# ऐतिहासिक पत्रव्यवहार

[ काव्येतिहाससंग्रह व भारतवर्ष यात पूर्वी प्रसिद्ध झालेल्या साधनांची पुनरावृत्ति व अवांतर नवीन भर ]



संपादक

गो. स. सरदेसाई

कृ. पां. कुलकर्णी

यादव माधव काळे





पुणें

सन १९३३ ] समर्थ भारत छापखाना [ किं. रु. ५

# प्रस्तावना

अलीकडे इतिहाससंशोधनाचा फैलाव होऊन पुष्कळ नवीन कागद प्रसिद्ध होत आहेत, तर चाळीस वर्षांपूर्वी छापलेले कित्येक महत्त्वाचे कागद दुर्मीळ झाल्यानें अभ्यासकांची फार गैरसोय होते. ती दूर करण्याचे उद्देशानें सुमारें तीन वर्षांपूर्वी काव्येतिहाससंग्रहांतील 'पत्रें–यादी' या ग्रंथाचें पुनर्मुद्रण केलें; त्याच वेळीं नागपूरकर भोसल्यांचे कागद व रा. ब. पारसनिसांनीं भारतवर्षांत छापलेल्या पत्रें–यादी व अखबार दिनचर्या याहि दुर्मिळ प्रकरणांची पुनरावृत्ति काढण्याचा संकल्प ठरला होता. तदनुसार प्रस्तुतचा हा साधनग्रंथ प्रसिद्ध करण्यांत येत आहे. या ग्रंथांत वरील दोन साधनांव्यतिरिक्त दुसरी आणखी महत्त्वाची नवीन भर पडल्यानें तोहि 'काव्येतिहाससंग्रह, पत्रें–यादी' एवढाच मोठा झाला आहे. कैक वर्षांपूर्वी कै. पारसनिसांना रामचंद्रबावाचीं कित्येक महत्त्वाचीं अस्सल पत्रें उपलब्ध झालीं. त्यांच्या नकला त्यांनीं सरदेसाई यांजकडे पाठविल्या. हीं पत्रें पारसनिसांना कोठून कशीं मिळालीं त्याचा थांग लागत नाहीं. तीं त्यांनीं स्वतः कोठें प्रसिद्ध केल्याचें आढळत नाहीं, किंवा तीं सातारा म्यूझियममध्येंही नाहींत. अशा स्थितींत तीं कायमचीं नष्ट होण्याचा संभव वाटून त्यांचा अंतर्भाव या पुस्तकांत मुद्दाम केला आहे. तसेंच पिलाजी जाधवाचीं कित्येक महत्त्वाचीं पत्रें बडोदें येथें सरदेसाई यांस मिळालीं. तीं अस्सलच भारत इतिहास सं. मंडळाकडे देण्यांत आलीं असून त्यांचाही समावेश वाचकांचे उपयोगासाठीं या पुस्तकांत केला आहे. शिवाय रा. वा. वि. जोशी हे कैक वर्षें सातान्यास संशोधन करीत होते, त्यांनीं कित्येक महत्त्वाचे कागद सरदेसाई यांजकडे पाठविले ते व असेंच दुसरे कित्येक कागद उपयुक्त वाटल्यावरून या ठिकाणीं प्रसिद्ध करण्यांत येत आहेत. आणखी एक इतिहासोद्योगी गृहस्थ श्री. भा. रा. भालेराव यांनीं कांहीं वर्षांपूर्वी 'मराठशाही बुडाल्याची मीमांसा' या नांवाचें एक लहानसें प्रकरण प्रसिद्ध केलें. त्यांत शिंदेहोळकरांचा मराठी युद्धाचे प्रसंगांतला महत्त्वाचा पत्रव्यवहार प्रसिद्ध केला होता. परंतु तेंहि प्रकरण आतां उपलब्ध नसल्यानें त्यांत गोवलेलीं पत्रें निराळीं काढून श्री. भालेरावांच्या परवानगीनें या पुस्तकांत संगतवार छापण्यांत आलीं आहेत. श्री. यादव माधव काळे यांस नागपूरकर भोसल्यांच्या कित्येक ऐतिहासिक कागदांच्या जुन्या तत्कालीन नकला उपलब्ध झाल्या त्यांपैकीं कित्येक त्यांनीं निवडून पाठविल्या, त्याहि यांत छापण्यांत आल्या आहेत. बहुतेक कागद कालक्रमानुसार जुळवून छापले आहेत. तथापि काळे यांजकडील कागद मागाहून हातीं आल्यानें ते शेवटीं पुरवणींत दाखल केले आहेत.

या पुरवणीच्या शेवटीं आणखी एक महत्त्वाचें ऐतिहासिक प्रकरण प्रसिद्ध करण्याचा योग जुळून आला याबद्दल आनंद वाटतो. हें प्रकरण म्हणजे सय्यद नुरुद्दीन हुसेनखान यानें सन १७७२त फारसींत लिहिलेलें नजीबुद्दौल्याचें चरित्र होय. हें दर पृष्ठास १२ ओळी प्रमाणें २३७ पृष्ठांचें चोपडें श्री. जदुनाथ सरकारांनीं ब्रिटिश म्यूझियममधून छायाचित्रानें नकलून आणिलें. त्याचें समग्र इंग्रजी भाषांतर ते अन्यत्र छापीत आहेत, त्यापैकीं पानिपतप्रसंगास अनुलक्षून असलेला सुमारें सहा वर्षांचा भाग तेवढाच येथें स्वीकारिला आहे. हा सय्यद नुरुद्दीन स. १७५० पासून दिल्लीच्या राजकारणांत वावरत असून त्यासच पुढें मॅलेटनें पुण्याचे रेसिडेन्सींत आपल्या हाताखालीं घेतलें. तो विद्वान्, बहुश्रुत व पानिपतचे राजकारणांत प्रत्यक्ष भाग घेणारा असल्यामुळें त्याचे लेखास काशीरायाचे बखरीइतकेंच किंबहुना जास्त महत्त्व यावें लागेल. सर जदुनाथांनीं हा भाग या ग्रंथांत समाविष्ट करण्याची परवानगी दिली याबद्दल त्यांचे आभार मानणें जरूर आहे. सर जदुनाथांच्या इंग्रजी तर्जुम्यावरून हें मराठी भाषांतर सरदेसाई यांनीं केलें आहे. नजीबखानाचे चरित्राचा अव्वलचा व अखेरचा अवशिष्ट भाग येथें घेतला नाहीं. तो केव्हां तरी मराठी वाचकांस अन्यत्र उपलब्ध होईलच.

अशा प्रकारें ठिकठिकाणीं विखुरलेल्या अनेक बहुमोल ऐतिहासिक साधनांचा हा ग्रंथ अभ्यासकांस विशेष आदरणीय वाटेल असा भरंवसा आहे. पेशवे दप्तरांतील कागदांप्रमाणेंच हेही कागद उच्च दर्जाचे आहेत; आणि अशा सर्व कागदांचा उपयोग करून आपल्या इतिहासांतील एक एक प्रकरण निरपवादपणें तयार करण्याचा काल आतां येत आहे. नागपूरकर भोसल्यांचा इतिहास तर समग्रच तयार व्हावयाचा आहे. मुख्यतः सन १८०३च्या युद्धानंतरची नागपुरची करुण कहाणी स्वतंत्रपणेंच लिहिली पाहिजे. त्यास उपयोगी पडणारें बरेंचसें साहित्य या पुस्तकांत सांपडेल व इंग्रजींतही कांहीं आहे. वाचकांच्या सोयीसाठीं नागपुरास कामावर असलेल्या इंग्रज रेसिडेंटांची संपूर्ण यादी त्यांच्या कालांसह पुढें स्वतंत्र दिली आहे.

काव्येतिहाससंग्रहांत छापलेले नागपूरकर भोसल्यांचे कागद व भारतवर्षांतील पत्रेंयादी यांच्या पुनर्मुद्रणाची परवानगी त्यांच्या विद्यमान मालकांनीं संतोषानें दिली याबद्दल संपादकमंडळ त्यांचे आभार मानीत आहे.

नागपूरकर भोसल्यांच्या कागदांच्या उपलब्धीसंबंधीं काव्येतिहास-संग्रहकार आपल्या प्रस्तावनेंत पुढीलप्रमाणें लिहितातः—“ आज आरंभिलेल्या नवीन सदराखालीं नागपूरकर भोंसल्यांविषयींचें कागदपत्र, तहनामे, यादी, सवाल जबाब, हिशेब, पत्रव्यवहार, सनदा इत्यादि अनेक लहानमोठ्या लेखांचा समावेश होईल. हे लेख आम्हांस एकाच ठिकाणीं मिळाले आहेत असें नाहीं. कांहीं लेखांच्या दोन दोन तीन तीन प्रतीहि मिळाल्या आहेत. त्यामुळें कित्येक दुर्बोध लेखांचा अर्थनिर्णय करण्यास चांगलें सुलभ साधन झालें आहे. शिवाय गिचमिड लिहिलेले मोडी लिपींतील लेख वाचतांना अक्षरें उमगण्याची जी अडचण

असते तीहि कांहीं अंशीं दूर होणार आहे. यांतील कित्येक लेख भोंसल्यांच्या पदरच्या कामदारांकडून व मानकऱ्यांकडून नागपूर येथील एका वजनदार गृहस्थानें मिळवून देण्याच्या कामीं आमच्या तेथील साहाय्यकर्त्यांस पुष्कळ मदत केली. या कामगिरीबद्दल आम्ही आपल्या त्या साहाय्यकर्त्या सन्मान्य गृहस्थांचे आभारी आहों. ( शके १८११ )"

'समर्थ भारत' छापखान्याचे उत्साही चालक श्री. स. रा. सरदेसाई यांनीं हें जोखमीचें काम अंगावर घेऊन सद्भावनेनें तडीस नेलें, हा मराठी इतिहासावर त्यांचा मोठा उपकार आहे. त्यास आपला भरपूर आश्रय देऊन वाचकांनीं त्यांस अनृणी केलें पाहिजे.

---

## The British Residents of Nagpur

1. Forster, 15.1.1788—5.1.1791 died.
2. Colebrooke, March 1799—May 1801.
3. Elphinstone, January 1804—24·1·1807.
4. Jenkins, 24.1.1807—29.12.1826.
5. Wilder, 12.4.1827—19.2.1830.
6. Grœme, 1830—1833.
7. Lt. Col. J. Briggs, 31.5.1834—1835.
8. Mr. R. Cavendish, 1835—13.11.1839.
9. Maj. Thomas Wilkinson, 13.11.1839—12.9.1844.
10. Col. A. Spiers, 1.12.1844—1847.
11. Capt. Ramsay, Jan. 1847—12.3.1849.
12. Mr. Davidson, 12.3.1849—August 1850.
13. Mr. Mansel, 1850—1854.
14. Capt. Elliot—Resident 4.3.1854, 1st British Commissioner after annexation 5,4.1854—November 1855.
15. G. Plowden, Novr. 1855—1860.

# दुरुस्ती

| पृष्ठांक | लेखांक | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २ | २ | विशाळड | विशाळगड |
| ४ | ४ | खेडसा | खेड सा |
| ८ | ६ | ३ | १३ |
| ३२ | ४४ अ. | ४२ | ४४अ |
| ३३ | ४४ ब | ४३ | ४४ब |
| ३३ | ४४ क | ४४ | ४४क |
| ३८ | ५१ | शंकर, | शंकर |
| ५५ | ७६ अ | ७६ | ७६ अ |
| ६२ | ८८ | राजममान्य | राजमान्य |
| ७० | ९२ | खरे | खैर |
| १०६ | १२७ | ११७ | १२७ |
| १११ | १३५ | कडेवर्ळाची | कडेवळीतची |
| ११६ | १४२ | षबार | पवार |
| १२३ | १५१ | १७९६ | १६९६ |
| १२७ | १५७ | Horuby | Hornby |

पृ. ३ टीप–शंकराजी नारायण सचिवाची मृत्युतारीख २६।१०।१७०७.

पृ. १६१ भा. व. १३ बद्दल भा. व. १–३ पाहिजे.

ले. ४३६–४४७ चे कागद शेवटीं पुरवणींत दिलेले कालक्रमानें मागें घेतले पाहिजेत.

---

# ऐतिहासिक पत्रव्यवहार

श्री

१ चैत्र व॥ ८ शके १६११

(भा. व. १-६०) ता॥ २२-३-१६९०

स्वस्ति राज्याभिषेक शके १६ प्रमोद नाम संवत्सरे चैत्र बहुल अष्टमी मंदवासरे राजमान्य राजश्री बाजी सर्ज्याराव जेधे देशमुख यांस राजआज्ञा अभय दिल्हें ऐसीजे. मा॥ रतनोजी शिंदे व शंकराजी ढोगे यांजबरोबरी किती एकनिष्ठपणाच्या गोष्टी सांगोन पाठविल्या, सांगितल्याप्रमाणें विदित जाल्या. त्यास हें महाराष्ट्र राज्य आहे. तुम्ही लोक या राज्याची पोटतिडीक धरितां तरी ते प्रान्तीं तितकें राजकारणें आहेत, चाळणा करून आपण जमाव करून सावधपणें राहोन स्वामिकार्य दृष्टीस पडेल ते मनास आणून हस्तगत करून ठेवणें. हुजूर लेहून पाठवणें, तेणेंप्रमाणें हुजरून विल्हे केली जाईल. या प्रान्तीं वर्तमान तर राजश्री छत्रपति स्वामी स्वारी करून कर्नाटक प्रान्तीं गेले-यावर तिकडे जमाव लष्कर चाळीस हजार व हशम एक लाख व पंचवीस हजार जमाव जाहला आहे. पुढेंही आणखी जमाव होतच आहे. ते प्रान्तींचे कुल पुंड पाळेगार तमाम येऊन भेटले आहेती. जमेती पोख्त जाली आहे. तूर्त पुढें राजश्री केसो त्रिमल या प्रान्तीं रवाना केले आहेती. त्यांबरोबर संगीन स्वार पंधरा हजार व हशम पंचवीस हजार देऊन रवाना केली आहे. तेही साखळ प्रान्तीं तुंगभद्रेच्या तीरास आले आहेत. खजिनाही एक लाख होन बराबर आहे. त्यास आणावयास राजश्री धनाजी जाधव, राजश्री सैताजी घोरपडे सेना-पंचसहश्री पाठविले आहेत. तेही आठ पंधरा दिवशीं येतील. ते आलियावरी तुमचीही सरं-जामी येथें मा॥ रतनोजी शिंदे, शंकराजी ढोगे यांहीं रदबदली केली त्याप्रों चालवूं. बि॥

| तैनाती सालीना होन | गांव |
|---|---|
| ५०० खासा | ४ इसाफती |
| ५०० मताजी जेधे | २ वेतनांत गांव |
| १००० | ६ |

सदरहूप्रों हजार होन तैनाती व गांव इसाफती व मोकासे मिळून सहा गांव कार्य-भाग जालिया देऊं. तरी तुम्ही आपली खातरनिशा राखोन स्वामींच्या पायाशीं एकनिष्ठता धरून स्वामिकार्य साध्य होय ते गोष्ट करणें. गनिमाचा हिसाब काय आहे? तुम्हीं लोक जेव्हां मनावरी धरितां तेव्हां गनीम तो काय आहे? गनीमसा तुम्हीं लौकिक केला आहे.

या राज्याची पोटतिडीक धरितां तेव्हां औरंगजेबाची हिसाब धरीत नाहीं. ऐसें बरें समजन लिहिल्याप्रमाणें वर्तणूक करणें. औरंगजेबानें महाराष्ट्र लोक आहेती त्यांस मुसलमान करावे असें केलें आहे. त्याप्रों मुसलमान केले, रा नतोजी व साबाजी घाटगे व जानोजी-राजे व कित्येक ब्राह्मणही या प्रान्तींचे बाटविले. पुढें मतलब केला आहे. तिकडून तमाम मराठे लोक होते ते आपला जमावानशीं आम्हांकडे येताती. हल्लीं राजश्री हणमंतराऊ निंबाळकर व सटवाजी निंबाळकर व माने व सरदार आले आहेती. पुढेंही कित्येक येताती. असे गनिमाचें लष्कर आपले हुजूर जमाव होत आहे. ईश्वर करितो तरी फतेच आहे. लिहिल्याप्रमाणें हिमती धरणें. जाणिजे छ० २० जाकर सुा तिसैन अलफ. +आज्ञाप्रमाण.

---

श्री

२ शके १६२३

(भा. व. १–५१) सन १७०२

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके २८ वृषनाम संवत्सरे ⁂ भृगुवासरे क्षत्रियकुलावंतस श्री राजा शिवछत्रपति यांणीं राजमान्य राजश्री प्रतापराव मोरे यांसीं आज्ञा केली ऐसीजे, तुम्हीं व राजश्री संताजी पांढरे फौजेनशीं मलकापुरानजीक औरंगजेबाची चौकी होती ते मारली, हें वर्तमान कळल्यावरी स्वामींनें तुम्हांस आज्ञापत्रें पाठविलीं आहेत तीं पाऊन वर्तमान कळलें. औरंगजेब विशाळगडास बिलगला याजकरितां त्याचे कबिला बाड मारून हमेशां गोटावर हल्ले करावे, तरीच तो बलकुबल राहतो. याजकरितां तुम्हीं व जे सरदार फौज घेऊन मुकाबला केला, आपले अवघे एकदिल होऊन औरंगजेबास जडून राहणें. तुम्हीं स्वामींचे एकनिष्ठ सेवक मायेचे विश्वासू आहां, तरीच या प्रसंगीं साहस करून मुख्य शत्रूच्या मुकाबल्यास आलेत, ये गोष्टीनें औरंगजेब दिक होऊन थोरच कार्य होऊं आलें. प्रस्तुत स्वामींचा मुकाम किल्ले प्रतापगडीं जाला आहे. बलकुबलीच्या प्रसंगास स्वामींचे तोलदार फौज असली पाहिजे. औरंगजेब गनीम दगेखोर आहे. कोणे समयीं काय विचार करील तोही कळत नाहीं. त्यास तुम्हीं बळकट फौजेनिशीं या तोंडें राहिले तरी त्याचे वस्तु चळवळ करवत नाहीं. आजीचे प्रसंगीं भरंवसा तुम्हां लोकांचा आहे, व स्वामींचे मायेचे आहां, याकरितां ये गोष्टीचें अगत्य धरून फौजेनशीं या तोंडें राहोन औरंगजेबाचा कबिला बाड मारून हैराण करणें. तो विशाळडचा ख्याल सोडी, तुम्हां लोकांच्या कीर्ति होऊन स्वामी समाधान पावेत ऐसी गोष्टी करणें. दूर प्रान्तें स्वारीस जाल तर हें तोंड सहजच मोकळें जाईल. म्हणजे औरंगजेब येखादी फौज या तोंडें पाठवावयास उशीर लावणार नाहीं. समयीं

---

+ मोर्तब चौकोनी, आंत अक्षरें ‘ मर्यादेयं विराजते. ’ सदरहू पत्र खंडो बल्लाळ चिटणीस याच्या हातचें सारें आहे. अस्सल जानोजी सर्ज्याराव जेधे देशमुख ताा भोर यांजपाशीं आहे.

स्वामीसमीप तुम्हांस यावया गांठ पडणार नाहीं, याकरितां अवरंगजेबास सोडून दुसरे [ कडे ] सर्वथा नच जाणें. समीपच राहोन स्वामी खुशाल या जागां रहात तें करणें. राज्य राखणें. तुमचे सेवेचा मजरा होय असी गोष्टी करणें. जाणिजे बहुत काय लिहिणें? मोर्तब असे.

---

श्री

३ ( नक्कल ) वैशाख व॥ ५ शके १६३०
( भा. व. १-३५) ता॥ २९-४-१७०८

स्वस्ति श्री राज्याभिषेक ३३ सर्वजितनाम+ संवत्सरे वैशाख वद्य पंचमी इंदुवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी यानीं समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री नारो शंकर पंडित सचिव यांस आज्ञा केली ऐसी जे. किल्ले वंदन येथील मुक्कामीं तुम्हांकडून राजश्री त्रिंबक शिवदेव मुतालिक सुरनिसी यांनीं येऊन विनंति केली कीं शंकराजी नारायण याणीं आंबवडियाचे मुक्कामीं देहविसर्जन केलें; नारो शंकर लहान, याजकरितां त्यांजकडे किल्ले कोट दौलत स्वामीची आहे, याचा बंदोबस्त हुजुरून व्हावा, दौलतीस कर्जवाम होऊन बहुत खराबींत आहे, म्हणून विनंति केली. ऐशियास शंकराजीपंत इमानी; आम्ही पादशहास हस्तगत होऊन त्याचे सैन्यांत होतो, तीर्थस्वरूप कैलासवासी काकासाहेब महालसुद्धां कर्नाटकप्रांती ( होते. अशा वेळीं ) इकडे राजश्री रामचंद्रपंतानीं सरदारांची सरबराई करून ठायींठायीं किल्लोंकिल्लीं लढाया देऊन कर्नाटकांत फौज रवाना करून तिकडील बंदोबस्त राखून गेले, किल्ले महामर्दीनें जातीनिशीं मेहेनत करून घेऊन स्वामीचें राज्य रक्षिलें. त्यांचे वंशाचे चालविणें स्वामीस बहुत अवश्यक. त्यांचा जिल्हा, मामला, वतनें व इनामगांव त्याप्रमाणें चालविले पाहिजेत. त्याजवरून हल्लीं स्वामी तुम्हांवर कृपाळू होऊन शंकराजी नारायण यांजकडे सुरनिशी चालत होती, मृत्यु पावले याजकरितां त्यांजकडून दूर करून तुम्हांस सुरनिशी अजरामरामत करार करून वस्त्रें बहुमान दिल्हा असे. तुम्हास जातीस तैनात सालीना बद्दल माजी होन १०००० दहा हजार करार केले असेत; याचे ऐवजीं तुम्हांकडे सरंजाम गांव चालत आहेत ते व इतलाख पावत आल्याप्रमाणें पावत जाईल; व वतनें, इनामगांव, पेशजीपासून चालत आल्याप्रमाणें तुम्हांस व तुमचें पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें चालविलें जाईल. जिल्हा, मामला, किल्लेकोट तुम्हांकडे आहेत त्याप्रमाणें करार करून दिले असेत. त्यास किल्लेकोटाचा खर्च व दरमहाचा ऐवज सालाबाद नेमणुकेप्रमाणें पाववीत जाणें. तुमचे जिल्ह्यांतील किल्लेकोट सुटतील ते तुम्हांकडे ठेविले जातील. पादशाहीचे लढायांमुळें तुम्हांस कर्जवाम झालें आहे, त्याचा निर्वाह झाला पाहिजे व तुमचे वडिलांनीं इमानें सेवा केली आहे. याजकरितां

---

+ शंकराजी पंत सचिव कार्तिक शु. ११ शके १६२९ रविवार ता.२६-१०-१७०७ रोजीं मरण पावला, सबब येथें राज्याभि० ३४ सर्वधारी संवत्सर पाहिजे.

स्वामींचें राज्य तोंवर तुमच्या जिल्हेमामल्याची वंशपरंपरेनें घालमेल होणार नाहीं. येविषयीं श्री शंभुमहादेव याची शफतपूर्वक आश्रय असे. तुम्ही इमानेंइतबारें यथान्यायें वडिलांचे वेळेस लोक स्वामिकार्यांस आले आहेत, त्यांचें व प्रजेचें पालग्रहण करीत जाणें. स्वामी तुमचे सेवेचें कर्तृत्व पाहून उत्तरोत्तर ऊर्जित करतील. जाणिजे, बहुत काय लिहिणें तरी सुज्ञ असा. मोर्तब. तेरिख १७ सफर सुा समान मया व अलफ

---

श्री

४
(ना. भो. ५०)

आश्विन व॥ १० शके १६३२
ताा ६-१०-१७१०

श्रीशाहू
नरपति हर्षनिधान
मोरेश्वरसुत भैरव[1]
प्रधान

श्रीशंकर
श्री शाहू छत्रपती
कृपानिधी प्रल्हादसुत
गदाधर[2] प्रतिनिधी.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३७ विकृतिसंवत्सरे आश्विन बहुल दशमी भृगुवासरे क्षत्रिय-कुलावतंस श्री राजा शाहू छत्र-पती स्वामी यांनीं राजश्री कान्होजी भोसले बिन परसोजी भोसलें यांस दिल्हे इनामपत्र ऐसेजे. तुम्हीं किल्ले सातारियाचे मुक्कामीं स्वामी सन्निधे येऊन विनंति केली जे, आपले पिते परसोजी भोसले यांचें स्मशानस्थल कृष्णावेण्यासंगमीं मौजे खेडसा जिल्हा पंवाई येथें आहे, तेथील पुष्पवाटिका व दिवाबत्ती [यांचे] ऊर्जेबद्दल मौजे मजकुरीं जमीन इनाम करून देविली पाहिजे म्हणोन विनंति केली; त्यावरून मनास आणन मशारनिल्हेनें स्वामींच्या राज्यांत बहुत दिवस एकनिष्ठपणें सेवा केली. त्यांचे स्मशानस्थलीं पुष्पवाटिका व दिवाबत्ती [यांची] ऊर्जा चालविणे अवश्यक. याबद्दल स्वामी कृपाळू बहू [होऊन ? तेथील पुष्पवाटिका व दिवाबत्ती [यांचे] ऊर्जेबद्दल मौजे मजकूर पैकीं पड जमीन कुल-बाव व कुलकानू खेरीज एकंदर जमीन चावर १ इनाम करून देऊन, सनद मौजे मज-कूरच्या मोकदमाचे नांवें आलाहिदा सादर केली असे; तेणेंप्रमाणें मोकदम मजकुरापासून सदर्हू जमीन चतुःसीमा करून रेखून घेऊन, वसाहत करून, तेथील उत्पनाचे ऐवजीं, धूप-दीपपुष्पादिक ऊर्जा चालविणें. सदर्हू इनाम साल दरसाल अविछिन्न स्वामी चालवितील. जाणिजे. लेखनालंकार.

---

१ प्रधान १७०८–१७१३.   २ प्रतिनिधि स. १७०८–११.

श्री

५ अधिक भाद्रपद व॥ ७ शके १६३३
( भा. व. १–५० अ) २४-८-१७११

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ३८ खर संवत्सरे अधिक भाद्रपद बहुल सप्तमी भृगुवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शिवछत्रपति यांणीं समस्तसेनाधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री जयसिंग जाधवराव सेनापति जफ्तनमुलूख यांस आज्ञा केली ऐसीजे. तुम्हीं विनंतीपत्र शुद्ध एकादशीचें पाठविलें तें काल षष्ठी गुरुवारीं प्रविष्ठ जाहलें. सारांश लिहिला कीं, आपली निष्ठा स्वामींच्या चरणीं, स्वामींची सेवा करावी आणि यशकीर्ति संपादावी. दुसरे राजश्री जाधवराव स्वामींच्या पायाव्यतिरिक्त दुसरें दैवत जाणत नव्हते. राज्यांत दुही निर्माण जाहली ते प्रसंगीं त्यांनीं प्रतिज्ञापुरःसर स्वामीसन्निध बोलोन स्वार जाहले, परंतु कालगतीनें सर्वांची बुद्धि एका प्रकारें जाहली. तन्मुळें त्यांचा हेतु पूर्ण करावा हें अंतःकरणीं धरून आजीपर्यंत याच मानी राहून राजश्री आप्पाजी थोरात, दमाजी थोरात, शहाजी निंबाळकर, संताजी पांढरे आदिकरून सामील करून घेऊन, शाहूनीं केल्या लोभाची आस्ता न धरितां, त्यासी वैमनस्य दर्शवून राजश्री परशराम पंडित प्रतिनिधि व राजश्री खंडेराव दाभाडे स्वामींच्या लोभाचे सेवक ह्या प्रसंगांत असावे, या अर्थे आपल्या समाधानास या उभयतांस पाठवणें म्हणोन मुद्दा सांगोन पाठविला. त्यावरून उभयतांस व राजश्री रामसिंग (मानसिंग) मोरे यांस शाहूनीं पाठवून दिल्हें. त्यांच्या व आपल्या भेटी जाहल्या. व राजश्री हैबतराव निंबाळकर सरलष्कर आले. यांचीही भेटी जाहली. तों अगोदर आपण व राजश्री थोरात, खंडेराव दाभाडे, संताजी पांढरे बसोन घाट घटला होता, तो सरलष्कर यांस सांगतांच त्यांचे चित्तीं हेंच होतें. मग हे व आम्हीं अवघे वर्तमान सरदार कटांत घेऊन राजश्री परशराम पंडित प्रतिनिधि यांस विचारांत घेतले. त्यास स्वामीची द्वाही फिरविली, खुशाली केली, आणि गडकिल्यांस आम्ही आपलीं व पंडित मशारनिल्हेचीं पत्रें पाठविलीं आहेत. याउपरी नीट सातारियाखाले चालोन जाऊन राज्यांतील दुही निःशेष करितां स्वामींनीं खुशाली केली पाहिजे म्हणोन हें वर्तमान विशदें लिहिलें, तें श्रवणगोचरें करून संतोषातिशय जाला. तो पत्रारूढ किती काय म्हणोन करावा! कार्यकर्तव्य पराक्रमी मायेचे हिंदुसेवक असावे ते तुम्हांसारखेच कृतकर्मे असावे. पूर्वोत्तर स्वामींचे कृपेचा अर्थ व राजश्री जाधवराव यांणीं कैलासवासी राजश्री स्वामींचे वेळेपासोन राज्याभिवृद्धीविषयीं केले श्रमसाहास व सांप्रत दुहीमुळें राज्याभिवृद्धीस जाला अपाय चित्तांत आणून पुढें स्वामींचें राज्य वृद्धीतें पावून यशकीर्ति संपादावी, हें मनीं धरून हें महत्कार्य सिद्धीतें पाववून जो अर्थ विषदें लिहिला तो उचित व यथार्थीच लिहिला; तरी तुम्ही दीर्घदृष्टेच आहां. हें राज्य समग्र तांब्राक्रांत जालें असतां कैलासवासी स्वामींनीं लहानापासून थोरास आपली माया लाऊन अवघियांवरी सदयत्वें कृपामृतवृद्धि करून दिनप्रतिदिनीं राज्य वृद्धिंगत पावविलें. ते प्रसंगीं कैलासवासी स्वामींचे संपूर्ण कृपेस पात्र

एक जाधवराव जाले, तें ते आपल्या कर्तृत्वावरी व हुकुमबारदारी एकनिष्ठेवरी जाले. राज्याभिवृद्धीविषयीं त्यांहीं कांहीं सामान्य कसाला श्रमसाहास केला नाहीं. जीविताची तमा न धरितां स्वामिकार्यीच तत्पर राहून, कैलासवासी स्वामींनीं जे समयीं हुकूम केला ते समयीं कर्नाटकांत फौजांनीं धावोन जाऊन कैलासवासी स्वामींस प्राप्त जालीं संकटें निरसन करून स्वामिगौरवाचें सुख त्यांहींच अनुभविलें व सेवाधर्मेकरून त्यांहींच कैलासवासी स्वामींस संतुष्टविलें, तेणें करून कैलासवासी स्वामींस मशारनिल्हेविना दुसरें प्रिय कीं प्राण [ कोणी ] होते असें नाहीं. सर्व प्रकारें कार्यास येतील हा भरवसा दृढ मनीं मानिला होता, तदनुरूपच रावमशारनिल्हेनीं स्वामींचे चरणीं चित्तालय करून औरंगजेबासारिखा मोठा शत्रु राज्यांत पसरला असतां, आपल्या शूरत्वाच्या व कर्तेपणाच्या योगें शत्रूचा हिसाब न धरितां राज्याच्या संरक्षणार्थ असाधारण कसाला केला, स्वामींच्या तपोबलप्रभावेंकरून शत्रु पराभव पावविल्याचें यश मशारनिल्हेस प्राप्त जाहलें. तदनंतर समुद्रवलयांकित अवनी मंडळ निःकंटक करून स्वामींचें शासन चालवावें, आणि कृतकार्य व्हावें हा हेतु रावमशारनिल्हेनीं धरून हुजूर येऊन मनसबा योजिला. तों दुहीचा प्रसंग प्राप्त जाहला. ते समयीं स्वामींस दुसरा कोणाचा भरंवसा होता कीं काय? दुही निःशेष करावी हे आंगेजणी रावमशारनिल्हेनीं करून प्रतिज्ञापुरःसर स्वामींचे सेवेशीं संतोषकारक व हौस जाणून स्वारहोऊन गेले. त्यास वैपरीत्य कालवशें व सर्व लोकांस एक प्रकारें मोह प्राप्त जाहला. तन्मुळें रावमशारनिल्हे कृतसंकल्पसिद्धीतें न पावले. त्यांचे पुत्र तुम्ही त्याचसारिखे कृतकर्मे आहां. तुम्हांवितिरिक्त त्यांचा संकल्प शेवटास नेणें आणखी कोण करूं पहातो? व दुहीमुळें राज्याभिवृद्धीस अपाय झाला, हा विचार मायेच्या सेविकाविना दुसरियाचे मनांत येऊं पहातो कीं काय? ज्यास यशकीर्ति संपादणें अगत्य त्यासच हा विचार. ते तुम्ही मायेचे यशकीर्त्यी दक्षित सेवक म्हणूनच हा दीर्घदृष्टीचा विचार तुमच्या चित्तांत आला, आणि रावसाहेब जाधवराव यांचा कृतसंकल्प दुही निःशेष करून समुद्रवलयांकित पृथ्वींत स्वामींचें शासन चालवून कृतकार्य व्हावेंचा होता तो सफल करावया उदित होऊन बुद्धिवैभवेंकरून समग्र सेना नानाप्रयत्नें व द्रव्यसाहित्येंकडून ज्याचे त्यापरी सजली जाऊन आपल्या विचारांत घेऊन, राजश्री परशराम पंडित प्रतिनिधि, व खंडेराव दाभाडे व मानसिंग मोरे यांस आपणाजवळी आणावयाचा विचार कल्पून त्यांस आणून एकाग्रतेनें संपूर्ण स्वामींचें राज्य स्वामींचे सेवेशीं तत्पर केलें, आणि आपलें कर्तेपण प्रगट करून जाधवरावांचा संकल्प सिद्धीतें पावविला, ही गोष्ट कांहीं सामान्य केली नाहीं. हे तुमची दीर्घदृष्टि व आंगेजणी व बुद्धीचें वैभव व शूरत्वाचा प्रसंग चित्तांत मनन करून पाहतां दुसरी साम्यता आहे असें नाहीं. अतएव स्वामींच्या राज्याचा अभिमान श्रीस संपूर्ण आहे व जाधवराव याणीं कैलासवासी स्वामींची सेवा त्रिकर्ण शुद्धीनें करून संपूर्ण कृपा संपादली होती; तद्योगें तुम्हांसारिखे बुद्धिप्रगल्भ, पराक्रमी पुत्र त्यांस होऊन स्वामींचे सेवेशीं तत्पर जाहले. हे कळून स्वामींनीं राज्यांतील दुही निःशेष मानून, संपूर्ण पृथ्वींत स्वामींचे शासन

चाललेंच असें मनांत आणून, तुमच्या भरोशानें स्वामी निश्चिन्त आहेत. तदनुरूपच तुम्ही सातारियाखाले येऊन निग्रह करावा आणि राज्यांतील दुही नाहींशी करावी, ऐशा विचारें फौजानिशीं येत आहां ती गोष्टीची त्वरा करून, योजिला मानस हा पराक्रमेंकडून अल्पकालें सिद्धीतें पाववून पुढें अनुपदेंकडून तांम्राक्रांत राज्य साधावें, एकाग्रता होय तें करणें आणि संतोषाचें वर्तमान हुजूर लिहून पाठविणें. स्वामींनीं खुशाली केली पाहिजे म्हणून तुम्ही हर्षेकरून लिहिलें तरी यापेक्षां दुसरा संतोष काय आहे ? तुमच्या विनंतिपत्राचा लेखनार्थ श्रवण होतांच स्वामींनीं तोफांचे आवाज करवून खुशाली कर्तव्य ते बहुत केली. राजश्री परशराम पंडित प्रतिनिधि यांस स्वामींच्या चरणावितिरिक्त दुसरा निजध्यास नाहीं. त्यांचे अंतरीं हाच मानस होता तो श्रीकृपें अविघ्नतेनें घडला; आणि त्यांणीं आपण एकरूप होऊन गड किल्लियांस पत्रें पाठविलीं. स्वामींनीं पंडित मशारनिल्हे स्वामींचे मायेचेच सेवक आहेत, स्वामींच्या राज्याभिवृद्धीविशीं त्यांहीं बहुत श्रम केले आहेत, अपायेंकरून त्यांस दगा झाला होता, तेंही राजश्री जाधवराव यांणींच त्यांचा अभिमान धरून संकटांतून रक्षिलें, त्यांमागें तुम्हीं त्यांस अंतर न दिल्हें. हा सविस्तर प्रसंग तुमचे मायेचा पंडित-मशारनिल्हे यांनीं हुजूर लिहिला होता, तदनुरूप स्वामींनीं त्यांस समाधानयुक्त पत्र विस्तारें पाठविलें आहे. गड किल्लेयांस त्यांहीं तुम्हीं पत्रें पाठविलीं, ही गोष्ट उत्तम केली. ते तुम्ही अखत्यारीच सेवक आहां. पुढेंही ज्यास जें लिहिणें तें लिहिणें. तें लिहून समस्त स्वामींच्या पायांशीं एकनिष्ठेनें वर्तन तें करणें. स्वामींनींही हुजरून गडकिल्लियांस व हशम लोकांस पत्रें पाठविलीं आहेत. राजश्री हैबतराव निंबाळकर सरलष्कर यांची चित्तवृत्ति स्वामींचे चरणीं सदृढ आहे. स्वामींनीं मशारनिल्हेस समाधानपत्र पाठविलें पाहिजे, म्हणून तरी त्यांचे बाप राजश्री हणमंतराव होते त्यांणीं कैलासवासी स्वामींचे वेळेपासून त्यांची व स्वामींची सेवा निष्ठेनें करून स्वामींची कृपा बहुतच संपादून घेतली होती हें प्रसिद्ध आहे. त्यांमागें मशारनिल्हे यांनींही आपली माया स्वामींस बहुतच लाविली आहे. त्यांचें सर्व प्रकारें स्वामींस अगत्य आहे. हल्लीं तुमच्या लिहिण्यावरून स्वामींनीं त्यांस समाधानपत्र सादर केलें आहे. राजश्री रावजी थोरात, व खंडेराव दाभाडे, संताजी पांढरे यांणीं ये प्रसंगीं बहुतच कसाला करून कार्याची प्रघटना केली; यांस समाधानपत्रें पाठवावीं, स्वामी धनी आहेत म्हणोन तरी मशारनिल्हेनीं सेवाधर्मासहित उत्तमपणास योग्य तोच प्रसंग चित्तीं धरून, तुमच्या चित्ताचे ठायीं एकरूप होऊन महत्कार्य संपादिलें, येणेंकरून स्वामी त्यावरी संतुष्ट आहेत. त्यांचींही विनंतीपत्रें हुजूर आलीं होतीं. त्यांनीं तुमच्या कर्तव्याचा प्रसंग बहुतच विशदें लिहिला आहे. तरी ते सेवक लोभ करून चालवावे असेच आहेत. स्वामींनीं त्यांस चित्तानुरूप समाधानपत्रें पाठविलीं आहेत. वरकडही तुमच्या लिहिण्याप्रमाणें राजश्री मानसिंग मोरे, राजश्री शहाजी निंबाळकर, हणगोजी नाईक निंबाळकर व मरिजी (केरोजी ?) पवार आदिकरून कुलसरदारांस समाधानपत्रें व नावांस जागेवून पत्रें पाठवावीं, आज्ञा केली पाहिजे म्हणोन लिहिलें, त्याप्रमाणें समाधानपत्रें पाठविलीं आहेत. समस्तांस

देऊन दिलासे करणें. अतःपर कोणी सेवक लोकीं विलक्षण कालगतीकरून घडोन आल्या आचरणाचा संशय मनांत आणावा असें नाहीं. मध्यें कांहीं दिवस कालाची कुटिल गति होती. अन्यथा तुम्हांसारिख्या सेवक लोकांस आणि स्वामींच्या पायांचा वियोग होणें होता कीं काय? याकरितां स्वामींच्या चित्तीं कोणा एकाचें वैषम्य कीं संदेह नाहीं. अवघ्यांही तुमच्या विचारें स्वामिकार्याची आंगेजणीकरून कार्यसिद्धि करावी, अशीच स्वामींनीं अवघियांस आज्ञापत्रीं आज्ञा केली आहे. या उपरीं शीघ्रतेनें चित्तानुरूप स्वामिकार्य सिद्धीतें पाववून संतोषाचें वर्तमान लिहून पाठविणें. तुम्ही वंशजपणास जे गोष्टी योग्य तेच गोष्टी संपादून कीर्तीस पात्र जालां. सर्व गोष्टीनें मातोश्री साहेब व स्वामीही बहुत संतोषी जाहले. या उपरीं दुसरें जें कर्तव्य तुम्हीं लिहिलें तें निःशेष करून, स्वामिसंतोषाचें वर्तमान लिहून पाठवून द्यावें. बहुत काय लिहिणें तरी तुम्हीं सुज्ञ असा. [ मोर्तब असे. ]

———

श्री

६ शके १६४०
( भा. व. १-४० ) सन १७१८?

यादी मतलब करून घेणें.

स्वराज्य थोरले कैलासवासी स्वामींचेप्रमाणें रायगड व वरकड गडकोट देखील करून घेणें.

ठाणीं मागोन घेणें.

१ खटाव
१ आकलुज
१ कासेगांव
१ सांगोलें
१ मंगळवेढें
१ नाझरें
१ मिरज ( बेळगाव )
१ चाकण
१ पेडगांव
१ बालेगड
१ जुन्नर समेत किल्ले
१ कल्याण भिवंडी समेत किल्ले
१ चेउल समेत किल्ले

चंदी प्रान्तीचें राज्य गडकोट देखील करून घेणें.

मातोश्री व मर्दानासिंग देखील कदीम व दुर्गाबाई, जानकीबाई व सेवक लोक मागोन घेणें.

पेशजी मतलब लिहून दिले आहेत, त्याचे फर्मान सनदा करून घेणें.

कोंकणपट्टी देखील राजपुरी चौथ व सरदेशमुखी, स्वराज्य व वरकड साधेल त्याचे फर्मान पृथक कोरें ( पृथकाकारें ) करून घेणें.

तालुके दर संस्थानी करून घेतला त्याची चौथाई करून घेणें.

नबाब बाकी(बलोल) खानाची दौलत फत्तेसिंग बाबाचे नांवें करून घेणें.

चांदाचें राज्य कान्होजी भोंसले यांणी साधिलें आहे, तें स्वराज्यांत करून घेणें.

सरदेशमुखी इनाम दर महालास एक गांव करून घेणें.

जैसिंग पालकर येतील तरी मागोन घेणें.

त्रिंबक मागोन घेणें.

सांभाळून (सहासुभे)याखेरीज गुजराथ माळवा साधेल तेथवर साधणें.

येणेंप्रमाणें खामखाय करून घेणें. बहुत लिहिणें तरी सुज्ञ असा. मोर्तब असे.[1]

---

श्री

७ चैत्र शुा ३ शके १६४३

( ना. भो. ८ ) २८-३-१७२३

रघोजी भोसले ऊर्फ बाबासाहेब यांजला शाहूमहाराजांनीं सेनासाहेबसुभ्याच पद व शिके कटार वस्त्रें वगैरे मरतबा दिला ते वेळेस रघोजी भोसले यांणीं महाराजांस विनंती केली कीं, आम्ही कर्नाटकचे मोहिमेवर गेलों होतों, तिकडेस एका महापुरुषानें आम्हांस श्री रामचंद्र स्वामीची मूर्ति प्रसाद दिली. त्या वेळेस त्या सत्पुरुषाची वाणी झाली कीं या मूर्तीची आराधना करून सेवा करणें म्हणजे तुमचे कल्याण होईल व देवाची पताकाही आम्हांजवळ आहे. या योगानें महाराज कृपावंत होऊन हें पद ते दिवसापासून दिलें. त्यास आमचे मनांत वासना आहे कीं श्री रामचंद्राचे नांवानें झेंडा उभारून चालवावा; याविषयीं महाराजांची आज्ञा असावी. यावरून महाराजांनीं आज्ञा केली, कीं आम्हीही रामभक्तच आहों व आमचा झेंडा भगवा रामदास स्वामींचाच आहे. त्यास तुम्हीही भगवा झेंडा करून जरीचा पटका येथील प्रमाणें लावावा, व हा सरदाराचा शिरस्ताही आहे कीं जयाचा झेंडा करावा. हें समजून महाराजांनीं कृपावंत होऊन सदरीं लिहिल्याप्रमाणें आज्ञा करून विडे दिले. त्या हुकमाप्रमाणेंच तेथेंच जरी पटका तयार करून समागमें घेऊन वर प्रांतीं आले.

---

श्री

८ मार्गशीर्ष शुा शके १६४६

( भा. व. १-४३ ) ५-११-१७२४

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५१ क्रोधीनाम संवत्सरे मार्गशीर्ष शुद्ध १ प्रतिपदा गुरुवासरे क्षात्रियकुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी यांनीं समस्त राजकार्यधुरंधर विश्वास-

---

१ चिटणीसकृत शा. म. चरित्र पृ. ३८ वर हींच कलमें आहेत.

+ सेनासाहेबसुभापद ताा २८-३-१७२३ रोजीं मिळालें पहा, ना. ब. पृ. ३२

राजमान्य राजश्री बाजीराव पंडित प्रधान याशीं आज्ञा केली ऐसीजे. राजश्री * राघोजीराव देशमुख साहेब दौलताबाद हे मुबारजखान याचे युद्धीं पडलें. त्यांचे पुत्र राजश्री मानसिंग जाधवराव आहेत. ऐशास ते स्वामीचे भाचे होत. त्यांचें राजश्रीस आगत्य आहे. आणि त्याविषयीं लोकांची साह्यता करावी उचित आहे. करितां हें आज्ञापत्र सादर केलें आहे. तरी तुम्ही नबाबास विनंति करून त्याचें बापाची मनसबा व जहागिरदारी त्यास बहाल होय ती गोष्टी करणें. यत्नें प्रयत्नें करून त्याची उभारणी होय ती गोष्ट करणें. बहुत लिहिणें तरी सूज्ञ असा. मोर्तब असे.

---

श्री

९

( ना. भो. ९ )

शके १६५०
सन १७२८ ?

सकळगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री राघोजी भोसले सेनासाहेबसुभा

सेवेशीं फत्तेसिंग भोसले रामराम विनंती उपरी. तुह्मी आपल्या समागमें फौजेनें शिकस्त मेहनत केली. तुमचे पदरीं फौजेस सरंजाम बेगमीचा नाहीं. याजकरितां तुम्हांस सरंजाम देऊं केला बितपशीलः-राजश्री कान्होजी भोसले राज्यांतून गेले. यांचे लेक राजश्री रायाजी भोसले †असलईत पुरातन सरंजाम राजश्री परसोजी भोसले याचे वेळेस जो होता, तो दरोबस्त स्वस्थान देखील करून देऊं; खेरीज माळवा, सुपें, बारामती व दहीगांव महाल तीन मोकासे करून देऊं. येणेंप्रमाणें कलमें दोन तुम्हांस देऊं केली आहेत; राजश्री स्वामींचें दर्शन झाल्यावर करून देऊं. अंतर होणार नाहीं. राजेश्री स्वामींस अर्ज करून देववूं. यास अंतर करूं तरी, स्वामींचे पायांची शपत असे. देशमुखी कडेवळितची राजपत्र करून देववूं हे विनंति.

---

*हा राघोजीराव देशमुख ह्मणजे शिंदखेडकर लुकजी जाधवरावाचा वंशज, जगदेवराव याचा पुत्र. राघोजीस राजारामाची कन्या अंबिकाबाई दिली होती, तिचा पुत्र मानसिंग मुबारीजखान याची व निजामुलमुल्कची लढाई साकरखेडीं येथें ता. १३-१०-१७२४ रोजीं झाली त्यांत राघोजी हा मुबारीजखानातर्फे होता, तो या लढाईंत पडला. निजामाचा जय झाला. तेव्हां राघोजीची बायको मुलगा मानसिंग यास घेऊन साताऱ्यास शाहूच्या आश्रयास राहिली, त्या वेळचें हें पत्र. हा मानसिंग ऊर्फ बाबजी पुढें ताराबाईच्या पक्षाचा होता. ( काळेकृत वऱ्हाडचा इतिहास, पृ. १५१ व ३३१ पहा )

† असल वंशांतला

श्री

**१०**

( भा. व, १-७८.)

शके १६५०

सन १७२८ ?

यादीदास्त छ २९ जाावल कानोजी आंगरे यांचे स्वाधीन किल्ले आहेत.

**जंजिरे**

१ जंजिरे सयदेरी.
१ जंजिरे कुलाबा.
१ जंजिरे सुवर्णदुर्ग
१ जंजिरे विजयदुर्ग
१ किल्ले जयगड.

५

१ किल्ले देवगड
१ जंजिरे कजला दुर्ग
१ किल्ले फत्तेगड
१ किल्ले अवचित-
गड गोवें
१ येशवंत दुर्ग

५

१०

**किल्ले**

१ रसाळगड
१ बहिरवगड
१ कोथळा
१ बिकटगड
१ माणिकगड
१ मृगगड
१ सागरगड
१ श्रीवर्धन

८

१ पालगड व
रामदुर्ग
१ गड खारेपाटण
१ रामदुर्ग
१ गड राजापुर
१ कोट आंबेड
१ गड साटवली
१ गड कोलधे
१ मनरजन

८

१६

---

श्री

**११**

( अप्र० जाधव संग्रह )

आश्विन शुा १२ शके १६५०

ता. ३-१०-१७२८

राजेश्री पिलाजी जाधवराव गोसावी यासी

छ अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेहांकित चिमणाजी बलाळ आसीरवाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणें विशेष. तुम्ही पत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. विजयादशमीचे दिवशीं कबिलासहवर्तमानें वाघोलीस गेलों म्हणोन लिहिलें तें कळलें. एसियास वाघोलीस गेले उत्तम केलें. वरकड राजेश्री यांनीं लिहिलें आहे त्यावरुन कळेल. जाणिजे छ १० रबिलावल बहूत काय लिहिणें? ( लेखन सीमा ) ( शेवटीं बाजीरावाचा वाटोळा शिक्का आहे. )

---

श्री

१२ शके १६५२

( भा. व. १-४९ ) सन १७३०

कित्ता परगणे यादी परगणे प्रांत गुजराथ

| | | |
|---|---|---|
| १ पेटलाद | १ ढवलके ( ढोलका ? ) | १ धुंधुके |
| १ बरिये | १ महमदाबाद | १ मातर |
| १ नडियाद | १ माधे | १ बडा सिनोर |
| १ लाद व्हाद (?) | १ थाबाळे | १ वासीरे |
| १ बिरपूर | १ कमालवाडा | १ पराटी |
| १ खराळी | १ इनामपूर | १ कडी |
| १ अमदानगर | १ बिसननगर | १ वडनगर |
| १ इडू | १ मोडासें | १ पाटण |
| १ खालणपूर | १ सिदपूर | १ दाता |
| १ रांजणपूर | १ समीमजपूर | १ हवेली हमदाबाद |
| १ बिरमगांव | १ छयाला | १ मानपूर मगोडी |
| १ कसबे उमरट | १ विज्यापूर | १ |

३६

**खाजगीकडे महाल**

| | | |
|---|---|---|
| १ भडोच | १ खंबायत | १ राजपिंपळे. |
| १ अंकलेश्वर संमत मांडवी शहर | १ कसबे नवसरी | १ घोगे सरकार सोरटे |

६

कित्ता परगणे

| | | |
|---|---|---|
| १ जंबूसर | १ बडोदें | १ सावली |
| १ चवरासी | १ बनांळ | १ कामेल |
| १ गोखरे | १ सावखेडे | १ बहादरपुरा |
| १ सोनारे | १ डभई | १ [illegible]र्याद |
| १ तलकवाडा | १ केवरवाडा | १ छत्री |
| १ सूत | १ कसबे चापनेर | १ कोरल कसबा |
| १ सरकारमर्दात | | |

१९

प्रांत सुरत

| | | |
|---|---|---|
| १ हवेली सुरत | १ नवसरी | १ घनपिरी |
| १ चिखली | १ बरवाड | १ कुंभारी |
| १ माहा | १ बसोंड | १ ह्रोंकाडे |
| १ उरपाड | १ दिगंज | १ वसराई |
| १ कटोरे | १ तडकेसर | १ गळे |
| १ कडोप | १ बलेसरी | १ अनावल |
| १ प्युतसरी | १ पारच्योर | १ खडकेबखरे |
| १ शहर मांडवी | १ वासदे | १ रामनगर |
| १ राजपिंपळे | १ टेलमेडे | १ आमस्त्रे |

२८

श्री

१३ शके १६५२
(भा. व. १-५२ ) सन १७३०

श्रीमंत सकल तीर्थस्वरूप राजश्रिया विराजमान्य राजश्री शाहूराजे दाजी वडिलांचे सेवेशीं अपत्यें संभाजीराजे कृतानेक दंडवत विनंती उपरी. येथील कुशल श्रीकृपें व वडिलांचे आशीर्वादें जाणोन वडिलीं आशीर्वादपत्रीं कुशलवर्तमान सदैव लेखन करून समाधान पावविलें पाहिजे विशेष. वडिलीं आशीर्वादपत्र पाठविलें तें उत्तम समयीं प्रविष्ट जाहलें. कुशलवृत्त अवगत होऊन संतोषावाप्ति जाली. निरंतर याच रीतीं परामर्ष करणें वडिलांस उचित आहे. तीर्थस्वरूप मातोश्री साहेबीं वडिलांचे ममतेचा अर्थ व उभयपक्षीं स्नेहाची दृढता होऊन विवेक व्हावा म्हणून वडिलांचा चित्ताभिप्राय लिहिला, तरी हे गोष्टी वडिलांस उचितच आहे. परस्परें विवेक होऊन लोकोत्तर उभयपक्षीं निर्दोष ( ? ) कीर्ति व्हावी हेंच आम्हांस अगत्य आहे. या अगोदरच मातुश्री साहेबीं राजश्री बावाजी प्रभु यांसी पाठवावयाविशीं लिहिलें होतें, तेव्हांच पाठवावें तरी त्यांचे शरीरीं सावकाश नव्हतें. प्रस्तुत मशारनिल्हेस पाठविलें आहे. सेवेसीं आलियानंतर सविस्तर अर्थ विदित करतील. बहुत लिहिणें तरी वडील सुज्ञ असेंत. ( मोहर असे. )

श्री

१४ शके १६५२
( भा. व. १-५४) सन १७३०

श्रीमन्महाराज राज्याधिराज क्षत्रियकुलावतंस राजश्री छत्रपति स्वामींचे सेवेसीं प्रार्थना सेवक भगवंतराव रामचंद्र कृतानेक विज्ञापना. येथील वर्तमान तागाईत वैशाख

मासपर्यंत सेवकाचें व स्थलाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. सेवकाच्या चित्ताचा हेतु ऐसा आहे जे साहेबांची सेवा करावी. पूर्वी वडिलांनीं सेवा केली होती, परंतु कालवैपरीत्यें किल्ले प्रसिद्धगडचे मुक्कामीं साहेबांचे सेवेसीं वडिलांपासून अंतर पडलें. या राज्यांत वडिलीं जीवाभ्य श्रमसाहास केले. आलीकडे नूतन प्रसंगांत विशेष श्रमेंकरून सेवा केली. वडिलांचा परिणाम यथाकालानुसार लागोन गेला. आलीकडे वडिलांमाघारें यथाकालानुसार सेवा या राज्यांत केली, परंतु सार्थक नाहीं. दरबारीं क्षुद्रमाणसांचा पर्वकाळ जाला आहे. यास्तव सेवकाचें मन उद्विग्न झालें आहे. साहेबांच्या पायाजवळीं सेवा करावी हे इच्छा धरली आहे. साहेबीं दया करून सदयता अंतःकरणें साभिमानपुरःसर बहुमानपूर्वक सेवकाचे हातून सेवा घेतली तरी सेवक हजीर आहे. कितेक वृत्त सेवेसी विदित करितां श्रुत होईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

श्री

१५ शके १६५२

( भा. व. १–५३ ) सन १७३०

श्रीमंत सकल तीर्थस्वरूप राजश्री दाजीसाहेब वडिलांचे सेवेशीं, अपत्यें संभाजीराजे कृतानेक दंडवत विनंती उपरी. येथील कुशल वडिलांचे आशीर्वादें जाणोन निरंतर आशीर्वाद-पत्र पाठवून परामर्ष केला पाहिजे विशेष. आशीर्वादपत्र पाठविलें तें व ममतापुरस्कर वस्त्रें व तरवार ढाल आदिकरून जिन्नस पाठविला तो अशेष यादीप्रमाणें प्रविष्ट जाला. त्याचे अवलोकनें व पत्रीं कितेक ममतातिशय अर्थ लेखन केला. तत्–श्रवणें वडिलांचे अंतः-करणपूर्वक लोभाचा विस्तार राजश्री बावाजी प्रभु यांणीं सविशद लिहिला. तत्श्रवणें संतो-षाच्या कोटी जाहल्या. तो विस्तार पत्रीं किती म्हणोन लिहावा? वस्त्रादि जें पाठविलें तें परम प्रसाद असें जाणोन घेतलें. श्रीमन्मातुश्री आईसाहेब आली तें वर्तमान लिहावयासी अवकाशावरी पडलें, त्याचें कारण लिहिलें तेंही अवगत जालें. तुम्हांपेक्षां अधिकोत्तर इतर तें काय आहे! तुमचा परामर्ष न करावा असें नाहीं, म्हणोन लिहिलें तरी हे गोष्टी यथार्थच आहे. वडिलांचें निर्व्याज वात्सल्य तैसेंच आहे. आम्हांसही वडिलांपेक्षां इतर दैवत तें काय आहे? वडिलीं वरचेवर याच रीतीं सांभाळ करावा हेंच वडिलांसही विहित. ये गोष्टीस वडिलांपासून अन्यथा काय निमित्त होईल? बावाजी प्रभु* यांणीं तुमचा चित्ता-भिप्राय सविस्तर निवेदन केला, त्यासी राजश्री सुलतांनजीराव निंबाळकर आलियावर यांसी जे आज्ञा कर्तव्य तें केलें जाईल म्हणोन लिहिलें, तरी वडील आम्हांस पितृस्थानीं. आमचा मनोरथ सिद्धि करून आम्हांस संतोष पावावा, आमचा सर्व प्रकारें सांभाळ करावा, हेंच वडिलांस विहित आणि कीर्तिरूप आहे, हा अर्थ वडील सर्वज्ञ वडिलांस अनवगतसा काय

---

* बावाजी निळकंठ प्रभु पारसनीस.

आहे! तेच गोष्टीची प्रतीक्षा करीत आहें. वडिलांस उचित तें वडील करतीलच. बहुत लिहिणें तरी वडील सुज्ञ असेती. ( मोहर असे. )

---

श्री

१६ जेष्ठ १६५५
( भा. व. १–७७ ) मे १७३३

राजमान्य राजश्री चिमणाजी बल्लाळ यांस आज्ञा केली ऐसीजे, बाणकोट जागा स्वामींनीं तुमचे स्वाधीन केला आहे. तेथील बेगमी करणें ती तुम्हांसच करावी लागते. याजकरितां पर्जन्यकाळ समीप आला आहे. पाऊस पडों लागल्यावर तेथें दाणागल्ला पावतो ऐसें नाहीं. तर दाणागल्ला आदिकरून बेगमी करणें उघड आहे तों आधींपासून जागा सामान फार करणें. लोकांचे मोबदले करून पाठवणें. पर्जन्यांत फौजेचा टिकाव होणार नाहीं, याजकरितां नेहमीं जे ठेवावयाचे ते दोनशें राऊत ठेऊन वरकड फौज वरती आणवणें. जें करणें तें बहुत शिताबीनें करणें. तुम्हांकरितां त्या जाग्याविशीं स्वामी निश्चिंत असेत. जेणेंकरून स्थलांची मजबुदी होऊन स्वामींची जागा जतन होय तें करणें. येविशींचा सविस्तरार्थ राजश्री अमृतराव लिहितील त्याजवरून कळेल. सुज्ञ असो.

---

श्री

१७ ज्येष्ठ शके १६५५
(भा. व. १–३८) मे १७३३

राजमान्य राजश्री चिमणाजी बल्लाळ यांसी आज्ञा केली ऐसीजे, तुम्हीं विनंतीपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. लेखनार्थ अक्षरशः अवगत जाहला. स्वामींनीं आमचे गळां नेहमीं चहूलक्षांचा खर्च बांधला आहे, आणखी राऊत पाठवावयाची आज्ञा होते, हेंच अपूर्व, हे किल्ले कोणाचे स्वाधीन करणें ते करावे म्हणजे तळें घोंसाळ्यास राऊत पाठविले आहेत तेच तिकडे रवाना करूं म्हणोन विशदें लिहिलें, ऐसियास तुम्ही स्वामींचे येखत्यारी सेवक. राज्यांतील स्थळें जतन करून राज्याभिवृद्धि करावी हाच तुमचा सेवाधर्म. त्याप्रमाणें तुम्हीही करीत आहां. पुढेंही सर्वप्रकारें स्वामींस तुमचाच भरंवसा आहे. किल्ले कोणाचे स्वाधीन करणें ते करावे म्हणोन लिहितां हेंच अपूर्व. तुम्हांसारिखे कर्ते सेवक स्वामींचे पदरीं असतां दुसरा जतन करणारा कोण? किल्लेकोट जतन करून स्वामींचें राज्य संरक्षण करावें असेंच पद तुमचें आहे. सात किल्ले ते काय आहेत? त्यांचें संरक्षण करून गनीमास शासन तुम्हांसच करावें लागतें. गोवळकोटचे मसलतीस राऊत तुम्हांकडील आलेच पाहिजेत. पर्यायानें लिहिल्यानें स्वामींची निशा होत नाहीं. तुम्हीं लोकीं असें लिहावें हें तुम्हांस उचित नाहीं. यास्तव हल्लीं हें आज्ञापत्र सादर केलें आहे. तरी पत्रदर्शनीं राउतांची रवानगी करणें. याविषयीं अंतर सहसा न करणें. सुज्ञ असा.

---

१ हीं शाहूचीं हस्ताक्षरें.

श्री

१८ आषाढ व॥ १ शके १६५५
( भा. व. १-६५ ) १६-७-३३

पुरवणी श्रीमंत राजश्री राऊ स्वामींचे शेवेसी विनंती उपरी. राजश्री आनंदराव सुमंत यांचीं पत्रें काल छ १५ सफरीं संध्याकाळीं आलीं, त्यांत लिहिलें आहे जे, येक हबसी अंजनवेलीहून रोज संगम ( ? ) तेथून नबाबाकडे येऊन नबाबास सविस्तर वर्तमान सांगितलें. राजपुरी खोकरी कौल देऊन लुटली. बाहेर खानजादा आहे त्याची स्थापना करूं म्हणतात. परंतु वरचेवर स्थळें घेतलीं. राहिलीं स्थळें कांहीं त्यास येतात असें नाहीं, आपण जबरदस्तीनें राखीतच आहां. नबाबांनीं मात्र आपली कुमक करावी. पादशाही जागे आहेत. असें बहुत कांहीं सांगितलें, त्याजवरून नबाबांनीं आजुर्देपणें भाषण केलें. बिघाड करावा असें चित्तीं आहे. आणखी दुसरा विचार आपला येक मनुष्य बरोबर देऊन राजश्री स्वामींकडे पाठवावा, आणि जीं स्थळें घेतलीं तीं घेतलीं; राहिलीं स्थळें तितकीं हबशी याजकडे करार करून तहरह करून घ्यावा. खानजादा जंजिरियांत बसविला आहे. त्याची स्थापना करावी. बाहेर आहे त्याचा दुराग्रह न करावा. चेऊल स्वाधीन करावें. ऐसीही नबाबाची बोली आहे म्हणोन पत्रें आलीं. त्यास त्याचा जाला मजकूर [ ऐकून ] घेऊन येणें म्हणोन उत्तरें गेलीं आहेत, विदित व्हावें म्हणून लिहिलें असे. जंजिरियांत खानजादा आहे, त्यास त्याचे नावें पादशाई फर्माना जाहला आहे. याकरितां त्याची स्थापना करावी हें नबाबाचें मानस आहे म्हणून लिहिलें आहे. पुढें येईल वर्तमान तें लिहून पाठवूं. कृपा केली पाहिजे हे विनंती.

---

श्री

१९ चैत्र-जेष्ठ शके १६५५
( भा. व. १-६६ ) मार्च-मे सन १७३३

पुरवणी श्रीमंत राजश्री राव व राजश्री आपा स्वामींचे शेवेसी उपरी. मंडणगड बाणकोटास आश्रा आहे. कोंकणांतील मुलूख राजश्री स्वामींनीं हुजूर ठेविला आहे. तरी सरखेलास लिहून राजश्री जिउबास सांगोन पाठवून मंडणगड हुजूर ठेवावा, मग ज्याचे स्वाधीन करावयाचे त्याचे करावा म्हणून लिहिलें, तरी सेखोजी आंगरे यांची रीत येक प्रकाराची आहे. केवळ राजआज्ञा ते प्रमाण करील हें दुरापास्त. कार्य न होतां लाभापरीस भाल्याची (?) आहे, इतकें मात्र बोलोन घ्यावेंसें होईल. विदित व्हावें. कृपा केली पाहिजे हे विनंती.

---

श्री

२० वै. शु० २ शके १६५६
( भा. व. १-७० ) २४-४-१७३४

राजमान्य राजश्री जिवाजी खंडेराव चिटणीस यांसी आज्ञा केली ऐसीजे. तुम्हीं विनंती केली कीं, पूर्वीं कैलासवासी महाराज याजपाशीं आपले वडिलांनीं सेवा एकनिष्ठेनें केली. त्याजवरून कृपाळु होऊन स्वामी संपूर्ण राज्यांतील सरकारकून व सरदार व किल्ले-कोट ठाणीं व जंजिरे येथील चिटणिशा व कारखानिशा व जमेनिशा हे तिन्ही धंदे वंश-परंपरेनें करार करून देऊन शपथपूर्वक वचन दिल्हें त्याप्रमाणें चालत आहे, व महाराजांसही अवगत आहेत. त्याजप्रमाणें येविशीं स्वामींचेंही अभयपत्र असावें, त्याजवरून पूर्वींपासून तुमचे वडिलांनीं सेवा बहुत केली, व ×कैलासवासी महाराजांनीं शपथपूर्वक सदर्हू तिन्ही धंदे वंशपरंपरेनें दिल्हे ते करार असेत. तरी सेवा तिन्ही धंद्यांची करीत जाणें. जाणिजे. छ १ जिल्हेज सु॥ आर्बा सल्लासीन. कैलासवासी महाराज तुमचे वडिलांनीं स्वामींच्या व राज्याच्या कल्याणासाठीं केली बहुत सेवा, याजवरून संतोष होऊन स्वामींच्या राज्यांतील सरदारी, कारकुनी, किल्ले, कोट, जंजिरे ठाणीं यांची चिटनिशी व कारखाननिशी व जमेनिशी वंश-परंपरेनें करार करून देऊन स्वामींच्या वंशाचा असल तो चालवील अशी आणशपत केली, त्याप्रमाणें तिन्ही धंदे करार आहेत. सेवा करणें. बहुत काय लिहिणें ?

---

श्री

२१ आश्वीन शु० १२ शके १६५६
( गुप्ते. सं. ) २८-९-१७३४

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री बाजीपंत पंडित प्रधान ता। मोकदमानी मौजे वणपुरी ता। करेपठार प्रा। पुणें सुरू सन खमस सल्लासीन मया व अल्लफ. राजश्री विठ्ठल दादाजी याचे चालवणें राजश्री स्वामीस अवशक जाणोन यांजवरी कृपाळु होऊन मौजे मजकूरपैकीं पड जमीन चावर ·॥· अर्धा चावर जमीन स्वराज्य व मोगलाई एकूण दुतर्फ कुलबाब कुलकानूदेखील इनाम तिजाई हालीं पटी पेस्तर पटी खेरीज हकदार इनाम करून दिले असे; तर तुम्हीं लखू बाबाजी दाणी याचे थलपैकीं सेत तांजार सदरहू नीम चावर जमीन चतुःसीमापूर्वक यांचे दुमाला करून यांस व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम चालवणें. प्रतिवर्षी नूतन पत्राचा अक्षेप न करणें. या पत्राची प्रति लेहून घेऊन हें पत्र भोगवट्यास परतोन देणें. जाणिजे. छ. ११ जमादिलावल प॥ हुजूर

---

× येथून अक्षर शाहू महाराज यांचे.

श्री

२२ शके १६५८
( भा. व. १-६३ ) सन १७३६

पुरवणी श्रीमंत राजश्री राव राजश्री आपा स्वामींचे सेवेसी विनंती उपरी. राजश्री स्वामींजवळ कोणीं सांगणारांनीं सांगितलें कीं, राजश्री प्रधानपंत जिल्हे हुजूर जाली म्हणोन साता किल्ल्यांवरील दारूगोळा दाणा गल्ला उतरून विकतात. हें ऐकल्यावरी आम्हांस बोलावून न्हेऊन पुसिलें. आम्ही तहकिकात करावी म्हटल्यावरी आम्ही आपणांकडील माणूस एक देतों, तुम्हीं आपलीं दोघें माणसें देणें म्हणून राजश्रींनीं आज्ञा केली. हें वर्तमान पेशजी स्वामींस लिहिलें आहे, त्यावरून विदित जाहालेंच असेल. याउपरी आपण काल दरबारीं उपक्रम केला कीं महाराज ते दिवशीं सातारा किल्ल्याचे तहकिकातीस माणूस देत होते, अद्यापि दिल्हें नाहीं, तें देवावें; आम्ही आपलीं दोघे माणसें समागमें देतों. तहकीक करावे म्हणून बोललों. त्याजवर राजश्रींनीं उत्तर दिल्हें कीं आम्ही एकाचे कागद व जिन्नस धरले त्याचें कोन्हीं काय केलें? तसेंच तुमचे तहकीक जाले तरी काय करितों म्हणून जाब जाहाला. मग आपण बोललों कीं कागदपत्राची गोष्टी महाराजांनीं म्हटलें तरी ही गोष्टी दुसऱ्यांणीं म्हणोन सोसली. आमचे धन्यास काडीइतकी अवर्तणूक कामास येत नाहीं. जिवेंच मारील. ऐशा गोष्टींचा त्यास कांहीं मुलाइजा नाहीं. आम्ही जालों तरी क्षमा करील हें घडणार नाहीं. ऐसें सांगोन खामखा माणूस द्या म्हणून म्हटलें. मग कांहीं जाब जाहाला नाहीं. उगेंच राहिले. विदित व्हावें म्हणोन लिहिलें असे. कृपा केली पाहिजे हे विनंती.*

---

२३ शके १६५९
( भा. व. १-७३ ) श्री सन १७३७

राजमान्य राजश्री येशवंतराव दाभाडे सेनापति यांसी आज्ञा केली ऐसीजे. राजश्री बाजीराव पंडित प्रधान उत्तर प्रान्तास जातात, त्यास आपली फौज सामील करणें म्हणून तुम्हांस आज्ञा केली होती. परंतु फौज त्यासमागमें दिली नाहीं व हुजूरही यावयाचा प्रसंग जा(ला?) नाहीं. रनालियास कालहरण करीत राहिले आहां, यावरून काय म्हणावें; तुम्ही सेनापति आणि हे तुर तुमची सेवा करून नंगनामोष करून घ्यावयाची हौस असतां ईरे व उमेद धरीत नाहीं. तेव्हां पुढें तुमचे हातें काय काय होणें? हल्लीं रा। प्रधानपंतास व निजामनमुल्कास समीपता हल्लीं गांठ पडली असेल. औरंगाबादची फौज जमा जाहली आहे. ते निजामाकडेस कुमकेस जाणार. गेलियानें निजाम भारी होईल. याजकरितां इकडेच — ऊन पाडावी. जाऊं न द्यावी. असें आहे तरी तुम्हीं आपले सारे फौजेनिशीं राजश्री

---

* पत्र महादोबा पुरंदरे याचें.

चिमणाजी बल्लाळ यांस शिताबीनें सामील होऊन स्वामी संतोषी होत असें करणें. पत्र पावतेक्षणीं फौजनशीं जाऊन सामील होणें. दिरंग एक क्षणाचा न करणें. बहुत शिताबीनें जाणें. घालघसरावर सर्वथा न घालणें. सुज्ञे असा.

---

श्री

२४ शके १६५९

( भा. व. १-७४ ) सन १७३७

राजमान्य राजश्री मानाजी आंगरे वजारतमाब यांस आज्ञा केली ऐसीजे. तुम्हीं विनंतीपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनार्थ विदित जाहला. बिल्लोरी कंदिलाची जोडी १ एक व समयांची जोडी १ एक व पेशजी समयांची येक जोडी पाठविली आहे. हुजूर प्रविष्ट जाहलियाचें आज्ञापत्र सादर करावें, म्हणून लिहिलें. तरी पेशजी बाबत समयांची येक जोडी व हल्लीं पाठविली येक, येकूण दोन जोड्या समयांच्या व बिल्लोरी कंदिलाची जोडी येक पाठविली ती स्वामिसन्निध प्रविष्ट जाहली आहे; व फणस इरसाल हुजूर पाठवावयाची आज्ञा केली असे. तरी उत्तम इरसाल हुजूर रवाना करणें. बहुत काय लिहिणें.

---

श्री

२५ कार्तिक शु॥ १ शके १६५९

( ना. भो. ४९ ) ३०-१०-१७३७

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ६४ पिंगलनामसंवत्सरे कार्तिक शुद्ध प्रतिपदा, गुरुवासरे, क्षत्रियकुलावतंस राजश्री राजा शाहूछत्रपति स्वामी यांनीं देशमुख व देशपांडे महालानिहाय

| श्री. | श्री. |
|---|---|
| राजा शाहू नरपति हर्षनिधान बाजीराव बल्लाळ प्रधान. | श्री आई आदी पुरुष श्री राजा शाहू नरपति स्वामी कृपानिधि तस्य श्रीनिवासराव प्रतिनिधि. |

प्रांत चांदे, यांसी आज्ञा केली ऐसीजे. प्रांत मजकूर निम्मे पैकीं तिसरी तक्षीम फुटमुकासे वजा करून, हुजूर खासगीकडे मुकासा आहे त्याचा अंमल राजश्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा यांचे स्वाधीन पेशजी केला आहे, त्याप्रमाणें साल मजकुरीं करार असे; तरी तुम्ही मशारनिल्हेकडे रुजू होऊन निम्मे पैकीं तिसरी मुकास बाबेचा व तह्याप्रमाणें जकातीचा वसूल सुरळीत देणें. जाणिजे लेखनालंकार.

---

श्री

२६ शके १६६०

( भा. व १-३७ ) सन १७३८

राजमान्य राजश्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा यांस आज्ञा केली ऐसीजे. कर्नाटक प्रांत तुंगभद्रेपासून पलीकडे दक्षिणतीर येथील बंदोबस्ताविषयीं तुम्हांस आज्ञा केली असे. बितपशील—

| हुजूर खाजगीकडे बंदोबस्तास स्थानें | किता संस्थानें |
|---|---|
| १ संस्थान त्रिचनापल्ली | १ सिरे |
| १ संस्थान चंदावर | १ आदवाणी |
| १ संस्थान अरकाट देखील चंदी | १ कर्नोल |
| १ संस्थान श्रीरंगपट्टण, हुजूर तह जाहला आहे तो खेरीजकरून वरकड संस्थानाचा मुलूख साधला आहे, तेथील ऐवज ध्यावा. | १ कडपें |
| | १ किरकोळ फूटमहाल |
| — | — |
| ४ | ५ |

सदरहू संस्थानांची जमा होईल त्याप्रमाणें सरदेशमुखी व बाबती वजा करून बाकी मोकासबाबपैकीं निमे कुसाजी येसाजी भोसले यांची तक्षिम व निमे हुजूर खासगी.

येणेंप्रमाणें चार संस्थानें बंदोबस्त व पांच संस्थानांपैकीं बाबती सरदेशमुखी व निमें मोकासबाब, एकंदर आकार होईल त्यामध्यें निमें तुमचे फौजेचे बेगमीस तुम्हीं घेणें. निमें हुजुरचा ऐवज, याचे विद्यमानें हुजूर पाठविणें. तुम्हीं व हे एका विचारें वर्तोन बंदोबस्त करून गडकिल्ले, राज्य सोडविणें. गडकिल्यांचे बंदोबस्तास फौजेंत गेले ते तुम्हीं ठेवणें हशम लागले ते हे ठेवतील; आणि किल्ल्याचा बंदोबस्त करणें. सदरहूचा ऐवज सालमजकुरीं रुपये ७००००० सात लक्ष करार केले आहेत ते हुजूर पाठविणें. लिहिल्याप्रमाणें शेवट करून स्वामिसेवा केल्यानें तुमचा मजुरा असे. ×लिहिल्याप्रमाणें शेवट लावणें. बहुत काय लिहिणें ? स्वामीस तुमचे सर्वस्व भरंवसा असे. सुज्ञ असा.

---

श्री

२७ शके १६६०

( भा. व. १-३६ ) सन १७३८

राजमान्य राजश्री बाजीराव पंडित प्रधान यांसी आज्ञा केली ऐसीजे. राजश्री पिलाजी जाधवराव यांस स्वामींचे आज्ञेप्रमाणें रवाना केलें म्हणोन राजश्री मल्हार तुकदेव यांस

---

× येथून शाहू महाराजाचें हस्ताक्षर.

लिहिलें तें त्यांणीं स्वामींस विदित केलें. त्याजवरून स्वामी बहुत संतोष पावले. तुम्हीं हुकूमबारदार सेवक; तुम्हांस स्वामींचे आज्ञेपेक्षां अधिकोत्तर काय आहे ? जें स्वामींचे मानस तोच अर्थ तुम्हीं सिद्धीस पाववाल हा स्वामींस भरंवसा आहे. स्वामिकार्याचें यश तुमचेंच विभागास आलें आहे. जाधवराव यांस पाठविलें येणेंकरून स्वामिकार्य सिद्धीस पावत आहेच, यांत संदेह नाहीं. याउपरी मशारनिल्हेस जलदीनें स्वामिसन्निध येऊन पोहोंचत असें सांगोन सत्वर पाठविणें. ×आम्हांस आगत तें तुम्हांस आगत. जें स्वामिकार्य तेंच करितां. बहुत काय लिहिणें ? सुज्ञ असा.

---

श्री

२८ आषाढ शुा १३ शके १६६१

( भा. व. १-७१ ) ता॥ ७-७-१७३९

राजमान्य राजश्री बाजीराव पंडित प्रधान यांस आज्ञा केली ऐसीजे. स्वामींच्या राज्यांतील स्थळें, किल्ले व जंजिरे व ठाणीं यांच्या कारखानिशा व सरदारांकडील चिटणिशी व जमेनिशीचे धंदे राजश्री जिवाजी खंडेराव चिटनिवीस यांचे आजे बाळाजी आवजी यांसी कैलासवासी थोरले महाराजांनीं वंशपरंपरेनें करार करून देऊन चालविलें; त्याप्रमाणें चालतच आहे. ऐशियास फिरंगाण वगैरे तालुके तुम्हीं सोडविले व पुढें सोडवाल तेथील किल्ले व जंजिरे ठाणीं यांची कारखानिशीचे व सरदारांकडील चिटणिशीचे व जमेनिशीचे धंदे यांचे कामांवर मशारनिल्हे आपले निसबतीचे कारकून पाठवितील त्यांचे हातून कामकाज घेऊन चालवीत जाणें. बाळाजी आवजी व खंडो बल्लाळ यांणीं स्वामिसेवा निष्ठेनें करून बहुत श्रमसाहास केले आहे. यास्तव यांचे वंशपरंपरेनें चालवणें अगत्य, हें जाणोनच आहां; तदनुरूप चालवीतही आहाच. जाणिजे छ ११ रबिलाकर सुा आर्बैन मया आलफ. यांचे हातून सेवा घेणें. बहुत काय लिहिणें ? सुज्ञ असा.

---

श्री

२९ शके १६६२

( भा. व. १-६७ ) सन १७४०

वेदशास्त्रसंपन्न समस्त ब्राह्मण क्षेत्र खेड व क्षेत्र माहुली उभय कृष्णातीर यांसी आज्ञा केली ऐसीजे. परभू हे पुरातन; यांची क्रियाकर्मांतर व शुभकर्म व उत्तर कार्य जें पुरातन चालत आहे तें तुम्हीं जाणतच आहां. त्याप्रमाणें पहिलेपासून चालवीत आलां आहां. त्यास प्रस्तुत यांचा क्रियाकर्मांतराचा प्रसंग पडला आहे. त्यास पुरातन विजापूरचे वख्तीं

---

× खुद्द शाहू महाराजांचें हस्ताक्षर.

व कैलासवासी शिवाजी महाराज यांचे वेळेस व कैलासवासी संभाजी महाराज यांचे वेळेस व कैलासवासी राजाराम साहेब व मातुश्री ताराऊ साहेब यांचे वेळेस व हल्लीं कारकीर्दींत जे चाल चालत आली त्याप्रमाणें उत्तरकार्य व सर्व कर्मे चालवीत जाणें. जुनें न मोडणें. नवें न करणें. पुरातन चालीप्रमाणें चालवणें. पुरातन चालवीत आलां त्याप्रमाणें चालवणें. ×नवी न करणें जुनें न मोडणें. लिहिल्याप्रमाणें वर्तणें. बहुत काय लिहिणें जाणतां विनंती.

---

श्री

३० शके १६६२

( भा. व. १–६९ ) सन १७४०

वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री उभय क्षेत्र माहुली व परशराम स्वामी गोसावी यांसी प्रति रघुनाथभट पंडितराव नमस्कार विनंती उपरी. प्रभूच्या क्रियेचा गुंता पडला, याजमुळें महाराज राजश्री स्वामींनीं आज्ञा केली जे, पूर्ववत् कैलासवासी शिवाजी महाराज यांचे कारकीर्दीपासून क्रिया चालत असेल त्याचप्रमाणें चालवावी म्हणोन महाराजांनीं आज्ञा केली. त्यावरून हें पत्र तुम्हांस पाठविलें आहे. तरी सुदामतप्रमाणें मनास आणून क्रिया चालती करणें. बहुत काय लिहिणें ? हे विनंती.

---

श्री

३१ मार्ग. वा १२ शके १६६२

( अप्र. जाधव सं. ) छ १४ सव्वाल ता ३–१२–१७४०

राजश्री पंतप्रधान गोसावी यांस

छ सकळगुणालंकरण अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो आनंदराऊ सोमवंशी सरलष्कर दंडवत विनंती. येथील कुशल ता छ २५ रमजान मुक्काम गंजनबाल पा बागडकोट मलप्रभातीर जाणोन आपलें स्वकीय लेखन करीत गेलें पाहिजे विशेष. आपण वार्तिकाबरोबरी पत्र पाठविलें. लिहिल्याप्रमाणें सविस्तर अर्थ कळों आला. अविंध तेरदळेमध्यें कोंडून परीघ घालून बसलों. कित्येक बोलीचालीचा प्रसंग अविंधानें प्रसंगोचित केला. त्यावरी राजश्री स्वामींकडून दर्याजी नाईक पत्रें घेऊन आले कीं, अविंधासीं सख्य करणें आणि त्याची वस्तभाव जे घेतली असेल ते माघारीं देऊन कबज हुजूर पाठवणें, येविषयीं आणीकही वरचेवरी पत्रें आलीं. त्यावरी राजश्री त्र्यंबकराऊ धायगुडे आले. त्यांजबरोबरी आज्ञापत्रें आलीं कीं अविंधासीं सख्य संपादून कूच करून जाणें. या उपरी कलह न करणें. ऐसीं वरचेवरी पत्रें आलीं. याकरितां अविंधासीं पैकियाची बोली केली होती, ते अवघीच राहिली. पनालियाकडून राजश्री निळकंठराऊ व घोरपडे यांच्या फौजा

---

× शाहु महाराजाचें हस्ताक्षर.

सामील जाल्या होत्या, त्या आपल्या वळणांत राहिल्या. राजश्री फत्तेसिंगबाबाकडील फौज व राजश्री उदाजी चव्हाण हिंमतबहाद्दर ऐसे एकत्र या प्रांतें आहों. मोंगलाचें युद्धीं घोडीं फार पडिलीं व लोकांचा गवगवा यास्तव या प्रांतें आलों आहों; परंतु लष्करची उस्तवारी होईल ऐसा अर्थ नाहीं. दूर लांबावें तरी राजश्री स्वामींचीं आज्ञा कीं, अविंधाचा शह राखोन रहाणें. याकरितां या प्रांतें आहों. आपणांस कळावें या करितां लिहिलें आहे. पुढें आपणांकडून पत्र येईल त्याप्रमाणें वर्तणूक करून. आपण कल्याण प्रांतीचा बंदोबस्त करून पुणियास आगमन जालें. पुढें तेथेंच मुक्काम आहे कीं काय हें सविस्तर लिहिलें पाहिजे. बहुत काय लिहिणें? कृपा लोभ असों दीजे हे विनंती.

---

श्री

३२ मार्ग. वा। ११ शके १६६३

( अप्र. अणजूर सं. ) ता। २२-१२-१७४१

छ मा। गंगाजी नाईक अणजूरकर यांसी बाळाजी बाजीराऊ प्रधान सूरसन इसने आरबेन मय्या व अलेफ. तुम्ही वसई प्रांतीचे मसलतीस श्रमसाहास बहुत केलें यास्तव तुम्हांस कृपाळु होऊन तुम्हास पालखी दिली असे. पालखी वागवून बसत जाणें. पालखीस वेतन तुम्हास वतन करून दिल्हे आहे. याचें उत्पन्न होईल त्यापैकीं देत जाणे. जाणिजे छ २४ सव्वाल. आज्ञाप्रमाण. मोर्तब लेखनसीमा.

---

श्री

३३ शक १६६३?

( भा. व. १-४२ ) सन १७४१?

विनंती उपरी. आपली प्रातःकालीं बोली जाहली जे, आज निशेचें पत्र घेऊन येतों निर्वाह करून जर खरें असलें तर कराराप्रमाणें निर्वाह करून घेऊन जे आम्हापाशीं बोलावयास जागां होय तें करणें. जेणें करून कार्य होय, अन आंचं ( आमचें? ) बल उत्तर होय, आम्हांस लाभ होय तें करूं. बहुत काय लिहिणे स ली क न म र बा जा ब र द (?) आहे.

---

श्री

३४ श. १६६३ माघ शु. १२

( गुप्ते सं. ) ता. ५. २. १७४२

राजश्री +जिवाजी खंडेराव चिटणिवीस दाजी गोसावी यांस

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेहांकित मानाजी आंगरे.

---

+मृ. ६. १. १७४३.

रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशललेखन करीत असलें पाहिजे विशष. आपणाकडून पत्र आलें तें लेखनार्थश्रवणें परम समाधान जालें. पत्रीं पूर्वी माहाराजांचे कामास्तव दाभोलचे देशमुखीचें वतन आमचें पंचवीस तीस हजाराचें सिरके यांस दिल्हें, याजवरून माहाराजानी चेऊल प्रांतींचें वतन त्या सारिखे वडिलांस दिल्हें. याजविसीं आपला आमल त्या प्रांतांत इकडून वहिवाट ठीक न पडे यास्तव आपले व पूर्वील वडिलांचे घरोबे वचनें शफता दस्तायेवज आहेत व इकडून त्या स्थलाची सरबरा कसी जाली आहे, आसे आसोन आपण गांवगना आमल दाखल करून पत्रें दिल्हीं आसतां, यैवज वतनाचा यावा त्या आन्वयें येत नाहीं म्हणोन कितेक पर्याय शब्दयुक्त लिहिलें. त्यास पूर्वी वडिलोपार्जित घरोबा आणि संस्थानपद आपले आभिमानाचें, त्यांत आम्हास स्वामीचे पेस पात्र करून हे दिवस प्राप्त केले, स्थापना आपण केली, ते समर्थांचें इमान व शफत विसर पडेल आसें कसें घडेल? आपले कार्याविसीं आंगरे यांच्या वौशींचा असेल तो कदापि आंतर करणार नाहीं हे खातरजमा असावी. तूर्त प्रयोजनें आहेत तर वर्षासनाचे येवजी व वतनांपैकीं साहित्य घडावें म्हणोन सुचविलें, त्यास राजश्री वामनाजी प्रभु यास पत्रें देऊन आमल दखल केल्यापासून वहिवाट दाखला समजाविला आहे. माहाल खराब याजमुळें आकार पुरत नाहीं. दरसाल नख्त हजार दोन हजार रुपये व भात शंभर दीडसें दोनसें खंडी व जिनस पांच च्यारसें याप्रमाणें पावत आलें आहे. जमाबंदीचे आन्वयें पाहून हल्ली कारभारी पाठविले याजबराबर वतनाचे येवजी पंधरा हजार रुपये व वर्षासनापैकीं पाच हजार जिनस किराउ हजार रुपयाचा येकून येकवीस हजार रुपयांचा भरणा तेथें करून घ्यावा. याप्रमाणे करून वामनाजी प्रभु बराबर देऊन रवाना केले आहेत. आम्हाविसी तिलप्राये संदेह नसावा हे वारंवार लिहिणे नको. वतनाचा येवज आकारा बरहुकूम वरचेवर पावता होईल. इकडील कार्याची याद कारभारी याजबराबर पाठविली आहे, त्याआन्वयें स्वामी महाराजांची खातरजमा होऊन कार्य घडावी येविसीं पूर्ण भरंवसा आपला आहे. येविसीं विस्तारें काय ल्याहावें? हें स्थल आपलें आहे. कलावें बहुत काय लिहिणें? कृपालोभ आसों दीजे. रवाना छ १० माहे जिल्हेज हे विनंती.

---

श्री

३५ भाद्रपद व॥ ८ शके १६६५

(भा. व. १-४६) ता॥ ३१-८-१७४३

यादी राजश्री बाळाजी पंडित प्रधान करार हुजरून करून दिल्हे, सुरु सन अर्बा आर्बैन मय्या अलफ.

हिंदुस्थान प्रांतचे सुभे दरोबस्त

१ प्रान्त माळवा
१ प्रान्त अजमेर
१ प्रान्त आगरे
१ प्रान्त प्रयाग

४

कलम १

खासदस्तक

चार सुभे तुम्हांस करार ४

संस्थान गढे पैकीं चौथाई व सरदेशमुखी स्वराज्यांत आहे; त्यास दरोबस्त चौथाई व सरदेशमुखी द्यावी; नाहीं तर नर्मदे अलीकडील मुलूख तोडून द्यावा. कलम १

खासदस्तक

चवथ व सरदेशमुखी यांस देणें मोंगलाई तुम्ही चवथाईच्या ऐवजीं प्रगणें व गांव तोडून देणें.

आंतर्वेदींत पटणे अयोध्या सुभेयांचा प्रान्त आला असेल तो रघोजी भोसले यांणी खावा. तुम्हीं कज्या करूं नये. कलम १

खासदस्तक

याप्रमाणें करार

घांसदाणा तुमच्या मुलखांत घेतला असेल तो रघोजी भोसले यांणी द्यावा. त्यांचे मुलखांत तुम्हीं घेतला असेल तो तुम्हीं द्यावा. कलम १

सुभा प्रांत पटणे पैकीं आमचे मुलखाचे लगतेयास पटणे याचे पश्चमेस, प्रयागचे पूर्वेस तीन लक्षांचे तनख्याचे सरसनिरस निवडून द्यावे. हा प्रान्त तुम्हांस दिला आहे. येथें मातबर फौज पाठवावी. कमाविसदार पाठवून अंमल करावा. दोन वर्षे फौज पाठवूं नये. कलम १

खासदस्तक

मोंगलाई १२०००० तीन लक्षांचे वसुली ३०००० सरसनिरस करार.

राजश्री रघोजी भोसले सेनासाहेब सुभा यांस हिंदुस्थानापैकीं

१ सुभा ढाके बंगाले
१ सुभा लखनौ ऊर्फ अयोध्या
१ सुभा पटणे पैकीं बारा लक्षांचे तनखियाचे वजा करून बाकी महाल दरोबस्त

३

खासदस्तक

तीन सुभे करार

येकूण तीन दिले आहेत तेथें तुम्हीं दखलगिरी न करावी. कलम १

खासदस्तक करार.

उभयतांनीं एकमेकांचे मुलखांत दखलगिरी न करावी. सनदेप्रमाणें ज्याचे त्यांणी अम्मल करावा. कलम १

खासदस्तक. येथून पुढें तुम्हीं त्यांचे मुलखांत न घेणें. त्यांणीं तुमच्या मुलखांत न घेणें. सुज्ञ असा.

श्री

३६ भा. व. ८ शके १६६५

(भा. व. १-४७) ता. ३१-८-१७४३

संस्थान गढें नर्मदे अलीकडे दक्षणतीरीं जो प्रांत असेल, तेथील मोगलाई अम्मल तुम्ही करावा. चौथाई, स्वराज्याकडील अम्मल राजश्री रघोजी भोसले सेनासाहेब सुभा याणीं करावा. नर्मदे अलीकडील मुलूख दरोबस्त तुम्हीं घ्यावा. कलम १

तुम्हांकडील मुकासे व बाबती व सरदेशमुखी वगैरे तालुकाचा मुलूख व महाल असतील, तेथें घांसदाणा वगैरे उपद्रव राजश्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा याणीं करू नये. तुम्हीं मशारनिल्हेकडील तालुक्यांत घांसदाणा वगैरे उपसर्ग न करावा. कलम १

तालुका अरकाट येथील ऐवज पेशजी तुम्हांस सालदरसाल २०००० रुपये वीस हजार पावत होते त्याप्रमाणें देऊं केले आहेत. कराराप्रमाणें देऊं. कलम १

दोहीं वाड्यांत सरंजाम. कलम १

सुभा प्रयाग दरोबस्त तुम्हांकडे कलम १

सुभा पटणपैकीं संस्थानें दरोबस्त

१ संस्थान सुंदरशा

१ संस्थान भोजपूर देखील दाउदनगर

---

२

सदर्हू तालुके तुम्हांस दिले आहेत, तेथें तुम्हीं अम्मल करणें. बाकी दरोबस्त सुभा राजश्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा यांजकडे दिला आहे. ते अम्मल करतील. तुम्हांस दिला याशिवाय दुसरें अधिक एखादें दखलगिरी करावयास प्रयोजन नाहीं. कलम १

राजश्री सेनाखासखेल व राजश्री बाबूराव सदाशिव यांनीं साल गुदस्तां तुमचे प्रांतांत घांसदाणा घेतला आहे, त्याचा निकाल करून देणें म्हणोन उमाबाई दाभाडे व सेनापति व खासखेल यांस पत्रें दिलीं जातील. कलम १

वऱ्हाड प्रांतीं खासगत तुम्हांस फुटमुकासे गांव आहेत ते सुदामतप्रमाणें राजश्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा यांस ताकीद करून चालवूं. कलम १

राजश्री रघोजी भोसले यांची जिल्हे तुमचे स्वाधीन आहे, त्याची खर्चाची बेगमी. कलम १

---

श्री

३७ माघ शु० १३ शके १६६५

( भा. व. १–४८ ) ता। १६–१–१७४४

यादी राजश्री बाळाजी पंडित प्रधान सुभा प्रयाग व सुभा आगरे व सुभा अजमेर देखील संस्थान राणाजी व संस्थान अभेसिंग, व सुभा पटणेपैकीं तनखा रुपये १२०००००
बारा लक्ष व वसई, साष्टी वगैरे प्रांत फिरंगाण व मोंगलाकडील जहागीर सुभा माळवा दरोबस्त दिल्हा आहे, तो खेरीज करून सदरहूचें सरकारांत सन सल्लास पासून द्यावयाचा करार जाला. रुपये १५०००० गु॥ देवराव येशवंतराव व गोविंदराव दीड लक्ष ते पेश-कसीप्रमाणें उडते द्यावें. त्याचा तपशीलः—

सन सल्लासचे ऐन अर्बा अर्बैनचे दसरियांत द्यावे १५०००० रु.

सदरहू दीड लक्ष रुपये येणेंप्रमाणें मजुरा दिल्हे.

१२०००० तालुका अरकाटपैकीं आपणांस सालदरसाल रुपये २०००० वीस हजार हुजूर द्यावयाचा करार केला आहे. इत्यादि सन तिसा-पासून सन अर्बा अर्बैन साल मज-कूर पावेतों सहा साला ( बद्दल ) रुपये.

३०००० माफ केले ता। राजश्री दादोबा १५००००.

सन अर्बा अर्बैनचे रुपये सन खमस अर्बैनचे दसरियांत द्यावे. परंतु सर-कारांत तोटा आहे यास्तव सध्यां द्यावे १५०००० रु॥ दीड लक्ष.

सन खमसचे रुपये सनसीतचे दस-रियांत द्यावे. याचप्रमाणें पुढें साल-दरसाल देत जावे. त्यांपैकीं अरकाट बाबत रुपये २०००० वीस हजार मजुरा सालदरसाल देऊन दरसाल रुपये. १३०००० एक लक्ष तीस हजार सदरहूप्रमाणें देत जावे.

येणेंप्रमाणें करार छ० ११ जिल्हेज सुरु सन अर्बा आर्बैन मया अलफ.

---

श्री

३८ शके १६६६

( भा. व. १–४४ ) सन १७४४

सरंजाम सौभाग्यादिसंपन्न वज्रचुडेमंडित मातोश्री सगुणाबाईसाहेब यांस द्यावा. सुरु-सन खम्मस आरबैन मय्या अलफ. पुणें व जुन्नर प्रान्त खेरीजकरून खानदेश गंगथडी वगैरे प्रान्तांत १०००० रु. दहा हजार, तनखा कमाल रु. १५००० पंधरा हजारांचे द्यावे. मोकासबाबती, सरदेशमुखी मिळोन तनख्याचे गांव नेमून द्यावे.

श्री

३९ शके १६६६-६७
(भा. व. १-४१) सन १७४५

यादी दोन्ही वाड्यांनीं याप्रमाणें वर्तावें म्हणोन राजश्रीनीं आज्ञा केली.

उभयतांनीं इनसाफ करूं नये. १

जें स्वामींनीं नक्त देणें, गांव, परगणा, जमीन, जें देणें तें उभयतांस बरोबर द्यावें. १ कलम.

जो सरंजाम सरकारचे सनदेखेरीज उभयतांनीं धरिला असेल तो सोडावा. १

स्वराज्यांतील परराज्यांतील. गांव, खेडें, परगणे, जिल्हेदारांकडील, मोकासदारांकडील, खाजगीकडील स्वराज्यांत परराज्यांत रोखे करूं नये. १

जागा जागांची जकातीची, परगण्यांची कमावीस करूं नये. १

सरंजाम गांव खेडें परगणा जमीन धरूं नये. १

कोणाचें वतन देशमुखी पाटिलकी घेऊं नये.

ज्यास देणें वाड्यांत नजर, गांवखेडें, तें उभयतांस बदल द्यावें. १

पेठ शाहूनगर येथील कज्या मनांस आणूं नये. १

कोणाचें कर्ज कोणाकडे असेल तो फिर्याद आला तरी त्यांत चित्त घालूं नये. १

सदरहूप्रमाणें उभयतांनीं मान्य केली यास स्वामी निरंतर संतोषी आहेत. ×येणेंप्रमाणें चालावें. करार.

---

श्री

४० शके १६६७
( जोशी संग्रह ) सन १७४५ नंतर

राजश्री दमाजी गायकवाड समशेर बाहादर गोसावी यांस

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजेश्री यशवंतराव माहादेव खासनीस व गोविंद खंडेराव रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत गेलें पाहिजे विशेष. राजेश्री सेनापति व रा॥ सेनाखासखेल यांचा व तुमचा कारभारसंबंधें अनसारखा अपूर्व विचार पडला होता. त्यावरून राजेश्री स्वामीनी आम्हा उभयतास आज्ञा केली कीं तुमचे धण्याचे व तुमचे मनास आणून मामलत चालती करून सरकारकामें वगैरे फडशे होत तें करणें, त्याजवरून आम्ही उभयतां दरम्यान होऊन तुमचा व राजेश्री सेनापति व सेनाखासखेल यांचा ऐक्यभाव करून देऊन मातुश्रीबाई यांनीं सांगितल्यावरून तुम्हां-

---

× येथून शाहू महाराजाचें हस्ताक्षर.

पासून मामलत करविली आहे. ह्या उभयतांनीं व तुम्हीं परस्पर केल्या कराराप्रमाणें वर्तणूक करून साल दरसाल चालावें त्यांत तीलमात्र अंतर करूं नये. ज्यांकडून अंतर पडेल त्यांस आम्हीं उभयतांनीं उत्तम रीतीनें सांगून वर्तवावें तदाप्रमाणें या उभयतां तुमच्या धन्यांनीं व तुम्हीं सेवकलोकीं चालून केल्या कराराप्रमाणें साल दरसाल वर्तणूक करावी. उभयपक्षीं अंतर न करावें. अंतर पडल्यास मध्यस्त आम्हीं उभयतां असो. बहुत काय लिहिणें ? लोभ असों दीजे हे विनंती.

---

४१ श्री

( पारसनीस सं. )

चैत्र–वैशाख शके १६६८
एप्रिल–मे स. १७४६

पु॥ राजश्री रामचंद्र बावा स्वामी गोसावी यांसी—विनंती उपरी. तुमचा व राजश्री मल्हारजी होळकर यांचा परस्पर पेंच वाढला आहे, म्हणोन वर्तमान बहुतांमुखें ऐकिलें जातें; ऐशास आपले घरांत, सरदारांत काडीमात्र द्वैतभाव नसावा हा उत्तम पक्ष आहे. तथापि घर आहे तेथें बोलीचाली आहेच; परंतु परस्पर कु-रसता कोणी बाळगीत नव्हते. सर्वही एकचित्तें करून ज्यांत धन्याचें हित व नक्ष तोच मनसुबा करीत गेले. श्रीकृपें व वडिलांचे पुण्येंकरून जें ज्यांणीं चित्तांत आणिलें, तें सिद्धीनें पावत गेलें. यशावह कर्मे तुम्हींच संपादिलीं. नक्ष, लौकिक लोकोत्तर म्हणावा तैसा जहाला व पुढेंही तुम्हीं कोणी स्वामिसेवेस चुकतां असा अर्थ नाहीं. सर्व प्रकारें या दौलतीचे तुम्हीं स्तंभच आहां. उचित मनसुबा असेल तो करितां व करालच, संदेह नाहीं. परंतु घरांत घरभेद सर्वस्वी नसावा. यामागें हरएक गोष्ट तुमच्या चित्तांत आली, आणि मल्हारबाचे न आली; तथापि तुमचें सांगितलें त्यांणीं केलें, अथवा त्यांणीं मनसुबा चित्तांत आणिला तुमच्या मनास न आला. तत्रापि त्यांचा मनोभाव तुम्हीं सिद्धीस नेला. म्हणोनच उत्तमा प्रकारें सोभा जहाली. एकतत्वी फौज, एकदील, कोणाचाही बुद्धिभेद चालला नाही. प्रस्तुत तुमची परस्पर कुरसता. याजकरितां या राज्यांत काय, मोगलाईंत काय, उमद्या उमद्यांचे घरीं मनमाने तैशा चर्चा करितात. आमचें कोणांस सुख आहे ऐसे नाहीं. परंतु वडिलांचे तपोबलें आमची फौज भारी, सरदार एकदील, मर्द, कर्ते. अस्मानही कडाडलें, तथापि आपल्या मर्दानगीस, हिमतीस अंतर करणार नाहीं, व केलें नाहीं. ज्यांच्या मर्दुमी व दिलेरीची तारीफ सर्वही करितात. ऐसें असतां कोणाचे वस्तु दम मारवला नाहीं, व फोडाफोडही कोणी करूं सकलें नाहीं. सांप्रत मल्हारबा इंदुरासच राहून राणाजीच्या भेटीस जाणार, तुम्हीं देशास येणार म्हणोन तत्वतां ऐकतों. तर ते तिकडे राहिले, तुम्हीं एकटे इकडे आल्यास लोकोत्तर कसें दिसेल ? उमदे लोक चर्चा करितात. आमच्या सरदारींत फूट पडावी, आपली कारीगारी चालावी हे इच्छितात, तेंच घडूं सकेल. राजश्री

रघोजी +भोंसले व राजश्री बाबूजी नाईक औरंगाबादेस जाऊन नवाब असफजाची भेटी घेतली. आपल्या गरीबीच्या, आम्हांकडील कितेक विपरीतार्थाच्या गोष्टी सांगतात कीं आम्ही गरीब, नवाबाचे हुकमाशिवाय आहों ऐसें नाहीं. जे नवाबासाठीं विरुद्ध वर्ततात, किल्लेकोट, मुलूख घेतात ते नवाबाच्या कार्याचें काय? आमचा गौर केल्यास कार्यास येऊन. ऐशा कित्येक गोष्टी सांगतात. नवाब करूं तो सकत नाहीं. परंतु त्यांचे मनोरंजकतेसाठीं अनुमोदन देतात, गोड बोलतात. राजश्री स्वामींस कर्ज जालें आहे तें परिहार जालें पाहिजे. याजकरितां मनमानें तो पैका मागतात. त्यांच्या सांगितल्याप्रमाणें आमचे वस्तु कबूल करवत नाहीं. यास्तव परम विमनस्कतेच्या गोष्टी घरांत बाहेर बोलतात. एणेंकरूनही लोकांस सुखावह वाटोन मनमानें त्या चर्चा करितात. त्यास आमच्या चित्तांत तो नबाब असफजानीं आम्हांसी कितेक वचनप्रमाणयुक्त करार केला काय, आणि करून दाखवितां आणिकेच तऱ्हेनें करून दाखविलें. त्याचा विचार दगाबाजीचा. एकास पळ म्हणावें; एकास पाठीस लाग म्हणावें. हा विचार त्याचा आहे, तो तुम्ही जाणतच अहां. त्यास कांहीं चमत्कार दाखवावा, विचारावरी आणावें, येविसींचा विचार करावा. दुसरें राजश्री स्वामींच्या कर्जाचा× निकाल कसा काढावा तो विचार आधीं आपले घरीं करून मग त्यांजसी बोलणें तें बोलावें. या विचारास वरकडही विचारास तुम्हीं असिलें पाहिजे. तुम्हांविना ऐसे विचार कसें करावें? याजकरितां तुम्हांस येणें म्हणोन वारंवार लिहिलें, परंतु अद्याप तुमचें येणे जालें नाहीं. तुमची आमची भेटी होऊन विचारआचार व्हावा; आम्हीं आपल्या हुजूराच्या फौजेची समजावीस करून तयारी करावी; तुम्हीं आपल्या फौजांची तयारी करून आश्विन कार्तिकांत मनसुबा कर्तव्य तो करावा; नबाब आम्हांसीं उचित विचारें चालत असतां, दाटून त्याजसीं विरुद्धास्पद करावें ऐसीही अंतःपुरस्सर आमची इच्छा नाहीं. किंचित् वक्रता दाखविल्या, ते आपले विचारानुरूप जहाल्यास मग कलहांत जोड आहे, ऐसें नाहीं. सारांश तुम्हीं उभयतांनीं यावें. घरचें बाहेरचे मनसुबे उचित दिसतील तैसे तुम्हां सर्वांच्या विचारें करणें तें करावें. असा विचार आहे. तरी तुम्हीं मल्हारबांस उत्तम प्रकारें सांगून त्यांस घेऊन येणें. किंबहुना ते इकडे न यावयाचें हरप्रकारें पर्याय लावतील; तथापि सर्वही वारापाणी करून त्यांचे येण्याविसीं बहुतां प्रकारें प्रसन्न करून खामखा घेऊन यावेच यावें. ते तुम्हीं, आम्हीं एक जागा जालियावर त्यांच्या चित्तांतील कलुषता दूर करून पूर्ववत्-प्रमाणें तुम्हीं ते वर्तो. दरम्यान विकृत भाव नव्हे ऐसाच विचार देवाच्या दयेकरून होईल; चिंता नाहीं. मुख्य गोष्ट आमच्या सरदारांत परस्पर फूट व्हावी, आमचा पक्ष हलका दिसावा—( त्रुटित )

---

+ पहा का. सं. प. या. ले. ५९.  × वर ले. ३७ पहा.

श्री

४२ वैशाख श. १६६८
( पारसनीस सं. ) मे स. १७४६

विनंती उपरी. इकडील नवल विशेष वर्तमान लिहिजेसें नाहीं. नवाब असफजा अवरंगाबादेस येऊन दाखल जहाले. नवाब नासरजंग कर्नाटक प्रांतें सिऱ्याचा मुलूख टाकून श्रीरंगपट्टणच्या रोखें गेले आहेत. राजश्री बाबूजी नाईक नासरजंगाजवळ साताआठां कोसांवरी आहेत. नासरजंग व नाईक यांची छावणी त्याच प्रांतें होईल. या उपरी त्यांजकडील वर्तमान येईल तें लिहिलें जाईल. दिल्लीकडील वर्तमान काय? मनसूरअल्लीखान कोणे मनसुबियावर आहेत? व ईश्वरसिंग कोण × आहेत? व राणाजी व अभेसिंग व कोटेकर वगैरे उमदे अमीर काय मनसुबा करितात? पातशाहाचा डौल कैसा आहे तो दिल्लीहून तुम्हांकडे वर्तमान येतच असेल, तर सविस्तर लेहून पाठवणें. बंगाल्याकडील वर्तमान काय? अमृतरायाचीं पत्रें काय येतात? महबतजंगाचा भाव काय आहे? रघोजीबावा + कोठें आहे, फौज किती कोणे प्रकारें आहेत? छावणीस आश्रय आहे किंवा नाहीं हें वर्तमान तिकडील, तुम्हीं माघारें फिरोन अल्म तथापि येत नाहीं. करणें तूर्त काय अर्थ आहे तो लिहिणें ही विनंती.

---

श्री.

४३ चैत्र श. १६६८
( पारसनीस सं. ) एप्रिल १७४६

पुा राजश्री रामचंद्र बावा स्वामी गोसावी यांस विनंती उपरी. सालमजकुरी आम्हीं घरीं राहिलों. यामुळें सारी फौज घरींच राहिली. नित्य कर्जासी संबंध पडला आहे. पुढें ज्येष्ठ, आषाढ, श्रावणमासीं फौजेची समजावीस व नालबंदी दिली पाहिजे. त्यास ऐवज पाहिजे. कर्ज घेईन म्हटल्यास इतका ऐवज कर्ज कोणाजवळ मिळतो ऐसा अर्थ नाहीं. महालकरी यांजपासून रसदेचा ऐवज घेतल्याखेरीज मातबर ऐवज + + नाहीं. यास्तव राजश्री लक्ष्मण शंकर व राजश्री नारो शंकर व राजश्री गोविंद + व राजश्री गोविंद कृष्ण वगैरे महालकरी ते प्रांतीचे आहेत त्यांस सांगोन रसदेचा ऐवज भरावयाकरितां त्यांचे मातबर गुमस्ते अथवा शहाणे चौकस कारकून ज्येष्ठमासीं पुण्यास पाठवून देणें. मागील महालकरी यांचे गळे गुंतले आहेत. बाक्यासाक्या राहिल्या आहेत त्या तुम्हीं वसूल करून देववून महालकरी यांचे गळे मोकळे करालच. कर्ज मागावयास गेलियावर मनास येईल तशा गोष्टी सांगूं लागतील. हरप्रकारें महालकरी यांचा गुंता उरकून हंगामसीर रसदेचा पैका येथें भरीत ऐसें करावें. येथील संसाराचा डौल सर्व तुमचे ध्यानांत आला आहेच. असें असतां विस्तारें लिहावें असें काय आहे! बहुत काय लिहिणें ही विनंती.

---

श्री

४४ जेष्ठ शके १६६८
( पारसनीस सं. ) मे-१७४६

पुा राजश्री रामचंद्रबाबा स्वामी गोसावी यांसीं

विनंती उपरी. राजश्री जयाजी शिंदे बुंदेलखंडांत येऊन जैतपुरास मोर्चे लाविले होते. राजश्री मल्हारजी होळकर हेही उदेपुराकडून आले. आम्हींही आलों. राजश्री यशवंतराव पवार खासा शरीरभोगामुळें धारेस राहून कुल फौज पाठविली. अवघे जैतपुरीं आहों. मोर्चे चालले आहेत. येथील कार्य सिद्ध जाल्याविना चित्तानरूप कारभार होत नाहीं. राजश्री नारो शंकर व लक्ष्मण शंकर व गोविंद बल्लाळ येथेंच आहेत, म्हणोन लिहिलें तें कळलें. ऐसियास बुंधेलियांनीं तहरह करून बदमा(म)ली केली. त्यांस नतिजा देऊन हलखुद करावयानिमित्य जैतपुरास मोर्चेबंदी केली. उत्तम केलें तुमच्या दृष्टीस नेक मनसुबा दिसेल तो करून योजिलें कार्य सिद्धीस न्यालच. नेणें. बुंधेले डांगांत राहून वळवळ करितील असें सामर्थ्य त्यांचें काय आहे ? तथापि वळवळ केल्यास तुम्हीं पारपत्य करालच. यंदा बहुधा बुंधेलखंडांत छावणी होईल असें दिसतें. यशवंतरायाचा विचार पुढें तुम्ही काय ध्यानांत आणिला तें लिहावें. सरकारास उचित तें करणें. रिकामें भिडेस न पडणें हे विनंती.

---

श्री.

४२ ज्येष्ठ शुद्ध १२, शके १६६८
( पारसनीस सं. ) ता. २१-५-१७४६

राजश्री मल्हारजी होळकर व जयाजी शिंदे गोसावी यांस

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्ने॥ बाळाजी बाजीराव प्रधान आशिर्वाद. सु॥ सीत आरबैन मया व अल्लफ. सांप्रत तुमचीं पत्रें येत नाहींत. उडतें वर्तमान ऐकतों कीं, तुम्हीं जेतपुरीं मोर्चे लावून बसला अहां ऐसें आहे. त्यास काय वर्तमान आहे? बुंधेलियांनीं काय विचार केला आहे? तुम्हीं कोणता मनसुबा योजिला आहे? तें सर्व वर्तमान तपशीलवार लेहून पाठविणें. इकडील वर्तमान तर अलाहिदा पुरवणीं पत्रीं सविस्तर लिहिलें आहे त्याजवरून अवगत होईल. दरबारचा मजकूर तरी अद्यापि प्रथम दिवस असे. जाणिजे छ ११ जमादिलावल. बहुत काय लिहिणें ?

---

१ ता. ५-५-१७४६ रोजीं जैतपूर हस्तगत झालें ( पहा का. सं, प. या. ५१. ).

श्री

४३ आषाढ शुद्ध १, शके १६६८

( पारसनीससंग्रह ) ता. ८-६-१७४६

पु॥ राजश्री रामचंद्रबावा स्वामी गोस्वामी यांसी

विनंती उपरी. यंदा छावणी करावयाचें बहुत संकट जालें. कालिंजराजवळ छावणी करून रहाणें. हातीं पैसा नाहीं. लाख दोन लाख रुपये कर्ज खादलें. आणखी दोन लक्ष रुपये कर्ज केलें, त्यांणीं होणें काय? परंतु नवा मुलूख जप्त करणें. कष्टासी समंध त्यास, दादोपंत वगैरे देशास गेले, यामुळें तों छावणीची अडचण फार पडली. असो. जैसें बनेल तैसें करून स्वामिकार्य उत्तम प्रकारें करितों. हुजुरातचीं पथकें राजश्री विठ्ठल शिवदेव व गोविंद हरि व अंताजी माणकेश्वर, चिमणाजी बापूजी, धोंडो दत्तात्रय हे कुल प्रीतिसिंगाबरोबर देऊन धामोणी खटोला तो जिल्हाच सांगोन रवाना केले. राजश्री साबाजी शिंदे व शहाजी शिंदे, जोत्याजी भोसले, राणोजी जांबुळकर, संताजी वाघ, शेट्याजी खराडे वगैरे सोहबा, अमोदा, हमीरपूर, पडवारी, जलालपूर प्रांतें रवाना केले. पुढें वेत्रवतीपार काल्पी, कोच जाणार आहे. नदी उतरलियावर पाहूं. तर सेवसें, मोणी, उगासी वगैरे महाल राहिले तेथेंही जमीदार उभे केले आहेत. बुंधेलियास मोठा नतीजा बैसला. केवळ नाइलाज जाहले आहेत. बहुतच शरण येतील म्हणोन लिहिलें तें कळलें. ऐशास यंदाचे छावणीची अडचण तुम्हांस पडली असेल. खेरीज गोष्ट आहे; जागा परकी, बुंधेले लबाडीवर, पैका पदरीं नाहीं. त्याहीमध्यें कांहीं फौज देशीं आली. याजमुळें गलबल जाली. तथापि तुम्हीं कार्यकर्ते, स्वामिकार्यावर दृष्टि, यास्तव सर्व गोष्टी सर्वांच्या पेश जात नाहींत. वरकड जागां जागां फौजा पाठवून बंदोबस्त केला. राहिला तो करून, म्हणोन तर उंची बंदोबस्त तो तुम्हीं केला, व राहिला कराल. बुंधेले सर्व प्रकारें मुर्दाड जहाले. शरण येतील म्हणोन तर त्याच्या दुरादृष्टच तैसें तदनुरूप त्यांस फलादेश जहाला. अद्यापि उमज न धरितील तर राज्यभ्र(ष्ट) जहालेच आहेत. सारांश ते शरण येतीलच. स्थापित आहेत. सारासार विचार पाहून मामला विल्हेस लावणें. अतःपर ओढ धरावीशी नाहीं. पाया शुद्ध मात्र करणें. पांच रुपये उणेअधिकावर मदार नाहीं. हे विनंती. *

---

श्री

४४ श्रावण वद्य १२, शके १६६८

( भा. व. १-६२ ) ता॥ २-८-१७४६

तीर्थरूप राजश्री नाना व तथा राजश्री भाऊ स्वामींचे शेवेसीं विनंती उपरी. सांप्रत राजश्री स्वामींची प्रकृत तिसरे प्रहरापासून अंग मोडून येत असें, पोटावर बिब्याच्या

---

* पहा का सं. प. या. ले. ५२.

फुल्या घातल्या आहेत. ऐसेंही असतां दोन्ही वाड्यांतील नित्य एक दुसरा कजिया ठेविलाच आहे. कजिया आसा जालियास असे घाबरे होतात कीं गर्भगत. देव मरण लौकर देईल तरी उत्तम म्हणतात. शरीरास उपाय करावयाचा उपेक्षा करितात. हें गोष्ट फुटकळ, दोहीं वाड्यांतून तुमचें इंगित समजावें आणि तदनुसार वर्तणूक करावी हे तरी त्यांचे ध्यानांत येत नाहीं; आणि साहेब तरी कोणाचें ऐकत नाहीं, म्हणोन यशवंतराव येक दोन वेळे बोलले व गोविंदरावही बोलले, परंतु कांहीं सुद्धां जाब दिल्हा नाहीं. याउपरीं वांचून काय करणें आहे म्हणतात. बुधवारीं प्रातःकाळीं नागोजीराव केशवराव दरबारीं होते. राघो रामाचे लेकांनीं शेणवी कर्जदार होता त्यास पैक्याकरितां मारला. त्याचा कजिया दरबारास आला. तो फैसल जालियावर राजश्रींनीं मशारनिल्हे ( स म्हटलें ) हाच कजिया देवडीवर जाता आणि आपाजी रघुनाथ यांस नेऊन मारतो तर कसें होतें ? माझे बळावर कोन्हीं जाऊं नये. आमची सत्ता उडाली. स्वामित्व दोन्हीं वाड्यांत आलें. तीं जीं करतील ते आमचे वस्तु नको म्हणवत नाहीं. कासार व परालाचा काजिया उपस्थित केला आहे. वाणी हरताळ पाडितात तें माझ्यानें सांगवत नाहीं. वाणी वगैरे आज उठोन गेले, तेव्हां कबूल करील. सवदा मिळेनासा जाला, तरी मजपुरतें तरी माझ्या बायकांकडून मजला जेऊं घालतील तें पुरवलें. परंतु बाइकांशीं कजिया माझ्यानें होत नाहीं. गजराबाईची नांदणूक उत्तम व्हावी, आपण पाहावी हा आपला संकल्प होता. परंतु थोरले धननीचे मर्जीस्तव जावाई आदिकरून वाडे यांस तंबे दिल्ही कीं नाहीं ? मग बरकड कळतच आहे. या उपरी माझे वस्तु कांहीं होत नाहीं, म्हणून बहुतच भाषण केलें. सारांश इतकाच कीं वाडियांतील मजकुराविशीं राजाच्यानें तिळप्राय बोलवत नाहीं. तीं जें म्हणतात तें हे बरें म्हणतात. या प्रकारचा मजकूर जाला आहे. याच समयांत या दोही तिही दिवसांत गोसावी व साहुकार यरझरा घालूं लागले आहेत. आमचे दिवाळीं निघावयास जाली. याउपरी पैका पाहिजे म्हणोन तगादा करितात. आज उद्यांच येऊन बसले तरी फजितीस कारण म्हणोन धोसरा राजश्रीनीं घेतला आहे. हाच मा। दोन्हीं वाड्यांत ऐकतों. विदित व्हावें यास्तव लिहिलें असे. दुश्चिन्हें दिसतात. वाड्यांत कोणता परिणाम कसा लागेल तें पहावें. सविस्तर स्वामींस कळावें म्हणोन लिहिलें असे. हे विज्ञापना.+

---

४२ श्री

( पारसनीससंग्रह ) भाद्रपद शुद्ध १, शके १६६८

पौ। छ. १३ साबान पौ। २०-८-१७४६

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री रामचंद्रबावा स्वामी गोसावी यांसी

पोष्य बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणोन

---

+ पत्र महादाजी अंबाजीचें.

स्वकीय कुशल लिहीत जावें. यानंतरीं सांप्रत तुमचीं पत्रें येऊन वर्तमान कळत नाहीं. त्यास, कोणे ठिकाणीं आलां, काय वर्तमान आहे, तें सविस्तर लिहिणें. येथील कित्येक अर्थ विस्तारें अलाहिदा पुरवणी पत्रावरून कळेल. फिरंगियांनीं सांवतांचीं स्थळें तमाम घेतलीं.* दोन तीन हजार निवडक फिरंगी + + गोंव्यांत आहेत. बहुत इरादा आम्हांसीं सवड पाहून कलह करावा ऐसा राखितात. वर्तमान उगेंच कळलें असावें यासाठीं लिहिलें असे हे विनंती.

---

श्री

४६ भाद्रपद वद्य ३, शके १६६८

( पारसनीससंग्रह ) ता. २४-८-१७४६

पुा राजश्री रामचंद्रबाबा स्वामी गोसावी यांस

विनंती उपरि. उदेपूरचा ऐवज दोन वेळां व बघेलखंडचा व नारो शंकर यांजकडील शिल्लक व सेवढें मिळोन सव्वा दीढपर्यंत पाठविला आहे, पावेल. वरकड रसदा द्यावयास तमाम मामलेदारांस ताकीद करून पाठविलें. गुदस्त प्रमाणें रसद घ्यावी. आम्ही वोढ सोसून स्वामींचा ऐवज रवाना केला. हुजुरातच्या फौजेची समजावीस व देणें मिळोन सात आठ पाहिजे. त्याची नेमणूक बुंधेलियांच्या ऐवजावरी आहे, म्हणोन लिहिलें तें कळलें. ऐशास उदेपूर व नारो शंकर यांजकडील ऐवज रवाना केला तो पावला. वरकड रसदा द्यावयास पाठविले तें येऊन रसदा देतील. हुजुरातच्या फौजेचे समजावीस व देण्याचा अर्थ लिहिला तो कळला. तुम्ही बुंधेलियांकडील ऐवज उगवावयाचे विचारांत अहां. उगवून घेणें. कर्तव्य उचित तें करणें. तुम्हीं रवाना केला ऐवज तो येऊन पावेलच. चिंता काय आहे? छ १७ साबान हे विनंती.

---

श्री

४७ भाद्रपद वद्य ५, शके १६६८

( पारसनसिसंग्रह ) ता. ५-८-१७४६

पु॥ राजश्री रामचंद्रबाबा स्वामी गोसावी यांसी

विनंती उपरी. दरबारचा मजकूर वारंवार तुम्हांस लिहिलाच आहे. थोरले बाई-कडील गुंता उरकिला. पायागडची चर्चा न करावी, ऐसें करून विल्हेस लाविलें. धाकटे बाईकडील बोली होत आहे, तेही विल्हेस लाविलियांतच आहे. लावून उपरांतीक राजश्री-

---

* ता. ५-५-१७४६ रोजीं हलर्ण किल्ला सांवताचा पोर्तुगीजांनीं घेतला पिंगुळकरकृत सा. इ.

कडील गुंता राहिला. त्यास तोही विल्हेस लागेल. परंतु मास दोन मास या गोष्टीस लागतील, लागोत. राजश्री संभाजी राजे राजश्री बाबूजी नाइकाकरितां अडले आहेत. मशारनिल्हेस आणावयास राजश्री केशोराव गेले आहेत. येतील न येतलि पहावें. राजश्री खंडेराव धुमाळ घोरपडियास पाडाव जहाले होते ते मृत्यु पावले. विरापा कैदेंत आहेच. वरकड नवलविशेष लिहिजेसें नाहीं. नबाब निजामनमुलूख हैदराबादेस आहेत. बागबगीच्या शहर करून आहेत. दसरा जालियावर कोणीकडे रोंख करतील ते मनास आणून लिहिलें जाईल. छ. १८ साबान हे विनंती.

---

श्री

४८ आश्विन शुद्ध १६६८

( पारसनिससंग्रह ) ऑक्टोबर १७४६

पुा राजश्री रामचंद्रबाबा स्वामी गोसावी यांसी

विनंती उपरी. पट्टण्यांत जावयाचा मनसुबा दोन तीन पुरवण्यांत विस्तारयुक्त लिहिला आहे त्याजवरून कळेल. सारांश तुम्ही बुंदेलखंडाचा गुंता उरकन मार्गशीर्ष मासीं पट्टण्यास जावयाचा विचार केल्यास चार वर्षेपर्यंत पातशहापाशीं बोलत गेलों, तें प्रमाण पडेल. पातशहापासीं पैका मागावयास जागा होईल. तुम्हीं पट्टण्यां(त) शिरतांच रघोजीची चकमक राहील व त्याचे पक्षपाती खंदीद होऊन त्याचा मनसुबा बहरम होईल. पट्टण्यांत आपल्या फौजा जावयास योग्यता आहेच. एक तुमच्या जाण्यानीं तीन गोष्टी साधतात. एक, सर्वोत्कर्ष आपला नक्ष या राज्यांत व परराज्यांत होईल. दुसरें, द्रव्यसाध्य होईल. तिसरें, आपल्या फौजा पट्टण्यांत जातां न येशा लोक चर्चा करीत होते, त्या गलथ होऊन बंगालियाच्या तहाचें यशच तुमच्या पदरीं पडेल. हे गोष्टीस तुम्हांकडून विलंब जहाला अथवा तुम्हीं न गेल्यास आजपर्यंत नक्ष जोडिला, ज्या ज्या गोष्टी पातशाहापाशीं बोलत गेलों, तें सर्व बास्कल होऊन लटीकवाद पदरीं पडेल. बहुतां + + नुकसान आपलें आहे, आणि यश संपादितां रघोजी संपादील. त्याचे पक्षपाती आम्हांकडील न्यून पदार्थ सर्व + + च आहेत. मग तो विशेषच बोलोन फारच फुलजीमर्दे अदमी होतील. याजकरितां लक्ष प्रकारें जावें उत्तम. तुमचा जावयाचा विचार जहाल्यास राजश्री बापूजी महादेव यांस पत्र लिहिलें आहे, तें दिल्लीस पाठविणें. व महाबतजंगास पत्र लेहून तुम्हांकडे पाठविलें आहे तें महाबतजंगाकडे पाठविणें. परभारी पत्रें उभयतांकडे पाठवावीं. आणि तुमचें जाणें पट्टण्यास न जाहल्यास तिकडूनही लटीकवाद येईल. याजकरितां तुम्हांकडेच दोही रवानगीचीं पत्रें पाठविलीं असेत. बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

श्री

४९ कार्तिक वद्य ३, शके १६६८
( पारसनीससंग्रह ) ता. २१-१०-१७४६

राजश्री मल्हारजी होळकर व जयाजी शिंदे गोसावी यांसी

छ अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो बाळाजी बाजीराव प्रधान आसीर्वाद सुा सबा आर्बैन मया व अल्फ. तुम्हांकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. कोठें अहां, काय मनसुबा योजिला आहे, तें सविस्तर लिहून पाठविणें. दरबारचें वर्तमान तर, राजश्री संभाजी राजे आज तागाईत अडून येथें बसले होते. त्यांस राजश्री स्वामींनीं, राजश्री बावूजी नाईक यांजकडून साडेचहूं लक्षांचीं खतें संस्थानची आणून द्यावयाचा करार करून, राजश्री संभाजी राजे यांस, आम्हांस दरम्यान जामीन व्हावयाची आज्ञा केली. आम्हीं मान्य केलें. बाबूजी नाईक यांजकडून खतें आणून देतों म्हणालों. त्यास राजश्री स्वामी बोलिले कीं, खतें येत तों मामला अमानत असे. याप्रमाणें बोली होऊन राजश्री संभाजी राजे यांस छ. १३ साबानीं निरोप दिल्हा राजश्री स्वामींनीं दोन हत्ती, पांच घोडे व समशेर १ एक व चार पोषाख दिल्ही. याउपरी एका दों रोजीं कूच करून जातील. बाबूजी नाईक बारामतीस आहेत. आबाजी नाईक साताऱ्यास आहेत. मागाहून बोलीचाली होईल ते लिहिली जाईल. नबाब निजामनमुलूख हैदराबादेस आहेत. अद्याप नवानिगादास्त अगर कूचाचा मनसुबा जहाला नाहीं. निश्चय होईल तो मागाहून लेहून पाठवून. वर फिरंगी, इंग्रेज, वलंदेज व सांवत यांचें वर्तमान पहिलें लिहिलें आहे त्याप्रमाणें आहे. आंग्रे बहुंशीं आपलाले जागा आहेत. जाणिजे, छ १६ सव्वाल बहुत काय लिहिणें?

---

श्री

५० कार्तिक वद्य ५ शके १६६८
( अप्र. जाधवसंग्रह ) ता. २३-१०-१७४६

राजश्री पिलाजी जाधव गोसावी यांस

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद सुा सबा आर्बैन मया व आलफ. किल्ले रतनगडकर रायकुवरबाई इणें सिरकिया ध्यावयाचा करून सिरक्याचे लोक घेऊन विक्रम पतंगराव जव्हारकर याजवर जावें, ऐसे वर्तमान आइकिलें व लिहिलेंही आलें आहे, त्यास सिर्के मन माने तैसे जागाजागा जमाव करून उपसर्ग करीत आहे हे गोष्ट अनुपयोगी आहे. त्याची बातमी यथास्थित आणून हरप्रकारें त्याची गुंज मोडे, पुढें ते उपद्व्याप न करीत, ते गोष्ट विचारें करून केलीच पाहिजे. यास्तव लिहिलें असे. तरी तुम्ही जवळ आहां. या गोष्टीचा शोध करणें. कोणी लबाडी करीत असतील

त्यास बरे वजेनें धमक देऊन ते धमकेनेंच बारापाणी होत, मनसुबा सिद्धीतें न जाई तें करणें, व पुढें वरचेवर वर्तमान लिहिणें. त्यासारखे कर्तव्यतेची आज्ञा केली जाईल. जाणिजे. छ + सवाल व तुम्ही राणीशीं राजकारण करणें कीं पहिल्यापासून पदरचे. तुमचें सर्व प्रकारें अवश्य आहे. ऐसें असतां तुम्ही आमच्या लग्याशिवाय करावें हें उचित नाहीं. सर्व प्रकारें तुम्ही आमचे, आम्हांस किल्ला देऊन आम्हांपासून आपलें बरें करून घ्यावें. येथूनही तुमच्या साहित्यास अंतर आहे ऐसें नाहीं. ज्या प्रमाणें तुमचें चालवावे त्या प्रमाणें चालवूं. ऐसें बोलून आपले लगामी लागेल तर विचारें करून लावून घेणें. जाणिजे. बहुत काय लिहिणें ? ( शिक्का लेखनसीमा )

---

श्री

५१ कार्तिक व॥ ६, शके १६६८

( पारसनीससंग्रह ) ता. २४-१०-१७४६

राजश्री मल्हारजी होळकर व जयाजी शिंदे गोसावी यांसी

छ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो॥ बाळाजी-बाजीराव प्रधान आशीर्वाद. सुा सबा अर्बैन मया व अल्लफ. दरबारचा मजकूर व दक्षिणेत मनसुबे उपास्थित जाले, व कर्तव्यतेचा प्रकार व उतरेकडील व पूर्वेकडील मनसुबा करीत आलों व पुढें कर्तव्यांत आणावा, व बुंधे-लियांचा निकाल काढावा, एतद्विषयींचा सर्वही अर्थ पृथक पृथक, निरनिराळा राजश्री अमृतराव शंकर, दिनकरराव यांस सांगितला आहे. हे तुम्हांस विविक्त प्रकारें सर्वही सांगतील. तो ध्यानांत आणून उत्तम प्रकारें मनन करून सध्यां करावें कोणतें, व अवकाशें करावें कोणतें, सध्यां करावें, बाहेरील साधावें, त्याचा फलादेश कसकसा आहे तो चित्तांत आणून उचित मन-सुबा व ज्यांत नक्ष, लौकिक तें आधीं करावें. राहिलीं किरकोळ कामें जे समयीं करूं म्हणाल ते समयीं होतील. तीं अवकाशें करून केल्यास आपल्याच हातांत आहेत. त्यांचें संकट नाहीं. जाणिजे छ. १९ सव्वाल.

---

५२ श्री

( अप्र. जाधवसंग्रह ) मार्गशीर्ष वद्य ४ शके १६६८

( शिक्का बाळाजी बाजीरावाचा ) ता. २१-११-१७४६

राजेश्री पिलाजी जाधवराव यांस

छ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेहांकित बाळाजी बाजीराव प्रधान आसीरवाद सुा सबा अरबैन मया व अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. नाजूक कार्याचे

---

+ येथून अक्षर स्वतःचें.

लागभाग हवेलागे सर्व केरोजी न॥ बांडे याचे सूत्रें करून सिद्ध केलें आहे. बाळोजी कराले व धोंडोजी इंदुरा खिजमतगार जाऊन पाहून आले. हवेलागे व केरोजी ना। बांडे यांची याद करार करून पाठविली आहे. ध्यानास आणून कार्यसिद्धतेची आज्ञा कर्तव्य ते करावी म्हणोन लिहिलें, ते धोंडजी इंदुरा आला याणी विदित केले, व बकसिसाची याद पाठविली त्याजवरून सविस्तर कळले. ऐसियास केरोजी ना। याचें सूत्र करून लागभाग ठीक जाहाला. हवेही कार्येसिधीस तयार आहेत, फार उत्तम आसे. तुम्हीच तेथून कार्य करावें, परंतु तुम्हास साष्टी वसईकडे जावयाचे लिहिले, त्यावरून तुम्ही गेलाच असाल. मागाहून रा। रामाजी माहादेव यास रवाना करून याजकडेही तेच सूत्र आहेत. याचेही लोक पाहून आले आहेत. यास कार्ये करावयाची आज्ञा केली आहे हे करतील. तुम्हासही सांगितील जाणिजे छ. १८ जिलकाद. ( लेखनसीमा ).

---

श्री

५३ मार्गशीर्ष वा। १०, शके १६६८
( पारसनीससंग्रह ) ता. २७-११-१७४६

पु॥ राजश्री रामचंद्रबाबा स्वामी गोसावी यांस

विनंती उपरी. दरबारचें वर्तमान तर, राजश्री संभाजी महाराज, राजश्री स्वामींचा निरोप घेऊन कोल्हापु++त्यास समाधान वाटत नव्हतें++आरोग्य आहे. राजश्री++दर्शनास राजश्री बाबूजी नाईक आले. भेटी जहालियावर...पांच रोज उगेच होते. राजश्री स्वामींनीं राजश्री संभाजी महाराज यांचा तालुका सोंधे बिदनूर व सावनूर, बंकापूर निराळी केली. तेथें बाबूजी नाईक यांनीं तिलतुल्य उपद्रव न द्यावा येविसीं राजश्री संभाजी महाराज यांच्या गळ्यावर हात ठेविला. व गुदस्तां बाबूजी नाईक यांनीं खंडण्या करून संस्थानिकांचे कतबे घेतले. त्याजकरितां राजश्री संभाजी महाराज पांचसहा महिने अडले होते. कतबे बाबूजी नाईक याजपासून तुमचे देवितों म्हणोन राजश्री स्वामींनीं करार केले. तदोत्तर राजश्री संभाजी महाराज यांनीं आम्हांस दरम्यान घेतलें कीं, बाबूजी नाईक यांजपासून कतबे घेऊन आम्हांस राजश्री प्रधानपंतीं द्यावे म्हणाले. त्याजवरून राजश्री स्वामींनीं आम्हांस जामीन व्हावयास आज्ञा केली. आम्ही जामीन जहालों. संस्थान बिदनूर व सांवनूर येथील बोली आमच्याच विद्यमानें होत आहे. बाबूजी नाईक यांनीं येथलि ताळतंत्र आठरोज पाहिलें. उपरांतीक राजश्रीनीं स्वामींच्या दारीं बैसोन उपोषणें आरंभिलीं. पंधरा दिवस उपोषणें करितात. राजश्री स्वामींनीं तों निश्चय केला आहे. कोणाचें काढून द्यावें, आपणांस अनुकल पडत नाहीं. तथापि दहा पंधरा उपाय केले. धाकटी बाईही छोटेखानींच्या बोलें लागोन रदबदल करितात. निदान नव परगणे सरंजाम देतों म्हणतात. अद्याप ठरलें नाहीं व तेही समजले नाहींत. राजश्रीच्या दारीं मशारनिल्हे बैसले. उपास केले. याजमुळें

राजश्री स्वामी फारच सक्रोध जहाले. मशारनिल्हेची अब्रू राहिली नाहीं. व त्यांचे मध्य-स्थास वारंवार शिरपाव होत गेला व अद्यापही होतात. पुढें निकाल पडेल तो लेहून पाठवूं. सारांश, या वेळेस फारच राजश्री स्वामींची मर्जी कूट आहे. त्याचा विस्तार लिहितां विस्तार आहे. नाईकांचे गुंते ++ जहाले. तथापि प्राक्तनवान, साहसी आहेत. ईश्वरें काय काय परिणाम नेमिला असेल न कळे. छ २४ जिल्काद हे विनंती.

---

श्री

५४ — मार्गशीर्ष वद्य १० शके १६६८

( पारसनीससंग्रह ) — ता. २७-११-१७४६

पुा राजश्री रामचंद्रबाबा स्वामी गोसावी यांस

विनंती उपरी. नबाब निजामनमुक यांची वार्धिक अवस्था, शरीरींही किंचित असमाधान, तथापि नवाबनीं भागानगरीहून छ २२ सव्वालीं कूच केलें. लहानलहान मजली करून कलबर्गियाचे रोखें येतात. पुढें कोणीकडे तोलतील पहावें. तहकीक येईल वर्तमान तें लिहिलें जाईल. आवढा किल्ला थोरले वाडियाकडे राजकारण लावून घेतला होता. परंतु मागें भर नाहीं, कुमक न होय, यास्तव मोगलांनीं मागती घेतला. छ. २४ जिल्काद हे विनंती.

---



श्री

५५ — मार्गशीर्ष वद्य १०, शके १६६८

( पारसनीससंग्रह ) — ता. २७-११-१७४६

पुा राजश्री रामचंद्रबाबा स्वामी गोसावी यांसी

विनंती उपरी. फिरंगी याचे व सावंतवाडीकर यांचा कलह लागला आहे. सावंतांचीं दोन चार ठाणीं फिरंगियांनीं घेतलीं, तो मजकूर पहिला तुम्हांस लिहिला होता. फिरंगी दिवसेंदिवस बळावला. राजश्री जयराम सांवत व रामचंद्र सांवत यांत परस्पर चित्तशुद्ध नाहीं. कितेक जमीदार लोक फिरंगियास सामील जहाले. हल्लींही दोन ठाणीं फिरंगियास दिल्हीं. प्रस्तुत फिरंगी रेडीवर आला आहे. कुमकेकरितां सांवताचे वकील येथें आले, त्याजवरून दोन चार हजार फौज त्यांचे कुमकेस रवाना करावी लागते. रवानगी करीत असों. फिरंगी व फरासीस एक जहाले. फरासिसांनीं मद्रास व फुलचरी दोन बंदर अर्काट प्रांतें इंग्रेजांचीं होतीं तीं घेतलीं. मुंबईस यावयाची आंवई घातली आहे. गोंव्यास फरासीस विसां जहाजांनसीं येतो. टोपीकर एकच आहेत. त्यांचा भरंवसा नाहीं. कोंकणांत खबरदारीस राजश्री पिलाजी जाधवराव रवाना केले असेत. मुंबईचें नांव घेतो, परंतु कोठें उतरतील

पहावें. आम्हीं आपले स्थलांची खबरदारी करविली असे. पुढें होईल वर्तमान तें लेहून पाठवूं. यंदां फिरंगियाचे मनांत गरमी दिसते. श्रीकृपा आहे, तों काय चिंता आहे ? छ २४ जिल्काद हे विनंती. *

---

५६ श्री मार्गशीर्ष वद्य ३०, शके १६६८

( अप्र. जाधवसंग्रह ) ता. १-१२-१७४६

राजश्री पिलाजी जाधव यांस

अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद सुा सबा आर्बैन मया व आलफ. राजश्री संभाजी महाराज यांचा तालुका सोधें व बिदनूर, व सावनूर, बंकापूर वगैरे हे संस्थानें राजश्री स्वामीनें आमच्या स्वाधीन केलीं. तिकडे राजश्री बाबूजी नाईक यांणीं त्या तालुक्यांत न जावें, ऐसा करार केला आहे. त्यास सदरहू तालुक्याचा पैका आला पाहिजे. विनाफौज ते लोक सुप्रयुक्तीनें पैका देतील न देतील हा अर्थ तुम्हांस न कळेसें नाहीं. यास्तव तिकडे फौज गेली पाहिजे. दुसरें, सावताशीं फिरंगियांनीं कलह मांडला आहे. सावताचीं दोन तीन ठाणीं फिरंगियानें घेतलीं. सावंत पहिल्यापासून पदरचे. त्यांणीं चाकरी केली. त्याचें साहित्य करावें जरूर आहे. यास्तव फौज रवाना करावयाची तजवीज केली आहे. चिरंजीव राजश्री सदोबा यास निरोप देऊन त्या प्रांतें रवाना करावे, ऐसा विचार केला, दो चौ रोजांत राजश्री स्वामीचा निरोप होईल. चिरंजीव कधीं स्वारीस गेले नाहींत. यास्तव तुम्हास जावें लागेल. तुम्हाविना दुसरे कोण्ही जावें? तुम्ही याजबराबर असलिया आम्ही निश्चिंत असों. फौजसह तुम्ही व यांणीं नरसी सरस्वती या जागा जावें. दो चहूं संस्थानचा निर्गम करून घेणें तो ध्यावा. तिकडे सावतावर फिरंगियानें दाट केली, तरी तिकडे दोन हजार फौज पाठविणें तिकडे पाठवून, त्यांचेंही साहित्य करावें. सारांश तुम्हांबरोबर पथकें आहेत, तीं वसईस पाठवावीं. तुम्ही आपले समस्त पथकानशीं सिद्ध असणें. चिरंजिवांस राजश्री स्वामींचा निरोप होतांच तुम्हांस लेहून पाठवूं ते समयीं स्वार होऊन अतिसत्वर येणें. जाणिजे छ २८ जिल्काद. बहुत काय लिहिणें?

---

* पोर्तु० ग० जनरल कॅस्टेलो नोव्हो यानें ता. ५-५-१७४६ रोजीं सावंताचा हलर्ण किल्ला हस्तगत केला, त्यावरून त्यास काउंट अलोर्ना असा किताब मिळाला. या सालीं सावंतांना त्यानें चांगलें नरम केलें, तेव्हां त्यांनीं बचावासाठीं पेशव्यांची मदत घेतली. पहा का. सं. प. या. ले. ६१.

श्री

५७

( अप्र. जाधवसंग्रह ) पौष शुद्ध ८, शके १६६८

ता. ९-१२-१७४६

राजेश्री पिलाजी जाधवराव गोसावी यांसी

छ आखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेहांकित बाळाजी बाजीराव प्रधान आसीरवाद सुर सन सबा आरबैन मया व आलफ. सांप्रत तुमचे पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं, तरी तिकडील फिरंगियाचे वगैरे वर्तमान वरचेवर लिहीत जावे. इकडील मजकूर कित्येक पुरवणीपत्रीं लिहिला आहे त्याजवरून कळेल. दरबारचा विचार तर नाईक अद्यापि उपास करीत आहेत, परंतु कांहीं निकाल जाहला नाहीं. पुढें काय होईल पाहावें. जाणिजे छ* ७ जिल्हेज. शरीर आपले अशक्त आहे. पथ्य औषध करीत असावे. बहुत काय लिहिणें ? ( लेखनसीमा ).

---

श्री

५८

( अप्र. जाधवसंग्रह ) पोष शुद्ध ८ शके १६६८

ता. ९-१२-१७४६

पुरवणी राजश्री पिलाजी जाधवराव गोसावी यांसी

आसीरवाद उपरी. करणाटक प्रांती इंग्रजाची जागा फिरंगियांनीं हल्ला करून बहुत मर्दुमीने घेतली. अनावरुदीखानाकडील कुमक गेली होती तीसही पिटून काढिले. त्याचप्रमाणें यंदा दोन तीन स्थळें घेतली. सेवटी दोन तीन हजार रेणोल गैरआगीचे सामान घेऊन रेडीस आले. रेडीकरही यथाशक्तीनें सावध होते. परंतु आगीच्या मारामुळें दम न निघाला. कौल घेऊन बाहेर निघाले. फिरंगियांनीं जागा घेतली. यावरून दिसोन येते कीं मुंबईकरांवर अथवा वसई वेसावे या जागियावर यावें, ऐसा अर्थ आहे. यास्तव आपणांस रवाना ते प्रांतीं केले. वरचेवर फौजही रवाना करीत आहो. परंतु वसईचे बंदराचे आंगची इमारत सखल आंतून मात्र झुंजावे, रावतानी बाहेर ते चालून येऊ लागले तर घोडे मैदान चालून घेऊन हिरीरी करावयास नाहीं. भरतीचे वेळेस जागा तों आगदीं नाहीच. यास्तव हशमी खासे खासे लोक निवडून त्यास बदरीचे आंगचा जे जे जागा नीच आसेल, तेथे चौकी नेमून द्यावी. म्हाळोजी खुटे याजकडील करोल वगैरे यानी नेहमीं आंत रहावें. दुसरेचे जागा जाग नीच आहे तेंथे हुके गरनाला टाकू लागतील तेव्हां कोट सफेल सोडून मागे होतील ते गोष्ट कामाची नाहीं. वोली लाकडे लांब तोडून आणून त्याचे माळे घालावे, त्याजवर थोडी थोडी माती घालावी, कीं सत्वर आग न लागे. हा प्रकार आथवा आणखी काही तजवीज केलियावांचून गरनाळा हुके यांचा मार तेथें सोसवणार नाही. सूचक आर्थ लिहिला आसे

आपले विच्यारास येईल तसें करावे. फिरंगियाचे आगीचे मारास सर्व प्रकारे वाकीफ आहांच. साष्टी प्रांतीं इंग्रोजी कदम, बापूजी भीवराव वगैरे पथके पाठविली आहेत. श्रीकृपेनें साष्टीस तो काही धोका नाही. परंतु वेसावे जागा लाहान व बंदरात त्याजकडील मात्तबर जहाज उभें राहून मार देईन म्हटल्याने बैसले कामी जागा ते आंगे आयाप नीच आहे, यास्तव चांगले बरकंदाज व करोल आत मर्द माणूस असलियाने दहशत न खाता मार करतील व तोफा आवसान धरून मारू लागल्यावर जाहाजांच्याने उभे राहावते आसे नाहीं. तेथीलही परामर्ष आपण करावा. फिरंगियांस वोढा बसावा यासाठीं चिरंजीव भाऊस बाहेर काढलें. आपणास पूर्वीं लिहिले होते की भाऊसमागमे जावे लागेल, परंतु आपण ये समई वसईसच आसले पाहिजे. तुम्हासारखे सलामतीचे सरदार आसलियाने गनीम येऊ पावणार नाहीं. आला तरी तुम्ही सर्व प्रकारे तरतूद व मर्दुमी करून नामोहारम कराल हे निशा आहे. यास्तव तुम्हास पत्र लिहिले आहे. तरी तुम्ही खाशा वज्रयोगिनीसच राहावें. वसईस जाऊन जागा लागभाग सर्व पाहून शंकराजीपंतास सांगून बंदोबस्त लढाईचा करावा, कोणेवीसी भीड न धरावी. शब्द लागता लागेल. आठा चौहू दिवसा मानाजी पायगुडे व आणखींही पथके आपणाकडे पाठवितो. तसेच आरनालियास चालून आलिया वर बाहेरील कुमक व्यर्थ, यास्तव आतच चांगले लोक ठेवावे. आरमाराची मिळकत थोडी व खर्च फार आहे. जरूर रवानगी करावी ऐसे नाही. आरमारावर हशमांतील निवड चढते ते पंधरावीस दिवस एखादीकडे गेली, मागे लढाई पडली तर ते गोष्ट कामाची नाही. यास्तव आरमार जवळच ठेवावे म्हणजे आरनाल्यात लोक उत्तम राहतील. चांगले लोक आसलियावर काय चिंता आहे. मागे खांदेरीवर हल्ला फिरंगी इंग्रजांनी केली होती. आत मर्द होते म्हणून मारून काढिले. सारांश तुम्ही सर्व घावदाव मनात आणून बंदोबस्त करविणें. छ ७ जिल्हेज ( लेखनसीमा. )

---

श्री

५९ पौष शु. १६६७?

( पारसनीससंग्रह ) १७४५ चें असावें ?

पु॥ राजश्री रामचंद्रबावा स्वामी गोसावी यांस

विनंती उपरी दरबारचा मजकूर तर हा कालपर्यंत दरबारींतून आमचा उलगडा जाहला नाहीं. मोठा बखेडा थोरले महालचा आहे. त्यास, त्याजकडील गुंता कळेल त्या-रीतीनें उरकावा या प्रयत्नांत असो. महालचा गुंता उरकून, निरोपाचा विचार करून. सारांश येथील प्रसंग अनिवार फार, यास्तव गुंता आहे. बोलोन चालोन जेथवर बंदोबस्त होईल तो करून निरोप घेऊन येऊं. वरकड राजश्री बावूजी नाईक हजार बाराशांनसीं नरगुंदास आहेत. शिंदे व भरगुडे सामील करून सावनूरकरांच्या प्रांतांत धामधूम करावी ही

उमेद धरिली आहे. सावनूरकर पठाण सहा हजारांनसीं नरगुंदासमीप दोन कोसावर उतरला आहे. त्याचें त्यांचें युद्ध होणार. येईल वर्तमान तें लेहून पाठवूं. राजश्री मानाजी आंग्रे...राजदर्शनास आले. त्यांचें गाणें गडकोठीचें आहे. +खापरा किल्ला त्यास मात्र द्यावा ऐसें राजश्री स्वामी व धाकटी बाई बोलतात. आम्हीं मान्य करावें तरी थोरली बाई पायागड बांध्यास द्या म्हणतात. हा अर्थ राजश्रीस निवेदन जहाला आहे. त्याजवरून आंग्र्यास खापरा किल्ला अवकाशें देवावा ऐसा भाव राजश्रींचा आहे. आम्हीं जितकें बोहून धरणें तितकें धरिलें असे व आंगरियाचेंही मनोधारण शब्दगौरवें कर्तव्य तें करून पुण्यास गेल्यावर तुमचें हित कल्याण तेंच करूं म्हणोन बोलत असों. आंग्रियास राजश्रीचा निरोप जहाला. अतःपर आम्हीं निरोप देऊन, लावून देऊन मागाहून सविस्तर लेहून पाठवूं. राजश्री स्वामींनीं राजश्री उदाजी चव्हाण यांस आणिलें. ते दोनशें स्वारांनसी येऊन दर्शन घेतलें. त्यांचा सरंजाम राजश्री स्वामी कसकसा करितात तो मजकूर मागाहून लेहून पाठवूं. हा कालवर येथेंच आहों. ईश्वर इच्छेनें ( निकाल ) होईल तेव्हां खरा. विस्तार काय लिहावा ? हे विनंती.

---

६० श्री पौष श. १६६८

( पारसनीससंग्रह ) डिसेंबर स. १७४६

अमृतरायाचें पत्र पटण्याहून आलें कीं, महाबतजंगास कोंडिलें आहे. यंदा सरकारची फौज न पोहोंचली. याजमुळें या मनसब्यांत बहुत अप्रामाणिकता येऊन शत्रुपक्षाची तमो-वृद्धि जाली. दुसरा पेंच, राजश्री कर्जाऊ पंधरा वीस आम्हांपासून इच्छितात. ते प्राप्त न होत याजमुळें कष्टी. थोरले वाडियांतील तो पेंच निरंतर लहानपासून थोर गोष्टीचा वृद्धी-सच पावत आहे. घरीं दोन वर्षे फौज बसली. कर्ज नवें दहा पंधरा जहालें. मानाजी आंग्रे यांचा किल्ला खापरगड नवा घेतला. याजमुळें धाकटे वाडियांतील कृपा होती तीही इतराज. याप्रकारें नानाप्रकारें पेंच आहेत. परंतु आमचे मतें घरकलह नाहीं तर इतकेंही श्रीकृपेनें उलगडूं सकतो. जर क्षुद्र क्षुद्र परस्परें मान अभिमान वाढवावे यांत नफा किंवा क्षुद्र अर्थ ध्यानांत न आणितां हरप्रकारें मल्हारबांस समजावून स्वकार्य साधनेसाठीं घेऊन यावें, हें अधिक. हा विचार आपण तमाम दौलतेचे उपयोगाचे नजरेनें करावा. मागें तुम्हीं व ते करीत आलां. त्याजमुळें इतके दिवस उत्तम जहालें. पुढें करावा उचित असे. घरकलहामुळें बाहेरील मनसबा बिघडेल तो सहसा नीट होणार नाहीं. यंदा स्वारीस जावयास योग्यता, राजश्रीनीं निरोप दिल्हा याजमुळें जहाली. सत्वर सर्वांनीं एके जागां होऊन तमाम डौल पाडावे. ...करावी. म्हणजे सर्व पेंच उलगडून दौलतेस उपयोगी होईल. हे अर्थ तुम्हांस लिहिणें लागतात ऐसें नाहीं. सर्व तुम्हीं करून म्हातारे जहालां. सारांश बाहेर वाईट न दिसे,

---

× ऊर्फ भैरवगड, कल्याणजवळ, हा २८-१-१७४५ रोजीं पेशव्यानें घेतला.

घरकलहामुळें दौलते, ती (?) उचित कार्यास अटकाव न पडे ती योजना जेणें करून होय तें सत्वर करून त्यांस समजाऊन घेऊन यावें. क्षुद्र मनुष्याचे बोलें विषाद वाढतात. ते निखालस, तुम्हीही निखालस, जन्माचे सोबती अहांत. विस्तारें काय लिहिणें हे विनंती.

---

श्री

६१ शके १६६७-६८

( भा. व. १-६४ ) सन १७४६

पु॥ तीर्थरूप राजश्री नाना व तथा राजश्री भाऊ स्वामींचे सेवेशी. विनंती. शेटी मलीक स्वामीकडून येथें आला त्याबरोबर पत्र पाठविलें तें पावलें. सेटीनें राजश्रीस वर्तमान सविस्तर स्वामींकडील सांगितलें. महाराजांनीं सर्व ऐकून मागती येकीकडे सेटीस घेऊन पुसिलें. त्याणें सांगितलें कीं, पेशवे सुखरूप आहेत. काम कारभार पूर्ववत्प्रमाणेंच होत आहे. आपल्या बंदोबस्तानें आहेत. ब्राह्मणाचे हात तोडले, कलवंतिणी राखल्या, दारू पितात, धुंद जाहले म्हणून महाराजांनीं ऐकलें होतें, परंतु सर्व शोध बारकाईनेंही घेतला, दिसोनही सर्व आला, अगदीं बाष्कल. नाना बहुत खबरदार आहेत. तेव्हां महाराज बोलले कीं लंबडिचे लोक भलतेंच सांगतात. सर्व लटकें! नाना खुशाल आहे कीं ? तेव्हां हा म्हणाला कीं खुशाल आहेत. महाराज बोलले, इतकेंच असलें म्हणजे जाहलें. नाना जिवानें खुशाल असला म्हणजे सर्व बरें आहे. लोकांचे आम्ही मजकूर कोठें मानतों ? तूं सांगतोस हें खरें. बारांना वाईट नाना माझा तेवढा चाकर पदरीं माझे मातबर आहे. सुखरूप असला म्हणजे जाहलें. मग शेटी म्हणाला कीं सुखरूप आहेत. हें वर्तमान शेटीनें येथें येऊन आम्हांजवळ सांगितलें. खरेंच आहे. परभारी शेटीनें जेव्हां राजश्रीजवळ स्वामींचें पत्र दिल्हें, महाराजांनीं वाचलें, दरबारीं लोक फार होते, यास्तव शेटीला म्हणाले इकडे ये; तुला वर्तमान पुसावयाचें आहे. असें सदरेस बोलून पलीकडे शेटीला घेऊन गेले. वर्तमान पुशिलें. यानेंही सांगितलें. हेंही वर्तमान राजश्री गोविंदराव यांणीं सांगितलें कीं, नानाचें वर्तमान पुसावयासी सेटीस याप्रमाणें पुशिलें, व जाबसालही उत्तम जाहला. आतां महाराजांचे निदर्शनास आलें. इतक्या उपरीं राजश्री दरबारीं काय चर्चा करितात व बाईजवळ काय चर्चा करितात हेंही येक दों दिवशीं कळेल. तदोत्तर शेवेसी लिहीन. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.*

---

* पत्र महादोबा पुरंदरे याचें. पेशव्यावर शाहूची इतराजी स. १७४६ च्या दसऱ्यापासून पुढील फाल्गुनपर्यंत चालली. ता. २०-३ व २४-३ स. १७४७ च्या पत्रांत पेशवा सातारा सोडून बाहेर पडल्याचें पिलाजी जाधवास लिहितो, त्यावरून सातारच्या भानगडी त्या वेळीं उरकल्या व सेटी मलीकच्या साक्षीनें शाहूची खात्री पटली असें दिसतें.

६२ श्री

( अप्र. जाधवसंग्रह ) पौष व॥ १४ शके १६६८

शिक्का ता। ३०–१२–१७४६

राजेश्री पिलाजी जाधवराव गोसावी यासी

छ आखंडितलक्ष्मीआळंकृत राजमान्य स्नेहांकित बाळाजी बाजीराव प्रधान आसीरवाद. सु॥ सबा आरबैन मयाव अलफ. तुम्हासमागमें फौज नेमणूक स्वार––

| | |
|---|---|
| २९८ मानाजी पायगुडे | १०० तानाजी धायबर |
| २२६ नि॥ लखजी बोधे | २० विटोजी गायकवाड |
| ३ पागा लखूजी बोधे | २५० पागा दि म्हाळोजी खुटे |

एकूण आटसे सत्याणव राउताची नेमणूक केली आहे. त्याचे गणतीस रोजमरेयाचे वाटणीस रा जोती कृष्ण पाठविले आहेत, तर गणती चौकसीनें घेऊन रोजमारेयाचे वाटणी-जाबेत आलाहिदा आहेत त्याप्रमाणें करवणे. रोजमरेयास ऐवज रुपये ६१३३॥ साहा हजार एकसे साडेतेतीस रुपये पाठविले आहेत. ऐवज पावलियाचा जाब पाठऊन देणें. पागा दि॥ म्हळोजी खुटे याची बेगमी हुजरून करून दिल्ही आहे. याचा इस्ता। महिना तागाईत जाबत्यावर लिहिले आहे त्यावरून कळेल. या खेरीज ऐवज रुपये

| | |
|---|---|
| १६० एशवंतराव धायबर स्वार २७९. | २३ मानाजी पायगुडे याचे हातीचा |
| रोजमरा आटवडा रु. ४० येऊण | रोजमरा दीडमाही |
| च्यार रोजमरा | १८३॥ जाजती मोघम ऐवज |
| | ३६६॥ |

एकून तीनशे साडे सहासट पाठविले आहेत. एकूण सारे सहा हजार रुपये पाठविले आहेत. घेऊन पावलियाचा जाब पाठवून देणें. दोघे जासूद व दोघे खासबारदार पाठविले आहे. जाणिजे छ २८ जिल्हेज. बहुत काय लिहिणें ? ( लेखन सीमा )

६३ श्री माघ शु॥ ३ शके १६६८

( अप्र. जाधवसंग्रह ) ता. २-१-१७४७

राजश्री पिलाजी जाधवराऊ गोसावी यांस

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद सु॥ सबा आर्बैन मया व आलफ. पसुलच्या (?) जकातीचा मुकासबाब व सरदेशमुखीचा अंमल सरकारांत ठेवून रा। गंगाधर धोंडदेऊ यांस कमावीस सांगून पाठविले आहेत. तरी तुम्ही आपल्या कडील कमावीशदारांस ताकीद करून पाठवावी. मजकूरच्या जकाती ज्या ज्या ठिकाणीं मोडत असतील तेथें घेणें. ठिकाणें बितपशीलः—

| | | |
|---|---|---|
| १ पा। फुलंबरी | १ पा। पिंप | १ पा। कडसा |
| १ पा। टांक | १ पा। कनड | १ पो। डोंगरगांव वगैरे जका- |
| १ मौजे जेवराई वगैरे जकातीचीं | — | —तीचीं ठिकाणें पा। दाभाडी. |
| ३ ठिकाणें पा। अंधेगांव. | २ | २ |

येणें प्रमाणें साता ठिकाणचा सदरहू अंमल मारनिल्हेकडे देववणें. पेशजीचे कमावीशदार रा कृष्णराव आनंदराव यांजकडील असतील त्यांजकडे अंमल न देणें. व राजश्री बाबूराव सदाशिव याजकडील कमाविशदार यांजकडे अंमल चालो न देणें. ऐवज कांहीं भरला असला तरी त्यांस ताकीद करून हल्लीं मारनिल्हे पाठविले आहेत त्यांजकडे अंमल न देणें. जाणिजे छ ११ मोहरम. बहुत काय लिहिणें ?

---

६४ श्री माघ वा ७ शके १६६८
(अप्र. जाधवसंग्रह) ता. २२-१-१७४७

श्री०

शिक्का

राजेश्री पिलाजी जाधवराव गोसावी यासी

आखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेहांकित बाळाजी बाजीराव प्रधान आसीरवाद उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहित जाणें विशेष. पत्र पाठविलें तें पावलें. वसईस पावल्याचा मजकूर व जव्हारकराचे पारपत्य करावयाचें राजश्री शंकराजी केशव याणी विस्तारे लिहिले आसे, त्याची आज्ञा त्यास करणें, ते करावी म्हणोन लिहिले ते कळले. ऐशियास वसई पावला उत्तम जाहले. तेथील सर्व बंदोबस्त उत्तम रीतीने करविलाच असेल. लिहिणे. पाणियातील गनीम आसे, याज करिता आपली खबरदारी असावी. शंकराजी केशव याचे पत्राचे उत्तर पाठविले आसे. जाणिजे छ २२ मोहरम. तूर्त नेहमी मसलत जव्हारकरावर न करणे. दबाऊन जे साधेल ते घेणे. तुम्ही सदर जागे आपले नजरेने जाऊन पाहणे. लोक दारूगोळा दरजागियातलि सरदार बरा कोन, वाईट कोण, फौज चैत्रआखेर पावेतो जरूर तो ठेविलीच पाहिजे. तुम्हास माघअखेर पत्र पाठऊ, तेव्हा येणे. माघ मास तो तुम्हास आनीक साष्टी वेसावा वगैरे पाहण्यासच पाहिजे. बहुत काय लिहिणे ? ( लेखन सीमा ).

---

श्री

६५ पौष शके १६६८
(भा. व. १-४५) जानेवारी स. १७४७

आशीर्वाद उपरी. रात्रीं राजश्री स्वामींची गांठ पडली नाहीं म्हणून लिहिलें ऐसियास ईश्वरी इच्छेस तुमचा इलाज काय? याउपरी तरी खामखाय गांठ दुपारीं घालून येणेंप्रमाणें विनंती करणें.

कलम १—दोन्ही महालांतील गुंते फार करून दूर केले. रोज नवे निघतात त्यास मात्र आमचा इलाज नाहीं. सांप्रत महालांतील गुंता नाहीं. मोगम बोलले चालले असतील, वारूं. महाराजकर्जाचे मजकुराचा गुंता, तो महाराज सर्व विचार ध्यानांत आणून आज्ञा करतील त्याप्रमाणें वर्तणूक जेथें असूं तेथें करूं. हुजूर असल्यास आज्ञा मान्य करूं, बाहेर गेल्यास न करूं ही सबब होणार नाहीं. परंतु निभावे ऐसी आज्ञा केली पाहिजे. सांप्रत मनसबा होऊन खचित जाहला आहे. मनसब्याचा कळस रक्षण करावयाचे दिवस थोडे असतात. यास्तव दोहीं वाड्यांत समजून सेवकांस निरोप द्यावा. येका दों दिवसांत हा अर्थ उत्तम. असें महाराजांनीं कृपा करून करावें.

कलम २—महाराजांचे कर्जाचा उरकावा तेव्हांच जावें, ऐसीच मर्जी असली तर पुण्यास न जातांच इकडून फिरून सेवेशीं येऊं. सावकाशीनें महाराज कृपा करून पुण्यास व वसईस जावयास आज्ञा देतील तेव्हां जाऊं. ह्या मनसब्याचा डौल पंधरा दिवसां अलीकडे आहे. येव्हां मालकास ऐसा गुंता काढल्यानें हा मनसबा नासतो. ये समयीं महिना दोन महिने याचा निरोप द्यावा. फिरोन येऊन सावकाशी सुमुहूर्ते महाराजांनीं देणें तर द्यावा.

कलम ३—नाइकाशीं कजिया करावयासी जातां ऐसा जनवार्तेवरून संदेह मनांत वाटला असला तर त्याविशीं निशा करून द्यावी. जो तालुका नाइकास महाराजांनीं करार केला त्यांत जावें. कजिया करावा हे गोष्ट महाराजांचे हुकुमावांचून सहसा होणार नाहीं.

कलम ४—चिरंजीव भाऊ तिकडे गेले आहेत. नबाबही तिकडे गेले म्हणजे गोव्याच्या शहास अंतर होऊन आणखी वगैरे किरकोळ गुंते तसेच अडकून पडतील. तेव्हां त्याचा लौकिक एक प्रकारें होऊन येईल. हा अर्थ महाराजांनीं ध्यानांत आणावा. सरकारांत भर करूं द्यावा तो उगवला पाहिजे. सर्वाही गोष्टींत आम्हांवर तोटा पडे असें करावें कीं काय? निदान येथून दो मजलीवर जाऊन राहण्यास आज्ञा करावी. सर्व फौज व पिलाजी जाधव यांस चिरंजीवाकडे रवाना करितों, आणि सेवेशीं फिरोन येतों.

कलम ५—महाराज निरोप देतात हा लौकिक जनांत जाहला. नबाबापावेतों बातमी जाईल. फिरोन दिल्हें हेंही वर्तमान जाईल. तेव्हां सर्व प्रकारें आम्ही इतराजींत हा लौकिक जाहला आहे व बाकी राहिला आहे हाही होईल.

इतके प्रकार निखालसतेनें विनंती केली असतां महाराज ध्यानांत न आणीत तर ईश्वरेंच या दौलतीवर इतराजी केली अशी जाणावी. मग बाहेरीलही इजतीचा दरकार सोडून बसूं. सर्व मजकूर वरल्याप्रमाणें विनंती करून उत्तर घेऊन येणें.*

---

* पत्र पेशव्याचें गोविंदराव चिटणिसास. या कागदांत वसईकडील धामधुमीचा व सदाशिवरावभाऊच्या पाठीवर निजाम कर्नाटकांत गेल्याचा उल्लेख आहे. ता. १-१२-१७४६ च्या पत्रांत वसईचा व ता. ११-३-१७४७च्या पत्रांत कर्नाटक मोहिमेचा उल्लेख असून त्यांवरून या कागदांतील भानगडींचा काल ठरवितां येतो.

६६ श्री

फाल्गुन वा ९ शके १६६८

( अप्र. जाधवसंग्रह ) ता. २२-२-१७४७

राजश्री पिलाजी जाधवराव गोसावी यास

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो रघुनाथ बाजीराव आशीर्वाद सुाा सबा आर्बैन मया व अलफ. बंगल्याची वास्तुशांत फाल्गुन वाा ११ स, द्वादशीस ब्राह्मणभोजन करावें लागतें. त्यास दक्षणा द्यावयास अधेल्या असाव्या. येथील सावकारांकडे शोध करून कांहीं अधेल्या मळावल्या. परंतु तितक्या न पुरत. याजकरितां तुम्हांस लिहिले असे. तरी तुम्ही आपलेकडील अगर सावकाराकडील अधेल्या दोन हजार रुपयांच्या पाठवून देणें. अधेल्यांचें जरूर प्रयोजन आहे. तरी अगत्यरूप पाठवून देणें. चार हजार अधेल्या कदाचित न मिळे तरी ज्या मिळतील त्याच पाठवणें. उद्या संध्याकाळीं पुण्यास येऊन पावत तें करणें. तिसरे प्रहरी तें करणें. चार हजार अधेल्या तुम्हांकडील आल्या तरी उत्तम. नाहीं तरी आणखी तरतूद करावी लागेल. याकरितां तिसरे प्रहरीं पावत ऐसी रवानगी करणे. जाणिजे छ २३ सफर. बहुत काय लिहिणें ? ( लेखन सीमा )

---

६७ श्री

( अप्र. जाधवसंग्रह ) फाल्गुन वा १४ शके १६६८

शिक्का ता. २७-२-१७४७

राजश्री पिलाजी जाधवराव गोसावी यासी

छ आखंडितलक्षुमीआळंकृत राजमान्य स्नेहांकित बाळाजी बाजीराव प्रधान आसीरवाद सुाा सबा आरबैन मया व आलफ. तुम्ही पत्र पाठविले ते प्रविष्ट जाहाले. वाघोलीस आलियाचा मजकूर लिहिला कळला. ऐसियास शरीरास जतन करून औषध उपाये बरे होणे. जाणिजे छ २ सफर. बहुत काय लिहिणे ? सारांश जेणे करून आरोग्य आरोग्य होय ते गोष्ट करणें. बहूत काय लिहिणे ?

---

६८ श्री अधि. चैत्र शुाा ७ श. १६६९

( पारसनीससंग्रह ) ता. ७-३-१७४७

पुाा राजश्री रामचंद्रबावा स्वामी गोसावी यांसी

विनंती उपरी. राजश्री राणाजीकडील वकील येथें आले आहेत. राजश्री माधोसिंग सवाई-जयसिंगाचे पुत्र, यांचा मजकूर बोलतात. त्यांत मुख्यार्थ हाच कीं, ईश्वरसिंग माधोसिंगास चोवीस लक्षांची जागा द्यावयाचे करार केले. त्यावर तुमचे सरदार आले. त्यांनीं कारभार

बिघडून दिल्हा. यामुळें माधोसिंगाचें काम खराब जहालें. राणाजी माघारें आले. माधोसिंग सवाईजीचे पुत्र, व ईश्वरसिंगही सवाईजीचे पुत्र. ईश्वरसिंगानीं राज्य करावें, आणि माधोसिंग राज्यास नालायक आहे ऐसें नाहीं. माधोसिंगाची राज्यावर स्थापना केली तरी आम्हींही उत्तम प्रकारें सेवा करून व जागा नेमून देऊं. परंतु ते गोष्ट तुम्हीं कोठें करितां ? ईश्वरसिंगाचें अगत्य तुम्हांस आहे. तुम्हीं हे गोष्ट करणार नाहीं. आम्हींही म्हणत नाहीं. पर ईश्वरसिंगांनीं चोवीस लक्षांची जागा देतो म्हणोन राणाजीजवळ करारमदार केला आहे, त्याप्रमाणें माधोसिंगास करार करून द्यावी. आम्हीं स्वामीस नजर जी याजकारणें ते करूं म्हणोन कित्येक प्रकारें बोलतात. त्यास या गोष्टीचा विचार तुमच्या विचारें काय तो लेहून पाठविणें. आमच्या विचारें ईश्वरसिंगांनीं चोवीस लक्षाची जागा द्यावयाची करार केल्यावर माधोसिंगास न द्यावीसी काय आहे? ईश्वरसिंगजीस सांगून माधोसिंगास करार केलेप्रमाणें जागा देवावी, आणि माधोसिंगापासून बारा पंधरा, बल्की याहून विशेष जेथवर साधेल तेथवर साधावी. न साधें तर जितकी बारा पंधरा, जितकी साधेल तितकी साधावी, ऐसें आहे. यांत तुमच्या विचारें पोख्ता विचार काय तें अविलंबें लेहून पाठविणें. ईश्वरसिंगानीं चोविसाची जागीर कबूल केली होती. परंतु तुम्हीं त्वरें जाऊन, राणाजीस फजीत करून ईश्वरसिंगाचें मनोभीष्ट सिद्धीस नेलें. परंतु भाऊ मातबर असतां तिही लाखांचे जागिरीवर समजवावा हे गोष्ट ईश्वरसिंगास निरंतर चिंताकारीच आहे. सांप्रत पंधरावर जर यांनीं नजर कबूल केली तर ईश्वरसिंगास सांगून चोविसाची त्यांनीं कबूल केली होती जागा ती यास देवावी. यांत दोन्ही रहातात. स्वकार्य होतें. आमचे विचारास याप्रकारें जालें तर बरेंच आहे. पत्रोत्तर सविस्तर सत्वर पाठविणें. छ रबिलवल बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

६९ श्री

अधिक चैत्र १६६९
मार्च १७४७

( अप्र. जाधवसंग्रह )

राजश्री पिलाजी जाधवराव गोसावी यासी

आखंडितलक्षुमीआलंक्रतराजमान्य स्नेहांकित बाळाजी बाजीराव प्रधान आसीरवाद सुा सबा आरबैन मया व आलफ. तुम्ही पत्र पाठविलें ते प्रविष्ट जाहले. डोई तिडकू लागली, जखमाचे आंग तिडकते, सीतज्वरही येतो, यास्तव वाघोलीस यावयाचा विचार केला. वाघोलीस आलों म्हणोन लिहिलें ते कळलें. ऐशियास तुम्ही वाघोलीस आला, उत्तम केले. तुमचें शरीर अशक्त जाहले आहे. प्रस्तुत अनारोग्यताही प्राप्त जाहाली आहे, तरी औषधउपाय उत्तम प्रकारें करणें. पथ्य करीत जाणें. पहिलें शरीरदृढतेचा विचार आता चित्तांत आणून औषधउपाय करावयास अथवा पथ्यपाणी घ्यावयास रेटारेटी करून

शरीरास अधिक दुःखणे करून घ्याल, तरी पहिल्या कटाक्षाचेच लक्ष या वयात शरीरास आणून उपाय करून घ्यावयास आळस न करणें. तुम्हांस तेथें वडील कोण्ही सांगावयास म्हणावे तरी तुम्हीच वडील; यास्तव शरीराची जत्तन करून पुर्ववतप्रमाणें दृढीकरणता कटाक्षाची होऊन आरोग्य होय, तो विचार करणें. वारंवार आरोग्यतेचे व भावनेचे वर्तमान लिहित जाणे. राजश्री सटवोजी जाधव यास फौजेत रवाना केले म्हणोन लिहिलें तरी त्यास फौजेंत रवाना केले, उत्तम केले; परंतु या दिवसात गनिमाची हालचाल माफीकच आहे. दुसरें, या दिवसांत त्याणी तुम्हाजवळ असिले पाहिजे, तरी त्यास पत्र पाठवून माघारे आपले जवळ आणणें आणि फौजेत राजेश्री जोत्याजी जाधव अथवा सुभानजी जाधव याजबरोबर बाबूराव यास देऊन पाठविणे; ते तेथे राहतील. पथ्य करून औषध घ्यावयास आळस कराल तर आण असे. वरकड फौज वसईस ठेऊन सटवोजी जाधवास बोलावणे. ( लेखनसीमा )

---

७० श्री

( अप्र. जाधवसंग्रह ) अधिक चैत्र शु॥ ११ शके १६६९

ता. ११-३-१७४७

शिका

राजेश्री पिलाजी जाधवराव गोसावी यासी

आखंडितलक्षुमीआलंकृत राजमान्य स्नेहांकित बाळाजी बाजीराव प्रधान आसीरवाद सु॥ सबा आरबैन मया व आलफ. चिरंजीव राजेश्री भाऊ याजकडे नबाब फौजसुद्धां जात आहेत त्यास पायबंद दिला पाहिजे, यास्तव आम्ही बाहेर निघालो आहो. त्यास या गोष्टीचा विचारआच्यार बोलावा लागतो तरी तुम्ही पत्रदर्शनी स्वार होऊन येणें; आणि राजेश्री सटवोजी जाधव यास पत्र पाठविले आहे ते त्याजकडे पाठवून त्यास जलदीनें आणवणें. जाणिजे छ १० रबिलावल. बहुत काय लिहिणें ? ( लेखनसीमा )

---

७१ श्री

अधिकचैत्र शु॥ १२ शके १६६९

( अप्र. जाधवसंग्रह ) ता. १२-३-१७४७

राजश्री पिलाजी जाधवराव गोसावी यांस

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो॥ बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद सु॥ सबा आबैन मया व आलफ. तुम्ही पत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. सुरतकरांचें तरांडें सरकारच्या आरमारानें वसईस धरून आणिलें तें सोडावयाविशीं सुरतकर मोगलानें पत्र पाठविलें तें आपणांकडे रवाना केलें आहे त्यावरून कळों येईल. तर गलबत सोडावयाची आज्ञा करावी म्हणोन लिहिले ते कळों आलें. सुरतकरांचीं पत्रें पाठविलीं

तीं पावलीं. ऐशियास त्या गलबतास आठा महिन्याचा कौल दिल्हा त्याप्रमाणें मुद्दत होऊन गेली. उपरांत गलबत दस्त केलें; त्यास बंदरचा शिरस्ता ऐसा आहे. त्यांत त्यांनीं रदबदल करावी ऐसें नाहीं. सुरतकरासही याप्रमाणेंच जाब लेहून दिल्हा आहे. तुम्हांस कळावें म्हणोन लिहिलें असे. तुमच्या पत्राचें उत्तर पारसी सुरतकरास लेहून दिल्हे असे. सुरतकरांनीं तह करून अंमल दिल्हा म्हणजे मग जहाज पुढें कशास धरतील? त्यांनीं रुजू व्हावें उचित असे. छ ११ रबिलावल बहुत काय लिहिणें? ( लेखन सीमा )

---

श्रीशंकर

७२ अधिक चैत्र वा। ५ शके १६६९
ता. २०-३-१७४७

( अप्र. जाधवसंग्रह )

राजेश्री पिलाजी जाधवराव गोसावी यासी

आखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेहांकित बाळाजी बाजीराव प्रधान आसीरवाद. सु॥ सबा आरबैन मयाव आलफ. आम्ही वहूताहून कुच करून बुधास आलो. तुमची वाट येथे पहात बसलो आहो. तुम्हांस पूर्वी आम्ही येणे म्हणोन लिहिलें होतें. त्याजवरून तुम्ही यावयाचा निश्चय केलाच असेल. तरी सत्वर येणें. कदाचित तुम्हास बरे वाटत नसले तरी येथपर्यंत येणें. येथून पुढे तुम्हास निरोप देणे तरी दिल्हा जाईल. येथें सत्वर पत्रदर्शनी येणे. *हे मनसब्याचे काम. यात तुम्ही जरूर असले पाहिजे, यास्तव बोलाविले. भेट होईल. मग पुढें विचार करणें तो तुमचे विचारें केला जाईल. जाणिजे छ १९ रबिलावल. बहुत काय लिहिणे? ( लेखनसीमा ).

---

श्री

७३ अधिक चैत्र वा। १० शके १६६९
ता. २४-३-१७४७

( अप्र. जाधवसंग्रह )

राजेश्री पिलाजी जाधवराव गोसावी यासी

आखंडितलक्ष्मीआळंकृत राजमान्य स्नेहांकित बाळाजी बाजीराव प्रधान आसीरवाद सु॥ सबा आरबैन मया व आलफ. तुम्ही पत्र पाठविलें तें पावलें. यावयाचा अनमान शरीरप्रकृतिमुळें लिहिला. त्यास, येथील जरूरीचा प्रकार यास्तव तुम्ही आसले पाहिजे म्हणोन निकडीने तुम्हास लिहिले आसता तुम्ही तोच मजकूर लिहिल्यावरी तुम्हास यावयाविशी त्याहावे आसे नाहीं. परंतु दरबारचे कारभाराचे कित्येक पेचपाच आहेत व

---

* येथून पेशव्यांचें अक्षर.

नबाबाकडील वर्तमान आले आहे याचा विचार केला पाहिजे. खामखा तुम्ही यावयाचे करणे. वरकड शरीराचा विच्यार तरी तुम्ही लिहिला तोच आसेल आणि तुम्हास तो आले पाहिजे. जाणिजे छ २३ रबिलावल. * येथे येऊन भेटून जावे. सांप्रत नाइकाची भेट जाहली. पुढे नबाब सावनूर बिदनूरचे रोखे जाणार. सहजात भाऊवर शह पाडणार. नाईकही समागमें आहेत. या पेचाचा प्रतिकार जरूर केला पाहिजे. विना तुम्ही आलिया-वाचून होत नाहीं. भाऊ नवे स्वारीस गेले. त्यामध्यें लौकिक एक प्रकार जाहल्या उत्तम नाहीं. दरबारी किरकोळ नफ्याचे इच्छेनें थोरले वाड्यातून क्रोधवृद्धि केली आहे. कित्येक अर्थ पत्रीं लिहितां येत नाहीं. तुमची वाट पहात बसलो आहे. विशेष काय लिहिणें? ( लेखनसीमा )

---

श्री

७४ चैत्र शुा २ शके १६६९

( अप्र. जाधवसंग्रह ) ता. ३१–३–१७४७

राजेश्री पिलाजी जाधवराव गोसावी यासी

छ आखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेहांकित बाळाजी बाजीराव प्रधान आसीरवाद सुा सबा आरबैन मया व आलफ. तुम्ही पत्र पाठविले ते प्रविष्ट जाहले. दोनतीन पत्रें येणें म्हणून आली. त्यास शरीराचा विचार लिहितां येत नाहीं, तत्रापि खाल्लन फौज आलियावरी येतो. उभाउभीं भेट घेऊन जाऊ, निरोप द्यावा, म्हणून लिहिले तें कळले. ऐशियास उत्तम आहे. येथे आलियावरी लवकरच निरोप दिल्हा जाईल. परंतु तुमची भेट जरूर आसावी. याचा विस्तार पहिला लिहिलाच आसे. जाणिजे छ ३० रबिलावल.. बहुत काय लिहिणे? ( लेखन सीमा )

---

श्री

७५ चैत्र वा २ शके १६६९

( अप्र. जाधवसंग्रह ) ता. १५–४–१७४७

राजेश्री पिलाजी जाधवराव गोसावी यास

छ आखंडितलक्ष्मीआळंकृत राजमान्य स्नेहंकित बाळाजी बाजीराव प्रधान आसीरवाद सुा सबा आरबैन मया व आलफ. तुम्ही पत्र पाठविले ते प्रविष्ट जाहले. जेजूरीस आलियाचा मजकूर लिहिला तो कळला. ऐसियास आला, उत्तम केले. इकडील मजकूर तर राजश्री स्वामीचा निरोप जाहाला नवता, याजकरिता राजेश्री स्वामीने माघारे

---

* येथून पेशव्यांचें हस्ताक्षर.

बोलावून नेले. याउपरी आमचे डेरियास आले. वस्त्र जवाहीर व घोडे चार, व हत्ती दोन याप्रमाणें दिल्हे. व याशिवाय लोक आले त्यास वस्त्रे दिल्ही. दुसरे दिवशी छ १२ रबिलाखरीं रविवार राजश्री स्वामीनें बारावे घटकेस वस्त्र व जवाहीर व हत्ती देऊन निरोप दिल्हा. देवढीकडील वगैरे निरोप घेऊन कुच दरकुच पंढरपूरच्या रोखें जातों. बांडियास राजेश्री स्वामीने हत्ती दिल्हे त्यास कुकडे मुंढे दोन गावे यावेसे केले. आम्हास मोबादला सरंजाम द्यावा. वरकड सर्व मोघम ठेवून निरोप मात्र जाहाला. याउपरी तुम्हीही मजल दरमजल येणें. भेटीनंतर सर्व वर्तमान कळेल. पुढे विच्यारआच्यार बोलणे ते बोलून तुम्हासही जावयास निरोप देऊ. तरी सत्वर यावे. जाणिजे छ १५ रबिलाखर. तुम्ही खटावेस येणें. जाणिजे. श्रीकृपेनें उत्तम प्रकारें रंग उतरला. बहुत काय लिहिणे ? ( लेखन सीमा )

---

श्री

७६ वैशाख शुा १ शके १६६९

( जोशीसंग्रह ) ता. २९-४-१७४७

पौ छ २९ रबिलाकर

पुा सेवेशीं विज्ञापना. आजी शनवार प्रातःकाळीं दरबारास गेलों होतों. राजश्रीचा मजुरा जाहला. दरबार भरला होता. चार घटका दरबार जाहाला. तदोत्तर राजश्री स्नानास गेले. मी धाकटे बाईकडे मजुऱ्यास गेलों. दहापांज जण बाईजवळ बसले होते. त्यास बाईंनीं सर्वांस उठोन जा म्हणून आज्ञा केली. सारे उठोन गेले. मला व सुकानंद यास बसा म्हणाली. तदोत्तर आज्ञा केली कीं नानाला राजश्रींची मर्जी राखणें आहे कीं नाहीं ? महाराज अतिशय रात्रौ रागें नानावर भरले व त्रिवर्ग राऊ मारनिल्हे यांजवरही भरले. त्यावरून बाई म्हणाली कीं म्यां महाराजांस अर्ज केला कीं आपण उगेंच रागें भरूं नये. विचारें करून नानास आज्ञा केली तर साहेबाचे सेवेशीं हजर आहेत. साहेबीं दुसरा विचार न आणावा. नानाची एकनिष्ठता साहेबांचेपाशीं एकनिष्ठता फार आहे. तेव्हां राजश्रीनीं बाईशीं उत्तर दिल्हें कीं मी नानाजवळ एक तिरुका मागेन तर बाळकृष्णाची मला आण व तुमच्या गळ्याची आण. मला पुरे जाहलें. नानाला म्यां कागद लिहिला त्याचें उत्तर तिघांजवळ बोललों आहेंच, येसें लिहितो. तस्मात् माझा चाकर नाना नव्हे, या त्रिवर्गांचा चाकर नाना, असो. मला कांहींच मागणें नाहीं. नाना माझा माझा मी म्हणत होतों त्याची गत ही जाहली. त्रिवर्गांनीं जी केली ती बरीच केली. त्याहीमध्यें गोविंदरायाचा उपकार तो मजवर फारच आहे, मला गोविंदरायानें करंगळीवर खेळवून असा परिणाम केला. असो. मी तिघांच्या पायांवर डोकी ठेवितों, येसें फार फार रागास येऊन गोष्टी बोलले, बाई म्हणाली म्यां फार गोष्टी सांगितल्या, विचारें करून गोष्ट सांगा. मी नानास सांगोन ऐकवितें तेव्हां मागती महाराज बाईसीं बोलले कीं तुम्ही तोंडघसी पडाल, ले तुम्हांस पाडतील. तुम्ही

मूर्ख आहां. तुम्हास कळत नाहीं. नाना कांहीं ऐकतों ऐसें नाहीं, ऐसें बोलले. याचा विचार तुम्ही काय करितां? खाविंदाला खटें केल्यांत जीव नाहीं. देणें तें घालच; परंतु नासवूं नका. तेव्हां म्यां बाईसाहेबाकड अर्ज केला कीं, महाराज जर विचारें करून आज्ञा करतील तर प्रधानपंतास लेहून पाठऊं. साहेबांचे आज्ञेसिवाय काय आहेत? व नानाचें पत्र-ही महाराजांस असेंच आलें आहे. आपणच विचारें पुसोन आज्ञा करणें ते करावी. आज्ञे-सिवाय नाना नाहींत. तेव्हां मागती बाईंनीं आशंका घेऊन पुसिली कीं कदाचित् महाराजांचे मर्जी पाहून म्यां अर्ज केला तर नाना ऐकतील. गोविंदराव व तुम्ही–( दुसरा बंद गहाळ )

---

श्री

चैत्र शक १६६९
एप्रिल स. १७४७

७६
( पारसनीससंग्रह )

पुा राजश्री रामचंद्रबावा स्वामी गोसावीं यांसी

विनंती उपरी. माधोसिंगाच्या राजकारणाचा मजकूर विस्तारें पेशजीं तुम्हांस लिहिला होता. त्याचें उत्तर तुम्हीं पाठविलें कीं, तें राजकारण लटकें, त्यांत जीव नाहीं. पैका प्राप्त होणें नाहीं. स्वामींनीं ईश्वरसिंगाचा अभिमान धरून एकदोन वेळ तुम्हांस लिहिलें, त्याजवरून आज्ञेप्रमाणें जाऊन साह्य केलें. प्रस्तुत स्वामी याप्रकारें लिहितात. तर त्यांत लौकिक रहात नाहीं. स्वामींनीं ईश्वरसिंगाचा अभिमान धरिला ऐसें लोकोत्तर जहालें. त्यास हे गोष्ट विरुद्ध आहे. आम्हीं चाकर लोक, आज्ञांकित असों, म्हणोन कित्येक पर्याय लिहिले. ऐशास माधोसिंगाचा सर्व प्रकारें ईश्वरसिंगांनीं अव्हेर केला, एतद्विषयीं राणाजीस अभिमान पडला आहे. ते मोंगलाई अमीराकडे राजकारण करून जोडतोड करितात. तैसेंच राठोड व हाडे वगैरे रजवाडे तों त्यास मिळताव आहेतच. राजश्री मल्हारजी होळकर यांजकडे त्यांनीं प्रवेश करून बोलीचालीचा दारमदार केला. प्रस्तुत एतद्विषयीं मल्हारबांनीं आम्हांस बहुतांप्रकारें लिहिलें कीं, राजकारण खरेंखुरें आहे. उभयतांची समजावीस होऊन कलह तुटतो, स्वामींस पैका मिळतो, म्हणोन कित्येक आग्रहपुरस्सर लिहिलें आहे. मल्हारबास या गोष्टीचा पुर्ता अभिमान आहे. तुम्हांसही बोलण्याचालण्यांत कळलें असेल. तुम्हांस कोणे गोष्टीचा अभिमान आहे ऐसें नाहीं. आजीपर्यंत तुम्हीं सेवा निष्ठायुक्त करीत आलेत. त्यांत

---

१ पौ २९ रबिलाखर म्हणजे २९ एप्रिल इ. १७४७ पैवस्तीचें पत्र दिसतें. धाकटी राणी सगुणाबाई १७४८ त वारली. कर्जाचा व इतर विचार १७४७ चे आरंभीं चाल-लेला होता त्या वेळचें पत्र बहुधा महादोबा पुरंदऱ्यानें साताऱ्याहून नानासाहेबास लिहिलेलें आहे ( पहा–भा. व. प. या १ ले. ४५ व ५५ ). त्रिवर्गराऊ—गोविंदराव, यशवंतराव व पेशवे बाळाजीराव नानासाहेब.

ज्यांत खावंदाची मर्जी, व खावंदांस पांच रुपये मिळत व नक्ष राहे तेंच केलें; व पुढेंहि सर्व प्रकारें तुमची दृष्टि खावंदाचे हितावर. कोणे गोष्टीचा दुराग्रह राखतां ऐसा अर्थ नाहीं. सोबत्याचें समाधान राखून मनसुबा कर्तव्य तो करीत गेला. तन्मुळेंच सर्वहि उत्तम प्रकारें दिसोन स्वामिसेवा घडत गेली. सांप्रत मल्हारबांस तों त्याचा अभिमानसा आहे. त्यांस तुम्हीं ईश्वरसिंगाचाच पक्ष धरिल्यास तुमचे त्याचे ऐक्यता चालणार नाहीं. ते द्वैत दाखवितील. तेव्हां आजपर्यंत परस्पर ऐक्यभाव चालला तो विथर दिसेल. हिंदुस्थानांत लोकोत्तर फटकाल होऊन धण्याचा कार्यनाश होऊं सकतो, व उमदे उमदे मनसुबियांत अंतर पडून कित्येक फितवे, अंग्रेज लोकांस बोटें घालावयास जागा होणार, ऐसें चित्तांत येतें. तरी इतक्याहि गोष्टी बाज न खातां मल्हारबांनीं माधोसिंगाचा अभिमान धरिला आहे. त्यासच आपण अनुकूल होऊन मातबरीनें उभयतांस मल्हारबा सांगणार. कलह तोडून परस्पर समजावीस करून देऊन खावंदाचेंहि कार्य होत असिलें तर लक्ष प्रकारें करावें. तुम्हीही येविसीं दुराग्रह कराल ऐसें नाहीं. फूट न दिसतां उत्तम प्रकारें मनसुबा घडोन येईल तें करणें प्राप्त जहालेंच. सारांश मल्हारबा त्या मनसुबियांत आहेत. त्यांचा मनोदय रक्षून आजीपर्यंत सर्वोत्कर्षे मनसुबा करीत आलां. त्यांस अन्यत्र प्रकार न दिसे, संपादिल्या यशाची अभिवृद्धि होय तें करावें. आमच्या विचारें तुम्हीं उभयतां ऐक्यरूप मनसुबा करीत आलां, तदनुरूपच चालावें. त्यांत विपर्यास नसावा, हेंच सर्वांत्मना आमच्या चित्तांत आहे. तुम्हांसही येविसीं न कळेसें काय आहे ? इतका विस्तार लिहिण्यास कारण हेंच कीं, तो मनसबा करावाच करावा. हा दुराग्रह मल्हारबाचा नाहीं. करीत म्हटल्यानें वाईट मानितील. तुम्हांपासून जावयाचा कदाचित आग्रह करितील. दुसरें, पंधरा लाख राणाजी देणार असें असतां दुराग्रह केलिया उत्तम दिसत नाहीं. यास्तव ज्या प्रकारे लौकिक फटकळ गृहकलहाचा न होतां कार्य करणें हे विनंती.*

---

श्री

७७ ज्येष्ठ शुा ३ शके १६६९

( पारसनीससंग्रह ) ता. ३१-५-१७४७

राजश्री मानाजी पवार गोसावी यांस

छ अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद. सुा समान अर्बैन मया व अलफ. तुम्हीं राजश्री गोविंदराव चिटनिवीस यांचे मार्फातीनें सरकारांत हत्ती देऊं केला. ज्या हत्तीनें वाघावर चालून सरस (?) घेतले तो, आणि अद्यापि न पाठविला. परगणियांत होता तो आणून पाठवितों ऐसें म्हणत असतां, न

---

* पहा पे. द. २ ले. ३-४.

पाठवितां बरोबर घेऊन गेला, याजवरून काय म्हणावें? हे गोष्ट काय आहे? या उपरी पत्रदर्शनीं हत्ती राजश्री रामचंद्रबाबा यांजकडे मुजरद पाठवणें, अथवा ते लिहितील त्याप्रमाणें हत्तीची रवानगी हुजूर करणें. जाणिजे छ २ जमादिलाखर. बोलावें एक, करावें एक, हे रीत उत्तम नव्हे. सत्वर हत्ती पाठवून देणें. बहुत काय लिहिणें ?

---

श्री

७८

( पारसनीससंग्रह )

मार्गशीर्ष शुा १६६९
स. १७४७ अखेर

पुा राजश्री रामचंद्रबाबा स्वामी गोसावी यांस

विनंती उपरी. कर्नाटकचा मनसुबा गुदस्ता केला. त्याचें कारण हेंच कीं, फौज घरीं रिकामी बैसली. रोजमरा तो देणेंच लागतो. यास्तव मनसुबियाचा डौल केला. तिकडे जाऊन मात्र गवत भक्षावें, शत्रूवरी उपर (?) करावा इतकाच अर्थ. प्राप्त थोडी, खर्च फार. तथापि मनसुबा उपस्थित करून फौज रवाना केली. तिकडे फौज गेलियावर दरबारी पेंच बहुतच पडले, ते उलगडिले. तैसेंच नवा (बा) कडीलही पेंच पडले तेही उलगडले. लाभ थोडा, उ--ध फार, असाच मनसुबा होता. तथापि श्रीकृपेनें निभावला. पुढें कर्नाटकचा मनसुबा करणें तो बहुत मातबरीनें करावा लागेल. विना तुम्हीं आम्हीं एके जागा असल्या होतो असा अर्थ नाहीं. तुमच्या येण्यावर तोही मनसुबा मौकूफ आहे. तरी तुम्ही राजश्री मल्हाबाच्या चित्तांतील किल्मिश दूर करून, त्यांस घेऊन अतित्वरेनें यावें. तुम्हां उभयतांच्या विचारें कर्नाटकचा मनसुबा मातबर विचारानेंच कर्तव्य तो केला जाईल. सर्व किरकोळ मोठे मनसबेयाची अनामत आहेत. हे विनंती.

---

श्री

७९

( पारसनीससंग्रह )

शके १६६९
सन १७४७

पुा राजश्री मल्हारजी होळकर व जयाजी शिंदे गोसावी यांसी

++सुा सबा अर्बैन मया व अलफ. बंगालियाच्या राजकारणाचा प्रकार, राजश्री महादाजी गोविंद दिल्लीहून आले तर्थीपासून त्या मनसुबियाचा पाया पडला. श्रीकृपे बंगालियास जाणें होऊन रकारनामकास हतवीर्य केलें. सर्वांवर दबाव वसिष्ठ पडला. कां कीं, हे म्हणतील तदनुरूप करितील; यामुळें महाबतजंगापासून व सार्वभौमापासून चार टक्के प्राप्त होणें ते जहालेंच. तदोत्तर उमदा मनुसुबा घडून यावा तो न आला. घरचाच अर्थ मनास

---

१ अनिश्चित.

आणिला व दिवसही नव्हते. आणि रकारपूर्वक बंगाले प्रांतें जाऊन छावणी केली. आपली शक्ति, सामर्थ्य दाखविणें तें त्या लोकांस दाखविलें. आमच्या फौजेनें जावें, त्यास प्रतिकार करावा हे सार्वभौमाची वासना. व वजीर व अमीरखान यांच्या चित्तांत वारंवार–

( अपूर्ण )

---

श्री

८० शके १६७०

( भा. व. १।३९ ) सन १७४८

राजमान्य राजश्री सदाशिव चिमणाजी यांसी आज्ञा केली ऐसीजे. राजश्री मानाजी आंग्रे वजारतमाब यांजकडील किल्ले माणिकगड व प्रान्त तुम्ही घेतलांत तो सोडून द्यावा, याविषयीं पेशजी राजश्री पंतप्रधान असतां आज्ञा केली. त्यास चेऊलचें देशमुखीचें वतन आपलें आहे. तें सुरळीत चालवीत नाहींत, तें चालवावें. व कल्याण भिवंडी प्रान्तचें साल दरसाल पंधरा हजार रुपये देत असतां ते अलीकडे पावत नाहीं, तो ऐवज सुरळीत पावावा म्हणजे किल्ला प्रान्त सोडिला जाईल, म्हणोन लिहून पाठविलें, त्यास हुजुरून येविषयींची कित्येक आज्ञा करणें तें करून राजश्री गोविंद खंडेराव व राजश्री त्रिंबक सदाशिव या उभयतांस पंडित मशारनिल्हेकडे रवाना केलें, आणि किल्ला व प्रान्त प्रान्तांत वसूल घेतला असेल तो द्यावा म्हणोन आज्ञा केली. त्याप्रमाणें उभयतांनीं पंडित मशारनिल्हेसीं व तुम्हास बोलून किल्ला प्रान्त सोडून द्यावयाचा करार केला. त्याजवरून स्वामी तुम्हांवर बहुत संतोषी जाहलें. तुम्ही स्वामींचें सर्व अखत्यारी सेवक, सर्वांचे आगत्य धरून हरएकविषयी साहित्यास अंतर न करावे हेच गोष्ट तुम्हांत उचित आहे. वजारतमाब पुरातन स्वामीचें सर्व अखत्यारी सेवक, निष्ठेनें सेवा करीत आहेत. त्याचें सर्व प्रकारें स्वामीस अवश्यक. तदनुरूप तुम्हीं अगत्य-वाद धरून साहित्य करावें हें तुम्हांस विहित आहे. त्यांजकडील कल्याण भिवंडी प्रांतच्या बाकीच्या व दरसालचा मजकूर, तरी उभयतां तुम्हांकडे पाठविलें असतां तहरह होणें तो जाहलाच आहे. त्रेणेंप्रमाणें स्वामींनीं निशा करून घेतली आहे. राजश्री गोविंद खंडेराव अद्याप हुजूर आले नाहींत. ते आल्यावर त्यांचा निकाल करून देविला जाईल. चेउल प्रान्तींचा प्रसंग, तरी तो मजकूर सांप्रत बहु + + खाली पडला आहे. पंडित मशारनिल्हे मुलूखागिरीहून आल्यावर मनास आणून आज्ञा कर्तव्य ते केली जाईल. स्वामींनीं तह करून दिला आहे, त्याप्रमाणें तुम्ही चालवावयास अंतर न करणें. त्यांजकडून राजश्री अंताजी

---

१ आंग्र्यांचा किल्ला माणिकगड तारीख २९-५-१७४७ रोजीं पेशव्यानें घेतला. त्याची तक्रार शाहूकडे गेली. त्या संबंधाचें हें पत्र आहे. सन १७४८ चे पहिले सहा महिने पेशवा उत्तरेकडील स्वारींत असल्यामुळें शाहूनें हें पत्र सदाशिवराव भाऊस लिहिलेलें दिसतें.

बाबाजी हुजूर आले होते. यांसही याच बरहुकूम आज्ञा करून त्यांजकडून रवाना केले आहेत. हे वजारतमाब यांस सांगून तहास अंतर पडों न देतां सुरळीत चालेल ते गोष्ट करतील. कराराप्रमाणें किल्ले माणिकगड व प्रान्त त्यांचा त्यांजकडे द्यावयाची आज्ञा करून हुजुरून राजश्री बहिरो हरि लिहिणार दिा चिटणवीस यांस व जोत्याजी यादव व जानोजी लावघरे हुकुमबारदार पाठविले आहेत. हे आज्ञेप्रमाणें सांगतील त्यांजवरून कळेल. यांज-समागमें तुम्हीं आपणांकडील कारकून व माणसें देऊन त्यांच्या विद्यमानें किल्ले माणिकगड व प्रान्त त्यांच्या स्वाधीन करून पावल्याचें लिहून घेऊन हुजूर पाठवून देणें. दुसऱ्या पत्राचा उजूर न करतां पत्रदर्शनीं किल्ला प्रान्त त्यांचे हवालीं करून यांची रवानगी सत्वर करणें. येणेकरितां स्वामींच्या व वाड्यांतील मर्जीस तुम्हीं अंतर पडों देणार नाहीं हा स्वामीस निशा आहे. स्वामीची इमारत तुम्हांवर. तुम्हीं मर्जीप्रमाणें वर्तणूक करावी, याचमध्यें उत्तम आहे. आज्ञेप्रमाणें किल्ला व प्रान्त सोडून देणें. + याणीं किल्ल्याविषयीं कित्येक आज्ञा करून राजश्री गोविंदराव, राजश्री त्रिंबक सदाशिव पाठविले आहेत. तरी आपण मान्य केलें त्यावरून आम्हांस संतोष जाहला. तरी राजश्री मानाजी आंग्रे यांचे हवालां करणें. त्यावर आपण हरएक विषयीं साहित्य करीत जाणें. हे आमचे पदरचे आहेत. यांचें आगत्य आम्हांस तसें आपणही धरून चालविणें जरूर जरूर. बहुत काय लिहिणें ? सुज्ञ असा.

---

८१ श्री श्रावण वद्य ५ शके १६७१

(भा. व. १. ६८) ता. २३-७-१७४९

पै॥ छ २२ साबान सुा खमसेन

श्रीमंत क्षत्रियकुलावतंस महाराज राजश्री छत्रपति स्वामीचे सेवेसीं विनंती. सेवक बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक विज्ञापना. सेवकाचें वर्तमान तागाईत छ १९ साबान-पर्यंत महाराजांचे कृपावलोकनें करून यथास्थित असे विनंती. सातारियांत ब्राह्मणांनीं गल-बला केला आहे. त्यास काशींतील उभयतटांचे ब्राह्मण कलह करीत आले आहेत. त्यांचें वर्तमान महाराजांनीं मनास आणून समजावीस करून लाऊन द्यावे. प्रभूंचें सुदामतप्रमाणें चालत आलें आहे, त्याप्रमाणें चालवावें. त्यास अडथळा होऊं न द्यावा. पूर्वापार चालत आलें तें चालवावें. नवीन कजिया योग्य नाहीं. ब्राह्मणांचा निर्गमही स्पष्ट आज्ञा करून करणार महाराज समर्थ आहेत. शेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

८२ श्री कार्तिक शुद्ध ५ शके १६७१

(गुप्तेसंग्रह) ता. ४-११-१७४९

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री बनाजी माधराव गोसावी यांसी सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार. खमसेन मया व आलफ. तुम्ही विनंतीपत्र २५

जिल्कादचें पाठविलें तें पावलें. लिहिला मजकूर कळला. नबाबाचे मनसुबियाचा भाव सप्त-ऋषीकडून प्रेष जहाले तद्विषयीं बहुत संतोषी होऊन आमच्यापक्षीं विकृत भाव चित्तांत आणलियाचें व रघोजी भोसले व चिमाबाई इत्यादि यांस बोलाविलीयांची व मुजफरजंगाची सेना साछील पडलियाचा मजकूर लिहिला तो कळला. अतःपरही तेथील अंतरबाह्य मजकूर निरंतर लिहीत जाणें. तुम्ही दरबारांत पैस बरा केला व राजेश्री मोरोपंताची घास पाहिली म्हणोन तर हेही मोठी गोष्ट केलीत. सारांश वर्तमान हकीगत सर्वदा लिहीत जाणें. स्वामींच्या व्यथेस उतार आहे. श्रीकृपें अविलंबच आरोग्य होऊन नबाब वांजरातीरास किती दिवस रहाणार, कोणत्या मार्गे जाणार, कसकसा विचार तो वरच्यावरी लिहीत जाणें. तुम्हाला ३०० रुपये पाठविले ते पावलेच असतील. जाणिजे छ ४ जिल्हेज.

---

श्री

८३ शके १६७०–७१

सन १७४९

( भा. व. १. ५५ )

यादी पेशव्यांचें म्हणणें शफतवचन असावें. त्यांनीं येणेंप्रमाणें चालावें.

पेशव्याखेरीज राज्य राखून चालावयाजोगें कोन्ही नाहीं हे खातरजमा जाहली. त्यांनीं वंश करवीरचें न करितां बसऊन त्याच्या आज्ञेप्रमाणें चालावें.

हूजूर खासगी खर्च आहे तसा चालावा. ज्याजकडून नेमणूक ती यावी. हुजूर महाल गांव किल्ले कोट दरोबस्त आहे तसें चालवावें. ज्याचे हवालीं जीं जिल्हें केलीं त्याचिया नांवीं करार.

महाराजांचें करज वारनें; करार. त्याप्रमाणें करावें. खत कोठें ठेवूं नये. ज्यास जें वचन दिल्हें तें चालावें.

सरदार कारकून चाकर सर्व राजमंडळ त्यांस महाराजांनीं दिल्हें. त्याचें त्याजकडे चालून त्याचें काम त्याचे हातें करावें. कोन्हास अंतर देऊं नये.

देवब्याकडे नेमणूक आहे ती खर्चाप्रमाणें राखून खासगीकडे वोढावे.

तुमची खातरजमा चिटणिसांनीं केली. त्याप्रमाणें निष्ठेनें राज्य राखून सेवा करणें. राज्य राखावें म्हणजे कल्याण होऊन येश येईल.

याप्रमाणें महाराजाचे पाय दिव्य आज्ञा मान्य.

---

श्री

८४ शके १६७०–७१

सन १७४९

( भा. व. १–५६ )

राजमान्य राजश्री बाळाजी पंडित प्रधान आज्ञा जे

राजभार तुम्ही चालवाल हा भरंवसा स्वामीस आहे. पहिले सांगितलें. खातरजमा

चिटणिसांनीं असल केली. मस्तकावर हात ठेविला आहे. वंश होईल तो तुमचे प्रधान चाल- वील. करील अंतर ती सफत आहे. त्याचे आज्ञेंत चालून सेवा करनें. राज राखनें. बहुत काय लिहिणें ? *सुज्ञ असा

---

श्री

८५ शके १६७०-७१
(भा. व. १. ५७) सन १७४९

राजश्री गोविंदराव गोसावी यांस आशीर्वाद उपरी. तुम्हास रूबरू खातरजमा केली असतां स्वामी दिक्कत घेऊन लिहितात त्यास तुम्ही खातरजमा करावी. तुम्हांस अंतर दिल्हे तरी वडिलांस व श्रीस मानणार नाहीं. पूर्वीपासून महाराजांचे कृपेस पात्र केलें हें विस्मरण कसें होईल ? वचनाप्रमाणें घडेल. निखालस पत्र यावें हे आशीर्वाद.

---

श्री

८६ शके १६७०-७१
(भा. व. १. ६३. ५८) सन १७४९

राजमान्य राजश्री समस्त राजकार्य धुरंधर यांसी आज्ञा केली ऐसीजे. रा। कृष्णाजी नाईक जोशी याणीं मोंगलाईंतून येतेसमयीं स्वामींच्या व स्वामींच्या राज्याचे कल्याणविशीं बहुत श्रमसाहास करून एकनिष्ठेनें सेवा केली. त्याजवरून स्वामी कृपाळु होऊन पोतदारीचा धंदा हुजूरचा व सरकारकून व सरदार यांजकडील वंशपरंपरेनें करार करून दिल्हा, आणि सनदा करून दिल्या आहेत. तरी तुम्हीं सर्वांनीं पोतदारी मशारनिल्हेकडे चालविणें. जाणिजे. + रा। नाईक कृष्णाजी यांस मोंगलाईंतून येतेसमयीं पोतदारीच्या सनदा दिल्ह्या आहेत. त्याप्रमाणें रा। प्रतिनिधि पंडित व रा। प्रधान पंडित व रा। सचीव, रा। मंत्री व रा। सरदेशमुख यांहीं त्याप्रमाणें चालवावें. *सुज्ञ असा.

---

श्री

८७ शके १६७०-७१
(भा. व. १. ५९) सन १७४९

(बाळाजी बाजीराव प्रधान यांणीं चिटणवीस यांस यादी करून दिल्ही स्वदस्तूरची)

यादी गोविंदरायाचें कार्य येणेंप्रमाणें आम्हीं करावें.

किल्ले कोटास कर्ज दिलें असेल तें रुजु- वातीनें मनास आणून सरकारांतून उगवून

राज्यभाराचे कार्यसाठीं व मराठे राज्या- पाशीं जेवावयाचे मजकुरासाठीं जें ज्यासीं

---

* अक्षर खुद्द शाहूमहाराजांचें.

यावें. किल्ले कोटास वगैरे जागा पडला असेल तो उगवून यावा. सरंजाम व किल्ले यावयाचे करार केले आहेत. हवालीं ताकीद करून करावे. हे करार.

हातरोख्यामध्यें कोणाचा दाखला नवा करूं मजमदार इच्छितात, तो होऊं देऊं नये, वगैरे लिहिणेयाच्या कैदा महाराज शाहूराजे यांचे वेळेस चालत आल्याप्रमाणें चालवावे. करार.

बोललें असाल तें मनास आणून, योग्यायोग्य करून देऊन, यांचें वचन रक्षावें. करार.

राजश्रीचे मनांत याचेविशीं वाईट आलें असेल तें बचून सर्व दूर करून राजश्रीची यांची निखालसता शफतपूर्वक करून यावें. करार.

शाहूराजे वेळेचे सरकारचे कापडाचें कर्ज वगैरे खासगत चौघांकडे आहे तें ताकीद करून उगवावें व आम्हांकडे कर्जाचे ऐवजीं वराता आहेत त्याप्रमाणें पैका यावा. करार.

गोविंदराव याणीं आम्हांशीं येणेंप्रमाणें वर्तावें.

आईसाहेबांचा लगाम मनापासून सोडऊन सर्व प्रकारें आमचे राजश्रीचे विचारां यावें. जें आम्हीं कार्य अवलंबूं त्याचे प्रयत्नांत मनापासून असावें. अंतर करूं नये.

हरयेक मजकुराची तोडजोड जें बोलणें तें निखालसतेनें आपले जागां बोलावी. परंतु बाहेर जें करणें तें आमचे विचारास येईल तें करावें.

---

श्री

८८ चैत्र शुा ८ शके १६७४

(भा. व. १ ६१ ) ता. ८-३-१७५२

श्रीमंत महाराज मातुश्री आईसाहेब यांणीं राजममान्य राजश्री बाळाजी पंडित प्रधान यांसीं आज्ञा केली ऐसीजे. तुम्हीं विनंतीपत्र पाठविलें तें पावोन लेखनार्थ अवगत जाहला. मोगल भागानगरास जातो. पैठणापलीकडे गेला. सेवकही पुणियास येणार. त्यास मुलूख लुटला गेला. फौजा मोठ्या. कर्जही मिळेना. सर्व साहेबांचे आशीर्वादे सेवकाचे निष्ठेनें निभालें म्हणोन कितेक निष्ठतेनें लिहिलें, व राजश्री दिनकर महादेव याणींही कितेक मुखवचनें विनंती केली, त्यावरून साकल्यार्थ श्रवण जाला. ऐसियासीं दु( त )र्फा कलह प्राप्त जाहालिया सहजच खराबी होती. त्यामध्यें मातबर फौज मिळाली याजमुळेंच दुर्जनांचें पारपत्य घडोन आलें. तुम्हीं एकनिष्ठ पुरातन सेवक याही पेक्षां कृतार्थाचें यश संपादाल हा

पूर्ण भरंवसा साहेबांस आहे. तरी तुम्ही पुणियास दाखल जाहालियाचें वर्तमान सत्वर लिहून पाठवणें. तदनुरूप जे आज्ञा कर्तव्य ते केली जाईल. जाणिजे छ २ माहे जमादिलावल सुा इसंने खमसेन मया अलफ. बहुत लिहिणें तरी सुज्ञ असा. ( मोर्तब असे.)

---

८९ श्री

( भा. व. १. ५० ) फाल्गुन वा ९ शके १६७४

पौा छ २८ जमादीलाखर ता. २८-३-१७५३

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसी

विनंती सेवक अंताजी माणकेश्वर कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. सेवकाचें वर्तमान ताा फाल्गुन वद्य ९ मुक्काम इंद्रप्रस्थ सुखी असों विशेष. स्वामींचीं पत्रें आलीं. वर्तमान कळलें. फरमासीची याददास्त पाठविली त्याप्रमाणें आम्हीच फरमास घेऊन अखेरसालीं सेवेसीं येऊं. फरमासीस अंतर पडणार नाहीं. श्रीमंत राजश्री दादासाहेबांनीं अमदाबादेस मोर्चे लाविले आहेत. गांवांत कमालुद्दीनखान बाबी आहे, त्यानें पातशाही परवानियाचा उजूर केला. त्यावरून श्रीमंतानीं परवाना आणविला होता, त्याप्रमाणें सार्वभौमाचा परवाना येथून पाठविला आहे. राजे माधोसिंग प्रस्तुत जयनगरींत आहेत. जोतपूरचे राजे बिजेसिंग आपले घरींच आहेत. व सुरजमल जाट चार महिने घरास गेला होता. मागती वजिरानीं दिल्लींत आपल्यापाशीं घेऊन आले. दिल्लींतील वर्तमान तरी आजि महिनाभर कमरदीखानाचा पुत्र खानखाना व गाजदीखानाचा पुत्र इमादनमुल्क व आणखी एक गृहस्थ तिघांनीं मिळोन एक विचार केला कीं, नबाब वजीर जबरदस्त जाला. पातशहा त्याचे हुकुमांत आहे. कोणाचें चालू देत नाहीं. त्यास किल्ल्यांत खलबतास बोलावून आणून ठिकाणीं लावावें आणि खानखानास बजारत द्यावी. इमादनमुल्क मीरबक्षी आहेच. आपलाच कारभार सर्व असावा. या गोष्टींचा विचार कोणास व आम्हासही तिळमात्र कळों दिल्हा नाहीं. प्रात:काळींच राजश्री बापूनीं पातशहाची चिटी मात्र दाखविली कीं, फौज पांच हजार झाडून मजला रूबरू पाहून गणती घेणें तयार होऊन येणें. त्याजवरून तयार होऊन किल्ल्याजवळ गेलों. तिकडून खानखाना व मीरबक्षी व खांदोराखानाचा पुत्र तयार होऊन आले. आणि नबाब वजिरास पातशहाची चिटी गेली कीं कांहीं प्रयोजन आहे, तरी सत्वर येणें. त्याच समयीं किल्ल्यांतून एक चिटी राजश्री बापूजी महादेव यांची याच कारभाराची मलकाजमानी पातशाहाची सापत्न माता आहे, तिनें धरून वजिराकडे पाठविली कीं, तूं न येणें, तुजला दगा आहे. तेच समयीं वजीर पंचवीस हजार फौजेनिसीं व तोफखाना तयार करून आला कीं ज्याणीं एवढा खेळ केला त्यांस ठिकाणीं लावूं. पातशहा कैदेंत ठेवूं. दुसरा महंमदशहाचा भाऊ आहे त्यास पातशहा करूं. तेव्हां तमाम शहरांत हंगामा जाला. पातशहानीं वारंवार सांगून पाठविलें कीं, मोठा भरंवसा तुमचा आहे. मी बाळाजीरायांचा आहे.

आजी माझा जीव जतन करणें. मजला आजी जन्माची चाकरी लाखा फौजेची पावली. तेव्हां पातशहाचें समाधान केलें कीं, हजरत, आम्ही चाकर. मरून बरें म्हणूं. आपली खातरजमा असों द्यावी. तोंवरी बापूनीं कळों दिल्हें नव्हतें. मग बापू गळां पडिले कीं, आजी पातशहाचे व आमचे जिवाचे सोबती होणें. पातशहा जन्मावरी श्रीमंताचा पाडाव[1] होईल. त्याजवरून मान्य करून जुंझास उभा राहिलों. त्यासमयीं पादशहाचे लहानमोठे अमीर वजिरास सामील जाले. खानखाना व मीरबक्षी व आम्ही तिघे मात्र राहिलों. इतक्यांत नवाब वजिराची चिटी आली कीं, सरदार आमचे भाऊ अंतरवेद आम्ही दिल्ही. तेव्हां करार कीं, ज्यावरी तुमची चढाई त्याजवरी आमची; आमची त्याजवरी तुमची; ऐसा करार आहे. तुम्ही सरदार एक असाल तरी येणें. त्याजवरून आम्ही त्रिंबकपंत सुभेदार वजिराकडे पांच स्वारांनिसीं पाठविला जे, हें कांहीं आम्हांस ठाऊक नाहीं. आम्ही यमुनास्नानास मात्र आलों. ते अकस्मात पाहिलें म्हणून उभें राहिलों. तेव्हां त्यांनीं आमच्या गृहस्थाची चिटीच दाखविली. वजीर म्हणो लागला कीं, तुम्ही फरेमुदई माझे आहां. बरें. समजोन घेईन. एके दिवशीं तमाम हिंस्थानचा अंमल उठवीन. तुम्ही मजशीं बेइमान केली. तुम्हास चिटी दाखवावयास कारण, राजश्री पंतप्रधान व सरदार मजला बेइमान म्हणतील म्हणोन दाखवितों. त्यावरून बहुतां प्रकारें वजिराचें समाधान केलें कीं, आजी पादशहास तुम्ही वाईट केलें, तरी तुमचे पदरीं स्वामिद्रोह पडिला. मागें सख्यदाचें नांव घ्यावयास राहिलें नाहीं व तुम्हास बरे वाईट तरी यांची पादशहात जाईल. शत्रू अटकेवरी साठ हजार फौज अबदाली येऊन त्याचा येलची दिल्लींतच आहे. आणि हें काम काय करितां? कृपा करून आपल्या ठिकाणास जावें. त्याजवरून वजीर आपल्या ठिकाणास गेले. पातशहा वगैरे आपले आपले ठिकाणीं बैसलें. आम्हीही आपल्या ठिकाणीं आलों. दुसरे दिवशीं वजीर व पातशहा व अमीर यांची व आमची फौजेची तों तयारी आपल्या आपल्या ठिकाणीं, मागची सर्वांची जाली. मागती पादशहाची चिटी आली कीं, मी खावंद आहें. माझे चाकरीस तुम्हास राजश्री पंतप्रधान यानीं पाठविलें असिलें तरी साफ मजपाशीं येऊन मरणें. मी आजी वजिराचे दोन सुभे अयोध्या व प्रयाग आहेत ते बाळाजीरायास देतों. माझ्या कामास तुम्हीं येणें. नाहीं[ तर ] तुम्हास वजिराकडे पाठविलें असिलें तरी वजिराकडे जाणें. व बापूचा कौल करार पादशहाचा पहिलाच होता कीं, हे फौज पांच हजार तुमची आहे. तेव्हां राजश्री बापूजी महादेव यांस सांगून पादशहाचे स्वदस्तूरचें दोन सुभ्याचे सुके करून घेविले. पुढें होता होईल तें पहावें. पैसा कांहीं पातशहाजवळ नाहीं पृथ्वी मात्र आहे. पातशहा थोर. दोन सुभ्यांची चिटी लिहून घेऊन वचनास गोवून ठेवून घेतलें. परंतु वजीर मारून टाकावा, तेव्हां ते सुभे खरे. असो. दुसरे दिवशीं वजिरांनीं चिटी पाठविली की, माझी वजारत तुम्ही करूं चाहतां. बरें तुतं सनद

---

१ ‘पाडाव’ शब्द चुकलेला दिसतो. उपकारी अशा अर्थाचा शब्द पाहिजे.

आग्ऱ्याची सुरजमलास देतों. अंतरवेद पठाणांस देतों. श्रीकाशीचा अंमल तगीर करितों. पुढें रजपूत आम्ही एक होऊन जें आम्हांस घडेल तें करितों. त्याजवरून अर्जी केली कीं, जरी श्रीमंतावरी तुमची नजर आहे, सरदार तुमच्या कामास आले आहेत, तरी मी चाकर या प्रसंगीं आहें. मजला अपयश न देणें. त्यांनीं मेळविलें आम्ही गमाविलें ऐसें न करणें. त्यानीं सांगितलें, मजकडे येणें. हें दिल्हें तें दिल्हें, व पुढें तुम्हास पैका देणें. दहा लाख रुपयांची जाहगीर तुम्हांस देतों. त्याजवरून विनंती केली कीं, आम्ही चांकर श्रीमंताचे, तैसे तुमचे, तैसेच पातशहाचे. सर्वांनीं आम्हावरी कृपा करावी. तुम्हीं उभयतां न भांडावें. पातशाही न बुडवावी. आम्हास पातशहाकडेच असों यावें. आमची अपकीर्ति न करावी. व आपण चार दिवस डेरे बाहेर देऊन रहावें. हे कलागत तोडावी. त्याजवरून त्यांनीं आर्जीमाफीक डेरे बाहेर दिल्हे. आमचीं ताकीदपत्रें अंतरवेदीच्या अमलाचीं दिल्हीं. व आग्ऱ्याचीं ताकीदपत्रें दिल्हीं. व काशीचा अमल सुरळीत द्यावा म्हणून ताकीद लिहून दिल्ही, ती गोपाळरायाकडे* रवाना केली. आपला कामांतील फितूर तोडिला. हें वर्तमान राजश्री बापूस सांगितलें. बापूनीं सांफ सांगितलें जे, जर पांच स्वार तुमचे वजिराकडे गेले तरी पातशहा आमचा तुटतो. आम्हास पुढें अयोध्या प्रयाग दोन सुभे घेणें. श्रीमंतांजवळ तुमचें घर बुडेल. तुम्ही आमचे आज्ञेप्रमाणें पातशाहाची चाकरी करणें. वजिराचा पैका व जागीर लागत नाहीं. त्याजवरून पातशहाकडेच चाकरीस आहों. आम्ही राजश्री बापूस सांगितलें जे, उभयतांची समजाविसी करूं. तोफखाना समसामदौलास देऊन उभयतांची समजाविसी करूं. उभयताही आम्ही राजी केले आहेत. परंतु बापूच्या व खानखानाच्या चित्तास येत नाहीं, याजमुळें नवाबही आपले डेऱ्यांत फौज चाळीस हजार जमा करितात, व पातशहाची आपली आपली तरतूद करितात. या उपरी उभयपक्षीं खाशांखाशांस तरी दगा होत नाहीं. सावध होऊन गेले, परंतु युद्ध होईल, दहा पांच हजार माणूस मरेल, तेव्हां हे कलागत तुटेल. वजीरही डोहणा भारी करील. कांहीं हे कलागत लहान नाहीं. मोठीच आहे. कोण्या थरास जाईल पहावें. श्रीमंत राजश्री दादासाहेबांस तीन चार पत्रें वकिलांनीं लिहिलीं कीं तुम्हीं सत्वर येणें तें कारण हेंच. ऐसियासी आम्ही वकिलास न कळत श्रीमंतांस लिहिलें कीं पातशाहा वजिराची कलागत भारी आहे. आपण आपलें कामकाज करून सरदेवरी मात्र यावें. मग वरचेवरी येथील रंग पाहून लिहूं. अबदाली पठाणाचें वर्तमान तरी अटकेवरी आहे, आलीकडे नाहीं. मीरमनू लाहोरींच आहे. येलची पठाणाचा आला होता, तो यांचा घरकलह पाहून गेला आहे. काय या उपरी तेही करितील पाहावें. बहुधा वजीर फारच बिघडला तरी पठाण आबदालीसही आणील किंवा काय कळेना. किंवा आम्हांकडे बिघडील पाहावें. कलागत लावणारांनीं थोरच लाविली. अयोध्या व प्रयाग वजिराचे दोन सुभे आहेत. याशीं मारिल्याउपरी उत्तमच आहे. असो, पाया करून घेतला आहे. चिंता काय ! सारांश, राजश्री

* बर्वे.

बापूजी महादेव यांचे आज्ञेनें आहों. त्यांचे आज्ञेखेरीज एक कारकून दोन वेळां गेला, आणि तूर्तच बिघाड केला होता. गोड गोष्टी सांगून राजी केला. काशीचा अंमल करून घेतला. अंतरवेद आगरे राखिलें व पुढेंही सरदार या प्रांतास येत तोंवरी आपल्याकडील बंदोबस्त राखूं. काडीमात्र बिघडों देणार नाहीं. मग सरदार आल्याउपरी ते खावंदच आहेत. परंतु सरदार अद्यापि नर्मदा उतरले नाहींत. या प्रांतीं कांहीं येतां दिसत नाहीं. आले तरी माळव्यांत अथवा रजपुतान्यांत जातील ऐसें दिसतें. दिवस थोडके राहिले. पाहावें. आम्ही आपली सीमा मृगसालपावेतों चाकरी करून तमाम सरकारच्या कामाचा बंदोबस्त राखूं. बहुधा श्रीमंत राजश्री दादासाहेब या प्रांतीं येतां दिसत नाहीं. त्यांजला तिकडे गुंता भारी आहे. यावरून येणार नाहींतसें आहे. तथापि आले तरी खावंद आहेत. वजिराचा व सरदारांचा फारसा घरोबा आहे. रात्रंदिवस त्यांचीं पत्रें यांस त्यांस वरचेवरी येत जात असतात. सरदारांचा व वकिलांचा फारसा मनोदय आहे कीं, मागती गाजदीखानाचे पुत्रास दक्षणेचा सुभा सांगावा. त्यास गाजदीखानाचे पुत्राजवळ दोन हजार फौज नाहीं. त्यानें येऊन काय करावें ! जेव्हां खासा सरदार त्यास आपले फौजेनें घेऊन येतील तेव्हां यावें. दक्षणेची सुभेदारी स्वामीची आहे. ज्याजकडे स्वामी, तोच सुभेदार. आपलीं अज्ञापत्रें तीन चार आलीं कीं, सलाबतजंगाचा आमचा स्नेह अकृत्रिम जाला. तेथें गाजदीखानाच्या पुत्रास सनद होऊं न देणें. त्या आज्ञेप्रमाणें वजीर पातशाहाशीं करार केला कीं, सनद न देणें. त्याजवरून मागेंच वजिरांनीं आम्हांस सांगोन स्वामीस पत्रें लिहिविलींच आहेत कीं, ज्यास राजश्री पंतप्रधान सनद देवितील त्यास देऊं. मजला राजश्री पंतप्रधान यांचें जो पत्र आणून देईल, तो सनद घेईल, ऐसें पत्र मागेंच सेवेसीं लिहिलें आहे. स्वामीच्या आज्ञेप्रमाणें सलाबतजंगास सनद करून देववितों. परंतु स्वामींनींही वजिरास व आम्हांस व वकिलांस लिहीत जावें जे सनद सलाबतजंगाचीच करणें. मुख्य सुभेदार स्वामी. ज्याजवरी स्वामीची कृपा तो सुभेदार खरा. आपण कांहीं इमादनमलुकास सनद साफ होऊं देत नाहीं. परंतु स्वामीनींही सरदारास यात्रिसीं पत्रें लिहीत असावीं. आमचा जीव लहान आणि यंदाची चाकरी आम्हांवरी केवढी भारी पडली. हे चाकरी उभयतां सरदारांनीं करावी ते सेवेकानें केली. सरकारचा शेरा आमच्या पथकास काय ! दिल्लींत दररोज दर स्वारास रुपाया १ लागतो. सालास पोटास तीनशें साडेतीनशें रुपये लागतात- साहूकाराचीं कर्जें खाऊन स्वामीचा लौकिक राखून आहों. कर्ज एके दिवशीं स्वामी फेडतील. परतु दिल्लींत हा समय कधीं येणार ? प्रस्तुत पातशाहा स्वामीचा ठेवणाईत जाला आहे. वजिरापरी वजीर राजीच आहे. कांहीं चिंता नाहीं. आमचा कारकून वजिराकडे जाऊन काशीचे परवाने घेतले व आगरे अंतरवेदीच्या ताकिदी घेतल्या आणि गोड गोष्टी सांगितल्या. या गोष्टीसाठीं राजश्री बापू फारसे श्रमी जाले कीं, वजीर हरामखोर, त्याचे घरास कारकून पाठवून ताकिदी कशास घेतल्या ? याजमुळें आम्हांवरी श्रमी आहेत. तरी तूर्त मुलकांतील अंमल उठवून तमाम हिंदुस्थानांत बखेडा करावा. सरदार देखील या प्रांतीं नाहींत, आणि आपण फौज पातशहाचे चाकरीवरी

राहून फुकाच्या गोड गोष्टी सांगोन आपलें काम न करावें ऐसें नाहीं. वरकड पातशहास सोडून जातों, तरी पैका व जहागीर तयार होती. परंतु वकिलांनीं साफ सांगितलें जे, तुमचे चाकरीवरी आजी पातशहा राजी. श्रीमंतांचा लौकिक राहून दोन सुभे मिळतात. नाहीं तरी हें अपेश तुमचे माथां. त्याजवरून वकिलाच्या सांगितल्यावरून पातशाहाकडेच राहिलों. परंतु पुढें कलागत वाढविली, ती कोणत्या ठिकाणास जाईल पाहावें. आम्हीं तों वजिरास भर दिल्हा कीं, आपण थोर आहेत. चार दिवस आपणच टाळा देऊन बाहेर निघावें. तोही बाहेर निघतो. परंतु त्याची फौज भारी. कोणता फंद करील पाहावें. खानखाना व इमादनमुल्क व समसामदौला खानदौराचा पुत्र मिळोन सारी बारा हजार फौज मात्र आहे. आमची फौज पहिली चार हजार व ग्वालेरीहून जाट व नवलराम वगैरे स्वार एक हजार आजी तीन महिने अबदालीचे गडबडेमुळें ठेविले ते तैसेच आहेत. त्यास आणखी दोन महिने निरोप देतां येत नाहीं. याजमुळें पांच हजार फौज आहे. दिल्लींत स्वामीच्या फौजेचा नक्ष आहे, याप्रमाणें दुसऱ्याचा नक्ष नाहीं. चाकरीचा मजुरा तों जिवापेक्षां करून दाखविला. पुढें ऊर्जित करणार स्वामी समर्थ आहेत. स्वामीची फौज येथें राहिली, त्यानें मोठासा लौकिक राहिला, आणि बंदोबस्त राहिला. पातशाहा उपकारी जाला. आम्हीं आपले तोंडें स्तुति काय ल्याहावी? पातशहाच लिहितील. वकील आमची चाकरी लिहितील न लिहितील हें पहावें. पुढें कलागत आहे. स्वामीच्या कामावरी जें आमचें होणें तें सुखरूप होऊ. आम्ही चाकरीस अंतर करणार नाहीं. स्वामीच्या कामावरी कांहीं जालें तरी चिंता नाहीं. परंतु आमचे चाकरीची गोष्टी स्वामीच्या ध्यानास येत नाहीं. हेच चाकरी दुसऱ्यानें केली असती तरी त्याजवरी बहुतच कृपा झाली असती. आजी दिल्लींत फौज एक एक स्वार लाखाचा जाला. त्यांत मराठी फौज तरी बहुतच चाहतात. पातशहापाशीं पैका नाहीं. मुलख जो मागाल तो स्वामीस देईल, याप्रमाणें राजी करून ठेविला आहे. आमची पेशजीची फौज स्वार अडीच हजार; त्याची नेमणूक सरदारांनीं वकिलांवरी माघे पूर्णिमेपरियंत करून दिल्ही होती. पुढें नव्हती. त्यास दरमाहे रुपये तीस हजार रोजमरा आहे. त्याची सनद नाहीं व जदीदं फौज दीड हजार त्याचें कबज सालाचे, त्याची सनद नाहीं. व आमचा पावणे दोनशें. दिल्लींत पोटासच तीनशें रुपये पुरत नाहीं. याचा विचार सरदारांनीं मान्य करून आमची रवानगी केली. परंतु याची सनद नाहीं. याविषयीं स्वामीस दहा वेळां विनंतीपत्रें लिहिलीं. परंतु स्वामी सरदारांवरी टाकून लिहितात. आम्ही एक खावंदाचीच चाकरी जाणतों. सुभे मिळाले व आणखी मन माने ते मिळाले तरी स्वामीचे येथें आहों. तरी कांहीं कोणास समाधान नाहीं. परंतु आपल्या मात्र कामाची गोष्टी आहे. ऐसें असतां वारंवार सनदेची दिकत स्वामी करून सरदारांवरी टाकितात. येवढी महागाई खाऊन कर्जदार होऊन, पांच हजार फौजेनिशीं चाकरी करूं. पातशाहा स्वामीचा करून घेऊं. वकिलांच्या मुद्याप्रमाणें कामें करून घेऊं. वीस हजार फौजेची चाकरी करून

---

१. पूर्वीची, कायमची.

दाखवूं. मागती सनदेचीच खळबळ व आमचे क्रमाळीं जो मरातीब आहे तोच आहे. तरी खावंदांनीं चाकराची चाकरी चित्तांत न आणिली आणि सेवकाची उभारणी करून सेवकाची अब्रू न वाढविली, तरी सेवकाचा इलाज काय आहे ? स्वामी खावंद आहेत. येथें पातशहांनीं आम्हांस हफ्तहजारी केलें. साहेबनौबत माहीमरातीब दिल्हें आणि कृतोपकारी फार जाला. तो फंद कांहीं आम्हांस नाहीं. आम्ही गरीब ब्राह्मण. स्वामीचे लिहिणार ते सर्व स्वामीचे. स्वामी मात्र आम्हांवरी कृपा करून नौबत करार करितील अथवा जें करितील तें आम्हांस प्रमाण. नाहीं तरी सेवक आहों. सेवा करावी दुसरें जाणत नाहीं. दीड हजार फौजेसह पैका व अडीच हजार फौजेस माहे पौर्णिमापासून पैका वकील देतच आहेत. परंतु आमचा कागद लिहून घेतला आहे कीं, श्रीमंतांची अथवा सरदारांची सनद आणून देऊं. जरी करितां सनद आणून न देऊं तरी पैका व्याज सुद्धां देऊं. ऐसा कागद लिहून दिल्हा. आणि पैका चार हजार फौजेस त्यापासून घेतों, तेही देतात. न देत तरी त्यांची अब्रू राहत नाहीं. परंतु आमचा कागद याप्रमाणें लिहून घेतला आहे. वर सरदार कांहीं सिताबी या प्रांतास येतां दिसत नाहींत. आले तरी माळव्यांत रजपुतान्यांत येतील. तरी येणेंप्रमाणें सनद पाठवावी. दीड हजार फौजेची सालाच्या कबजाची व अडीच हजार फौजेची माहे पूर्णिमेपासून पुढें आषाढी पूर्णिमेपर्यंत व दिल्लीच्या खर्चामुळें कांहीं जास्ती ऐवज ऐसी सनद जरूर पाठवावी. हेंही स्वामींच्या जरूर चित्तास परभारें वकिलांस हुजरून सनद द्यावयाचें चित्तास न आलेंच तरी उभयतां सरदारांस सनद एक आमच्या पत्रांत लिहून पाठवावी जे, दीड हजार स्वारांचें कबज तेथील खर्चाप्रमाणें करून सनद वकिलांस देणें व अडीच हजार स्वारांची बेगमी माघ पूर्णिमापरियंत केली होती, पुढें करून देणें. दिल्लीचा खर्च भारी, हा अदमास चित्तांत आणून जो शेरा जास्ती करणें तो करावा. ऐसी निखालास सनद तपशीलवार सरदारांस लिहून सेवकाकडे पाठवावी. संदेहयुक्त कांहीं न ल्याहावें. साफ उगवून परिछिन्न लिहावें जे, तिन्ही कलमांची सनद वकिलांवरी करून देणें म्हणजे ते सरदारांची सनद सरदार जेथें असतील तेथें पाठवून सरदारांची सनद यांस आणून देऊं. सरदारांस कांहीं संशयात्मक ल्याहाल तरी सनद पाठवणार नाहींत. आम्ही येथें राहून चौंकडे प्रवेश केला हें कांहीं कोणास सुख नाहीं. परंतु एक स्वामींच्या कामाचें मात्र आहे. तरी परभारें न लिहितां आम्हांजवळ सरदारांस पत्रें परिछिन्न लिहिल्याप्रमाणें लिहून आम्हांजवळ पाठवावीं जे, तीन कलमांची सनद करून देणें. विनंती उदास न करावी. पुन्हा वारंवार अत:पर लिहिणार नाहीं. व साहेबनौबतीची सनदेची आज्ञा केली पाहिजे. नाहीं तरी येथील येथेंच ठेवावयाची आज्ञा जाली तरी ठेवूं. दुसरें, पातशहा आम्हांस परिछिन्न आगोटीस निरोप देतां दिसत नाहीं. आम्हांस राहतां पुरवत नाहीं. दोन वर्षे जालीं, लोक राहणार नाहींत. सरदार जवळ नाहींत व सरदारांपाशीं फौज दिल्लींत ठेवावयाची आहे. कोणती ती आम्हांस कळतच आहे. पातशहा जे स्वामी म्हणतील तें मान्य करितील. परंतु स्वामीची फौज पांच हजार नेहमीं राहिल्याखेरीज त्यांस चैन पडत नाहीं. त्यास आम्हीं पातशहास राजी करून एक हजार स्वार व एक सर-

दार छावणीस ठेवून चार महिन्यांत निरोप घेऊं. परंतु वकिलांस परिछिन्न पत्र लिहावें जे, एक हजार स्वार व एक सरदार अंताजीपंत ठेवतील, आणि त्यांस निरोप देणें जरूर. त्याचें काम आहे. मागती दसऱ्या जाल्याउपरी रवाना करूं. याचप्रमाणें आम्हांस पत्र लिहावें कीं, एक हजार स्वार ठेवून तुम्हीं येणें. मागती सत्वर रवानगी करूं ऐसें साफ लिहावें. त्याखेरीज सुटका होत नाहीं व मजला सेवेशीं कित्येक गोष्टी बोलणें आहेत; तरी याप्रमाणें आम्हास व वकिलांस पत्रें ल्याहावीं. ग्वालेरची रसद भरली असतां दुबारा ऐवज सरकारांत पाऊण लाख घेतला, त्याजविसी दहा वेळां लिहिलें. स्वामींनीं पुण्यांत राजश्री त्रिंबकराऊ मामास पत्र दिल्हें कीं, पाऊण लाख रुपये गोविंद बल्लाळ यावरी तता [ दस्ता ] ऐवज देणें. परंतु त्यांनीं सनद दिल्ही नाहीं. राजश्री जनार्दनपंत फडणीस यांणीं समजाऊन सांगितलें. परंतु त्यांनीं दिकतच फार घेतली. सनद न पाठविली. वरीसभर रुपयास जाले. अखेर साहुकारांस व्याज हुंडणावळ सुद्धां पैका देणें लागेल. आम्ही कांहीं चोर नाहीं. हिंदुस्थानचा पैका गोविंदपंताकडील घेऊन दक्षणेस येतों. कांहीं वाईट नव्हतें. परंतु त्यांचे चित्तास न आलें. पाऊण लाख रुपयांची तपसीलवार पुरवणी आलाहिदा लिहिली आहे. कागद फार म्हणून रागास न यावें. सर्व वाचोन पाहोन सविस्तर उत्तराची आज्ञा करावी. गोविंद बलाळावरील पाऊण लाखाची सनद जरूर पाठविणें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

९० श्री मंगळमूर्ति शके १६७५
( जोशीसंग्रह ) सन १७५३

श्री रमामंडित राजमान्या विराजित धर्मपरायण
गोब्राह्मणप्रतिपालक श्रीराव प्रधान स्वामीचे सेवेसीं

नारायणराव साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल जाणोन आपलें स्वानंदलेखन करणें. कृपापत्र रा शामरायाबरावर पावलें. आपले आज्ञेप्रमाणें शामरायास मुख्याचे सनमुख केले. मुख्याचा वेव्हार व प्रसंग व रीत परस्परें अयकिली असेल. यांजला लटके कदापि अवडत नाहीं. जो प्रसंग करणारांनीं महाराजांपाशीं केला त्याची येथें गंधवार्ता नाहीं. अवघें मिथ्या. आरंभापासून सेवटपावेतों लटकें. राजमान्या विराजित मल्हारराव होळकरांनीं मुख्यास अर्जी लिहिली होती त्याचें उत्तर शामरायाचे हवाला केलें आहे, त्यावरून आदी अंत अवघें विदितें होईल. जर कांहीं प्रसंग आढळता तर सेवकाचे विचारेंच होता व रा मल्हाररावांनीं थोडीं जीं वस्त्रें आमचे मुख्यास पाठविलीं होतीं तें दाखविणें उत्तम न देखलें, फिराऊन पाठविलीं असेत व मीरखुदायारखानासही वस्त्रें पाठविलीं होतीं तीं त्यानेंही न घेतलीं. वस्त्रें शामरायाजवळ आहेत. मी शुभाचिंतक असें. मज योग्य सेवा असतां आज्ञा करीत नाहीं. कोणेविशई दुसरा वेव्हार न जाणावा विनंती.

---

श्री

## ९१

आश्विन शुद्ध १० शके १६७९
ता॥ २२-१०-१७५७ ?

( जोशीसंग्रह )

सेवेसीं विज्ञापना. मोगल्याच्या लस्करांतून यका ग्रहस्तांनीं सागोन पाठविलें कीं, इब्राईमखान गाडदी यानें नवाबापासून विडा उचलला आहे कीं आज खामखाये सडी ( फौज घेऊन ) जातों, या प्रमाणें वर्तमान आलें आहे. ( सबब ) आजच्या रात्री बहुत खबरदार (राहिले) पाहिजे. पुढें चौक्या गेल्या आ ( हेत त्यांस ) सांगोन पाठवावे. आणि ( ठाणियांनींही) आपल्या ठिकाणीं रात्रीचे ख ( बरदार ) आसावें. आलें वर्तमान सेवेसीं लि(हि)लें असे. सत्यमिथ्या ईश्वर जाणे. ( परं ) तु आपण आपल्या ठिकाणीं सावधानी केली. उत्तमच आहे.+ त्याच्यानें तो बाहेर येवत नाहींच. परंतु आपले जागा खबरदार आसावें हें उत्तम आहे. सेवेसी श्रृत होय हे विज्ञप्ति.

---

श्री

## ९२

वैशाख शु. १५ शके १६७८ ?
१४-५. सन १७५६ ?

( भा. व. १८२ )

मुजफखान बहादर हमेशे खुषवख्त वाशंद

स्नेहांकित रफअतव अ बा ली प न ब त ह व र ज कदत दस्तगाहा बादज मलासुद आंकीं. येथील खरें जाणोन आपली खबर कलमी करीत जाणें दिगर. आरफअत पुन्हा अजुर्दा बोलून राजश्री महादाजी पंडित यांजपासून गेला. आमची अजबस तुम्हांवर मेहेरबानी व दिलाची सफाई असतांना आपली पुन्हा आम्हांवर येत न येतां लोकांचे सांगितल्यावरून गेलें हे बात मुनासीब नव्हे. बरें याउपरी अमृतराव तुम्हांजवळ येतील तरी खामखा तात्याही शक न आणितां हुजूर येणें. येथें आल्यावर तुमचे खातरख्वा मतलब हुजुरांत आणले जातील. खातरजमा राखोन जलदीनें येणें. तुम्ही उमदे सरदार. तुम्हांपासून कामें आम्हांस मोठीं घेणें असें असून तुम्हीं चित्तांत दुसरे प्रकार राखावे. जाणून मागें राहिला. उत्तम न केलें. याउपर खातरजमा राखून येणें. सविस्तर अमृतराव सांगतील, त्यावरून कळेल. रा छ. १४ साबान. ज्यादा काय लिहिणें ?

---

+ येथून अक्षर सदाशिवरावभाऊचें. पत्र वडिलांस म्हणजे अर्थात् नानासाहेबास लिहिलेलें आहे. इब्राहीमखान गाडदी निजामाकडे असण्याच्या कालांतील म्हणजे स. १७५७ च्या सप्टेंबरमधील ही सिंदखेडची मोहीम असावी. यानंतर इब्राहीमखानास भाऊसाहेबानें आपल्या नोकरींत घेतलें. कंसांतील अक्षरें फाटलीं आहेत.

श्री

९३ आश्विन वद्य ८ शके १६६९
(ना. भो. ६१) ता। ४-११-१७५७
अस्सलप्रमाणें नकल

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री
पाराशर दादाजी गोसावी यांसि

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार, समान खमसेन मया व अल्लफ. रमाबाई भोसली साल मजकुरीं मृत्यु पावली, सबब त्यांचे गांव कुमटें वगैरे सरकारांत जप्त करून तुम्हांकडे कमाविस सांगितली. त्यास हल्लीं रमाबाईचे गांव राजश्री राणोजी भोसले पुतणे याजकडे करार करून देऊन सरकारची नजर करारः—

५,००० रुपये कार्तिक वद्य ५
५,००० मार्गेश्वर वद्य ५
५,००० चैत्र वद्य ५
———
१५,०००

एकूण पंधरा हजार रुपये करार करून तुम्हांकडे दिले असत, तरी सदर्हूप्रमाणें तुम्ही वसूल घेणें. मौजे कुमटें येथील जप्तीचा वसूल तुम्हीं घेतला असेल तो माघारा देणें, आणि याजकडे गांव राजपत्राप्रमाणें चालवणें. सिदोजी गुजर याजकडे रमाबाईची वस्तभाव असेल ती त्यास ताकीद करून कुल घेणें. जाणिजे छ० सफर. बहुत काय लिहिणें?

———

श्री

९४ कार्तिक शुद्ध ११ शके १६७९
(ना. भो. ५९) ता। २१-११-१७५७
अस्सलप्रमाणें नकल

राजश्री राणोजी भोसले गोसांवी यांस

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद उपरि. येथील कुशळ जाणून स्वकीय लिहिणें विशेष. तुम्ही हुजूर येऊन विदित केलें कीं, आपली चुलती रमाबाई भोसली ईस राजपत्रीं गांव चालत आहेत ते बितपसील.—

१ मौजे कुमटें सदर्हू वगैरे गांव प्रांत वाई दरोबस्त
१ मौजे दुसे तालुके हवेली प्रांत कराड निमे इनाम
१ मौजे मरली तालुके हवेली प्रांत कराड निमे इ०
———
३

एकूण तीन गांव इनाम राजपत्रीं आहेत. त्यास साल मजकुरीं रमाबाईस देवाज्ञा जाहली. तरी सदर्हू गांव आमचे नावें करार करून देऊन चालविले पाहिजेत, म्हणून त्याजवरून तुम्ही रमाबाईचे पुतणे हें जाणोन तुम्हांस तीन गांव सदर्हूप्रमाणें करार करून दिले असेत, तर रमाबाईचे राजपत्राप्रमाणें तुम्ही इनाम अनुभवून सुखरूप रहाणें. तीन गांव वंशपरंपरेनें अनुभवीत जाणें. छ. ७ माहे रबिलावल सन समान खमसेन मया [व] अलफ. बहुत काय लिहिणें ?

---

श्रीगजानन

९५

शके १६७९ कार्तिक शुद्ध ३
ता. १४-११-१७५७
अस्सलवरून नक्कल

( ना. भो. ५८ )

राजश्री राणोजी भोसले गोसावी यांस

अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित पाराशर दादाजी आशीर्वाद विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत असलें पाहिजे विशेष. श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींनीं तुम्हांकडून मौजे कुमटें वगैरे याचे नजरे बाबत ऐवज रुपये १५०००

यांची खांदेबंदी ( हासेबंदी ? ) येणेंप्रमाणें:—

५००० कार्तिक वद्य ५
५००० पौष वद्य ५
५००० चैत्र वद्य ५
१५०००

एकूण पंधरा हजार रुपये देविले ते खांदे येणेंप्रमाणें परभारे देविले ते बितपसीलः—

रुपये ५०० रदकर्ज देणें, नारो गणेश
,, ७२५० ताजाकलम राजश्री गोविंदराव
,, ६००० हवाल्याबद्दल चिठ्ठी
,, १२५० वसूल कुमटें बद्दल रुजू होणें बद्दल गोविंदगड
,, ७२५०
,, ५३७३ निसबती पंडित मिरजकर तुकोजी शामराव
,, १८७७ रकम कर्ज देणें गणेश कृष्ण दामले
,, १५०००

एकूण सदरहू रुपये पंधरा हजार भरून पावले. दुकान पुणें; हस्तें नारो गणेश बेहेरे, रुपये पंधरा हजार पावले. छ १ माहे रबिलावल समान खमसेन मया अलफ. बहुत काय लिहिणें ही विनंती.

---

श्री

९६ आषाढ शुद्ध १५, शके १६८०

( ना. भो. ४७ ) ता॥ २०-७-१७५८

राजश्री जानोजी भोसले सेनासाहेबसुभा गोसावी यांसी

छ सकळगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद उपरि येथील कुशळ जाणोन स्वकीय कुशळ लिहीत असलें पाहिजे विशेष. राजश्री मुधोजी भोसले सेनाधुरंधर यांणीं सर्वांसीं बदअमलीचा प्रकार केला, सावकार व मुलूख धुडविला, भाऊपणियांतही सुधे नाहींत, चाकरीसही तोच प्रकार आहे, व आपलें स्वरूपही जतन करावें ते गोष्ट न केली, सरंजाम चोराहाती खाऊन सर्व खराबा केला; वर्ष सव्वा वर्ष रुभरु सांगावयाचे प्रकारें सांगत असतां कोणतीही गोष्ट घडोन न आली; तेव्हां राजश्री हरि दामोदर यांणीं त्यांणीं एक विचार असून मुलकाचा बंदोबस्त करावा व चाकरीस नीट असावे, याप्रमाणें करून उभयतांची रवानगी केली; या गोष्टीस मशारनिल्हे कबूल झाले; असें असतां कोणी अंदेसी करून निघोन गेले. ऐशियास मशारनिल्हेस ठिकाणीं ठेवावें, बहकूं देऊं नयेत, व मुलखाचा बंदोबस्त करावा व सरंजामावरील लोकांचें देणें वारावें, सरकारचे चाकरीस फौज पाठवावी, याप्रमाणें बंदोबस्त करावा, हें आपणांस उचित आहे. तरी येणेंप्रमाणें करावें. रवाना छ १३ सवाल. बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

श्री.

९७ मार्गशीर्ष वा॥ ७ शके १६८२

( भा. व. 1-1९. ) ता. २८.१२.१७६०

चिरंजीव राजमान्य राजश्री मोरोबादादा यांप्रति बाळाजी जनार्दन आशीर्वाद उपरी. येथील कुशल तागाईत छ. १९ जमादिलावल पावेतो मुकाम पाणिपत येथें सुखरूप असो विशेष. बहुत दिवस जाहले, आपणाबद्दल पत्र येऊन कांहींच वर्तमान कळत नाहीं; तरी निरंतर पत्रीं संतोषवीत जावें. इकडील मजकूरः पूर्वी कुंजपुऱ्यास लढाई जाहली; अबदुल समदखान वगैरे मारले. त्याजवर अबदालीची गांठ पडली, कृष्ण जोशी संगमेश्वरकर यांस गोळा लागून देवआज्ञा झाली, इतकें वर्तमान तपशीलवार लेहून पाठविलें होतें त्यावरून साकल्य कळलेंच असेल. त्या अलीकडील मजकूर तरी यांणीं तोफखान्याचा आरबा पसरून खंदक खणून पाणिपत गांव आपल्या पाठीशीं घालून सध्या फौजा तोफांचे मागें उभ्या, याप्रमाणें बंदोबस्तानें राहिले आहेत. बुणगे गांवाचे पुढें फौजेचे मागें ठेविले आहेत. त्यापाशींही चाळीस पन्नास तोफ चांगली आहे. साठ हजारापर्यंत फौज आहे. एके दिवशीं सरदाराकडील बाजूकडे त्यांची फौज वाढून आली. त्याची यांची लढाई चांगली झाली. शिया-

कडील लोकांनीं त्यांना गोटांत नेऊन घातलें. सहाशें पावेतों माणूस जखमी व ठार त्यांजकडील जहाले. यांजकडीलही दोन अडीचशेंपर्यंत ठार व जखमी झाले. अस्तमान झालें, यास्तव लढाई राहिली. त्यानंतर पंधरा दिवशीं छ २८ रबिलाखरीं श्रीमंतांकडील मोर्चावर चालून चार पांच हजार आले. वरकड फौज त्यांची पाठीमागेंच उभी होती. त्यांची यांची लढाई होऊं लागली. लढाईस प्रारंभ होतांच अस्तमान झालें. ते दिवशीं बळवंतराव गणपत यांस छातींत गोळी लागली. तसेच घोड्याखालीं पडले. तों त्यांजकडील माणसें धावलीं. त्यांतील एकानें तोंडावर तरवारीचा वार केला. दुसऱ्यानें गळा कापून तें शीर नेऊं लागले तों पांचसात राऊत धावून सोडविलें. गळा अर्धा कापला होता, तसेंच आणून दहन केलें. समागमें स्त्री अग्निप्रवेश केली. त्या दिवशीं त्यांजकडील दीड हजार माणूस ठार आपल्या आराब्यापुढें पडलें होतें. त्यांचे पुढें किती होतें हें कळलेंच नाहीं. औशीची तीन घटका रात्र पावेतों लढाई झाली. आपल्याकडील दीडशें पावेतों ठार व पांचशें सातशें पावेतों जखमी झाले. ही लढाई फार चांगली झाली होती; परंतु बळवंतराव यांचा प्रकार असा झाला यामुळें ते सर झाले. त्यावर गोविंद बल्लाळ यांस पूर्वींपासून पत्रें जात होतीं कीं, अंतरवेदींत उतरून अबदालीची रस्ता बंद करणें. यावरून ते दरमजल दिल्लीच्या सुमारें आले. तेथील नारो शंकर यांचीही कांहीं फौज मदतीस घेतली व पुढें रस्त मारावी तों अबदालीनें दहा हजार फौज निवडक पाठवून दगा केला. कोणी लढले व कोणी पळाले. गोविंद बल्लाळ यांचें शीर कापून आणून श्रीमंताकडे दिलें. मग दहन झालें. गोविंदपंताकडील वगैरे तीन चारशें फौज ठार झाली. गोविंदपंतांचे चिरंजीव बाळाजी गोविंद समागमें होते, ते पळून नारो शंकर यांजवळ दिल्लीस आले. कोणी कोणी पळालेले लोक येत. याप्रमाणें झालें. मोठे दगेबाज याजकरितांच आरबा पसरून खंदक खणून मोगलाई रीतीनें राहिले आहेत. दोन महिने यांची त्यांची लढाई होते; अद्यापि लढावें हाच निश्चय उभयतां पक्षी झाला आहे. ईश्वर काय परिणाम लावील तो खरा. मनसबा भारी पडला आहे; पैसा नाहीं, महागाई फार; यामुळें लष्कर गलबललें आहे. याप्रमाणें वर्तमान आहे. आपले बुणग्यांत गोळे जातात. त्याचीं बहुत पत्रें मीं पाठविलीं परंतु आपणांस एकही लिहावयास अनुकूल न पडलें! बरें असो. बहुत काय लिहिणें? लोभ कीजे हे आशीर्वाद. हें वर्तमान तीर्थस्वरूप रा बाबांस[1] लिहून पाठवावें हे आशीर्वाद. पेटा फुलमरी येथील फडनविशी महादजीपंत कुंटे यांस दिल्ही आहे. त्यास त्यांचें वेतन उत्तम प्रकारें होय अशी विनंती श्रीमंतांस करून घ्यावें. मी आपणांस लिहावें असें नाहीं. असामी आपले घरचा, परंतु महादजीपंत यांचीं पत्रें येतात त्यावरून लिहिलें आहे हे आशीर्वाद.

---

१ बाबूराव बाबा.

श्री.

शके १६८२
स० १७६०

९८
( भा. व. १-८० )

श्रीसकल गुणालंकरण श्रीमंत महाराज राजश्री भाऊसाहेब यांचे सेवेसीं

आज्ञाधारक महादजी शिंदे साष्टांग दंडवत विनंती विनवावया प्रार्थना ऐसी. मौजे जांबगांव प्रान्त पारनेर येथील पाटीलकी तीर्थरूप राजश्री कैलासवासी सुभेदार याणीं बरव्यांपासून घेतली, त्यावरून सुभानजी व रामजी पाटील बरवा याणीं खरीदखतही करून दिधलें. त्यास तेथें गांवांत धनगर खलेल करीत असतां आपण साहेबांचें ताकीदपत्र पाठवून होलीस पोली साहेबांची लाविली. त्याजवरून धनगर साहेबांकडे आले असे. तंव बरवेही आले असेत. त्यास महाराजसाहेब काय आज्ञा करितील तेणेंप्रमाणें यांचा इनसाफ करविला पाहिजे. पाटिलकीही साहेबांचीच आहे, आणि आपणही साहेबांचे असों. याजकरितां सेवेसीं विनंतीपत्र लिहिलें असे. त्याजवरून जे गोष्टीनें आपलें कार्य होय ऐसी आज्ञा जाहली पाहिजे. बहुत काय लिहिणें? सेवेसीं विज्ञप्ति.

---

श्री

९९
( ना. भो. ६७ )

श. १६८२
स. १७६०

वेदशास्त्रसंपन्न राजश्री गणेशभट बीन महादेवभट बापट संगमेश्वरकर गोसावी यांसी स्नो साबाजी भोसले दंडवत विनंती. सुरु सन सीतेन मया व अलफ. तुम्हीं थोर सत्पात्र कुटुंबवत्सल, तुमचे चालविल्यास श्रेयस्कर आहे, जाणोन तुम्हांस वर्षासन प. तलेगांवे दहा सहस्राचे, येथें रु. ५० प्रमाणें करून दिल्हे होते. त्यासी त्या सनदा गमाविल्या म्हणोन हल्लीं हें नवीन पत्र करून दिलें असे. तरी सदरहु रु. ५० प० तलेगांव मजकुराचे ऐवजीं प्रतिवर्षी घेऊन अभीष्टचिंतन करीत जाणें; जाणिजे. छ. १२ माहे

---

श्री

१००
( पुरंदरेसं. )

श. १६८३. मार्ग व. ८
१९. १२. १७६१

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीं

पोष्य भास्करराव दादाजी सां नमस्कार विनंती. येथील क्षेम आपलें दये मार्गशीर्ष बहुल अष्टमी तों यथास्थित जाणून स्वकुशल लेखन करीत असिलें पाहिजे विशेष. आपणां-

---

१ वऱ्हाडांत तलेगांव दशसहस्र हें गांव आहे.

कडून बहुत दिवस पत्राभावें परामर्ष न होतां चित्त उत्कंठित, सदैव पत्रप्रेषणीं सांभाळ करावा. यानंतर दुसाला आम्हांवर कसाला सीमेपरता आपणांस विदितच आहे. नजरेचे पैकेस गारदी बसलेच आहेत. येविशींचा कितेकार्थ सांगून हालीं राजश्री गणेश विश्वनाथ पाठविले आहेत. सर्वही आपणांस विदित करतील, तें अंतःकरणीं घेऊन त्याप्रमाणें दरबारीं साहित्य पुरऊन, समर्पक घडऊन आमचे ऊर्जित हो तें करावें. बहुत काय लिहिणें ? कृपा असावी हे विनंती.[१]

१ सर्व प्रकारें स्वाम खावंद. आम्ही सेवक लोक. आज्ञेप्रमाणें वर्तणूक करावी. चाकरी येकनिष्ठेनें करून दाखवावी. जेणें-करून सरकारचा नफा ती गोष्ट व्हावी व करावी, हे इच्छा आहे. या प्रमाणें करवि-णार खावंद आहेत. आमची उमेद खावं-दांचे कृपेवर. खावंदांनीं घेतल्यावर सर्वही सेवक करतील.

२ धन्याची घरची जाहागीर किले गेले किती, राहिला मुल्क किती, हें खावंदाचे खावंद ध्यानांत आणतील, तेव्हां विचारांत येईल.

३ खावंदांचे दौलतीस जख (=घट) किती बसली हे खावंदांचे ध्यानांत आहेच. त्यास इतक्या गोष्टी नीट व्हाव्या, दौलतीचा बंदोबस्त व्हावा, गेली बाजी सावरावी, या गोष्टींवर चित्त कायेम राहून डौल धरावा, हें स्वामीविना कोण करणार !

४ प्रस्तुत सर्वांनीं आपलालें नीट करून घेतलें आहे. खावंदांचे दौलतीचे कर्जाचें कोणास आगत्य आहे नाहीं, हें स्वामी जाणत असतील.

५ मोगलासी स्नेह प्रस्तुत जाहाला आहे, उत्तमच आहे. परंतु मातबर कामें येक दोन त्याणें आपुण करावीं यांत नफा दौलतीचा आहे. तरीच स्नेह उत्तम. तूर्त कर्नाटकाचा बंदोबस्त त्याणे आपुण करावा. हैदर नाइ-काचा पारपत्य करावे, म्हणजे पाऊण करोड रुपये आपले वसूल होतील. ही गोष्ट येंदा जरूर व्हावी.

६ फडणीस पुरातन सेवक, स्वाम कृपावंत मजूमदार पुरातन आहेत. कृपा करून सेवा घ्यावी. त्याजकडील नजर सरकारांत आली आहे.

७ खावंदाचे घरीं सर्व लहान मोठे आहेत. बरे वाईट आहेत. परंतु आपपरत्वे जातीचा आभिमान हा प्रकार काही येक नसावा. सर्वही खावंदांचीं लेकरें; व सेवक जो दौल-तीचा खैरखाई तो आपला उपयोगी; यैसें ध्यानांत आणून, सर्वांवर कृपा योग्यायोग्य आसावी. असी रीतीस जो आणिक तरेने वर्तेल व दाखवील, त्याचे पारपत्य आसावे. तरीच बखेडे बंद पडतील. आम्ही शेवक हें जाणतो कीं देशस्त, कोंकणस्त, कराडे,

---

१ हें पत्र त्रिंबक सदाशिव ऊ० नाना पुरंदरे यास लिहिलेलें असून त्याच्या पाठीवर नाना पुरंदरे याच्या हातची वरील महत्त्वाची यादी दोन जोडांत डावीं उजवीं सात कलमें लिहिलेली अशी आहे.

परभु, सेणवी, मराठे हे सर्व स्वामींचे, स्वाम दौलतेची करावी. हे जातिभेद आभिमान इतक्यांचे मायेबाप. चाकरी मात्र सर्वांनीं नसावे.[1]

---

१०१ श्री

( भा. व. २. १ ) श. १६८३ मार्ग. व. ९

पौ छ १८ जाखर सन इसन्ने मुा उज्जैन ता. २०-१२-१७६१

श्रियासह चिरंजीव राजश्री विश्वासराऊं यांस

प्रति नारो शंकर आशीर्वाद उपरी. येथील कुशल ताा छ २२ जमादिलावल मुक्काम पेडगांव भीमा दक्षिणतीर जाणून स्वकीय लिहिणें विशेष. तुम्ही अमळनेराचे मुक्कामींहून पत्रें पाठविलीं तीं प्रविष्ट होऊन लिहिलें वर्तमान सविस्तर कळलें. हरिनाथबराबर घोडी-पिडी उंटें वगैरे, हत्ती एक, भांड्याची यादीदास्त पाठविली ते पावली. तुम्ही जलदीनें मलगांवींहून कूच करून दरमजलीनें सेंदव्याच्या मार्गाकडून जातों म्हणोन लेखन केलें, तरी उत्तम आहे. देशीं तुमचा गुंता बहुत दिवस जाहला यामुळें मामलतीचें काम आझार (?) जाहलें. त्याहीमध्यें गणेश संभाजी ( खांडेकर ) याणें बखेडा आरंभिला. त्याजकडे सर्व मंडळी मदनसिंग गुजर वगैरे गंगापुरी गोसावी याणीं तिकडे मिळोन नानाप्रकारचे फंद करून डोहोणा केला आहे, तरी चिंता काय आहे ? श्रीसत्तेनें शासन पावतील. चिंता नाहीं. तुम्ही अतःपर कोठें न गुंततां लौकर उज्जनीस जाऊन, तेथील हरद्र मनास आणून, मामलेदार वगैरे कारभारियांस बोलावून दहा लाख रुपयांच्या वरातेची ताकीद करून दहा लाखांची निशा पडे ऐसें करून, तेथील साद्यंत वर्तमान आम्हांकडे लिहोन पाठवून, तुम्ही येथें गुंता न करितां त्वरेनें सिरोंजेस जाऊन इजतखान सुजाखान व गोविंद कल्याण भेटतील. सिरोंज अहिरवाडा दोही मामल्यांचा बंदोबस्त तूर्त गोविंद कल्याण यांस सांगोन इजतखान सुजाखान व अहिर बोलावून, समागमें घेऊन, सत्वर झांशीस जाऊन, किल्ले झांशी व किल्ले करेरा दोन्ही स्थळें[2] हस्तगत करून मामल्याचा बंदोबस्त करणें. गंगापुरी वगैरे यांसी

---

१. पहिल्या पत्रांतील भास्करराव दादाजी कोण याचा उलगडा होत नाहीं. त्याचें पत्र मार्गशीर्ष वाा ८ चें आलें, त्या वेळीं निजामाची स्वारी उरळी पावेतों होऊन निजामाशी सलूख रघुनाथराव दादानें ठरविला. बाबूराव फडणिसास कारभारांतून काढल्याचा प्रसंग याच वेळचा आहे; आणि याच तहाचे संबंधानें कोंकणस्थ व देशस्थ असा पक्षभेद पुण्यांत उत्पन्न झाले. भास्करराव दादाजीची तक्रार नाना पुरंदऱ्याकडे आली, तशा तक्रारी दुसऱ्याही असल्याचें पाहून पुरंदऱ्यानें वरील राजकारभाराचीं तत्त्वें दादासाहेबांस समजाविण्यासाठीं लिहून काढिलीं असें दिसतें. हे कागद रा. कृ. वा. पुरंदरे यांजकडून मिळाले.

२. विश्वासराव लक्ष्मण, नारोशंकरचा पुतण्या स. १७६१-७० पावेतों झाशीच्या सुभ्यावर होता. त्यास रावसाहेब म्हणत.

स्नेहभावें करून शिष्टाचार समाधानाच्या गोष्टी सांगोन परम आप्तता दाखवून दोन्ही स्थळें हस्तगत करून घेणें. पुढें त्यांच्या वर्तणुकेप्रमाणें गौरव करावयास न चुकणें. सूचनार्थ लिहिलें असे. इकडील वर्तमान तरी औरंगाबादेहून मोगल* मोठ्या जोरानें निघोन टोकें, कायगांव, प्रवरासंगम या तिन्ही स्थलांचा विध्वंस केला. श्रीसिद्धेश्वराचा विध्वंस केला. मोठा अनर्थ केला. श्रीसत्ताप्रमाण. तेथून दरमजलीनें निंबेदेहारेयाच्या घांटें चढोन देशांत आला. चांभारगोंद्याजवळ जुंज मातबर जहालें. छ १५ जमादिलावर रविवारीं प्रथमता आपले फौजेचें तोंड लागलें. मागाहून पिछाडीस श्रीमंत राजश्री दादासाहेबांनीं तोफांचा व बाणांचा मार दिधला. आपल्याकडील पंचवीस घोडीं पडलीं व जखमी चाळीस-पन्नास झालीं. माणसें ठार पडलीं व जखमी जहालीं. गारदी श्रीमंतांकडील शेंपन्नास ठार जहाले. शें-दोनशें जखमी जहाले. मोगलाकडील शेंपन्नास ठार पडिले. जखमी शें दोनशें जहाले. घोडींही पडिलीं. दोनप्रहरापासून अस्तमानपर्यंत जुंज जहालें. मोगल घाबरे जहाले. सर्वांचें चित्त जहालियावर तांत्राचें पारिपत्य करणें अगाध नाहीं; परंतु धन्याचा कारभार एक प्रकार. बहुनायकी. फौज नाहीं असें म्हणावें, तरी पन्नास हजार फौज जमा झाली असे. राजश्री जानोजी भोसले सात आठ हजार फौजेनिशीं येऊन श्रीमंतांस भेटले. त्याणींही जुंज एक बरेंच केलें. निकड करून एकचित्तें सर्वांनीं लगट केल्यास मोगलाचें पारपत्य करणें अवघड नाहीं. चांभारगोंदेयाच्या पेठा जाळून गांवांतील दाणागल्ला भाडेंकुंडें सर्व लुटून नेलें. तोफा पांच सात नेल्या. गांवांतील देवालयें व थोर घरें मात्र वांचलीं. तीनचार मुक्काम मोगलानें चांभारगोंद्यावरी केले. काल छ २१ रोजीं कुच करून चांभारगोंद्याअलीकडे लिंपण-गांव तीन कोसांचा मुक्काम केला. आणि छ २२ जमादिलावल मुरादखान मोगलाकडून श्रीमंत राजश्री दादासाहेबांच्या भेटीस आला. सलुखाचा पेगाम लागला असे. श्रीमंतांच्या विचारें कांहीं न देतां सलुका करावा. मोगलाच्या मनसबियांत दोन किल्ले व गुदस्ता मुलूक घेतला आहे तो सोडवून घ्यावा, या कारभारांत बाबूजीनाईक सर्वाध्यक्ष कारभार सवलितात. दरबार नासलें आहे. आम्हीं झांशीच्या मामलतीमुळें दहा-बारा लाखांस कर्जदार जहालों. तेथें तों पैशास ठिकाणा नाहीं. शिंद्याच्या डौलामुळें उभारणीस चाळीस लाखांस कर्जदार होऊन फौज पंचवीस हजार ठेवून नालबंदी दिधली. दहापंधरा हजार फौज जमा जाली. फौजेस रोजमुरियास ऐवज नाहीं, याजमुळें लोकांनीं गवगवा आरंभिला आहे. सरकारांतून रोजमुरियास ऐवज देत नाहीं. रात्रंदिवस घोड्यावरील जीन बांधून फिरत असावें, विश्रांति क्षणमात्र जिवास नाहीं, अशा बखेड्यांत पडिलों असों. श्रीभवानीशंकर परिणाम करील तो खरा. तुम्ही तिकडील बंदोबस्त करून जलदीनें लिहोन पाठवणें. मोगलाचा तहरहाचा निवाडा आठपंधरा रोजांत जालियानें आम्हीं त्या प्रांतीं लौकर येत असों. ही गांठ

---

* निजामअली यानें सन १७६२ मध्यें टोकें प्रवरासंगमावर चाल करून तेथील हिंदु देवालयें लुटलीं त्या गडबडीची हकीकत या पत्रांत आहे.

जालियानें महिना दोन महिने किती दिवस लांबेल हें कळेना. श्रीमंत मातुश्री ताराआईसाहेब यांस देवाज्ञा जाली, पंधरा दिवस जाले. रामराजे यांची स्थापना राज्यावरी ताराआईंनीं आपण असतां केली असे. पुढें नवल विशेष वर्तमान होईल तें तुम्हांस लिहोन पाठवूं. तिकडील वर्तमान तुम्ही सविस्तर वरचेवरी लिहोन पाठवीत जाणें. इजतखान वगैरे जमीदार वोडसेवाले व दतियेकर यांस सामील करून सर्व जमीदार हातीं घेऊन हजार पांचशें जमाव अहीर वगैरे जमा करून जबरदस्तीनें जाऊन स्थळें हस्तगत करून मामलतीचा बंदोबस्त करणें. राजेश्री विठ्ठलपंत[1] तात्या यांजकडील महाल अहीरवाड्यांतील परगणे इंदोर व परगणे कछवा व अथईखेडा यांच्या सनदा जमीनदारांच्या नांवें ताकीदपत्रें व मशारनिल्हेचीं घेऊन तुम्हांकडे पाठविलीं असत. तेथें शहाणा माणूस ठेवून मामलतीचा बंदोबस्त उत्तम प्रकारें करणें. राजेश्री तात्यांचा शब्द न लागे ऐसें करणें. चिरंजीव राजेश्री माधवराऊ व्यंकटेश यांचें समाधान करून मशारनिल्हेचे जिमेस सेवड्याची मामलत करणें. राजश्री धोंडाजी यांसही आपल्याजवळ ठेवून त्यांसही कामकाज सांगोन ठेवून घेणें. सिरोंज अहीरवाडा येथील मामलत राघो गोविंद यांजकडून दूर करून सनद सरकारची घेतली आहे ते बजिन्नस तुम्हांकडे पाठविली असे, त्याप्रमाणें प्रस्तुत राजश्री गोविंद कल्याण यांस तेथील बंदोबस्त सांगोन त्यांचे जिमेस मामलत करून दोन लाखांच्या चिठ्ठया रसदेच्या लौकर पाठवून देणें म्हणोन मशारनिल्हेस ताकीद करणें. मागाहून सेविशीं लिहिणें तें लिहून पाठवूं. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

---

१०२ — श. १६८५ श्रावण पूर्वी

( ना. भो. ३५ ) — आगष्ट स. १७६३ पूर्वी

जानोजी भोसले व पेशवे याच्यामध्यें पुढील करार झाले.

१ दहा लक्षाचा रोखा तुम्ही सरकारांत लिहून दिला आहे तो तुम्हांस देऊं. येणेंप्रमाणें करार करावे. — करार.

२ राजश्री मुधोजी भोसले सेनाधुरंधर यांजकडील पंधरा लक्षांचा मुलूख तुम्हांस देऊं; ह्याचे कर्जदार आहेत ते तुम्हीं वारावे. आम्ही मुधोजी बाबास समजाऊं. येणेंप्रमाणें करार करावे. — करार.

३ मोगल दरोबस्त बुडाल्यानंतर प्रांत वऱ्हाड येथील मोगलाई अंमल तुम्हांस दिला जाईल. करार करावे.

४ दिल्लींत वकील सरकारचा आहे तेथें तुम्हीं आपला वकील ठेवावा त्यांनीं सरकारचे वकिलाचे विद्यमानें जाबसाल करावा. — येणेंप्रमाणें करार करावे.

---

[1] विठल शिवदेव. याचें व नारो शंकराचें घराणें एकच. उपनांव दाणी.

५ भागानगर प्रांतीं जमिदारी मुलकाचा घासदाणा घ्यावयाचा प्रकार तुम्हीं लिहिला, त्यास तिकडेस जमिदारी मुलूख नाहीं. तथापि जमिदाराची नावनिशीची याद आणून समजवावी. तुम्हीही हुजूर आल्यानंतर करणें तें केलें जाईल. करार करावे. करार.

६ लक्ष्मणराव पाटणकर याजकडे मौजे पोतलें व बैलबडें दोन गांव इनाम पुरातन राजपत्री आहेत ते चालवावे, त्यास पेशजीपासून चालत आल्याचा भोगवटा राजपत्र मनास आणून चालविलें जाईल. येणेंप्रमाणें करार करावे. करार.

७ गंगथडी प्रांतीं तुमचा घासदाणा होता तो मुलूख सरकारांत आला. त्याच्या ऐवजीं वऱ्हाडचे सरदेशमुखीचा ऐवज देऊं. येणेंप्रमाणें करार करावे.

८ पटणें राजश्री मुधोजी भोसले सेनाधुरंधर याजकडे आहे ते तुम्हांस देऊं. येणेंप्रमाणें करार.

९ कागद सरकरांत घेतला आहे तो तुम्हांस देऊं. करार करावे.

१० भावाबंदाचा पक्ष करूं नये म्हणून त्यास तुम्ही निखालसपणें वर्तल्यास कोणाचाही पक्ष होणार नाहीं. येणेंप्रमाणें करार करावे.

११ सरदार कोणी आम्हाकडील आला तरी ठेऊं नये म्हणून तुम्हीं लिहिलें त्यास तुम्हांकडील सरदार इकडेस आला तरी ठेऊं नये. इकडील तिकडेस गेला तरी तुम्हीं ठेवूं नये. करार करावे.

१२ पहिल्यापासून आपला व आमचा स्नेह. त्यास राजा तक्तीं बसल्यावर त्यास कोणी किती प्रकार समजावितील, त्यास सर्व प्रकारें सांभाळणी आपली असावी म्हणून लिहिलें. त्यास राजा तक्तीं बसल्यावर तुम्हीं आमचे विद्यमानें वर्तल्यास मान अभिमान सर्व आम्हांसच आहे. येणेंप्रमाणें करार करावे. करार.*

---

**१०३** श्री

( भा. व. २. २ ) श. १६८३ पौ. शु. १३

पौ छ ३४ जाखर सन इसन्ने मुा उज्जनी ता. ८-१-१७६२

श्रियासह चिरंजीव राजश्री विश्वासराव यांस

प्रति नारो शंकर कृतानेक आशीर्वाद उपरी. येथील कुशल पौष शुद्ध १३ मुक्काम भीमातीर प्रांत पुणें देश जाणोन स्वकीय लिहीत जाणें. यानंतर इंदूरचे मुकामींहून पत्रें पाठविलीं

---

* राक्षसभुवनचे लढाईपूर्वी जानोजी भोसले निजामास मिळाला होता. त्यास आपल्याकडे परत आणिताना पेशव्यांनीं त्याच्याशीं केलेला हा करार आहे. रामराजास काढून दुसरा छत्रपति करण्याचा विचार पुष्कळ दिवस चालू होता असें दिसतें. ताराबाईनें मरतांना त्यास फिरून गादीवर बसविलें. त्या पूर्वी तीच आपणास छत्रपति समजत असली पाहिजे.

तीं पावोन लेखनार्थ अक्षरशः अवगत जाला. राजश्री सुभेदाराकडील पत्राची नक्कल व माधो-सिंगाचे फौजेशीं व सुभेदाराशीं युद्धप्रसंग होऊन पंधरा हजार अमित्राची फौज बुडविली, मातबर फत्ते झाली, हें वर्तमान तपशीलवार लिहोन गणेश संभाजी व गोसावी उमराऊगीर यांशीं लढाई होऊन एकवेळ गणेश संभाजी याणीं गोसावियाशीं शिकस्त दिल्ही. पुन्हा गोसावी फौजबंदी करून आला आहे. तुम्हीही उज्जनीवरून दरमजलीनें झांशीस जाऊन बंदोबस्त करणार म्हणोन विस्तारयुक्त लिहिलें तें सर्व विदित जालें. आम्हांकडील लढायांचें वर्तमान नानाविध ऐकोन सचिंत होऊन वर्तमान कळावें म्हणोन लिहिलें, त्यास यापूर्वी वरचेवर तुम्हांकडे पत्रें पाठविलीं आहेत, त्यांजवरून वर्तमान कळलें असेल. मोगलाकडून आदिअंत वर्तमान येणेंप्रमाणें आजपावेतों शेवटास आलें. इा कार्तिक शुद्ध १४ प्रांत आंबेड व पैठण ता पौष शुद्ध ३ अवघ्र दोन पावेतों मोगल औरंगाबादेस जाऊन पुण्याचे रोखें उरळी नजीक पुणें येथपावेतों नित्यानीं लढाया घेत आला. आपणांकडील प्रसंग सर्व विष्कलीत पाहून मोठ्या स्फुंदानें गर्वारूढ होऊन, महाराष्ट्र वगैरे सर्व लहान थोर सरदार जमा करून, मातबर फौजा व तोफखान्यासहवर्तमान केवळ अत्याग्रहास प्रवर्तोन मातबर मातबर झुंजें केलीं. आपली फौज पैठण आंबेड प्रांतीं मोगलाशीं गांठी पडली ते समयीं बहुतच थोडी होती. आबालवृद्ध मोगल भारी भासोन प्रसंग विलक्षण वाटत होता. परंतु श्रीमंत उभयतां पितापुत्र, केवळ श्री शिव व विष्णुचेच अंश, प्रतापरुद्र, ताले शिकंदर, येणेंकरून अकस्मात नित्यानीं फौजा जमा होत चालल्या. साठ सत्तर हजार फौज जमा जाली. भोसले येऊन भेटले. एकनिष्ठेनें दोन चार युद्धप्रसंगीं त्यानीं शर्त चाकरीची करून दाखविली. आमचीही फौज पंचवीस हजार पैकीं या प्रसंगीं पंधरासोळा हजार जमा जाली. शेवटही उत्तम रीतीनें घडोन आला. गोपाळराव व रास्ते वगैरे तीन चार पतके मिळोन दहा हजार फौज, त्यांनींही कामकाज चांगलेंच केलें. रा बाबूजीराव यांचीही दहा हजार पावेतों फौज जमा जाली. या खेरीज श्रीमंतांची हुजरात, तोफखाना व दहा हजार गाडदी वगैरे सेनासमूह ऐशीं नव्वद हजार पावेतों स्वार प्यादा जमा जाला. दौलताबाद, अहमदनगर, हिवरें, श्रीगोंदें व नजीक भुलेश्वर इतक्या स्थळीं मातबर युद्धें जालीं. हरएक प्रसंगीं मोगलास शिकस्तच दिल्ही. हजार पांचशे घोडे माणूस प्रतियुद्धीं उभयपक्षीं जाया होत गेलें. मोगलास चहूकडून कुर्क[1] करून चारा, दाणा, पाणी बंद करून अजीज केलें. दोन शेर धान्य भुलेश्वरपावेतों जालें. ऐसा प्रसंग त्यावर गुजरला. भलेश्वरचे लढाईपासून मोगलाची हिम्मत गेली. त्याहीमध्यें श्रीमंताचे पुण्यप्रतापें रा बाबूजीराव यांचे विद्यमानें ह्या प्रसंगीं रामचंद्र जाधवराऊ चंद्र-सेनाचे पुत्र, मातबर सरदार, मोगलाचे पांच हजार फौजेचे खावंद, स्वतंत्र बाजू सांभाळ-णार ऐसे होते. त्यांजकडे भेदाचा प्रसंग लागला. धनाजी जाधवराव पूर्वीं आपले राज्यांत सेनापति होते ते रामचंद्र जाधवराऊ यांचे आजे. तेव्हां सेनापतीचें पद श्रीमंतीं त्यांस द्यावेंसें केलें. मोगलाकडून पंचवीस तीस लक्षांचा मुलुख रामचंद्र जाधवराऊ यांस होता

१. वेढून

ता त्यांचा त्यांस द्यावा, ऐसे कित्येक करारमदार त्यांसी करून नाईक मशारनिल्हे यांनीं भेदें करून श्रीमंतांकडे आणावेसें केलें. निजामअलीखानाचा कनिष्ट बंधु मीरमोगल अली नासरजंग त्यासही ममता दाखवून तिकडून श्रीमंताचे भेटीस घेऊन यावे ऐसें गुप्त ठरलें. जाधवराऊ व नासरजंग उभयतांस कोणासही मंत्र प्रगट न होतां अकस्मात् नाईक अर्धे रात्रीं फौज सुद्धां मोगलाचे फौजेवर छाप्याचे बहाण्यानें जाऊन, फौज व तोफखाना जाधवांकडील जो होता त्यासुद्धां श्रीमंत उभयतांचे भेटीस घेऊन आले. एक बंधु मुख्याचे प्रतिमेचा, दुसरा जाधवराऊ मातबर सरदार बाजूचा यांजकडे आला. यानें मोगलाची फौजसुद्धां हिंमत खता जाली. महर्गता दर रुपयांस शेरभर अन्न न मिळे, ऐसा प्रसंग उरळी पावेतों मोगलास प्राप्त जाला. चहूंकडून आपल्या फौजांनीं वेष्टिले. चार दिवस ऐसा प्रसंग त्यांजवर राहाता तर समूळंच विनश्यति जालें होतें. त्यानें विलक्षण प्रकार प्राणांतिक पाहून श्रीमंतांशीं थेऊरच्या मुक्कामीं सल्ल्याचा पैगाम केला. बाबूजीराव, गोपाळराऊ, भोसले, जाधवराऊ वगैरे सर्वांचे विचारें मोगल बुडवावा, सल्लूक न करावा ऐसें होतें; परंतु श्रीमंत दादासाहेब भोळा सदाशिव, कृपावंत मोगलावर जाले. त्याजकडील सल्ल्याचा पैगाम काय, हेंही सरदाराची मर्जी नसतां मान्य केला. राजश्री हणमंतराऊ निंबाळकर व राजश्री आनंदराऊ जयवंत निंबाळकर व वस्ताद मुरादखान त्रिवर्गास मोगलानें मध्यस्तीस घातलें. उभयपक्षीं कोणास कांहीं न द्यावें, स्नेह मात्र होऊन मोगलानें आपले स्वस्थलास जावें ऐसा करारमदार सलुकाचा झाला. रामचंद्र जाधवराऊ मोगलाकडून आपले राज्यांत आले. त्यांचा मुलुक मोगलाईंतून त्यांजकडे होता तो श्रीमंतानीं न घ्यावा, त्यांस चाकर ठेविलें तर त्यांजला मुलूख आपलेपासोन देऊन त्यांची उभारणी करावी, इतकी इच्छा मोगलानें केली. दुसरे बंधु नासरजंग यांजकडे आले, त्यांस हिस्सा मुलुक श्रीमंताचे आज्ञेप्रमाणें द्यावा, परंतु त्यानें मोगलाकडे जावें ऐसे दोन मुद्दे मोगलानें घातलें. परंतु श्रीमंतांजवळ येणेंप्रमाणें ठराव होऊन सल्ल्याचा निश्चय जाला. येणेंप्रमाणें कलमें ठरलीं.

जाधवराव यांचा मुलूक मोगलाईंतून होता तो दरोबस्त मोगलानें श्रीमंतांस दिल्हा. त्याजपैकीं सत्रा लक्षांचा ऐवज मुबदला मुलूक श्रीमंतांनीं आपल्या मुलुकापैकीं बेदर वगैरे प्रांतीं बेदर वगैर महाल मोगलास सोडावे ऐसा करार जाला. आपल्या आखत्यारें महाल द्यावेसें जालें. रामचंद्र जाधवराऊ यांस मोगलानें कल्याणचा किल्ला नूतनच दिल्हा होता तो मोगल माघारे मागूं लागले. त्याऐवजीं नलदुर्गचा किल्ला श्रीमंतांनीं मोगलास द्यावा ऐसा करार झाला. उभयपक्षीं मोगलाचा व श्रीमंताचा जाबकुरान बेलभंडार जाला.

मीरमोगल अली नासरजंग मोगलाचे कनिष्ठ बंधु श्रीमंताकडे आले, त्यांनीं श्रीमंतापाशींच रहावें, मोगलानें त्यांचे हिश्याचा मुलुक विसा लक्षांचा श्रीमंताचे स्वाधीन करावा, ऐसा ठराव ठरला.

सदरहूप्रमाणें ठराव होऊन सलुक जाला. मोगल धारूर भागानगर प्रांतें स्वदेशास दरकूच चालिला. त्रिवर्ग सदहूप्रमाणें मध्यस्तीस आले होते तेही श्रीमंतांची आज्ञा घेऊन मोगलाकडे गेले. श्रीमंत स्वामीचे शिकंदर ताले. चहूंकडून प्रसंग विष्कालित असतां मोठा नक्ष मोगलावर जाला. अतःपर स्वराज्याचा बंदोबस्त होणार. बाबूजीराव यांचे विद्यमानें जाधवराऊ आले. त्यांस कराराप्रमाणें सेनापतीचीं वस्त्रें दिल्हीं. दोन हत्ती, दोन घोडीं, पांच सात चौकडे, कडीजोड वगैरे जवाहीर व वस्त्रें व आसमंतात त्याजकडील सरदार, कारकून वगैरे मातबर मातबर होते त्यांस वस्त्रें, कडीं, चौकडे यथापद्धत सर्वत्रांचा सन्मान केला. मोगलापासून जाधवरायाचा मुलूक सोडविला तो त्यांचा त्यांस देऊन आपले तर्फेनेंही करारमदार आहेत त्याप्रमाणें देणें तें देतील. सलुक श्रीमंत व रा सखारामपंत बापू उभयतांनीं आपल्या विचारें मोगलाशीं केला याजकरितां रा बाबूजीराव बहुतच श्रमी आहेत. बाबूजीराव, गोपाळराऊ, त्रिंबकरावमामा व बाबूराव फडणीस यांचा एक विचार, त्यांत श्रीमंत दादासाहेब व सखारामपंतबापू यांचें एक मत, ऐशीं आपल्यांत भिन्न भिन्न मतें जालीं आहेत. याचा परिणाम पहावा कैसा होतो. आम्ही आज्ञेप्रमाणें आपले फौजेसहवर्तमान मोगलाचे आसपास होतों. पेडगांव पावेतों मोगलास माघारे पोहोंचविलें. श्रीमंतांची आज्ञा बहुत त्वरेनें येणेंविशीं आली, त्याजवरून दरकूच श्रीमंताकडे येऊं अथवा पुणें जेथें असतील तेथें जात असों. तेथील प्रसंग सदहू भिन्न भिन्न प्रकृतींचा ध्यानास आणून आपल्याकडील जाबसालाचा सत्वर उलगडा करून फौजेसहवर्तमान स्वल्प दिवसांतच हिंदुस्थानप्रांतास येत असों; तोंपावेतों तुम्ही बहुत शहाणपणें सर्व एकचित्तें झांशी प्रांतींचा बंदोबस्त उत्तम प्रकारें करून वर्तमान वरचेवर आम्हांस लेखन करीत जाणें. या पूर्वी सिरोंजच्या सनदा राघोपंती तगाईच्या वगैरेच्या तुम्हांकडे पाठविल्या त्या पावल्या असतील. कमावीस रा रामचंद्र जिवाजी यांस करार करून सांगितली. रसदही त्याणीं द्यावी ऐसे जुने तुम्ही रा गोविंद कल्याण यांची खातरजमा करून सिरोंजचा बंदोबस्त करणें तो करून पुढें झांशीस लवकर जाणें. वर्तमान वरचेवर लिहीत राहणें. बहुत काय लिहिणें आशीर्वाद.

राजश्री खंडो पुरुषोत्तम व राजश्री चिमणाजी वामन यांशीं साष्टांग नमस्कार. उपरी परिशिजे हे विनंती.

---

श्री

१०४ — श. १६८३ फाल्गुन व. ७

( ना. भो. ७१ ) — ता. १७-३-१७६२

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री दिवाकरपंत दादा स्वामी गोसावी यासी

पोष्य *भवानी शंकर गोपाळ कृतानेक विनंती उपरी. येथील क्षेम तागायत फाल्गुन वद्य ७ पर्यंत सुखरूप असो विशेष. आपणाजवळून स्वार जाहलों तों मार्गी शरीरभोग

---

* भवानी काळे.

घेतल्यामुळें एक महिना [ तळ ] दिल्हा. सप्तऋषीस फाल्गुन वद्य ७ स दाखल झालों. बाकी येथील बंदोबस्त यथास्थित असे. आपण आल्यावर जें होतें तें स्वामींचे सेवेशीं निवेदन केलें. महाराज बहुत खुष झाले. त्यांनीं आज्ञापत्र लिहिलें आहे, तें आपणाकडे पाठविलें आहे. येथें कित्येक प्रकारें अर्जबाब करून साकल्य विदित केलें. सर्वप्रकारें मान्य केलें आहे. जो आपला मनोदय आहे तोच स्वामींचाही मनोदय आहे. जितकें प्रकरण करावयाचें असेल तितकें केलें पाहिजे. या प्रांतामध्यें स्वामींनीं चांगला बंदोबस्त केला आहे. राजश्री राघोबादादा फाल्गुन वद्य ३ शुक्रवारीं किल्ले मजकुरीं येऊन स्वामींची भेट पर्वतावर जहाली. कित्येक मजकूर उभयतांचा अंतस्तांत जाबसाल जाहला. तो स्वामींनीं कित्येक अर्थावर दृष्टि ठेवून ते जें बोलले तें मान्य केलें. पुढें शुक्रउदय झाला. खालतीं उतरणार ते समयीं स्वामींनीं आज्ञा केली आहे कीं, आपली खासगत फौज अंतःस्थितींत जवळ असावी यास्तव तुम्हांस सूचना दिली आहे. खर्चाची अडचण झाली आहे म्हणोन लिहिलें असे. आपणही राजकारभार चालवितेत. सुज्ञाप्रति उगाच लिहिणें नलगे. स्वामींची मर्जी रक्षावी हें आपणांस विदितच आहे. महाराजांनीं हुजूर असामी तीन पाठविले आहेत. त्यास हैबतराव यास आपणाजवळ ठेवून घेणें. इजतवार ठेवणें. जबानीं सांगतां कळोन येईल. महाराजांची आज्ञा आहे कीं, आमचा हुजरमुजरत एक दरबारीं ठेवणें. यास्तव हैबतराव ठेवून घेणें. बहुत काय लिहिणें? कृपालोभ असो दिजे हे विज्ञापना.

---

श्री

१०५ शके १६६३, श्रावण शुा ७

( भा. व. १. १८ ) ता. १५-८-१७६३

श्रीमंत राजश्री स्वामीचे सेवेशीं

पोष्य रामचंद्र गणेश साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ताा छ ५ सफर जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे विशेष. आपण कृपा करून ज्येष्ठ वद्य द्वितीयेचें पत्र पाठविलें तें छ १ सफरीं पावलें. परम संतोष जाहला. इकडील वर्तमान तरी छ २९ मोहरमीं नजीक राक्षसभुवन येथें निजामअलीकडील सारे सरदार व निम्मी फौज याप्रमाणें गंगे अलीकडे विठ्ठल सुंदर होता. निजामअली खासा मात्र पलीकडे होता. त्यानंतर आपले लोकांनीं सकाळच्या दीडप्रहरा दिवसास मोगलांचे फौजेवर चालोन घेतलें. ते बेबरब गोटांतच गेले. लढाई चांगली जाहली. विठ्ठल सुंदर व विनायकदास व गोपाळसिंग खंदारकर राजा हे त्रिवर्ग ठार झाले; व सदाशिव रामचंद्र यास जखमा झाल्या होत्या, त्यास तो तसाच गंगेंत उडी मारून पार झाला. निजामअलीस खंदार पलीकडे कळतांच जनानखाना तेच वेळेस औरंगाबादेस पाठवून दिला, व आपण छ ३० मोहरमीं पहांटेचे प्रहररात्रीस डेरेदांडे टाकून दोनशें राउतांनिशीं औरंगाबादेस गेला. अलीकडे फौज व बाजारबुणगे जितके होते, त्यांपैकीं कांहीं मारले गेले व फार करून लुटले गेले. आपणांस कळावें

म्हणोन लिहिलें असे. बहुत काय लिहिणें ? लोभ कीजे. प्रस्तुत फौजा गंगा उतरून पार जाऊन शहरास शह द्यावा असा विचारबेत आहे. गंगेस पाणी फार आहे. नावा नाहींत. हे विनंती.

---

१०६ श्री ( मार्ग. व. १३ श. १६८७
( ना. भो. १३ ) ता. २५-११-१७६५

राजश्री जानोजी भोसले सेनासाहेब सुभा गोसावी यांस

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित रघुनाथ बाजीराव आशीर्वाद विनंती उपरी. येथील कुशळ जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें विशेष. तुम्हीं पत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनार्थ अवगत झाला. त्यांतील खुलासा मजकूर–कैलासवासी नानासाहेबांमागें यवनांच्या मसलतीस आपण येऊन सामील झालां,* यवनांचा पराभव झाला. आपली ममता अधिक असावी. तेज पुण्य दृष्टीस पडलीं. त्यानंतर बाबूराव फडणवीस व गोपाळराव, व पिराजी नाईक, व सदाशिव रामचंद्र व नरशिंगराव आदिकरून प्रतिनिधि यवनाकडेस गेले. सदाशिव यमाजी येऊन आपणांस घेऊन गेले. आठ महिने पर्यंत होणार तें झालें. आपलें घर बुडतें जाणून पुढें जो प्रकार घडून आला तो आपले प्रत्ययास आलाच आहे. परस्परें बेल तुळशी इमान झालें असतां दोहींकडेसही विश्वास न पुरे. याजमुळें शिलेदारांनीं मनास मानील तो सरंजाम मागावा, पैसा मागावा. शरीक मातबर करून दरमहा पुरता, एवढें संचार होत असावें. येणेंकरून यवन बलाढ्य होतो. हिंदुस्थान वगैरे देशांतरीचे मनसुबे राहात चालले; आपल्या आपल्या घरकृत्यांत पहात असावें, पैका नाहींसा झाला; म्हणजे शिलेदारांनीं यवनाकडे जावें, यवन बलवावा, तेव्हां आपलीच घरबूड होते हें उमजोन लिहिलें आहे. या उपरी सातार्‍यांत राजा प्रतापानें नांदत नाहीं हा आक्षेप इकडून नसावा. आपण वडील, आपणावर राज्यभार आहे. आम्ही लेंकरें आहोंत; लेंकूरपणाची आळ चालवावी. इकडे शत्रूची मसलत पडेल तेव्हां आपलें साह्य असावें. जेव्हां पडेल तेव्हां आह्मीं न बोलवितां यावें. येऊं तेव्हां पोटास मात्र यावें. यवनांचें निर्मूलन करणें मनांत असल्यास चार महिने मेहनत करणें पडेल ती करावी. यवन निर्मूल होईल. परस्परें खिलाप तुटोन ऐक्यता झाल्यानें सर्व स्वस्थता होईल. आपल्या आपल्या सरंजामांत जाऊन बंदोबस्त घडेल. द्रव्य पुष्कळ होईल ही गोष्ट एक, संशय परस्परें तुटला, म्हणून जहाली हें जाणावें. आतां इकडून दगा किंवा यश अपेश संधींत अंतर आम्हापासून पडेल तरी दोन बाप असतील. कैलासवासी रघोजी बाबा यांचे वीर्यापासून जो जन्मला असेल तो आपणाकडे वांकडे पाहणार नाहीं, दगा करणार नाहीं; ह्याप्रमाणें आपलें अभय झालिया आमचे मनांतील विकल्प दूर होऊन चित्त स्वस्थ होईल. त्यानंतर आम्ही आपल्यासमीप येतों. उत्तरें अभयवचनांचे सत्वर

---

* उरुळीचे स्वारींत.

यावें हेंच शपथ उभयपक्षींचे कारभारी आहेत किंवा पुढें नवे करणे झाले तरी त्यांजवळ कळवावी. त्या कृत्यानें त्यानें चालावें, म्हणून विस्तारें लिहिलें तें सविस्तर कळलें.

ऐशास तुमची सरदारी ते आपली हें पहिल्यापासून आहे. कैलासवासी शाहूमहाराज यांमागें रघोजी बाबांचा काळ झाला ते समयीं नानासाहेब यांणीं सेनासाहेबसुभ्याचीं वस्त्रें बहुमान तुमचे घरास पाठविलीं. तुम्हास आणून ममतेनें वागविलें. याप्रमाणें आमचीही ममता तुमचे ठायीं असोन काल एक प्रकाराचा जाहला. प्रतिनिधि आदिकरून यवनाकडे गेले. तुमचेंही जाणें जाहलें. याजमुळें राज्य खराबींत आलें. पुणें जळालें. त्यापुढें तुम्हांस सर्व उमजोन तुह्मी आलां, परस्परें ऐक्यता होऊन बेल तुळशी इमान प्रमाण जाहलें. तेव्हां संशयाची गोष्ट तिळमात्र राहिली नाहीं. तुमचे मनांत संशय राहिला तो दूर न होय. बेल तुळसी ईश्वराची शपथ जाहली. यावर संदेह नसावा; तथापि तुमचा आग्रह कीं, आपण जे शपथ लिहिलीं ती हिकडून असावी. परंतु थोर लोक जे आहेत ते या शपथेस शब्द ठेवतील, तथापि तुमच्या मनांतील संशय तोडून तुम्हांस आपल्या जवळ आणावे, यास्तव तुमचे लिहिल्याप्रमाणें शपथ मान्य असे. चिरंजिवाचे नांवें पत्र पाठवावें असें लिहिलें. ऐशियासि चिरंजीव हल्लीं मोहिमसीर लांब आहेत आणि येविशींचे विस्तारें अर्थ रामाजी बल्लाळ यांस आज्ञा केली आहे. मशारनिल्हे सांगतां कळेल. सारांश, तुम्हांस कोण्या काळींही इकडून दगा होणार नाहीं. आपण निर्भयपणें यावें. रा। चन्द्र ११ माहे जमादिलाखर फसली ११७५ बहुत काय लिहिणें हे विनंती. [ लेखनसीमा ]

---

श्री

फाल्गुन शुद्ध १४ शके १६८८
ता। २३-२-१७६६

१०७
( ना. भो. ४३ )

( नबाब व जानोजी भोसले यांची कलमबंदी माधवराव पेशव्यांचे मार्फत ठरलेली )

सवाल १--वराड प्रांतीं तह पहिलेपासून आहे, त्याप्रमाणें अमल सुरळीत चालावा. त्यांत खलश नसावा. ज्यास्ती उपद्रव करूं नये. कलम

ज० १--खलेल आम्हांकडून जाहला असला तरी जाबसाल खाम(?) हिशेब मनास आणून करूं. पुढें तहाप्रमाणें चालूं येणेंप्रमाणें.

स० २--सालमजकुरीं श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांची स्वारी वऱ्हाड प्रांतीं आली. भोसले यांचा हिस्सा म्हणून महालोंमहाल ऐवज घेतला. त्याची रसीद एकंदर महालोंमहालची द्यावी कीं, जो आकार मामलत रुईनें होईल त्यांत सरकार हिस्सा जाऊन बाकी ह्याचा हिस्सा राहील त्यांत तो ऐवज मजुरा द्यावा.

ज० २--ऐवज सालमजकुरीं न पुरतां येत्या सालांत राहिला ऐवज मजुरा देऊं. रसीद वाजवी असावी.

स० ३--देवगड चांदा येथील पेशकशीचा ऐवज सुदामतप्रमाणें देत नाहींत. त्याचा मागील हिशेबाप्रमाणें ऐवज नगद द्यावा, व पुढील सावकारी निशा द्यावी. कलम

ज० ३--[ ही जागा मुळांत कोरी आहे. ]

स० ३--गढिया व ठाणें सांप्रत नवीन घेतले आहेत, त्यांत सुदामत ठाणें राहात आहेत ते ठाणें सोडावीं. ठाणें आमचीं. कलम

ज० ४.--तहाखेरीज घेतली असतील तरी माघारी घ्यावीं.

स० ५.--सांप्रत फौजेचे उपद्रवामुळें वऱ्हाड मुल्ख प्रांत खराबींत आले. त्यास कौलपत्र देऊन आकाराचा पैसा घेऊन त्याची उस्तवारी करावी; उभयतांकडून कौलास अंतर नसावें. ज्यास्त उपद्रव न करावा.

ज० ५—प्रांत उभयतांचा आहे. त्यास उभयपक्षीं उचित तें करावें.

स० ६--वऱ्हाड प्रांतीं सुभा राहील त्यानें व सरकारचे सुभेदारानें आपापले तहाप्रमाणें अम्मल करून सुरळीत वर्तावें; हिशेबाप्रमाणें महालाचा वसूल द्यावा; जहागीरदार वगैरेचे महालास उपद्रव न द्यावा. कलम

ज० ६—सदर्हू प्रांत तुमचा आमचा आहे; त्यास उभयतांनीं परस्परें जें उचित तें करावें. येणेंप्रमाणें.

स० ७--जहागीरदारांचे महालांत तह व गांवखर्च व सरदेशमुखी वजा करून बाकी निंमेनिंमे ऐवज घेत जावा; त्या करारांत अंतर नसावें. कलम

ज० ७—[ ही जागा मूळांत कोरी आहे ]

स० ८--पागेकरी वगैरे पतकी महालांत राहतात. त्यांनीं वावगा उपद्रव रयतीस न द्यावा. कलम

ज० ८--जें उचित तें उभयतांनीं करावें.

स० ९.—भागानगर व बेदर व अवरंगाबाद वगैरे प्रांतीं घांसदाणा नबाब असफज्याचे वेळेस न होता, सांप्रत ही खास फौज त्या प्रांतीं असल्यास घेऊं सकत नाहींत. फौज मोहीमशीर असतां मागें उपद्रव देतात तो न करावा. कलम

ज० ९ घासदाणा नबाब असफज्याचे वेळेस व नासरजंग याचे इनायत झाला. घांसदाणा मामूल घेणें. येणेंप्रमाणें.

स० १०--प्रगणे नाचणगांव वगैरे महाल वर्धापार आहेत त्यांचा तहाचे वेळेस इजारा करून दिल्हा, त्या तागाईत तो ऐवज न आला तो नगद द्यावा. पुढें सावकारी निशा आलियास महाल त्याजकडेस रहावेत; नाहीं तरी सदर्हू महाल सोडावेत.

ज० १०--सदर्हू इजाऱ्याचे तहाप्रमाणें ऐवज बेमुजीब हिशेब भरून ता राजे बहादुर दिल्हा. आलीकडेस सनदा आहेत त्यास कराराप्रमाणें सनदा असल्यास उत्तम.

स० ११--साबाजी भोसले यांस जागीर बशर्त चाकरी करावी म्हणून दिल्ही. त्यास कराराप्रमाणें फौज चाकरीस नाहीं, सबब फौज चाकरीस द्यावी. अथवा महाल सोडावे.

ज० ११--चाकरी बशर्त परंतु आज पावेतों चाकरी केली नाहीं. जहागीर आसफज्यापासून आहे.

स० १२--आमनेरचा किल्ला यास दिल्हा. सबब कीं, हे येऊन सरकारांत सामिल जाहले. पुढें सामिल राहून कितीएक मनसुबे करावे, तों याजकडे सामिलांतींत अंतर जहालें. सबब किल्ला व महाल सोडावा. दिकत नसावी.

ज० १२--बेमोजिब सनद जवाबसाल आहे.

स० १३--राजाराम बाबूराव सुभेदार आपले सुभ्यांत अम्मल करितात, त्यास बुडविलें. त्याची माल मवेशी व सरकारच्या तोफा वगैरे माघाऱ्या द्याव्या. कलम १

ज० १३.--वाजवी.

स० १४.--निंबाळकर वगैरे त्यांचे महालांत पैसे वाजवी घेतले ते जमीदारांचे रुजुवातीनें सदर्हू ऐवज माघारा द्यावा. कलम १

ज० १४.--बत्तिसां लक्षांची जहागीर श्रीमंतानें दिली त्या महालाचा वसूल नबाबाचे सरकारांत अगर जहागिरदारांकडे जमीदारांकडे त्या वेळीं सदर्हू निंबाळकर वगैरे यांचे ताल्लुक्यांत घेतला असेल.

स० १५.--हवेली आळंजपूर याचा मक्ता सरदेशमुखी भोकाश बाबती घांसदाणा वगैरे कुल मुकरार रुपये २५००० पंचवीस हजार अक्षरीं पंचवीस हजार घेत जावे. याचप्रमाणें तहनामा आहे त्यास सांप्रत कराराशिवाय ऐवज अधिक घेतला असेल तो ऐवज माघारा दरोबस्त दिला पाहिजे.] कलम १

ज० १५.--[ ही जागा मुळांत कोरी आहे ]

---

१०८ श्री

( ना. भो. ५६ ) श. १६८९ चै. शु. १५

१४-४-१७६७

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बाळाजी जनार्दन स्वामी गोसावी यांस, पोष्य माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहिणें विशेष. इकडील वर्तमान तर उसकोट्यास मोर्चे लाविले होते. किल्लाही फत्ते जाहला. किल्ला भरीव चांगला आहे. या प्रांतीं ठाणीं व किल्ले चांगले सुटले आहेत. आजपावेतों पंचविस लक्षांचा मुल्क सुटला आहे. याजखेरीज निराळे गुरुमकोंड्याजवळ पाली व सरकारताल्लुका पेशजीचा सुटला आहे. याखेरीज मुरारराचाचा ताल्लुका पांचा लक्षांचा सुटला आहे. मुरारराचाचे किल्ले व ठाणीं झाडून सुटलीं. सरकारताल्लुक्यांपैकीं जगदेव सरकार मात्र सुटावयाचें राहिलें आहे. सारांश गोष्ट, अखेरीचे दिवस आले, आजपावेतों ठाणीं व ताल्लुका मात्र सुटला. पैक्याचें दर्शन नाहीं. तुर्गल्ली, हरपनल्ली वगैरे संस्थानच्या

खंडण्या पहिल्याच होऊन आल्या. त्यास इतके दिवस खंडण्याचा ऐवज व आणीक अठ्ठावन लक्ष पावेतों कर्ज घेऊन आजपावेतों चाललें. याउपरी शेवटचे दिवस आले; आणीक कोणीं संस्थानें राहिलीं नाहीत. एक हैदरखानाची मात्र मामलत राहिली. त्याचा प्रकार तर नबाब निजामअलीखान याणीं सत्वर यावें असा पूर्वी करार होता. त्यास नबाब तर आजपावेतों येतच आहे. मोगली कारभार सुस्त. त्याजमध्यें बसालतजंगाचीं ठाणीं आम्हीं भनू वगैरे सरकारांत घेतलीं. ते बसालतजंग नवाबाबरोबर हैदरखानाची त्याची पहिली ओळख याज-मुळें नवाबास शंभर तऱ्हेचे लोभ हैदराचे वकील व बसालतजंग दाखवितात, याजमुळें येण्यांत विलंब करितात. रायदुर्गाहून प्रस्तुत कूच करून पुढें येतात असें आहे. रुकनुत-दौला भला मनुष्य आहे, याजमुळें ते मात्र नीट लक्ष राखितात. परिणाम बरा वाईट रुकनत-दौलासच करावा लागेल, यास्तव ते मात्र संभाळून करितात. आतां सत्वरच येतील असें आहे. परंतु नवाब मागेंच येते तर हैदराची मामलत सत्वर होती, अथवा न येते तरी सरकारकाम तटत नव्हतें आणि हैदरास नुकसान होतां नवाब येऊन कामावर पडले नाहींत असें जाहलें. बाकी सरकारचे मामलतीस हिसका मात्र चार दिवस बसला. शेवटीं नबाब आम्हांसीं तोडून हैदरास मिळवून घेतात असें तर नाहींच, परंतु अखेरचे दिवस आले; छावणी तर दोन्हीही फौजांची होत नाहीं. ह्या खबरी हैदरास कळून तो ओढीत आहे. नवाबास आशा दाखवितो कीं, तुम्ही याची कुमक न करावी, पेशकसीचा ऐवज देतों. याप्रमाणें नवाबास आशेस लावितो. इकडे पैगाम असा आहे कीं, तीस लक्ष रुपये आणि सिरें ठेवावें. वरकड तालुका किल्ले सुद्धां सोडावा असा पैगाम इकडे आहे. त्यास या प्रांतींचे किल्ले व ठाणीं मजबूत सुटलीं आहेत तीं पुढें यावयाचीं नाहींत. त्याजमध्यें चार किल्ले तर पहाडी; ते तर येणेंच संकट. यास्तव आम्ही सोडीत नाहीं. अशी अटीस गोष्ट आहे आणि नबाबाचाही वहीम त्यास आहे, यास्तव मामलत होत नाहीं. याजपेक्षां हैदरास विशेष जरब बसावयाचा प्रकार तर एक बेंगरुळास लागावें अथवा पट्टणास जावें. तरी दोन्ही प्रकार शहास गुंतावयाचे आहेत. दिवस तर राहिलेच नाहींत असा मजकूर आहे. यास्तव पंचविसा लाखांची जरूर तरतूद जाहली पाहिजे. जर करितां मामलत जाहली तरी ऐवज हप्तेबंदीनें येईल तेव्हां तरी मोबदल्यास ऐवज पाहिजे. जर करतां मामलतच न जाहली तर पैक्याची तर्तुद जरूर पंचवीस पावेतों करणें. छावणीस गोपाळराव, रास्ते वगैरे फौज सलूक न जाहल्यास पंधरा हजार ठेवावी लागेल. कां कीं ठाणीं व किल्ले बेजोर, [1]जिदीस्तव राखणें प्राप्त, यास्तव भारी फौज राहील. जागे चांगले आणि जिदीनें राखणें तेव्हां शिबंदी फार लागेल त्यासही ऐवज पाहिजे असा प्रकार आहे. यास्तव पत्र पावतांच पंचविसांची तरतूद आधीं करणें. यंदांचा समय असा होता कीं, एक छावणी करून पुरतें पारपत्य करून बेंगळूर वगैरे जागा घेऊन फार ऐवज

---

१ अब्रूसाठीं

घ्यावा, मनाजोगता सल्लक करून घ्यावा असा समय होता; परंतु नाइलाज होऊन मागील पेंचामुळें फिरणें प्राप्त होतें. नाहीं तरी याचे पारिपत्याचे दिवस पुढें येणें कठिण. तुम्हास कळावें. तरतूद सत्वर व्हावी. तागाईत छ १४ जिलकाद. बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

१०९ श्री

( भा. व. २–९ ) श. १६८९ आश्विन शु. ५

ता। २८–९–१७६७

यादी कलम तीर्थरूप राजश्री दादासाहेब यांजकडील सुा समान सीतैन मया व अलफ. भोसले गायकवाड वगैरे सरदार व कमाविसदार यांनीं आमचे हिमायतीनें तुम्हांशी वाकडी गोष्ट सांगितली असेल, वर्तणूक वाकडी केली असेल, ते सर्व माफ करावी. पुढें मातबर अन्याय पारपत्यायोग्य त्यांजपासून घडून आल्यास सुखरूप पारपत्य करावें. मागील अन्यायावर पारिपत्य न करावें. येणेंप्रमाणें. कलम १

मागील अन्याय चित्तांत आणून कोणाचेंही वाईट करणार नाहीं. यापुढें मातबर अन्याय पारपत्यायोग्य जाहल्यास पारपत्य आज्ञेप्रमाणें करूं. येणेंप्रमाणें करार.

होळकरांनीं लबाडीनें परगणे रेवातीरचे वगैरे खराब केल्यास तोटा येईल. तोटा चौपट गुन्हेगारीचे रुपये त्याजपासून देववावे. कलम १

रेवातीरचे वगैरे परगणे यांस होळकरांनीं लबाडीनें खराबा केल्यास तोटा येईल तो होळकरास ताकीद करून तोटा भरून देवविला जाईल, व पारपत्य केलें जाईल. करार.

यैवज ठरावून मुदती बोलल्याप्रमाणें लावून द्यावा.

यैवजास मुदती लावून दिल्याच आहेत. त्या मुदतीच्या मुदतीस यैवज पावता होईल. येणेंप्रमाणें करावें.

खासगीच्या परगण्यांत सरकारच्या फौजांचा अथवा सरदारांच्या फौजेनें वाटेनें पायमल्लीमुळें तोटा आला तर तोटा भरून द्यावा लागेल. किरकोळ हजार पांचशे असला तर आम्हीच त्यास त्वरेनें निरोप देत जावा. आपणास मागणार नाहीं. मातबर तोटा एक कडून तिळमात्र उपद्रव लागूं नये. हजारावर जाहल्यास द्यावा लागेल. येणेंप्रमाणें करार. कलम १

खासगीचे परगण्यांतून फोजांचा मार्गच नाहीं. तथापि सर्व सरदारांस ताकीद उपद्रव न व्हावा याविषयीं होईल. कदापि उपद्रव लागणार नाहीं. एक बांडे मात्र मार्गावर आहे. त्यासही उपद्रव न व्हावा याविषयीं जसा बंदोबस्त करावयाचा तसा होईल. तथापि रस्त्यामुळें थोडाबहुत उपद्रव लागल्यास क्षमा करावी. फारच नुकसानी जाहल्यास जो नुकसान करील त्याकरवीं भरून देऊं. करार

दमाजी गाईकवाड, भोसले, होळकर, शिंदे वगैरे मातबर सरदारांची रवानगी हिंदुस्थानांत केली, तरी त्यांणीं येथील आज्ञा घेऊन जावें. आनंदवल्लीस येऊन आठचार रोज राहून आज्ञा घेऊन जावें. येणेंप्रमाणें जाहल्यास संतोष राहील. कलम १

हिंदुस्थानांत जे सरदार रवाना होतील त्यांणीं आनंदवल्लीस येऊन आपली भेट घेऊन दोनचार दिवस राहण्याची आज्ञा जाहली तर राहून आपली आज्ञा घेऊन जावें. आपणही खासगीच्या परगणियांत मोकाशी आहेत त्यांची चाकरी येथें घ्यावी येणेंप्रमाणें. कलम १

आपणाकडील खासगीचे महालपैकीं शंभर राऊत आपणाकडे चाकरी करतील. पेशजीचे यादींत केरोजी पवार दीडशें व बांडे शंभर एकूण अडोचशें दिल्हे आहेत. त्याशिवाय खासगीचे महालापैकीं शंभर. एकूण साडेतीनशें स्वार चाकरी करतील. करार.

पंचवीस हजारांअलीकडे फर्मास येईल ते पाठवीत जावी.

पेस्तर साल सन तिसापासून दरसाल पंचवीस हजाराची फर्मास करीत जावी. प्रविष्ट होईल. येणेंप्रमाणें करावें.

दहा लक्ष रुपये सालीना अक्षतमरिष्ट आनंदवल्लीस पोहोंचत अशी जहागिरी कबूल यावी. त्यांत उणें कामास न ये. महालमजकूर व किल्लेजातची जहागीर वजा करून येणेंप्रमाणें खर्चास पाहिजे. कलम १

महालमजकूर खेरीज करून दहा लक्षांची जहागीर निमी लावून देऊं.

किल्लेजातची जहागीर खेरीज करून खासगीची दहा लक्षांची जहागीर आनंदवल्लीस सदर्हु दहा लक्ष रुपये पावत अशी जहागीर नेमून देऊं. करार

खेरीज किल्ले रोजगार असाम्या दिल्या आहेत. विनाअपराध काढूं नये. ज्याचे त्याजकडे रोजगार चालणें. हरामखोरी अथवा चोरी अंगीं लाविल्यास सुखरूप काढावी, येणें प्रमाणें. कलम १

महालमजकुरीं असाम्या आज्ञेप्रमाणें चालू विनाअन्याय दूर करणार नाहीं. येणेंप्रमाणें करार.

एकूण नवच कलमें करार.

छ ४ जावल आश्विन मास मुकाम आनंदवल्ली नजीक जनस्थान.

---

श्री

११० शके १६९० भाद्र. शुा १०

(ना. भो. ३४) ता. २१-९-१७६८

राजश्री जानोजी भोसले सेनासाहेब सुभा गोसावी यांस सकळ गुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री स्नो माधवराव बल्लाळ प्रधान आशीर्वाद विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशळ लिहावें विशेष. राजश्री चिमणाची रखमांगद आले आणि सर्वार्थ निवेदन केला. त्यास मागें जे संशय आले ते येथें सांगितल्यावरून कळले. याविषयीं येथें शपथपुरस्कर संदेह राहिला नाहीं, तरी आपली खातरजमा असावी. परंतु राजश्री दिवाकर पुरुषोत्तम यास बोलण्यास पाठवावें. येथें आल्यावर त्यांनीं आपल्या तर्फेचा खातरजमा जशा मागें गोष्टी बोलण्यांत आल्या आहेत त्याप्रमाणें मशारनिल्हेनीं येथील खातरजमा करावी. तसेंच येथूनही याद करार करून दिले आहेत त्याप्रमाणें अम-

लांत येईल, खातरजमा असावी. ज्यांत दिवाकरपंताची खातरजमा होईल तेच करण्यांत येईल. सत्वरच त्यांस पाठवावें. रवाना चंद्र ९ माहे जमादिलावल. बहुत काय लिहिणें? लोभ करावा हे विनंती.

---

श्री

१११ शके १६९० भा. व. ९

(ना. भो. ४६) ता. ४-१०-१७६८

राजश्री मुधोजी भोसले सेनाधुरंधर गोसावी यांसी

छ सकळगुणाळंकरण अखंडितलक्ष्मीआळंकृत राजमान्य स्नो माधवराव बल्लाळ प्रधान आशीर्वाद विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशळ लिहीत गेलें पाहिजे विशेष. राजश्री जानोजी भोसले सेनासाहेबसुभा यांजकडील सरंजामापैकीं तुम्हांस सरंजाम दिला होता तो तुम्हांकडून दूर करून सेनासाहेबसुभा यांजकडे करार करून दिला असे. तरी तुम्ही त्या सरंजामांत आपलेकडील दखलगिरी न करावी. यांजकडील कामदार अमल करतील. चंद्रपूर व छत्तीसगड वगैरे तालुका देखील मशारनिल्हेचे स्वाधीन करावे. रवाना छ २२ जमादिलावल. बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

श्री

११२ शके १६९० आश्वि. शु. १०

(ना. भो. ३३) ता.२१-१०-१७६८

राजश्री जानोजी भोसले सेनासाहेबसुभा गोसावी यांस सकलगुणालंकरण अखंडित लक्ष्मी आळंकृत राजमान्य स्नो माधवराव बल्लाळ प्रधान आशीर्वाद विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहावें विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. लिहिलें वर्तमान कळलें; व राजश्री सदोबास पत्र पाठविलें त्यांतील आशय मशारनिल्हेनीं सांगितले. त्यास विस्तारें करून राजश्री दिवाकर पुरुषोत्तम यास लिहिला आहे त्याजवरून कळेल. आपण सत्वर त्यांस पाठवून द्यावें. वारंवार संदेह न धरतां पाठवून द्यावें. वरकड येण्या वगैरेचे प्रकार सदोबाशीं बोलण्यांत आले आहे. हे लिहितील त्यावरून कळेल. आपण निघून सत्वर यावें. चंद्र ९ माहे जमादिलाखर. बहुत काय लिहिणें? लोभ असू दीजे हे विनंती.

---

११३ श्री

आश्विन शके १६९०

(ना. भो. ४९) आक्टोबर -१७६८

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री दिवाकर पुरुषोत्तम स्वामी गोसावी यांसी

पोष्य रघुनाथ बाजीराव नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहीत जाणें विशेष: तुम्ही पत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनार्थ ध्यानास आला. लिहिलें कीं,

श्रीहरि स्वामीचा मनोवर देऊन शफत मी केली, तो विश्वास न वाटे, हें पुरतें मजला भासलें. याजकरितां विस्तारें राजश्री सेनासाहेबसुभा यांनीं लिहिलें आहे तें पाहून अभयपत्रें पाठवावीं; इतःपर पृथ्वीचा आक झाला हें जाणावें. जे दिवशीं पाय पाहीन तो दिवस धन्य म्हणून लिहिलें, ऐसियासी तुम्हीं शफत केल्याप्रमाणेंच भासली आहे. राजश्री सेनासाहेब-सुभा यांचे पत्राचा भाव जाणोन उत्तर समर्पक पाठविलें आहे. याउपरी संदेह राहिला नाहीं. येविशींचा अर्थ विस्तारें राजश्री रामाजी बल्लाळ सांगतील. जाणिजे. माहे जमादिला-खर. संदेह किमपि न धरितां येणें उचित आहे. मातबर सरदार त्याजपासून साहाय्यास अंतर कैसें होईल ? हल्लीं राजश्री रामाजी बल्लाळ येतील, त्यांचे जबांनीं सर्व कळेल. कळावें. बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

श्री

११४

[ जोशी सं. )

श. १६९० कार्तिक व. १

ता. २५-११-१७६८

राजश्री राघोजी आंगरे वजारतमाब सरखेल गोसावी यांस

सकळगुणालंकरण अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो॥ माधवराव बल्लाळ प्रधान आशीर्वाद विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत जाणें विशेष. हल्लीं मसकताहून घोडे आणावयाकारितां रा विसाजी केशव यांसी आज्ञा करून परीक्षेक दिल्हा आहे, त्याप्रमाणें मशारनिल्हे [1]डंगी सहवर्तमान रवानगी करतील. तुम्हांपाशीं सावकार आहेत यांजकडून तुमचे तर्फेच्या पैरवीवरून चांगले घोडे आणावयाचा करार रा साबाजी तुकाजी याचे विद्यमानें आला आहे, येविशीं मारानिल्हेनीं विनंती केली त्यावरून तुम्हांस लिहिलें असें, व मारनिल्हेसही आज्ञा केली आहे, त्याप्रमाणें सावकाराजवळोन घोडे आणविणें. रा विसाजी केशव आपलेकडील डंगी व परीक्षेक पाठवितील त्याजबराबर तुम्हांकडील सावकार व डंगी पाठवून घोडे आणविणें, येविषीं विसाजी केशव यास लिहिलें आहे. त्याजकडील परीक्षेक घोडे परीक्षा करून सांगेल त्याप्रमाणें तुमचे सावकारांनीं परीक्षा करून आणावे. रा छ १४ रजब. बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

श्री

११५

( जोशी सं. )

कार्तीक वा १० शके १६९०

३-१२-१७६८

पो छ २७ रजब तिसा कार्तीक हस्ते जासूद बाळोजी तिमाजी जथे वाघोजी नाईक.

राजश्री बाळाजी जनार्दन स्वामी गोसावी यांस. पोष्य माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहिणें विशेष. इकडील वर्तमान

---

१ एकप्रकारचें जहाज.

तर आज पंढरपुरास आलों. येथें एक दोन मुकाम होतील. सखारामपंतही येथेंच येतील. चिरंजीव राजश्री नारायणराव येथेंच भेटेल. फौज पांच हजार पावेतों आम्ही देखील आहे. गोपाळराव व रास्ते लवकरच येतील. येथून कूच जाहलें म्हणजे सुरापुरास जाऊं. फिरंग्यांचें वर्तमान विशेष नाहीं. राजश्री धोंडोराम यांसी लवकर रवाना करणें. अली रजाखानास पाठविणें. भोसल्यांचीं पत्रें आलीं, त्यांतील भाव न्याबयाचे आहेत, यास्तव तुम्हीं चांगली बा[1] राखणें. देवाजी हाच येईल ऐसें आहे. यास्तव त्याची बातमी दो तिही तऱ्हेनें राखणें. चिंतो अनंत यांस सोलापुरांत ठेविलें. कळावें. तिकडील नवलविशेष लिहित जाणें. रवाना छ + रजब बहुत. काय लिहिणें हे विनंती.[2]

---

श्री

११६ श. १६९० माघ व. ४

( ना. भो. ६ ) ता. ७–३–१७६९

राजश्री जानोजी भोसले सेनासाहेवसुभा गोसावी यांस सकळगुणाळंकरण अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित माधवराव बल्लाळ पंत प्रधान आशीर्वाद विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशळ ल्याहावें विशेष. आपण कितएिक प्रकारें तीर्थरूप कैलासवासी यांचे वेळेस निखालस वर्तलेत. त्या अलीकडे कालगतीनें दरम्यान न व्हावयाच्या गोष्टी जाल्या. त्यास सांप्रत सर्व प्रकारें निखालस वर्तावें व या दवलतीचें कल्याण इच्छावें, या अर्थावरून संतोष झाला. त्यास तुम्ही तरी सर्व प्रकारें या दवलतीचें उत्तम तेंच इच्छावें, काडीमात्र दुसरा भाव नसावा, व येथून तिळतुल्य आपणाविषयीं दुसरा विचार नाहीं. सर्व प्रकारें निखालसतीनें असावें. याशीं अंतर होणार नाहीं. याज विषयीं आपणही शपथपूर्वक पत्र पाठविलें त्याप्रमाणें चालावें. येथूनही ऐसेंच वर्तण्यांत येईल. यास तीर्थरूप कैलासवासी नानासाहेबांची शपथ असे व श्री गजाननाची शपथ असे. जैसें निष्ठेनें वर्ताल तैसेच तुमचे दवलतीची अभिवृद्धि करण्यांत येईल. वरकड मजकूर हे सांगतील त्याजवरून कळेल. छ २७ माहे सवाल. बहुत काय लिहिणें ? लोभ असों दीजे हे विनंती. ( लेखनसीमा ) *

---

श्री

११७ श. १६९० फा. व. १

( ना. भो. २८ ) ता. २३–३–१७६९

( सवाल माधवराव पेशवे यांचा, जबाब जानोजी भोसले यांचा ?–इनह दुसरा–याद राजश्री जानोजी भोसले सेनासाहेब सुभा यांजकडील करारमदारांची याद मुकाम मौजे

---

१. बातमी. २. सबंध हस्ताक्षर माधवरावाचें. * हेंच पत्र खरे भा. ३. ले. ७९५ येथें छापलें आहे.

कनकापूर सन्निध ब्रह्मेश्वर गंगा उत्तरतीर सुा सितैन मया आलफ छ १४ माहे जिलकाद फाल्गुनमास विद्यमान राजश्री दिवाकर पुरूषोत्तम )

सवाल—सरकारांत जाहगीर द्यावी.

१ जुनी जहागीर सरकारांतून महाल दिले आहेत ते माघारे द्यावेत. महाल बित-पसिलः--रेवा मुकुंदपूर, प्रगणे महोबा, प्रगणे चारठाण, प्रगणे जिंतूर, प्रगणे साकरखेडा, प्रगणे मेहकर एकूण सहा महाल.

फत्तेसिंग भोसले याचा हिसा वराड प्रांती आहे तो द्यावा, अगर प्रगणे जामोद व प्रा आकोट आडगांव हे तीन महाल, यांत सरकारचे मर्जीस येईल ते द्यावे.

—

२ दोन कलमें करार करावेत.

जबाब.--येणेंप्रमाणें करार.

सवाल २.--श्रीमंताचे खास दस्तूर करार झालियावर, मुबदला बाळापूर मागितले, तरी करार केला असे. पुढें घालमेल करूं नये. जालियास तसें घडणार नाहीं.

जबाब.--येणें प्रमाणें करार.

सवाल ३.--सरकारांत नजर रुपये ५००००१ पांचलक्ष एक रुपया द्यावा. यास किस्तबंदी सालमजकूर सन तिसा पासून दरसाल लाख रुपये देत जावे. सालमजकुरचा ऐवज आखेरसाली द्यावा. पेस्तर दरसाल दसऱ्यास देत जावा.

जबाब--येणेंप्रमाणें करार.

सवाल ४.--कोणी शिलेदार अथवा कोणी सरकारांतून रुजू नसेल त्यास तुम्हीं ठेऊं नये व आश्रा देऊं नये.

जबाब--सरकारचे अपराध्यास आसरा देणार नाहीं.

सवाल ५.--वाशीमचें कापड दोन हजाराचें व बाळापूरचें तीन हजाराचें याप्रमाणें दर साल चांगले फर्माविसी पाठवीत जावें.

जबाब—पाठवीत जाऊं.

सवाल ६.—फौज तुम्हीं ठेवणें ते आपले ऐवजापुरती ठेवावी. अधिक ठेऊं नये. घर पाहून वर्तणूक करणें प्राप्त आहे. ज्या गोष्टी सरकारास विरुद्ध त्या करूं नयेत.

जबाब—येणेंप्रमाणें करार.

सवाल ७.--फत्तेसिंग भोसले यांचा हिस्सा वराड प्रांतीं आहे तो द्यावा; अगर आडगांव आकोट जामोद तीन महाल द्यावेत ऐसे वरतें कलम लिहिलें आहेत. [ ही जागा मूळ लेखांत कोरी आहे ] त्यास हल्लीं दोही मजकुराचे ऐवजीं बाळापूर प्रगण्यांत तुमचा अंमल सरदेशमुखी सुद्धां दरोबस्त असेल, तो सरकारांत द्यावा. सनदा द्याव्या.

जबाब—येणेंप्रमाणें खासदस्तुर. वरचे प्रमाणें रद्द असे. बाळापूर करार असे.

सवाल ८.--सरकारचे माहालीं घासदाण्याचा उपसर्ग लागूं नये, घेऊं नये; महाल बितपसील:—जान्हापूर, पैठण, आंबाड, गांडापूर, वैजापूर, वाळुंज, आंबडापूर, रांजणी, रोशनगांव, आवंढ, आंबाजोगाइचे, [ तीन माहाल टाकून बाकी अकरा माहाल लिहिले आहेत ]. या शिवाय पेशजीचे करारांत घासदाणा घेऊं नये असा महाल असेल तेथील घेऊं नये. वरकड सरकारचे महाली सालबंदी घासदाणा घ्यावयाचा असेल त्या प्रमाणें करार करून ऐवज सरकारांतून देविला जाईल.

जबाब--महालास काडीभर उपसर्ग लागणार नाहीं. करार.

सवाल ९.--हिंदुस्थानांत पातशाहा, इंग्रेज, व नजीबखान व सुजायद्दवला वगैरे हिंदुस्थानचे सरदार यांजकडे खतपत्र पाठवूं नये व राजकारण राखूं नये.

जबाब—कारण नाहीं.

सवाल १०—मशारनिले यांणीं सरकारांत अकृत्रिमपणें चालावें. कोणाशीं राजकारण राखूं नये. फितवाफंद करूं नये. निष्ठेनें सेवा करावी, चाकरीस बोलावूं तेव्हां आपण यावें, अगर भावास पाठवावें अथवा दिवाकर पुरुषोत्तम यांणीं यावें.

जबाब--येणेंप्रमाणें करार.

सवाल ११.—कटकाकडे जाबसालास इंग्रजांकडे वकील असावा. त्यानें मामलतसंबंधीं मात्र जबाबसाल करावा. कागदपत्र जाणें तोही मामलतसंबंधीं जावा. दुसरे प्रकारे कांहीं नसावा.

जबाब--कार्याकारण पाठवूं.

सवाल १२.--नबाब निजाम अलीखान याजकडे पूर्ववतप्रमाणें वकील असावा. त्यानें वराडचे मामलतसंबंधीं व घासदाणासंबंधीं जबाबसाल करावा व तुम्हीं लिहिणें तें याचे जबाबसालचें लिहावें. वरकड कोणेही विसीं सिलसिला राखूं नये. सरकारचे वकिलाचे इतल्यानें असावा.

जबाब--दुसरी मसलत बोलावयास कारण नाहीं.

सवाल १३. नबाबाचे महालांत घासदाणा घेतात त्याचा मुकरर करून ऐवज नबाब देतील. न दिल्यास घासदाणा मात्र घ्यावा. वरकड कोणेविसीं त्यांचे महालास तसदी देऊं नये.

जबाब—सुदामत घेत जाऊं.

सदर्हू कलमें पेशव्यांनीं लिहिले ते भोसले साहेबांनीं करार करून दिल्हे.

---

श्री

११८ शके १६९० फा. व. १

( ना. भो. १९ ) ता. २३-३-१७६९

( राजश्री पंतप्रधान यांजपासून जाबसाल व्हावयाचे, सुा तिसा सितैन मया व आलफ, मुक्काम मौजे कनकापूर संनिध श्री ब्रह्मेश्वर गंगा उत्तरतीर, छ १४ माहे जिलकाद् फालगून मास; राजश्री जानोजी भोसले सेनासाहेबसुभा यांजकडील. )

सवाल १.--कड्याचें वतन व निंबगांवचें ठाणें आमचें. त्यास ठाणें वारंवार पाडलें आहे ते न पडावें, वतन पूर्ववतप्रमाणें चालावें. कलम १

जबाब.--तीर्थरूप कैलासवासी यांचे वेळेपासून ठाणें निंबगांव वतन चालतें त्याप्रमाणें चालावें व मनसुबीचा ठहराव तीर्थरूपांचे वेळेस झाला आहे याप्रमाणें करावें. येणें-प्रमाणें करार.

सवाल २.--हिंदुस्थानांत फौजा जातात त्या महालांत उपद्रव करितात. यास्तव पहिल्या-पासून हिंदुस्थानांत फौजा जातात त्या वाटेनें सरकारचे फौजेनें जावें. कलम १

जबाब--पहिल्यापासून ज्या वाटेनें फौजा जातात त्या वाटेनें जातील. उपद्रव लागणार नाहीं; येणेंप्रमाणें करार.

सवाल ३.--भावाबंदांचीं राजकारणें सरकारांत आलीं तरी परिछिन्न ऐकूं नये; आमचे आम्हांकडे लावून द्यावेत. आपण आश्रय देऊं नये. कलम १

जबाब.--तुम्ही त्यांचें चालवावें. येथून कोणास आश्रय देणार नाहीं; येणेंप्रमाणें करार.

सवाल ४.--इंग्रेजाचा कज्या कटक प्रांतीं आहे त्याचा फडशा होत नाहीं. त्यास फौज पाठविली पाहिजे, अथवा खाशांनीं गेलें पाहिजे, येविषयीं आज्ञा असावी. कलम १

जबाब.--सरकारांत मसलत नाहीं व तुमची फौज न आल्यास पेंच नाहीं असें असल्यास फौज पाठवावयाची आज्ञा केली जाईल, अथवा तुम्हांस निरोप दिला जाईल; येणें-प्रमाणें करार.

सवाल ५.--आमचे कर्जदार आहेत ते दरवर्षास सरकारांत येऊन बोभाट सांगून आम्हांस त्वष्ट लावतील. त्यास प्रस्तुत दवलतेंत पैका नाहीं. यास्तव कोणाचा अर्ज ऐकून तूर्त आम्हांस तगादा न व्हावा; पुढें दवलतींत पैक्याची आबादाणी झाल्यास वाजवी कर्ज असेल तें आज्ञेप्रमाणें वारूं. कलम १

जं० येणेंप्रमाणें तूर्त तगादा तुम्हांस लागणार नाहीं. पुढें तुमचे सोईनें वारीत वारीत वारावें; येणेंप्रमाणें करार.

स० ६—प्रस्तुत आमची खराबी जाहाली; सबब हलके जाणून कोणी उपद्रव करील तरी ममतापूर्वक साहित्य करावें. कलम १

ज० साहित्य केलें जाईल; येणेंप्रमाणें करार.

ले. ७

स० ७. दर्यापुरकर खान महमद दरसाल आम्हांकडील बोभाट सांगतात; त्यास नेमणूक-प्रमाणें घांसदाणा आम्ही घेत जाऊं; जास्त उपद्रव लागणार नाहीं. येविषयीं त्यांस ताकीदपत्र कलम १

ज० तुम्ही वाजवी घांसदाणा मात्र घेत जावा. जास्त उपद्रव करूं नये. सुदामतप्रमाणें घांसदाणा घ्यावा; येणेंप्रमाणें करार.

स० ८. आमचे घरचे लहान मोठे चाकर तुफान सांगून सरकारचा क्षोभ करितात. त्यास येविषयीं पुर्ता शोध करून आम्हांकडेस दोष असल्यास मनास आणून आज्ञा करणें ती करावी. कलम १

ज० पुर्ता शोध करूनच केलें जाईल. उगाच आरोप ठेवून निमित्य ठेवावें ऐसें घडणार नाहीं; तुम्हीहि सरळपणें वर्तावें; येणेंप्रमाणें करार.

स० ९. नबाब निजामअलीखान याचा व आमचा वऱ्हाडचा तह चालतो. त्यास आम्हांस कमजोर पाहून तह मोडून बिगाड केला तरी सरकारांतून आमची कुमक व्हावी; आमचा सलूख व बिगाड सरकारचे सलूखबिगाडांत; येणेंप्रमाणें करार.

ज० येणेंप्रमाणें करार.

स० १०. वासीम दारव्हा वगैरे महालीं सरदेशमुखीचे अमलामुळें गोपाळ केशव उपद्रव करितात; त्यास वाजवी सरदेशमुखीचा अमल करावा. जास्त उपसर्ग करूं नये, येविषयीं त्यांस पत्र. कलम १

ज० वाजवी अमल करणें, जास्ती अमल न करणें, म्हणून पत्र देणें.

स० ११. लहानसहान निमित्य ठेवून लटका आरोप ठेवावा ऐसें मात्र न व्हावें; आम्हांकडील कागदपत्र अथवा दाखला मुकाबला असल्यास आम्हांस सांगून आमचे आंगीं वाजवीचे रीतीनें लावून मग आज्ञा करणें ती करावी. कलम १

ज० तुम्ही कोठें राजकारण राखूं नये. बदमामली करूं नये. येथूनही ममतापूर्वक निखालस-पणें कृपा केली जाईल. येणेंप्रमाणें करार.

स० १२. आमचे नांवें सनद कीं पटणें, मकसुदाबाद, कटक, वऱ्हाड, चांदा, गोंडवान, वरघाट, घासदाणा गंगथडीसरकारचे महाल कराराप्रमाणें वजा होऊन बाकी घांस दाणा व मंडलेचे परगणे चालतात ते व दाबिले आहेत ते छतीसगड व छोटा नाग-पूर व बस्तर वगैरे कदीम मुलूख कैलासवासी महाराजांपासून वगैरे ठाणें चालतें. आजपर्यंत तें अनभवून कराराप्रमाणें वर्तणूक करूं. सरकारांतून कोणाविषयी पेंच न करितां कृपा करावी. कलम १

ज० सदहू प्रमाणें सनद. येणेंप्रमाणें करार.

स० १३. सरकारांत कोठें पेच न पडे आणि मामलतसमयीं जाबसाल असतील तेथें कार्याकारण कागदपत्र लिहिण्याविषयीं आज्ञा असावी. कलम १

ज० मामलतसंबंधीं जाबसाल लिहिणें तो त्याव्हावा. राजकारण राखूं नये; येणें-प्रमाणें करार.

स० १४. कैलासवासी नानासाहेबांनीं पुत्राप्रमाणें लोभ केला. त्याप्रमाणें आपणही अकृत्रिमपणें ममता करून चालवावें. त्यांत अंतर करूं नये; कलम १

ज० तुम्ही येकनिष्टेनें वर्तावें. ज्यांत दवलतीचें कल्याण तीच वर्तणूक करावी. तुम्हांवरही अकृत्रिमपणें ममता करून कुटुंबांतील ऐसें जाणूनच कृपा केली जाईल यांत गुंता नाहीं. येणेंप्रमाणें करार.

स० १५. आमनेरचा किल्ला सरकारांत घेतला आहे, तो माघारे द्यावा. कलम १

ज० किल्ला जकिरासुद्धां सेनासाहेबसुभ्याचे स्वाधीन करणें म्हणून राघो बाबाजी यास सनद देणें.

स० १६. पहिलेपासून नबाब निजामअलीखान याजकडे व इंग्रजाकडे कटकचे जाबसालास वकील राहतात, त्याप्रमाणें राहातील; सरकारचे वकिलाचे इतल्यानें राहातील; ते मामलतीशिवाय जाबसाल करणार नाहींत. कलम १

ज० येणेंप्रमाणें करार.

स० १७. घासदाण्यासाठीं फौज फिरते याजमुळें कोठें लहानसहान उपद्रव लागतो. त्याविशी रोष न व्हावा व आम्हांस सांगून माघारे देवावे. कलम १

ज० येणेंप्रमाणें करार

स० १८. घासदाणा वसूल करावयास आमची फौज येते. याजवर उभयतां निंबाळकर दंगा करितात, एविशीं त्यास ताकीद व्हावी व पत्रें द्यावीं. कदाचित् न ऐकिल्यास सरकारांतून त्यास शिक्षा व्हावी. कलम १

ज० येणेंप्रमाणें पत्रें द्यावीं व ताकीद केली जाईल. येणेंप्रमाणें करार.

स० १९. मंडलेवाल्यांस व भूपाळवाले यांस पत्रें कीं पेशजीपासून सेनासाहेबसुभा याजकडे मुलुख चालतो त्यास उपद्रव न देणें व त्यांचे महाल दाबिले असतील ते सोडून देणें एविशीं पत्रें द्यावीं. कलम.

ज०--सदहूप्रमाणें पत्रें देणें.

---

श्री

११९ श. १६९० फा. व. १

(ना. मो. ३७) ता. २३-३-१७६९

१. जुनी जहागीर सरकारांतून महाल दिले आहेत हे माघारे द्यावे. महाल बितपशील:—

१ रेवामुकुंदपुर १ जिनतूर १ च्यारठाणें १ साखरखेडलें १ मोहबा १ मेहकर

६ एकूण सहा महाल

२. फत्तेसिंग भोसले यांचा हिस्सा वऱ्हाड प्रांतीं आहे तो द्यावा; अगर परगणें आकोट व परगणे जामोद आडगांव हे तिन्ही महाल यांत सरकारचे मर्जीस येईल ते घ्यावे. दोन कलमें करार करावीं. येणेंप्रमाणें करार.

३. श्रीमंतांचे खासदस्तुर करार जाहलियावर मुबदला बाळापूर मागितलें तरी करार केला असे. पुढें घालमेल करूं नये. झालियास घडणार नाहीं.

४. सरकारांत नजर रुपये पांच लक्ष किस्तबंदी सालमजकूर सन तिसापासून दरसाल लाख रुपये देत जावे. सालमजकूरचा ऐवज अखेरसालीं द्यावा. पेस्तरसाल दसऱ्यास देत जावा. येणेंप्रमाणें करार.

५. कोणीही शिलेदार अथवा जो कोणी सरकारांत रुजू नसेल त्यास तुम्ही ठेवूं नये व आसरा देऊं नये. " सरकारचा अपराधियास आसरा देणार नाहीं. "

६. वाशीमचें कापड दोन हजारांचें व बाळापूरचें कापड तीन हजारांचें त्याप्रमाणें दरसाल चांगले फरमाविशी पाठवीत जावें. " पाठवीत जाऊं. "

७. फौज तुम्हीं ठेवावी.ती आपले ऐवजापुरती ठेवावी, अधिक ठेवूं नये. घर पाहून वर्तणूक करणें प्राप्त. ज्या गोष्टी सरकारास विरुद्ध त्या करूं नये. येणेंप्रमाणें.

८. फत्तेसिंग भोसले यांचा हिस्सा वऱ्हाड प्रांतीं आहे तो द्यावा; अगर आडगांव, अकोट, जामोद, तीन महाल द्यावे, ऐशीं वरतीं कलमें लिहिलीं आहेत. त्यांशीं हल्लीं दोहीं मजकुराचे ऐवजीं परगणे बाळापूर परगण्यांत तुमचा अमल सरदेशमुखीसुद्धां दरोबस्त असेल तो सरकारांत द्यावा. सनदा द्याव्या. येणेंप्रमाणें (खासदस्तुर) वरचे परगणे रद्द असे. बाळापूर करार असे.

९. सरकारचे महालीं घांसदाण्याचा उपसर्ग लागूं नये; घेऊं नये. महाल बितपशीलः—

| | | |
|---|---|---|
| १ जानवपूर. | १ परगणें आंबड. | १ वाळुंज. |
| १ आंबाडपूर. | १ रोषणगांव. | १ आंबेजोगाईचे. |
| १ आंबड. | १ पैठण. | १ गांडापूर. |
| १ वैजापूर. | १ वांजणी. | |
| ४ | ४ | ३ |

११ यांत तीन महाल टाकून करार.

१०. अकरा महाल दिले आहेत याशिवाय पेशजीचे करारांत घासदाणा घेऊं नये असा महाल असेल तेथील घेऊं नये. वरकड सरकारचे महालीं सालबंदी घांसदाणा घ्यावयाचे असेल त्याप्रमाणें करार करून ऐवज सरकारांतून देविला जाईल. महालास काडीभर उपसर्ग लागूं नये. करार.

११. हिंदुस्थानांत पातशाहा, इंग्रेज व नजीबखान व सुजादौला वगैरे हिंदुस्थानचे सरदार यांजकडेस पत्रें पाठवूं नये व राजकारण करूं नये. " कारण नाहीं. "

१२. मशारनिल्हे यांणीं सरकारांत अकृत्रिमपणें चालावें. कोणाशीं राजकारण राखूं नये. फितवा फंद करूं नये. निष्ठेनें सेवा करावी. चाकरीस बोलावूं तेव्हां आपण यावें. अगर भावास पाठवावें. अथवा दिवाकर पुरुषोत्तम यांनीं यावें.

१३. कटकाविषयीं जाबसालास इंग्रजाकडेस वकील असावा. त्यानें मामलतसंबंधीं मात्र जाबसाल करावा. कागदपत्र जाणें तोंही मामलतसंबंधीं जावा, दुसरे प्रकारें कांहीं नसावें. " कार्याकारण पाठवूं. "

१४. नबाब निजामअलीखान यांजकडे पूर्ववत्प्रमाणें वकील असावा. त्यांनीं वऱ्हाडचे मामलतसंबंधीं व घासदाणासंबंधीं जाबसाल करावा, व तुम्हीं लिहिणें तें यांचे जबाबसालाचें लिहावें. वरकड कोणेविशीं शिलशिला राखूं नये. सरकारचे वकिलाचे इतल्यानें असावें. " दुसरी मसलत बोलावयास कारण नाहीं."

१५. नबाबाचे महालांत घांसदाणा घेतां त्याचा मुकरर करून ऐवज नबाब देतील. न दिल्यास घासदाणा मात्र घ्यावा. वरकड कोणेविशीं त्यांचे महालास तसदी देऊं नये. "सुदामत घेत जाऊं."

---

श्री

**१२०**　　　　श. १६९१ चै. व. १०
(ना. भो. ५१)　　　　ता. १-५-१७६९

राजश्री जानोजी भोसले सेनासाहेबसुभा गोसावी यांसी

छ सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य　श्री माधवराव बल्लाळ प्रधान आशीर्वाद विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें विशेष तुम्हाकडे श्वेत वऱ्हाड व गोंडवण व चांदें व छत्तीसगड व बस्तर व चुटियानागपूर व कटक व मकसुदाबाद व पटणें व वरघाट मूलतापी व कवाल व घासदाणा गंगथडी सरकारचे महाल कराराप्रमाणें वजा होऊन बाकी घासदाणा व मंडल्याचे परगणे व भूपाळचे परगणे चालतात ते व दाबिले आहेत ते वगैरे कदीम मुलुक कैलासवासी महाराजांपासून व आलीकडे नवे चालते आजपर्यंत ते तुम्हांकडे करार केले असे; तरी सदहू प्रांतांचा अंमल करून सरकारांत निष्ठेनें वर्तोन अनुभावित जाणें. वऱ्हाड प्रांताची सरदेशमुखी पेशजी तुम्हांकडे दिल्ही आहे त्याप्रमाणें करार असे. अंमल करीत जावा. जाणिजे. छ २३ जिल्हेज सुरु सन तिसा सित्तैन मया व अलफ. बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

श्री

१२१ शके १६९१ कार्ति. शु. ३

( जोशी सं. ) ता. १-११-१७६९

विनंती उपरी. राजकी वर्तमान भोसले यांणीं श्रीमंतांस हत्ती, वस्त्रें बहुमान पाठविला. यांही त्यांस वस्त्रें बहुमान पाठविला. मातबर घोड्या दोन पाठविल्या. वकिलीच्या कारभारास राजेश्री रामाजी बल्लाळ गुणे आहेत. परस्परें स्नेहच आहे. देवाजी चोरघोडे यांजवर भोसल्याची इतराजी झाली. त्यांस कारभारांतून दूर केलें. सांप्रत पुणियाहून श्रीमंतांस विचारून राजेश्री बाबूराव कोनेर यांस नेलें. त्यांस दिवाणगिरी दिल्ही. निजामअलीखां हैदराबाज भागानगरीं आहेत. परस्परें समाधानच आहे. हैदराच्या मनांत बैदा करावा हा भाव होता; परंतु त्याचेही तूर्त वकील आले आहेत. खंडणी चुकवून द्यावी हा विचार बोलतात. गायेकवाड यांचे वर्तमान ( राते ) सयाजी गायेकवाड याच्या नांवें समशेर बहादरी हें पद व सिक्केसनद त्याच्या नांवची. सर्व सरंजाम पेशजी त्याचा आहे तो त्यास करार. सर्व कारभार राजेश्री फत्तेसिंग यांनीं करावा व वस्त्रें आश्विन शुा ३ स जाली. उभयतां बंधूंस वस्त्रें हत्ती बहुमान जवाहीर दिले. कारभारी बाळोबा, रामचंद्र बसवंत याचे बंधु, खंडो आबाजी वकील, येणेप्रमाणें करार जाले. रा गोविंदराव गायकवाड यास सेनाखासखेल पद मात्र, तीन लक्षांचा सरंजाम द्यावा, हुजूर असावे, वरकड संबंध नाहीं. येणेप्रमाणें गोपाळ ना तांबेकर यांचे विद्यमाने कारभार झाला. कळावें. हैदऱ्यानें मनांत बदअमली आणिली आहे. गुदस्ताचे खंडणीचे रुपये देत नाहीं. उमेद बिघाडीची धरली. गोपाळराव रास्ते वगैरे फौजा पेशजी रवाना जाल्या आहेत. सांप्रत श्रीमंत रा नारायणराव आश्विन वद्य ८ स डेरे दाखल जाले. समागमें कारभारीसाहेब त्रिंबकराव मामा करार होते ते राहिले. बच्याजीपंत व बाजीपंत फडणीस ××× से जाले. सर्व फौजांस ताकीद जाहली आहे. फौजा जमा जालियावर मोहीम कर्नाटक प्रांतची आहे. श्रीमंत रावसाहेब वाईस आश्विन वद्य त्रयोदशीस गेले. सत्वरीच पुणियास येतील. त्यांचा मुहूर्त कार्तिक शुा ८ व एकादशीस ऐसे दोन मुहूर्त स्वारीस जावयाचे आहेत. आपण पुणियास कार्तिक शुा ३ गेलों. जालें वर्तमान लेखन केलें. मागाहून होईल तें वरचेवर लेहून पाठवूं. आपणाकडून पत्र चार महिन्यांनी येऊं लागलें ऐसें न पाहिजे. महिन्याचे अवकाशे आमचें वर्तमान आपणास पोहोचे व स्वामीचेंही वर्तमान आम्हांस याप्रमाणें पोहोंचेसें केल्यास उत्तम. यांत मर्जीस येईल तें करावें. राजेश्री नानाकडील आसामीचे वगैरे काम सर्व करून देतों म्हणोन लिहिलें; त्यास आपणास अशक्य नाहीं. परंतु आपण कृपा करून देतील तो सुदिन असे. त्या प्रांतचें राजकीय व स्वकीय सविस्तर लिहून संतोषवावें. विशेष काय लिहिणे हे विनंती.

श्री

१२२ मार्गशीर्ष, शके १६९१
( जोशीसं. ) सन १७६९, नोव्हेंबर

राजश्री बाळाजी जनार्दन स्वामी गोसावी यासी विनंती उपरी. पुण्यास तीनशे राउतांची नेमणूक करावयाची होती. त्यास येथून राउत पाठवावयाजोगे नाहींत; सबब हल्लीं नवे राऊत चांगले अस्सलाचे, घोडे माणूस चांगले असे पाहून ठेवावे. तीनशांचे शेऱ्यांचे ठेवण निवळः—

२०० जनार्दन राम यांचे नि॥
१०० भगवंतराव कडेकर नि॥
३००

येणेंप्रमाणें तीनशें राऊत ठेवणें. गायेकवाडीकडील वर्तमान अलीकडे कांहींच कळत नाहीं. गोपाळ नाईक, गोविंदराव, आप्पाजी गणेश गेले कीं नाहीं, फौज किती यांजपाशीं जमा झाली, फत्तेसिंगाकडील खबर काय, कोठें आहे, अलीकडे त्याचा कांहीं कागद पत्र आला कीं काय, तें सविस्तर लिहिणें. मार्गशीर्ष मासचे हप्त्याचा ऐवज भरणें त्याची तरतूद काय केली ते लिहिणें. नरहरपंत कोठे आहे, त्याजला पुण्यांत ठेविलें किंवा गोविंदरावाजवळ आहे किंवा गोपाळ नाईकाबरोबर गेला ते लिहिणें. नरहरपंत निश्चित बसले आहेत किंवा कोठें हिंडतात फिरतात, तें लिहिणें. ही विनंती.[1]

---

श्री

१२३ श. १६९१ फा. शु. ७
( जोशीसं. ) ४. ३. १७७०

पो॥ छ २२ जिल्काद सबैन फाल्गुन
हस्तें परशराम दयाराव; रू

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बाळाजी जनार्दन स्वामी गोसावी

पोष्य माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहिणें विशेष. इकडील वर्तमान तर गोपाळराव बुदेहालानजीक राहिले होते. हैदरखान बाणावरास दहा कोसांचें अंतरानें होता, त्यास पटणची आवाई घालून एकाएकीं येऊन छापा घातला. त्यांत पहिला एक गाडदी एक सरकारचा चाकर होता त्यानें पूर्वी येऊन गोपाळरायांस सूचना केली. परंतु यांस खरें न भासलें. कां कीं, त्याचा चाकर हा सांगतो हें तथ्य कशावरून, याजमुळें कांहींसे सावध होते. छापा येतांच हे कांहीं थोडेसे राऊत घेऊन नगारा वाजवीत त्याचे सुमारें गेले. यामुळें यांनींच मार

१ हस्ताक्षर सबंध माधवरावाचें.

सोसला. याजमुळें बुनगे निघाले. परशुरामाखालीं दोन घोडीं पडलीं. सारांश फार करून यांनीं संभाळिलें. कांहीं डेरे राहिले ते जाळिले. तुम्हांस कळावें. विशेष कांहीं नाहीं. रा छ जिलकाद. बहुत काय लिहिणे हे विनंती.[1]

---

१२४ श्री

( जोशी सं. ) वैशाख शु. ७ शके १६९२

पै॥ छ २० मोहरम सबैन वैशाख ता. २-५-१७७०

हस्ते हेमराज जथे रायमल्ल कासीद

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बाळाजी जनार्दन स्वामी गोसावी यांस

पोष्य माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय लिहिणें विशेष. इकडील वर्तमान तर किले निजगल्यास मोर्चे लाविले होते, त्यास आणिक कुमक आली. याजमुळें किल्यानें पांचसहा दिवस दम खाला. त्यास आम्हांस मोबदला करणेंच होते. त्यास हल्ला करून गांव घेतला. माणूस किल्यांत फार यामुळें फारच बंदुक चालली, त्यामुळें लोक फारच जायां जाहले. आप्पाजी मुठे यांस भारी जखम आहे. वांचणें कठिण. आणिक लोक फारच जायां जाहले. पोखरगीर गोसावी ठार जाहला. फार वेळ लोकांनीं मार सोसला; त्यामुळें माणूस जाया झालें. चिरंजीव राजश्री नारायणरावाचे हातास गोळी लागली. हलकी आहे. शिरा व हाडाचा बचाव जाहला. तुम्हास कळावें. यानंतर मामाचे ठेवण्याचें बोलणें होत आहे. येथून दोतिहीं दिवशीं कूच करून मामास ठेवून गोपाळरायाची यांची गांठ घालून देत असों. शास्त्रीची आज्ञा कीं वैशाखमास लागतांच माघारें फिरावें. त्यावरून माघारे येत असों. याअन्वयें स्वामीस सांगून पाठवावें व चिरंजीव राजश्री नारायणरायाचें गोळीचें वर्तमान हलकी आहे म्हणोन सांगणें. उजव्या हातास मनगटाचे जवळ लागून गेली. स्वामीस कळवावें. हैदरखान झाडी धरून आहे. तुम्हांस कळावें. तिकडील वर्तमान सदैव लिहितच आहां, व लिहून पाठवीत जाणें. मुरारराव, भोसलें, मोगल यांस पाचा साता दिवशीं निरोप होईल. ह्या किल्याच्या प्रकार तर आठीस पडले, तेव्हां करणेंच प्राप्त जाहलें. पाहतां अर्थी हे माणूस इतके मोठ्याच कामावर जखमी व्हावे, आणि मोठेंच काम व्हावें, असाच दम राखून हला कारीगार जाहली. हजार बारासे माणसांचें पारपत्य जाहलें. सरदारखान व आणीक दोघे कैदेंत ठेविले. तुम्हांस कळावें. रा छ ५ मोहोरम हे विनंती.

---

१ हस्ताक्षर माधवरावाचें. २ शहाजी भोसले अक्कलकोटकर.

श्री

१२५

( जोशी सं. )

वै. शु. १३ श. १६९२
७. ५. १७७०

पो छ २३मोहोरम सबैन वैशाख

हस्ते सखोजी सुभानजी जथे खंडोजी गुळदगड

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बाळाजी जनार्दन स्वामी गोसावी यांसी पोष्य माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहिणें विशेष. इकडील वर्तमान तर मामा व गोपाळराव यांनीं छावणीस राहावयाचा निश्चय जाहाला. हुजरातची फौज सात आठ हजार पावेतों ठेविली. यानंतर सत्वरच माघारे येत असों. हैदरखानाचा सलुक जाहल्याविना येणें ठीक नाहीं; परंतु राहूनही काम होत नाहीं व शास्त्रीबाबांचीहि आज्ञा न राहण्याविशीं यास्तव रहात नाहीं. चिरंजीव राजश्री नारायणरावाचे हातास गोळीची जखम लागल्याचें वर्तमान पूर्वी लिहिलें त्यावरून कळलेंच असेल-जखम हलकीच आहे. आठाचहूं दिवशीं पाणी घेतील. तुम्हांस कळावें. यानंतर दरमजल येत असों. तीर्थरूप मातुश्री बाईसाहेबांनीं पुण्यास येण्याविशीं पत्रें लिहिलीं आहेत. तुम्हीं येण्याविषयींचें साहित्य पाठविणें आणि लवकर येणें पुण्यास होय तें करणें. रा छ १० मोहरम. बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

श्री

१२६

( जोशी सं. )

श. १६९२ मार्ग० द. १३
ता. १४. १२. १७७०

पो २ सवाल

विनंती उपरी. राजकी वर्तमान श्रीमंत रावसाहेब कार्तिक श्रुा ८ पुणियाहून कूच करून वाईस जाऊन श्री जेजुरीस आले. तेथचे मुकामीं राजश्री साबाजी भोसले दोनतीन हजार फौजेनशी येऊन भेटले. श्री मोरेश्वरचे मुकामीहून राजेश्री फत्तेसिंग गायकवाड यांस गुजराथ प्रांते जावयास निरोप झाला. राजेश्री गोविंदराव गायकवाड समागमें गेले. दोन हजार फौजेनशीं चाकरी हुजूर करावी, त्याचे फौजेचे संचनीस ऐवज फत्तेसिंग याणी द्यावा, सेना खासखेलचा सरंजाम जातीस येणेंप्रमाणें झालें. सर्व मामालियेत फत्तेसिंगाचे स्वाधीन झाली. सरकारची नजरेची निशा त्यांहीं केली. पुणियांत आठचार मुक्काम आहेत. मार्गेश्वर वद्य १३ कूच करून गुजराथेस जाणार. श्रीमंत कूच दरकूच श्रीमंत राजेश्री नारायणराव यांस सामील व्हावयास गेले. हैदऱ्या बिदनेर प्रांतें आहे. जमाव पंधरा हजार फौज वीस हजार प्यादा आहे. श्रीमंतांची फौज चाळीस हजार पावेतों जथा आहे. शिवाय तोफखाना गाडदी हैदऱ्याचे वकील मामलियेत करून सलूख राखावा या विचारास आले आहेत. नबाब निजामअलीखांचें श्रीमंताचें स्वारस्यच आहे. त्याची फौज रुक्नउद्दौला सामलातीस हैदराबादेहून

रवाना जाहला आहे. श्रीमंत कृष्णातीरास दाखल झाले. हैदऱ्याची मामलियेत चुकली. या नंतर पंचमहालांत खासा स्वारी होणार. कर्नाटक प्रांतें [ धान्य मह ] र्ग आहे. हरोलीस पुढें राजेश्री गोपाळराव गोविंद व रास्ते आहेत. भोसले स्नेहरक्षण करून आहेत कळावें.

श्रीमंत राजेश्री बाबूरावबाबास[1] वायु झाला येणेकरून दुखणें अतिअवस्त जाहले. या करितां श्रीमंत राजेश्री मोरोबादादा घरींच मार्गेश्वर शुा पावेतों होते. सांप्रत बाबांस उतार जाला आहे. दानधर्म बहुत केला. मार्गेश्वर वद्यांत मुहूर्तें राजेश्री मोरोबादादा बागेंत राहिले. सत्वरीच लष्करास जातील. श्रीमंत राजेश्री बापू तों समागमें गेले. राजेश्री गोविंद शिवराम गेले. राजेश्री कृष्णराव स्वारीसमागमें आहेत. वरकड नव कलह त्यावेसारखे नाहीं. मागाहून होईल वर्तमान तें वरचेवर आपणांस लिहून पाठवूं. वरकड वर्तमान राजेश्री अंताजीराम यांणीं लिहिलें आहे. गांवकुसू आपल्या वाड्याचे हद्देस पोहोंचलें. आलग बांधावी लागते ते तर्तूद करून पाठविणें. चोरांचा उपद्रव यामुळें सिबंदी दहा प्यादे ठेवणें जरूर जाहाले. सेताचे व चिंतो काशी व अंताजी राम यांणीं लिहिलें आहे त्यावरून कळेल. अंताजी राम कारकून विद्यमान राजेश्री दादो शंकर यांणीं ठेविले आहेत. बरे माणूस आपल्या उपयोगीं आहेत. येथून वरचेवर होतो वाका तो त्यांजकडून लष्करास दादास लिहिला जात आहे. कागदीपत्रीं बंदोबस्त राखणें तो राखीतच आहों. चिंता न कीजे. श्रीमंतांची ममता [ आपणावर ] आहे. त्यांतून विशेष लोभ करीत ऐसे लक्ष राखोन वर्तत जावें. वरचेवर कासीद पाठवून वर्तमान सविस्तर लिहीत जावें. हे विनंती.

---

११७ श्री

( जोशीसंग्रह ) मार्ग. व. १० श. १६९३

पौा २९ रमजान इसन्ने ता. ३१-१२-१७७१

ह्मा खंडोजी धावरे निाा खास जिलीब

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बाळाजी जनार्दन स्वामी गोसावी यांस पोष्य माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहिणें विशेष. तुम्ही गेल्यापासून वर्तमान कळलें नाहीं. तरी मेणवलीस कधीं पावलां, पुण्यास कधीं जाल, तें लिहिणें. पुण्यास सत्वर जाणें. तेथें गेल्यानंतर जो खर्च उणा केल्यानें कामास येई तो जरूर करावा. किल्ले व महाल व इमारती, यंदां ऐवजाची वोढ तुम्हांस ठाऊकच आहे; यास्तव जो खर्च उणा करण्यास पेच नाहीं तो पाहून पाहून करावा. कोठें जमेचें कलम कमाविसीचें अधिक साधावयाचें तें साधण्यांत यावें. तुम्ही करीतच आहां, परंतु पुण्यास सत्वर जाऊन हेंच मनन नेहेमीं असावें. तीर्थस्वरूप राजश्री दादासाहेब काय करीत असतात, प्रकृति कशी आहे तें लिहून पाठविणें.

---

१ बाबूराव फडणीस.

चौकी पाहऱ्याची बंदोबस्ती एक दोनदां मनास आणून दरजशी (?) वाटेल तें नीट व्हावें. इकडील वर्तमान तर प्रस्तुत कूच करून सिधटेकचें सुमारें जाणें होईल. तेथून महादेवाचे सुमारें जाऊन पुढें फौज पा, हीच योजना प्रस्तुत आहे. वरकड प्रस्तुत नवलविशेष वर्तमान अधिक नाहीं. पुढें जावें असेंही आहे. पाहवें कसें घडतें. मामाकडील वर्तमान विशेष कांहीं आलें नाहीं. रा छ २४ रमजान. बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

श्री

१२८ श. १६९४ माघ शु. ५
२८-१-१७७३

( ना. भो. ३२ )

श्रियासह चिरंजीव राजश्री साबाजी भोसले सेनासाहेबसुभा यांसी प्रति मुधोजी भोसले सेनाधुरंधर कृतानेक आशीर्वाद उपरी. तुमचा व आमचा हर्षामर्ष वाढला, याजमुळें फौज ठेवून कलहास प्रारंभ झाला. याकरितां चौघे मराठे मातबर दरम्यान ठेवून राजश्री रामाजी बल्लाळ निसबत पंत प्रधान यांचे विद्यमानें तह ठरला. बितपशीलः—

१. चिरंजीव राजश्री बापू यांस मातोश्री बाई यांचे ओटींत घालावें.

२. आमच्या संतोषास आलें तर तुमचे संमतें कारभार आम्हीं करावा.

३. दोहींकडील फौज भारी. इकडे लोक ठेवावयाचें कारण सध्यां नाहीं. यास्तव जितकी फौज कार्याकारण ठेवावयाची ती ठेवावी. जे दूर करणें त्यांचा फडशा हिशेबाचा तुम्हीं करावा. त्यास आम्हीं अनुकूल असावें.

सदर्हू तीन कलमांच्या निभावणीस दरम्यान असाम्या बितपशीलः—

१ लक्ष्मणराव पाटणकर, २ जोत्याजी घाडगे व चिमाजी घाडगे, ३ बाजीराव पाटणकर, ४ यशवंतराव नाईक निंबाळकर, ५ नऱ्होजी जाचक, ६ राणोजी नाईक निंबाळकर, नाईकजी व ७ हणमंतराव घाडगे, ८ जगोजी यादव, ९ जगदेवराव निंबाळकर, १० मजीतखान रोहिले.

एकूण असामी दहा यांचीं पत्रें अलाहिदा आहेत. त्याप्रमाणेंच उभयपक्षीं निभावणी होईल. रोज चंद्र ४ माहे जिल्काद सु॥ सलास सबैन मया अलफ हा आशीर्वाद.

---

श्री.

१२९ शके १६९४ माघ शु. ९
१. २. १७७३

( ना. भो. ३० )

राजश्री साबाजी भोसले सेनासाहेबसुभा गोसावी यांसी अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित राणोजी नाईक निंबाळकर रामराम विनंती उपरी. राजश्री मुधोजी

भोसले सेनाधुरंधर यांचा व तुमचा किंतु वाढून परस्परें फौज ठेवून कलहास प्रवर्तलां; याजकरितां आपण सर्व मंडळी मिळून आपणांकडे आलों आणि आग्रह केला कीं आपली दौलत जतन करणें. त्याजवरून निश्चयांत आणून तहनामा राजश्री रामाजी बल्लाळ ( गुणे ) दिवाण राजश्री पंतप्रधान यांचे विद्यमानें ठरवून आपणांपाशीं दिला. त्याप्रमाणें आपण राजश्री मुधोजी भोसले सेनाधुरंधर याशीं वर्तणें. जिमा आपला असे. यांत अंतर झाल्यास आपण तुमचे सोबती असों. यासी अंतर करूं तर आपले वंशींचा नसून कुलस्वामीची शपथ असे. रवाना छ ७ माहे जिल्हेज सन ११८२. बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

श्री

१३० — श. १६९४ माघ व. ११

( ना. भो. ३१ ) — १७-२-१७७३

तीर्थस्वरूप राजश्री मुधोजी भोसले सेनाधुरंधर वडिलांचे सेवेशीं

अपत्ये साबाजी भोसले सेनासाहेबसुभा दंडवत विज्ञापना. आपला व आमचा हर्षामर्ष वाढला, याजमुळें फौज ठेवून कलहास प्रारंभ झाला. याजकरितां चौघे मराठे मातबर दरम्यान येऊन राजश्री रामाजी बल्लाळ निसबत पंतप्रधान यांचे विद्यमानें तह ठरला. कलमें बितपशील:—

१ चिरंजीव राजश्री बापू यास मातुश्री बाईच्या ओटींत घालावें.

२. तुमच्या संतोषास आलें तरी आमचे संमतें कारभार तुम्ही करावा.

३. दोहींकडील फौज भारी, इतके लोक ठेवावयाचें कारण सध्या नाहीं. यास्तव जितकी फौज कार्याकारण ठेवावयाची तेवढी ठेवावी. जे दूर करणें त्याचा फडशा हिशेबाचा आम्हीं करावा. याशीं तुम्हीं अनुकूळ असावें. सदहू तीन कलमांचे निभावणीस दरम्यान असाम्या बितपशील:—

१ लक्ष्मणराव पाटणकर, २ जोत्याजी व चिमणाजी घाडगे, ३ बाजीराव पाटणकर ४ यशवंतराव नाईकजी निंबाळकर, ५ राणोजी नाईक निंबाळकर, ६ जगदेवराव नाईक निंबाळकर, ७ जगोजी यादव, ८ नऱ्होजी जाचक, ९ मजीतखान रोहिले, १० हणमंतराव बाजी घाडगे.

एकूण असामी दहा यांचीं पत्रें अलाहिदा आहेत. त्याप्रमाणेंच उभयपक्षीं निभावणी होईल.

सुाा सलास सबैन मया व अलफ, माघ मास छ २४ जिलकाद हे विज्ञापना.

---

श्री

**१३१** शके १६९५ श्रावण.
(भा. व. २. ३६) आगस्ट १७७३

राजश्री मुधोजी भोसले सेनाधुरंधर लष्करांतून नागपुरास जावयाकरितां येथें आले. आठ दहा दिवस येथें होते. आगतस्वागत झालें. बोलणीं झालीं. त्यांत कांहीं कसर त्यांणीं ठेविली नाहीं. शपथा देखील झाल्या. दसरा दिपवाळीस फौजसुद्धां यावें अशीं बोलणीं पक्कीं झालीं. दुसरें बोलणें कीं, आपली खासदस्तुर चिटी जे समयीं आली कीं येऊन पोहोंचलों असें समजावें, असींहि बोलणीं झालीं. नंतर निरोप घेऊन नागपुरास गेले. पत्रें जात येत असत. भाद्रपदमासीं पत्रें येण्याविशीं पाठविलीं. त्यांचीं उत्तरें आलीं कीं, सेनासाहेबसुभा यांस खांडुक झालें आहे. आणि आह्मास चातुर्थिक ज्वर येत आहे. कांहीं समाधान वाटल्यावर येत असों, अशीं आलीं. त्यांचीं उत्तरें त्याजवरच दौलतीचा भार ठेवून लिहिलीं; नंतर तुह्माकडून छापा पृथक पडल्याचीं पत्रें आलीं; तेव्हां निकडीनें येण्याविशीं लिहिलें. त्याचें उत्तर मंडल्याचा तपशील व खंडोजी भोसले याजकडील खर्चाचे ओढीचें व वराडांतील दंग्याचें व दौलतीचें सविस्तर लिहिलें. त्यांत भवानीपंतांहीं खासदस्तुर चिठीचा भाव लिहिला त्यावरून खासदस्तुर चिठी पाठविली. त्याचें उत्तर आलें कीं ओढ तो ऐसी आहे आणि शरीरीं समाधान नाहीं.

---

श्री

**१३२** श. १६९५ भाद्र. व. ३
(ना. भो. १४) ४-९-१७७३

राजश्री मुधोजी भोसले सेनाधुरंधर गोसावी यांस सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मी-अलंकृत राजमान्य स्नेहांकित चिंतो विठ्ठल आशीर्वाद विनंती. येथील कुशल तागाईत छ १७ जमादिलाखर मुक्काम पुणें जाणोन स्वकीय कुशललेखन करीत असलें पाहिजे. विशेष इकडील वर्तमान सविस्तर राजश्री व्यंकटेराव कासी यांनीं लिहिलें आहे त्याजवरून कळलेंच असेल. श्रीमंत राजश्री दादा साहेब यांनीं सर्व प्रकारें कृपाकरून करारमदाराच्या यादी करून व पत्रें देऊन लक्ष्मणराव[1] कासी आपणास आणावया करितां पाठविले आहेत. त्यास आपण अविलंबें यावयाचें करावें. रवाना छ १६ जमादिलाखर. बहुत काय लिहिणें? लोभ केला पाहिजे ही विनंती.

---

१ हे दोघे प्रभुगृहस्थ भोसल्यांचे पदरीं होते. पहा नागपूर भोसले बखर पृ. ३४.

श्री

१३३ श. १६९५ भाद्र. व. ३
( ना. भो. १५ ) ४-९-१७७३

राजश्री मुधोजी भोसले सेनाधुरंधर गोसावी यांस सकलगुणालंकरण अलंकृत राजमान्य स्नेहांकित रघुनाथ बाजीराव आशीर्वाद उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशळार्थे लिहित जावें. आपला आमचा स्नेह पहिल्यापासून; आपलें चित्त अंतःकर्णपूर्वक आमच्या ठाई अति स्वच्छ; हा अर्थ राजश्री व्यंकटराव कासी व लक्ष्मणराव कासी विनंती करीत गल. तो अर्थ चित्तांत आणून आपणांवर दृष्टि देऊन आपले सरदारीचा बंदोबस्त ज्यांत आपलें कल्याण व सरकार उपयोगी तोच प्रकार निश्चयांत आणून, राजश्री हरि विश्वनाथ व व्यंकटराव कासी यांसी आज्ञा करणें ते केली आहे; हे लिहितील व राजश्री लक्ष्मणराव कासी यांसी पाठविलें आहे हे सांगतील. तो प्रकार चित्तांत आणून येथील लक्ष राखून सारी फौज गंगाजलनिर्मल दर्याबाई[1] इसमाईलखान[2] यांजपाशीं ठेऊन, दोन हजार सडी फौज व राजश्री रघुजी भोसले यांसी घेऊन अतिशीघ्र यावें. रवाना छ १६ माहे जमादिलाखर. बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

श्री

१३४ श. १६९५ भा. व. ३
( ना. भो. १६ ) ता. ४-९-१७७३

कलमबंदी याद राजश्री मुधोजी भोसले सेनाधुरंधर सुा आर्बा सबैन मया व आलफ.

सवाल १.—राजश्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा या पदाची वस्त्रें. कलम

जवाब—सदरहूप्रमाणें करार.

सवाल २.—सरकारांत ऐवज द्यावा व याचा करार रुपये ७०००००१ यासी हस्तेबंदी; वस्त्रें जालियावर ४०००००; ज्येष्ठ अखेरपर्यंत ३०००००१ द्यावे. एकूण सातलक्ष एक रुपये. कलम.

जवाब—येणेंप्रमाणें करार.

सवाल ३.—रुकनतद्दवला यास पत्र कीं राजश्री मुधोजी भोसले सेनाधुरंधर यांस सरकारांतून भेटीस यावें याविशीं पत्रें पाठविलीं आहेत; सडे फौजेनशीं येतील. तरी तुम्ही आपली फौजसुधां निघोन नबाबाकडे जाणें, आणि कलह तोडणें, आणि प्रांताची बंदोबस्त होऊन लावणी होईल तो अर्थ करणें म्हणून पत्र. कलम.

---

१ जानोजीची बायको. २ एलिचपुरचा नबाब मुधोजीचा साह्यकर्ता.

जबाब—सदर्हू अन्वयें मजकूर समजोन पत्र लिहिलें आहे.

सवाल ४.—साबाजी भोसले याची समजावीस आम्ही काढूं. ते न ऐकत आणि सरकारांत फिर्याद आले, तरी पदाविशीं घालमेल न व्हावी. ते नजर देतील. सर्व यावयास करतील; परंतु येविशीं ऐकूं नये. कलम

जबाब—साबाजी भोसले यांची समजूत हरप्रकारें घरांत पडली तरी उत्तमच आहे. ते न ऐकतां हुजूर आले तरी पदाविशीं तरी घालमेल होणार नाहीं. वरकड समजुतीची सरकारांतून आज्ञा होईल त्याप्रमाणें करावें लागेल. करार

सवाल ५.—सालाबाद घासदाणा मोंगलाचे प्रांतांत घेत असतों त्याप्रमाणें घेत जाऊं. सालमजकुरीं रुकनतद्दवला याचा आमचा पेंच वाढला आहे. त्यास येविशींचा पक्का बंदोबस्त सरकारांतून व्हावा. कलम

जबाब—पूर्वी कैलासवासी जानोजी भोसले यांचा व मोंगलांचा तह जाहला आहे त्याप्रमाणें वर्तणूक करावी; नवीन [ तह ] करूं नये. करार

सवाल ६.—सरकारची फौज साबाजी भोसले याजपाशीं आहे ती हुजूर आणावयाविशीं बालोजी पलांडे व सरलष्कर वगैरे येतील त्यांस पत्र कीं, राजश्री सेनाधुरंधर यांसमागमें हुजूर येणें म्हणून पत्र.

जबाब—सदर्हूप्रमाणें सरदारांस बोलण्याविशीं पत्रें गेलीं असेत. येतील. का

सवाल ७.—सालमजकुरीं घरकलहामुळें फौजेचा पेंच भारी बसला. सरदारी ओढगस्त जाहली. त्यास बंगाला गढेमंडला या प्रांतीं जाऊन फौज वारावी लागेल. किंतीएकांच्या समजाविसी कराव्या लागतील; लोक दंगा करतील; त्यास आम्ही आपला अजमास पाहून जें देणें तें देऊं; येविशीं सरकारांतून साहित्य असावें.

जबाब—तुमचें तुह्मीं समजून करावें, येथें बोभाट येऊं देऊं नये, तें करणें. येथील इतल्याखेरीज लांब जाऊं नये. येणेंप्रमाणें करार.

---

श्री

( ना. भो. १७ ) इ. स. १७७३?

१३५ श. १६९५

कलमबंदी राजश्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा. सुा आर्बासबैन मया व आलफ.

सवाल १.—कडेवळाची देशमुखी ठाण्यासुद्धां आमची आम्हाकडे यावी ऐसें पूर्वीपासून करारांत असतां अमलांत येत नाहीं; अशास हल्लीं सरकारचे हुजरे कारकून देऊन ठाणें स्वाधीन करून यावें. कलम १

जबाब—[ या सवालाचा जबाब मूळप्रतींत नाहीं ].

सवाल २.—मोगलांपासून मुलुख सोडविल्यास आम्हांस जाहागीर देण्याचा करार करून यावा. कलम

जबाब--मेहनत मन लावून केली व लढाईचे उपयोगीं पडल्यास फौजेचा अजमास नेमून दिला जाईल, करार; परंतु वाजवीचा ऐवज घेतला जाईल.

सवाल ३.--मोगलांचे बिघाडांत कामकाज घडून आल्यास सालमजकुरीं रदकर्जांत वगैरे नजरेत महाल लिहून घेण्यांत आले आहेत. येणेंकरून सरदारीचा बदनकशा लौकिकांत झाला आहे तो कृपा करून दूर होऊन माहाल मोकळे होत तो अर्थ झाला पाहिजे. कलम

जबाब--आमचे मर्जीप्रमाणें मोंगलाविशीं मसलत मेहनत करून शेवटास नेल्यावर सदरहू कलमाचा मजकूर फार नाहीं. आपले मनोदयाप्रमाणें घडेल. येणेंप्रमाणें दोन [ प्रकार ] होणार नाहींत.

सवाल ४.--चार मराठे सरदार व कारकून पदरीं आहेत याजविशीं वतनाचे वगैरे कामकाजाविशीं बोलावें लागेल तें मनास आणूस वाजवी करून देत जावें. कलम

जबाब--वाजवी जाबसाल वतनाचे मनास आणून इनसाफ मनास आणिले जातील. येणेंप्रमाणें करार.

सवाल ५.--साताऱ्यांतील रामाऊचा गोट पूर्वीपासून चालत आला तो अलीकडे चालत नाहीं. ऐशास सुदामतप्रमाणें पेठ करून देवावी. कलम.

जबाब--नानासाहेबांचे काराकिर्दीस चालत आल्यास चालेल. येणेंप्रमाणें करार.

सवाल ६.--पेशजी मोंगलावर स्वारी झाली ते समयीं फौज पाहून दरमहाचा खर्च देण्यांत आला आहे. हल्लींही दरमहाचा करार करून दिला पाहिजे. कलम

जबाब--मोंगलाचे मसलतीवर आहेत तोंपर्यंत दरमहा खर्चास दाहा हजार फौज बाळगावी, मेहनत रात्रंदिवस करावी, त्यांत आणिक [ प्रकार ]. नसल्यास दरमहा खर्चास ७५००० रुपये पाऊण लाख रुपये मुदतीप्रमाणें पोंचत जातील. करार

सवाल ७.--मोंगलाई मुलुखांत घासदाणा सुदामतपासून आहे, तो मुलूक सरकारांत आल्यास आम्हांकडील घासदाणा आहे तो सुदामत प्रमाणें चालवावा. कलम

जबाब--मोंगलाकडील महाल सरकारांत येतील त्या महालाचे घासदाण्याचे ऐवजाचा आकार पाहून त्याऐवजीं नेहमीं महाल तोडून दरोबस्त दिला जाईल. येणेंप्रमाणें करार.

सवाल ८.--आंबडापुर सिंदखेड वगैरे महाल सरकार निसबतीचे आहेत. त्यास तेथें सालाबाद मेजमानी घासदाणा घेण्यांत येत आहे त्याप्रमाणें चालवावें. कलम.

जबाब--माधवराव यांचे कारकीर्दीस करार झाला असेल त्याप्रमाणें चालविलें जाईल. येणेंप्रमाणें घासदाणा घेऊं नये, ऐसा करारच असेल. तथापि यादी पाहून यादीप्रमाणें चालवूं.

सवाल ९.--स्वदेशचीं वगैरे खेडीं पूर्वीपासून होतीं त्यांपैकीं कांहीं चालतात, कांहीं अलीकडेस चालत नाहींत, त्यास पहिल्याप्रमाणें करार करून दिले पाहिजेत. त्याची याद आलाहिदा असे. कलम

जबाब--चालत आहेत त्याचा गुंता नाहीं, चालत नाहींत त्याचे कागदपत्र भोगवटा मनास आणून केलें जाईल. येणेंप्रमाणें करार.

---

१३६ श्री गणपति

( जोशीसंग्रह ) माघ शुा १३ शके १६९५

पो १४ जिल्काद ता. २५-१-१७७४

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बाबूराव स्वामीचे सेवेशीं पो परशराम रामचंद्र साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहित जावें विशेष. श्रीमंतांनीं पदाचीं वस्त्रें सातान्याहून आणावयाकरितां राजश्री त्रिंबकराव पेठे यांस पाठविले आहेत. तर पेशजीचे सांप्रदाय तुम्हांस ठाऊकच आहेत. त्याप्रमाणें श्रीमंत महाराज यांसी विनंती करून मारनिल्हे याजबराबर वस्त्रांची रवानगी व्हावयाचा बहुमान जातां व येत पेशजीचा शिरस्त्या बमोजीब व्हावा. छ १२ जिल्काद. बहुत काय लिहिणें लोभ असो द्यावा ही विनंती.

---

श्री

१३७ माघ वा १ शके १६९५

( जोशीसंग्रह ) २८-१-१७७४

राजश्री बाबूराव सुभेदार स्वामीचे सेवेशीं

विनंती उपरी. तुम्ही चिठी पाठविली. महाराजांस विनंती करून मुहूर्ताचा समय टळूं न देतां दुरंदेशावर नजर देऊन सुमुहूर्तानें वस्त्रें व शिकेकटार व निशाण, स्वामीची कृपा संपादून घेऊन ठेविली, हें मोठें काम केलें. शिंयांकडील गृहस्थ यावयाचा गुंता आहे. यास्तव राजश्री त्रिंबकराव आप्पा वगैरे यावयास अवकाश आहे. ते आल्यानंतर त व आम्ही सर्व मंडळीसुद्धां निघोन येतों. सांप्रदायानुरूप समारंभ करून आज्ञेप्रमाणें वस्त्रें घेऊन येऊं. रावजी तुम्ही समय साधून वस्त्रें घेऊन ठेविलीं हें फार चांगलें केले. ही कारस्तानीं लिहून कळवावीशी नाहीं. सर्व मंडळी वरती यावयाची जाल्यानंतर अगोदर आपणास इशारा करितों. रा १५ जिल्काद बहुत काय लिहिणें ही विनंती.

---

१३८ श्री

(भा. व. १. ४) श. १६९५ माघ व. ७

पौा छ २२ जिल्काद सन अर्बा ता. ३-२-१७७४

राजश्रिया विराजित राजमान्य राजेश्री बाबूराव स्वामीचे सेवेशीं:--

पोष्य बाळाजी जनार्दन साष्टांग नमस्कार विनंती उपरी. तागाईत छ २१ जिल्काद पावेतों मुक्काम पुरंधर वर्तमान यथास्थित असे विशेष. श्रीमंत राजश्रीस किल्ल्यावरें नेऊन

---

१ हीं वस्त्रें गंगाबाई गरोदर असतां पेशवे पदाचीं म्हणून मुहूर्तावर घेऊन ठेविलीं असें दिसतें. २ पुरंदर किल्ल्यावर.

बंदोबस्त केला म्हणून लिहिलेंत संतोष जहाला. पूर्वी वेदमूर्ति राजश्री गोविंदभट उपाध्ये यांस तुम्हांकडे पाठविलें होतें. तुम्ही ही खातरजमा सांगोन पाठविलीत. तुम्ही आमचे लक्षाशिवाय नाहीं ही पूर्ती निशा आहेच. श्रीमंत कैलासवासी यांचा प्रकार कसा कसा जहाला हा तुम्हीं ऐकिलाच आहे. त्यास ते गोष्ट जहाली त्यावरही श्रीमंत मातुश्री गंगाबाई गरोदर, त्यावर ज्यांणीं पूर्वी अकर्म केलें त्यांच्या चवक्या महत् संकटांत असें जाणोन, चार पिढ्या ज्यांचें अन्न भक्षिलें त्यांचें सार्थक करावें असें चित्तांत आणून रा सखारामपंत आम्ही व चिरंजीव राजश्री मोरोबादादा लष्करांतून आले त्यांस अनुकूळ करून, रा त्रिंबकराव मामा, साबाजी भोसले, वामनराव वगैरे सरदार व हुजरातची फौज सर्वांचें मानस एक होऊन, यांचें संरक्षण करावें, दौलतीचा बंदोबस्त करावा असें चित्तांत आणून, आम्ही व सखारामपंत उभयतां श्रीमंत मातुश्रीस घेऊन सातारियासच येणार होतों. परंतु कित्येक बंदोबस्त होणें याकरितां येथें आलों. लवकरच सातारियास यांस घेऊन येऊं. तुम्ही कदाचित् बापूचा संशय घ्याल तर सर्वांनीं आपले अभिमान सोडून निखालस खावंदांचे वंशाचें बरें व्हावें हीच इच्छा आहे. संशय नाहीं. शिंदे होळकर येणार. तुम्हांस राजश्री वरते न्यावयाचे वेळेस गोविंदभटास पाठवावें अथवा खासदस्तुर पत्र पाठवावें अशी खुण होती. त्यास भटजी मुंजीस गेले याकरितां त्रिंबकपंतबाबा हशमनिसाकडील पाठविले. त्यांजवळ तुम्हीं संशय घेतला तो प्रमाणच. तों मागाहून तुम्हांस पत्रही गेलें. तुम्हीं बंदोबस्तही केला. उत्तम जहालें. या उपर पक्क्या बंदोबस्तानें रहावें. तुम्हांस श्रीमंत कैलासवासी यांणीं इतबारी समजून ठेविलें. त्यांचे वंशाचे कल्याणाकरितां प्राणही गेले तरी सार्थक असा चित्ताचा निश्चय करून बंदोबस्तीनें रहावें. कदाचित् कोणी तिकडून आला तरी घेऊं नये. तुम्हांस सविस्तर कळावें म्हणोन लिहिलें आहे. बेगमी चांगली करावी. बहुत काय लिहिणें ? लोभ असों दीजे हे विनंती. पत्राचें उत्तर खातरजमेचें पाठवावें हे विनंती. गारदी पन्नास उतरावे म्हणून सनद पाठविली होती तें माणूस उतरलें कीं नाहीं ? उतरलें असलें तर बरेंच जहालें. नसलें तर उतरून काढून द्यावें आणि लिहून पाठवावें हे विनंती.

---

श्री

श. १६९६ चै. शु. ४

ता. १६. ३. १७७४

१३९

( भा. व. २ )

सेवेसी विनंती. येथील वर्तमान तागाईत छ ३ मोहरमपर्यंत यथास्थित असो विशेष. भोसल्याकडून राऊत व वकील कोण आला त्याचा शोध करून लिहून पाठवणें म्हणून आज्ञा. त्यास दरयाबाई व रघुजीबावाकडून वकील राजश्री महिपतराव विश्वनाथ आले आहेत. आज मुकाम आहे. उदईक कूच करून सेवेसीं येतील. बरोबर राऊत पंचवीस आहेत. त्यांचा कारकून आज गडास येणार आहे. सेवेसी कळावें म्हणून लिहिलें आहे. बहुत काय लिहिणें ही विनंती.

१४० श्री चै. शु. ६ श. १६९६
( ना. मो. ४ ) १८-३-१७७४

( राघोबादादांनीं साबाजी भोसले यास फोडून आपल्याकडे सामील होण्याकरितां कलमबंदी लिहून या प्रकारें दिली. ) नकलः—

१ आमचे घरचे चाकरांनीं मोगल मेळवून खूळ आरंभिलें आहे. त्यांतून तुम्हीं निघोन लवकर हरवक्त आम्हापाशीं यावें. कलम

२ घरचे चाकर यांचा व मोंगलांचा बंदोबस्त जसा आमचे सेवकास सोयीस बनेल तसा करावा. त्या कामास सर्वात्मना अकृत्रिमपणें आमचे मनोदयानुरूप अनुकूल असावें. तिळप्राय कसूर कोणेविशींही करूं नये. कलम

सदर्हू दोन कलमांप्रमाणें अमलांत यावें. आम्हांकडून आपला गौरव याप्रमाणें होईल. तपशीलः—

१ सेनासाहेबसुभा बमोजीब दौलत सांप्रत जशी ज्याचे नांवे आहे तशी असावी असें तुम्हास प्रशस्त असल्यास आहे तसेंच असेल. हें जर तुमचे चित्तास न ये, तुमचेच नांवें पद व दौलत असावी असें असल्यास, तुमचेच नांवें पद दौलतसह करून देऊं. यांत तुम्हांस जसें आवडेल तसें करूं. कलम

२ तुमचा उपयोग हल्लींही हरवक्त पडावा व पुढेंही हमेषा असावा, सबब तुम्हांस महाल जहागीर एकूण बेरीज तनख्याची ३२ लक्ष रुपयांची द्यावयाचा करार केला असे. सदर्हू बेरिजेचे महाल क्षेपनिक्षेप देऊं. येणेंप्रमाणें पेशजींप्रमाणें ३२ चा करार. कलम

३ पेशजीचे कराराप्रमाणें किल्ले आशेरी ही जागा तुम्हांस देऊं. येणेंप्रमाणें करार कलम

छ ५ माहे मोहरम सुा आरबा सबैन. चैत्र मास मुकाम कुडची करनाटक प्रान्त नजीक कृष्णा दक्षिणतीर. फसली ११८३.

---

१४१ श्री
( भा. व. २ १४० ) श. १६९६ अ. वै. शु. ७
पौ छ ६ सफर अर्बा ता. १८. ४. १७७४

विनंती उपरी. आपण पत्र पाठविलें व राजश्री अप्पाजी विश्वनाथ याजबरोबर सांगून पाठविलें कीं, राजश्री सदाशिव रामचंद्र यांचीं माणसें तोरण्यास पाठवावीं. त्यास राजश्र दादा फडणीस यांस आपणाकडे पुरंदरास एका दो दिवशीं पाठवितों. आपल्याशीं बोलतील. उपरांतीक जैशी मर्जी असेल त्याप्रमाणें पैरवी होईल. गुंता पडणार नाहीं. बहुत काय लिहिणें? लोभ करावा हे विनंती.

---

१४२ श्री अ. वै. व. १ श. १६९६

( भा. व. २ ६४ ) पैा छ ४ रविलावल अर्बा २७-४-१७७४

सेवेसी महादाजी बल्लाळ साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागाईत छ १५ माहे सफर मुक्काम उजैन वर्तमान यथास्थित असे विशेष. आपलीं पत्रें दोन एक छ २७ मोहरमचें पाठविलें तें छ ७ सफरीं उषःकालीं पावलें. राजश्री बहिरजी ताकपीर सेवगांवावर मुक्काम करून होते. त्यांजकडे कारकून जासूद पाठवून लिहिलें कीं मामास सामील होणें. त्यांजवळ राजश्री महादजीबावांचे पत्राचा उजूर केला; आणि श्रीमंतांची स्वारी येतांच जाऊन मिळाले. ते स्वमतेंच गेले, किंवा पाटीलबावांचे विचारें गेले. लौकिकांत तों पाटीलबावाचे मतावांचून गेले नाहींत, असेंच दिसतें. तर पाटीलबावानीं पत्र लेहून पाठवून ताकपिरास इकडे पाठविलें तर श्रीमंतानीं त्यास धरून नेलें हेंच प्रमाणांत येईल. लोक आम्हांस म्हणतात, गुरुजी तेथें गेले असतां ताकपीर श्रीमंताकडे कसे गेले. हें ऐकून आम्ही उगेच राहतों तर याचा उलगडा लोकांस कळे ऐसें करणें. पाटीलबावांचें लक्ष श्रीमंत कैलासवासी यांचे पायीं कसें होतें व त्यांची कृपा यांजवर कशी होती त्याचे उत्तीर्णतेचा समय हाच आहे. ताकपिरास इकडे पाठवावें व आपणही जलद येऊन पोहचावें. श्रीमंत नर्मदा पारही होणार त्यास सरदारांनीं आडवे होऊन हस्तगत करावें. बळाबळ विचारें हें न बने तर आपण एकीकडे व्हावें, त्यास भेटूं नये म्हणोन आज्ञा. दुसरें पत्र छ १७ मोहरमचें जासूदजोडीबरोबर पाठविलें. तेंही छ मजकुरी त्रितीय प्रहरीं पावलें. तेथें आज्ञा जे मामास श्रीमंतांनीं दग्यानें पाडाव करून नेलें. मोगल, भोसले व सरकारची फौज कायम आहे. शिंदे मातबर सरदार साऱ्या अगोदर येऊन लढाईचा तरतूद करून केला मनसबा सिद्धीस न्यावा ते गोष्ट न घडली. आतां तरी जलद येऊन पोहचत तें करणें. ऐशास मी आज्ञा घेऊन आलों. टोंक्यास मुक्काम केला ते रोजीं ताकपीर पैठणीं होते. त्याजकडील गृहस्थ बोलावून आणून सांगितलें कीं, तुम्ही पुरंदरास जाणें. त्यांनीं उजूर पाटीलबावांचे आज्ञेचा केला. तेथून दरमजल इंदुरास आलों. पाटीलबावाही तेथेंच होते. भेटी जाहली. खुलासा घेतला. ते एकच बोलिले जे श्रीमंत कैलासवासीनीं मजवर दया फार केली त्यास मीं उत्तीर्ण काय व्हावें. सेवा करावी हाच आमचा धर्म. सेवेवर प्राणाची सांडणी करावी ते वडिलांनीं केली. आजपावेतों आम्हीही वंचकबुद्धि धरिली नाहीं. धन्याच्या हितावर दृष्टि ठेवणें कल्याण जाणून उदेपुरापासोन जाठ व रोहिले इटावे या झुंजांत प्राणाकडे पाहिलें नाहीं. धन्याचा नक्ष केला. किफायतीस जागा करून ठेविली असतां ज्यांनीं नाश केले त्यांस पृछा नाहीं. स्वस्थ आपले घरीं आहेत. आमची मेहनत बरबाद[1] होऊन उलटे गुन्हे लाजम जाहले. जरकरितां केला मनसबा शेवटास जाता तरी राजश्री विसाजी कृष्ण, होळकर व आम्ही तिघेही ओढींत न पडतों. फौजेच्या देण्यापासून बेफिकीर झालों असतों. तरी आज कूच करून चालावयास पेच काय होता. वोढीमुळें संकटांत पडलों. अस्तु. याची क्षीत कां

१ निष्फल.

मानावी ? धन्याची नुकसानी झाली त्याचा विवेक नाहीं. तेथें आमचे श्रमाची शाबासी कोणीं द्यावी. सेवक लोकांनीं सेवेस तत्पर असावें. त्याअन्वयें पहिले चाकरीस अंतर केलें नाहीं. पुढें पक्ष कैलासवासींचाच अवलंब आहे. दुसरें घडणार नाहीं. शिबंदी फौजेचें देणें पहिले सहा वर्षांचें फार निघालें यामुळें अवघडलों. याची तरतूद करून चालतों. संशय न मानावा. तूर्त इंदुरासही यावयाचें प्रयोजन हेंच कीं, होळकरास मार्येत घेतल्यावांचून ते येत नाहींत. धन्याच्या कामाकरितां मानाभिमान एकीकडे ठेवून यास मेळवून घ्यावयाकरितां आलों. याप्रमाणें भाषण झाल्यावर ताकपिराचा मजकूर केला. त्यांनीं उत्तर दिल्हें जे मामांनीं आमची फौज आणविली होती. सबब चिरंजीवाची रवानगी केली, तों मामांचें पत्र आलें. तुमची फौज रवाना झाली असेल तरी माघारी न्यावी. ते समयीं चिरंजीव सडे नर्मदातीरीं होते. पूर्वी श्रीमंतांचीं पत्रें फौजेकरितां फार आलीं होतीं व चिरंजीवास श्री जेजुरीलिंगाचे दर्शनास जाणें होतें, ह्मणून त्याची स्त्री त्याजकडे पाठविली. लेहून पाठविलें कीं तुह्मी यात्रा करून बायको कोढेजयास पाठवून श्रीमंताकडे जाणें. त्यावरून कूच करून पुढें गेले. इतक्यांत दुही झाल्याचीं पत्रें आलीं. ह्मणून चिरंजीवास लेहून श्रीमंताकडील जाणें मवकूफ करविलें. कोठेंही मुक्काम करून असतील. बयाचें जाणें पुरंदरास त्वरेनेंच होईलसें कळतें. जलदी होतेसें कळल्यावर चिरंजीव तिकडेच रवाना केले असते. आतां सांगाल तसें करूं. तेव्हां तेच समयीं पुरंदरास जाण्याविशीं शिंद्यांचें पत्र ताकपिराकडे रवाना केलें, दुसरें पत्र उज्जनीहून पाठविलें, तिसरें पत्र राजश्री यादवराव भागवत यांजवळ दिल्हें आणि शिंदे फौजेच्या देण्याचे फडशास लागले. आमची ताकीद नित्य कूच करावयाकरितां निकडीनें असून चौ चौ रोजांचे अंतऱ्यानें आजपावेतों सातआठ विनंतीपत्रें सेवेशीं रवाना केलीं. आह्मी आज्ञा घेऊन आल्यापासून एक पत्र अगोदर व हीं दोन्हीं पत्रें एकूण तीन पत्रें स्वामीचीं आह्मांस पावलीं. पत्रीं आज्ञा जे दहा पत्रें तुह्मांकडे पाठविलीं व तुह्मांकडील पत्रच येत नाहीं, यावरून आमचीं पत्रें सेवेसीं पावलीं नाहींतसें वाटतें. वाटेचा दगाफटका ह्मणावा तर एकादे पत्रांस व्हावा. अगदीं पत्रें न पोहचावयास कारणें काय असतील श्री जाणे. कासद स्वस्थ असल्यास पावतील. श्रीमंतांचीं पत्रें पाटीलबावास हमेश येतात तीं दाखवितात. आह्मी पाहतों. एक दोन पत्राच्या नकलाही सेवेसीं पाठविल्या आहेत. यांजकडील राजश्री आबाजी रघुनाथ चिटणीस पेशजी श्रीमंतांचे स्वारीसमागमें होते. त्यांनीं मतलब कलमबंदीची यादी श्रीमंतांस[1] दिल्ही होती. जाबसाल तेव्हांपासून होत होते, ते या प्रसंगीं ठरावांत आणावे, करार करून द्यावे, ऐशीं पत्रें आबाजी रघुनाथाचीं येत होतीं. ते देखील दाखवित होते. यांचे मुद्दे हासल करून देण्याचे अर्थ पाहिल्यास चित्तांत आशंका होई तेव्हां निकड करूं. ते कालीं उत्तर यांचें हेंच कीं श्रीमंत आमचे मुद्दे हासल करून देतात यावरून संदेहांत पडूं नये. आह्मी तिकडे जाऊं ऐसें चित्तांत येऊं न देणें. लोकांचे

---

१ रघुनाथराव दादा

देण्याचा पेच नसता तरी आतांच निघोन चालतों. पैक्यास ठिकाण नाहीं. लोकांचा गवगवा भारी. नित्य धरणींपारणीं पाहात असतां, संशय कां वागवितां, बाहेर कां निघत नाहीं, म्हणाल तर देण्याचा फडशा न करितां डेरेदाखल होणें अनर्थास कारण होईल. या अनमानास्तव डेरे ( न ) दिल्हे. मात्र दाखल होतां लोक स्थित ठेवणार नाहींत. श्रीमंतांकडील वर्तमान मुद्दे हासल करून देतात हें ऐकून विपर्यास चित्तांत आणीत असाल तर न आणावे. आम्हीं चाकरीस पोहचल्यावर तुह्मांपासूनही मतलब हासील करून घेऊं. सरदारी खावंदाचे घरची वाल ते घरींच आहे. मग आम्हांस मागावयास व तुम्हांस द्यावयास पेंच नाहीं. श्रीमंताचे देण्याचा विश्वास मानून तिकडे जाऊं, तुह्मांस टाकूं हें होणें नाहीं. अर्थात पाहतां श्रीमंतांचीं व आबाजी रघुनाथ यांचीं पत्रें आह्मांस दाखवीत आहेत. दगा करणें असलें तरी पत्रें न दाखविते. वोढीचा प्रकार खराच पाहिला. एके रोजीं राजश्री बाळाराव यांचे घरीं दोघे सरदार जाऊन मशारनिल्हेस घेऊन बसले. कटारा काढून मारावयापावेतों दंगा जाहला. येथवर वोढीचा बखेडा पाहिला. सबब दिवसगत लागून येण्यांस लांबण पडली. स्वामीनीं शब्द लावून लिहिलें हेंही खरें.येथील प्रकार जसा पहात होतों तो पत्रीं विनंती करीत गेलों. कारण कीं याची वोढ ध्यानास आल्यास वर्तमान कां लिहिलें नाहीं. वोढ वारून घेऊन जातों. वर्तमान न कळल्यानें गोष्ट लांबणीवर पडली ऐसा शब्द येईल. आज्ञा नसत आम्हीच यांशीं बोलल्यास तितकेच घेऊन बसतील यास्तव बोललों नाहीं. प्रसंग नाजूक, हेही लाचार, ऐसें जाणून आज्ञा आल्याप्रमाणें याशीं बोलण्यांत येईल. लोकांचे देण्यांत आजपावेतों कांहीं हवाले कपाल्याची तोड निघाली. राहिल्याचा निर्गम करावा तेव्हांच लोक तन देतील ऐसी गति येथील आहे. ताकपिरास दोन तीन पत्रें पुरंदरास जाणें ह्मणोन पाठविलीं होतीं. मागाहून रायाजी पाटील हजार फौजेनशीं रवाना केले. पोहोंचले न पोहचले हें कांहींच कळेना. संदेह होता तो राजश्री बहिरजी ताकपीर यांचें पत्र पाटीलबावास आलें कीं, आज्ञेप्रमाणें पुरंदरास जावयाकरितां तिसगांवीहून कूच करून घाट चढलों. रुईवर मुकाम झाला. ते रोजीं श्रीमंतांचा मुकाम आह्माजवळोन तीं कोसावर आला. अकस्मात गणोजी कदम व नारोपंत दिंमत अलीबहादर आह्मांकडे आले. श्रीमंतांनीं तुह्मांस बोलाविलें आहे, कूच करा, चला, तेथें उजूर तुमचा करतां येत नाहीं. कुयोगावर टाळिलें. कदम गेले. आम्हाजवळ बातमी ठेविली. आम्हीं रात्रीं निघोन जावयाची सलाह करून पाहिली. बनली नाहीं. प्रातःकालीं राजश्री अमृतराव व सदाशिव रामचंद्र, रामचंद्र गणेश, मानाजी शिंदे फाकडे वगैरे जमावसुद्धां न्यावयास आले. त्याजवळ आम्ही यात्रेचा मजकूर बोललों जे यात्रा करून येतो. सांगाल ते मुकामीं सामील होऊं, ऐसें पुष्कळ बोललों. त्यांनीं (न) ऐकिलें. शेवटीं निकर्षावर यावें ऐसा रंग त्यांचा पाहिला. आह्माबरोबर कुटुंब, मग काय करावें. लाचार होऊन जाणें पडलें. गेलों; श्रीमंतासी भेटलों. हें एक पत्र आलें. चौथे रोजीं दुसरें पत्र आलें. त्यांत मतलब कलमबंदी श्रीमंतांनीं करार करून दिल्हेली याद व श्रीमंतांचें पत्र व ताकपिराचें पत्र आलें. तीं पत्रें अगदींच आम्हास दाखविलीं आणि शपथ केली कीं,

मजला किमपि ठाऊक नाहीं. पहिलेच लोकांचे फडशे पडून आमचें जाणें होतें तरी कांहींच न होतें. आम्ही येथें देण्यांत फसलों. वोढीमुळें जाणें लांबणीवर पडलें. मुळावर हा प्रकार जाहला; येणेंकरून कारभारी यांचे चित्तांत आशंका उत्पन्न होतील तर आशंका येऊं न द्याव्या. स्थाईभाव आमचा श्रीमंत कैलासवासींच्याच पक्षीं आहे. बाया व कारभारी यांसच सामील होऊं. लक्ष दुसरें नाहीं. मूल सकुटुंब फसला तो काढिला पाहिजे, यास्तव अनेक हुन्नर करणें पडतील, राजकारणें लावावीं लागतील, येतों म्हणावें लागेल, वर्तमान लोपणार नाहीं. तेव्हां राजश्री बापू व नाना विषम मानून कल्पना करतील, दुरारोप ठेवितील तर विकल्प सहसा न आणावा. आमच्यानें दुसरें सहसा होणार नाहीं. असें बोलतात व करणींतही सरळताच दिसते. पडदा राखीत नाहींत. शिंदे छ १२ सफरीं डेरेदाखल झाले. होळकरही तेच दिवशीं डेरेदाखल झाले. उभयतांसही निकड फार केली आहे व राजश्री कृष्णाजी पवार व जिवाजी पबार यांस निकड लाविली आहे. तेही लौकरच तयार होऊन यांस सामील होतील. श्रीमंतांचीं पत्रें शिंद्यांस आलीं त्यांच्या नकला पेशजीं पाठविल्या आहेत व हल्लीही पाठविल्या आहेत. विदित होय हे विज्ञापना.

---

श्री

**१४३** श. १६९६ आषा. व. १०
(ना. भो. २१) ता. २-८-१७७४

राजश्री मुधोजी भोसले सेनाधुरंधर यांस

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो सदाशिव रामचंद्र कृतानेक आशीर्वाद विनंती उपरी. येथील कुशल तागाईत श्रावण शु पंचमी जाणून स्वकीय कुशललेखन करीत जावें. विशेष. आपलीं पत्रें छ ९ जमादिलावलचीं आलीं तीं पाहोन सर्व वर्तमान कळलें. इकडून पत्रांचीं उत्तरेंही पाठविलीं आहेत; व राजश्री महादजी शिंदे यांचींही पत्रें गेलीं आहेत, त्यांजवरून करार केला जाईल. यानंतर इकडील वर्तमान तरी श्रीमंत सरदारांसह नर्मदापार झाले. तेथून कूच करून तापीतीरास जाणार आहेत. बरकड सविस्तर वृत्त राजश्री आबाजी त्रिंबक आपल्यास लिहितात त्याजवरून कळेल. सारांश, आमचें लक्ष आपल्याकडे आहे, दुसरा प्रकार नाहीं; आपलेकडील वर्तमान वरचेवर लिहावें, तेणेंकरून चित्त स्वस्थ होईल. महंमद इसफ याचें लक्ष सर्व प्रकारें आपल्याकडे. आम्हींही बहुत त्याची खातरजमा आपल्याकडे जावयाविशीं केली आहे. तूर्त श्रीमंतांपासून रुकसत केले. हे जवळ असल्यास पुणेंकर दहशत खाऊं लागले. सरदारांचेंही मानस असेंच पाहून चार दिवस यांजला आपणाकडे रवाना केलें. यांचा गौरव सर्व प्रकारें आपण करावा. तूर्त नबाब इसमाइलखान बाहदर व आपण एकदील आहेत. या प्रसंगीं महंमद इसफ आपल्याजवळ पोहोंचले म्हणजे कोणतीही गोष्ट अगाध नाहीं, शत्रूचें पारिपत्य करितील. सारांश, आप्पासाहेब, तुम्हीं कायम आहां तर

श्रीमंतांस व आम्हांस मोठा आश्रय आहे. यास्तव सुभेदार यांजला आपल्याकडे रवाना केले. हे दोन हजार सामान आहे. कैसे आहेत तें ध्यानांत असेल. श्रीमंताचे कंबरेची समशेर आहे ती आपण जतन करावी. विशेष काय लिहिणें? लोभ आसावा हे विनंती.

---

श्री

१४४ श. १६९६ आश्वि. व. ३०
( भा. व. २. ५० ) ता. ४-११-१७७४

श्रीमंत राजश्री आनंदरावजी[1] सुभेदार स्वामीचे सेवेसी

पोष्य गोपाळ गोविंदे कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील वर्तमान तागाइत छ२९ शाबानपर्यंत यथास्थित असे विशेष. महमद अजीम मुसलमान मुंबईहून आलीकडे आला. तो जासईचे चौकीवर सांपडला. त्याजवळ एक पत्र होतें. त्याजवर शिका राजश्री दादासाहेबांचा आहे, यास्तव आपणाकडे रवाना केला आहे व तेंच पत्रही पाठविलें आहे. त्याजवरून सर्व अर्थ चित्तांत येईल. बहुत काय लिहिणें? लोभ करावा हे विनंती. दुसरें त्याजवळ पारशी कागद आहेत ते पाठविले आहेत हे विनंती.

---

१४५ श्री फाल्गुन शु॥ ३ शके १६९६
( जोशीसंग्रह ) ता. ४-३-१७७५

श्रीमंत क्षत्रियकुलावतंस महाराज राजश्री छत्रपति स्वामीचे शेवेशीं

विनंती सेवक माधवराव नारायण प्रधान कृतानेक विज्ञापना. सेवकाचे वर्तमान ता॥ छ १ मोहरमपावेतों महाराजांचे कृपावलोकनेंकरून यथास्थित असे विशेष. तीर्थस्वरूप राजश्री दादासाहेब व गोविंदराव गायकवाड व खंडेराव गाइकवाड मही उत्तरतीरास होते व राजश्री हरि बल्लाळ हुजरातची फौज व रा. तुकोजी होळकर व महादजी शिंदे व फत्तेसिंग गायकवाड फौजसहवर्तमान मही दक्षिणतीरीं होते. दादासाहेबांचा तहरहचा दारमदार करीत असतां त्यांच्या विचारास न ये तेव्हां इकडील सरदारही एकचित्ते होऊन बुनगे बडोद्यानजीक टाकोन सडे होऊन ता॥ १६ जिल्हेजी मही उतरून पार गेले. सहा घटिका दिवस राहतां लढाई मातबर होऊन त्यांचे सरदार जखमी झाले. एक दोघे पाडाव आले. त्यांजकडील तोफा व हत्ती आणिले. फौज लुटली गेली. दादासाहेब व गोविंदराव गाईकवाड व खंडेराव गाईकवाड यांनीं पळ काढिला. त्यांचे पाठीवर फौजा गेल्या. ते नडियादेच्या ठाण्यास गेले. तेथें दोघे गाईकवाड राहिले. दादासाहेब हजार राऊतांनशी खंबाईतास गेले. तेथून भावनगरास जाऊन हत्ती घोडीं लोकांस देऊन आपण दोन सेव-

---

१ आनंदराव राम साष्टीचा सुभेदार. २ कामतेकर, गायकवाडांचा दिवाण.

कांनसी जाहजांत बसून सुरतेकडे गेल्याची खबर आहे. इंग्रजांचे आश्रियास गेले. याउपरी त्यांहीं फौज जमून मनसुबा करावा. ही उमेद त्यांची राहिली नाहीं. महाराजांचे कृपावलोकनेकरून सेवकाकडील सरदारांस यश येऊन बखेडा मोडिला. या कलहामुळें चहूंकडे शत्रूंनीं उपद्रव आरंभिले आहेत. याउपरी फौजा मोकळ्या झाल्या. शत्रूचीं पारपत्यें महाराजांचे कृपेकरून होतील. संतोषाचे वर्तमान महाराजांस निवेदन व्हावें याजकरितां सेवेशीं लिहिलें आहे. सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

---

श्री

१४६ श. १६९७ चै. शु. १३
(ना. भो. ६८) ता. १३-४-१७७५

चिरंजीव राजश्री लक्ष्मणराव यांसी व्यंकटेशराव काशी आशीर्वाद उपरी.

आह्मी घरास आलों तों चौकीपहारा बसवून, दगा करून गडास नेऊन जामीन घेऊन मोकळीक केली; हें वृत्त तुम्हांस लिहिलेंच आहे. ते वेळीं गडास नेऊन राजश्रीचा हातरोखा यजमानास आणून आह्मांजवळ दिल्हा, आणि उत्तर आणवून द्या ह्मणोन बोलले. परभारां पाठवा, आह्मांस दरकार नाहीं म्हणोन बोलिलों. परंतु न ऐकतां; तुह्मीच उत्तर आणोन देणें, नाहीं तर कार्यास येणार नाहीं, म्हणोन रागावले. त्यावरून दिलेलीं पत्रें पाठविलीं आहेत. यजमानांचे मर्जीस येईल त्याप्रमाणें उत्तरें पाठविण्याचीं असल्यास पाठवणें. चिटणिसांसही दिलेलीं दोन पत्रें पाठविलीं आहेत. पावतीं कीजे. आम्ही सर्वत्र कुशळ असों चिन्ता न कीजे. तुह्मी वरचेवर संतोषवृत्त लिहित असणें हे आशीर्वाद.

---

श्री

१४७ श. १६९७ ज्ये. व. १२
( ना. भो. ७ ) ता. २४-६-१७७५

राजश्री रघोजी भोसले सेनासाहेब सुभा गोसावी यांस

सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित माधवराव नारायण पंतप्रधान आशीर्वाद विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित असलें पाहिजे. विशेष श्रीमंत महाराज छत्रपति स्वामी यांचे आज्ञेवरून तुह्मांस सेनासाहेब-सुभा पद बहाल केलें असे, तरी तुह्मी फौजेचा व मुलखाचा बंदोबस्त करून चाकरी सरकारची एकनिष्टपणें करीत जावी. रा छ. २५ माहे राखर सुा सीत सबैन मया अलफ. बहुत काय लिहिणें? लोभ असों दीजे हे विनंती. ( लेखनसीमा )

---

श्री

१४८ श. १६९७ ज्ये. व. १३

( ना. भो. ४८ ) २५-६-१७७५

राजश्री रघूजी भोसले सेनासाहेबसुभे गोसावी यांस

स्नेहांकित सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य बाळाजी जनार्दन आशीर्वाद विनंती उपरी येथील कुशळ जाणून स्वकीय लिहीत असलें पाहिजे विशेष. राजश्री बाबूराव विश्वनाथ यांनीं आपणाकडील कित्येक निखालसपणाचे भाव सांगितले. त्यावरून श्रीमंत महाराज छत्रपति स्वामी यांस श्रीमंतांनीं विनंती करून सेनासाहेबसुभ्याचीं वस्त्रें आपलें नांवें बहुमानयुक्त घेऊन राजश्री जिवाजी रघुनाथ यांजकडे पाठविलीं. त्यास श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांचीं पत्रें आम्हांस असावींत, मग वस्त्रांचा स्वीकार होईल ह्मणोन आपण आक्षेप केला ह्मणोन मशारनिल्हेनीं श्रीमंतांस लिहिलें. त्यास उचित पक्ष जाणून श्रीमंतांनीं आपणास पत्र लिहिलें आहे. त्याप्रमाणें सुमुहूर्ते पाहून बहुमानयुक्त वस्त्रें स्वीकार करावा. रवाना छ २५ रबिलाखर. बहुत काय लिहिणें? लोभ असों दीजे हे विनंती.

---

श्री

१४९ श. १६९७ आश्वि. शु. ९

( ना. भो. ३ ) ता. ३–१०–१७७५

राजेश्री मुधोजी भोसले सेनाधुरंधर गोसावी यांस

सकळगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित माधवराव नारायण आशीर्वाद विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे विशेष. राजश्री रघोजी भोसले सेनासाहेब सुभा यांचें लग्न मार्गशीर्ष मासीं करणार त्यास घरांतील बायकांचा बेत सोन्याच्या साखळ्या पायीं घालाव्या याजकरितां श्रीमंत महाराज छत्रपति स्वामींस विनंती करून राणीचे पायां साखळ्या प्रसादिक आणून लग्न समारंभास पाठवाव्या, म्हणून राजश्री दिवाकर पुरुषोत्तम यांनीं राजश्री सखाराम भगवंत व बाळाजी जनार्दन यांस लिहिलें त्याजवरून कळलें, ऐसियासि आपल्याकडील बायकांचे मनोरथ सिद्धीस न्यावे हें आम्हांसही आवश्यकच, यास्तव महाराजांस विनंती करून डागिणे मागविले आहेत. आले म्हणजे राजश्री बाबूराव विश्वनाथ यांजबरोबर पाठवून देऊं. नवरीस लहान डागिने असावेत,

---

१. बाबुराव विश्वनाथ वैद्य नागपूरकरांच्या दरबारीं पेशव्यांचे वकील.

ते तेथें आपण करावेत. रा छ५ माहे रमजान. बहुत काय लिहिणें? लोभ आसों दीजे हे विनंती. लेखनसीमा[1].

---

श्री

१५० श. १६९७ का. शु. ७
( ना. भो. १० ) ता. ३१-१०-१७७५

राजश्री मुधोजी भोसले सेनाधुरंधर गोसावी यांस

सकळगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ बाळाजी जनार्दन आशीर्वाद विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे. विशेष विस्तारें मजकूर लिहिला त्यांत मुख्यार्थ कीं महमद इसफ याजवर ताजखान रोहिले फौजेसुद्धां रवाना केले. त्यांनीं मेहनत फार करून धरून आणून त्याचे पायांत बिडी घातली. त्यास शिवनीस आणविला आहे. तेथें पांचशें राऊत पाठऊन न्यावा म्हणून राजश्री हरि बल्लाळ यांस लिहिलें आहे. त्यांचे राऊत येऊन घेऊन जावे हे प्रतीक्षा आहे म्हणून लिहिलें तें कळलें. ऐशास ताजखान रोहिले यांनीं मर्दुमीची शर्त करून हरामखोर धरिला, फार सरस केलें. त्यास आणावयास पांचशें राऊत पाठविले म्हणून हरि बल्लाळ यांनीं लिहिलें. येथें होते त्यास राऊत शिवनीस पोंचवून त्यांचे स्वाधीन इसम मजकुरास केलाच असेल. आपलें लक्ष दुसरें नाहीं म्हणून लिहिलें तरी पूर्वीपासून श्रीमंतांचा व आपला स्नेह घरोबा एकात्मता चालत आला, तेंच लक्ष आपलें आहे. त्याच रीतीनें येथून दुसरा विचार सहसा नाहीं. आपण मार्गाची गोष्ट तेच करितात, हेंच फार उत्तम आहे. अलंकाराचा विषय किती; परंतु लिहून पाठविलें हे उचित. रा छ ६ रमजान. बहुत काय लिहिणें? लोभ असो दीजे हे विनंती.[2]

---

श्री

१५१ श. १५९६ ?
( भा. व. २.१३० ) स. १७७५ ?

सेवेसी विसाजी कृष्ण साष्टांग नमस्कार विज्ञापना. प्रातःकालीं रविवारीं सहा घटका रात्रीस श्रीमंत किल्ल्यास जाणार. उभयतां काकूबाई यांची कांहीं ओझ्याची सोय होत नाहीं.

---

१. रघूजीचीं चार लग्नें झालीं. त्यांत हें पहिलें मानसिंगराव मोहिते यांचे कन्येशीं ११८५ फसली मार्गशीर्ष मासीं झालें. ह्या मुलीचें नांव गजराबाई ठेविलें. बाकीच्या बायकांचीं नांवें, पार्वतीबाई, बांकाबाई, व अंबिकाबाई.

२ याच पत्राच्या अन्वयें सखाराम भगवंत यांनींही पत्र लिहिलें, त्याची तारीख ही छ मजकूरच आहे.

तेव्हां जाणें कसें. वरकड बारीक मोठें वर्तमान बोलणें तें मी सेवेसी आलियावर विनंती करीन. परंतु तेथून दोन खिजमतदार येथें पाठवून त्यांचे रवानगी त्यांनीं करून द्यावी ह्मणजे जातील. नाहीं तर ज्याप्रमाणें आज्ञापत्र येईल त्याप्रमाणें उभयतांस विनंती करीन. ओझ्याची तरतूद जाहलीच पाहिजे हे विज्ञापना.

---

श्री

१५२ श्रा. शु. ६ श. १६९८

[ भा. व. २. ८ ] २१-७-१७७६?

सेवेसी कृष्णराव अनंत कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान तागाईत छ ४ जमादिलाखरपावेतों यथास्थित असे विशेष. राजश्री मालोजी घोरपडे राजे यांनीं विदित केलें कीं, तालुके सातारा येथील देशमुखी आमची आहे. त्यास तालुकेमजकूर येथील गावगन्नापैकीं जमीन पूर्वीं श्रीमंत कैलासवासी शाहू महाराज यांनीं घेऊन शहर वसविलें. तेथील पेटांचे ऐन जमेवरी हक्क वगैरे कानुकायदे बितपशीलः—

१ पेठेचे जमेवर दरसदे रुपये ७॥ प्रमाणें

१ बाजारची फसकी व उकाम.

१ अडण कुळें कोष्टी, वाणी, तेली, तांबोळी, सणगर वगैरे कानुकायदे.

१ शहरचे जकातीचा हक्क.

—

४

१ बलुते वतनदार वगैरे यांजकडील शिरस्तेप्रमाणें राबणुकेबद्दल.

१ पेठेंतील जमाबंदी आमचे विद्यमानें करावी.

१ संक्रांत, लग्न, मुहूर्त याचा खांडवा वाटी कुळाकडील एकूण.

—

३

येणेंप्रमाणें सात कलमें चालत नाहीं. येविशीं पेशजीं सरकारांतून मोरो गोविंद कारकून व पत्रें पाठविलीं. परंतु त्याप्रमाणें चालत आलें नाहीं. येविशीं आज्ञा झाली पाहिजे ह्मणोन त्याजवरून हें पत्र सादर करून राजश्री मोरो गोविंद कारकून पाठविले असेत. तरी पेशजींचे पत्राप्रमाणें याचे विद्यमानें चौकशी मनास आणून त्याचप्रमाणें चालवणें ह्मणोन आज्ञा. त्यास कैलासवासी शाहू महाराज यांनीं शहरची वस्ती केली. त्यापासून देशमुख व देशपांडे यांचा दाखला शहरांत नाहीं. शहरचा कचा आकार होतो तो सरकारांत जमेस येतो. हल्लीं नवीन रयतेवर जाजती देशमुख देशपांडे यांचा हक्क बसविल्यानें शहर ओस होतें. शहरचीं अवघीं वतनें महाराजांचीं आहेत. याप्रमाणें शहरची वसाहत झाल्यापासून चालत आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.[१]

---

१. लेखक कृष्णाजी अनंत भानु, नानाचा चुलत भाऊ यांचें पत्र साताऱ्याहून पुण्यास नानास. २. पत्राचा काळ निश्चित करतां येत नाहीं.

श्री

१५३ श. १६९७
( भा. व. २. १४३ ) स. १७७६

बाळाजीपंत नाना गोसावी यांसी

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृतराजमान्य स्नेहांकित श्रीमंत संकराजी राजे घोरपडे दंडवत विनंती. उपरी येथील कुशल जाणून आपलें स्वकुशल लेखन करीत असलें पाहिजे विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. तीर्थस्वरूपांस घेऊन येणें ह्मणून लिहिलें, त्यास म्यां चिट्टी पाठविली होती कीं, याप्रमाणें तीर्थस्वरूपास उत्तर लिहिणें. त्याप्रमाणें सरकारांतून न लिहितां तीर्थस्वरूपांस परभारें चिठ्ठी लिहिली कीं, राजश्री बापू व बाबा याजसमागमें येणें ह्मणोन लिहिलें. त्यांत माझा कांहींच मजकूर लिहिला नाहीं, त्याजवरून तीर्थस्वरूप कूच करून आपणाकडे आले आहेत. यांचा सर्व मजकूर राजश्री राघोपंतास ठाऊक आहे. ते आपणास विनंती करतील तें विदित होईल. श्री देवास जाणें होतें ह्मणून या मार्गें आलों. कूच दरकूच येतों; दर्शनाअंतीं जे विनंती करणें ते करीन. बहुत काय लिहिणें ? कृपा पूर्ण असों दीजे हे विनंती.

---

१५४ श्री
( भा. व. २. ३५ ) १७७६ ?
श. १६९८ ?

स्वामीचे सेवेसी विनंती सेवक तुकोजी होळकर कृतानेक विज्ञापना. स्वामीकडून चिटी आली ती प्रविष्ट झाली. उदईक सरकारचें कूच होऊन खोडवी कोबली येथें मुक्काम होणार. याजकरितां तुम्हीं कूच करून मुक्काममजकुरीं येणें म्हणोन आज्ञा; त्यास आज्ञेप्रमाणें मौजे हिरडगांव येथून कूच करून यावयाचें घडेल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

१५५ श्री
( पारसनीससंग्रह ) माघ शु॥ ४ शके १६९९
ता. १-१-१७७८

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री लक्ष्मण आपाजी गोसावी यांसी

सेवक बाजीराव रघुनाथ नमस्कार. सूर सन समान सबैन मया व अलफ. तुम्ही तीर्थरूप सौभाग्यवती मातुश्री बाईसाहेबांस पत्रें पाठवितां आणि आम्हांस पाठवीत नाहीं, हे गोष्ट तुम्हासीं रुचावयाची आहे कीं नाहीं ? तुम्हांस रविशंकरमणाचे तीळ कर्शरा ( शर्करा ) पाठविलें आहेत हें घेणें. तुह्मी सांगून पाठविलें कीं एक दोन लाहान साह्य जाहल्यास त्यांच्यानें काय कार्य होणार आहे ! मोठ्यांच्यानें कांहीं जाहालें नाहीं. त्यास ही गोष्ट खरीच आहे. परंतु सुतें बहुत मिळालीं म्हणजे एक चऱ्हाट होतें, त्याणें मस्त हस्ती बांधला जातो. त्याप्रमाणें बाराभाईंनीं एक मत

करून धन्यासही थारा नाहींसा केला. याप्रमाणें युक्त केल्यास काय न होये? चवघे जे गोष्टीनें आपल्या मतांत येतील त्या तऱ्हेचीं सूत्रें राखावीं व आपले दौलतेंत कोणी मोठें माणूस असेल त्याणीं कराराचा शब्द मागितला तर त्यास देऊन कार्य होये ते गोष्ट करावी. नाहीं तर सल्ला तरी कालावर नदर देऊन करावा. ह्या गोष्टींतून कांहींच नदरेस येत नाहीं आणि उगेच इंग्रेजाचें घरीं पोटास मात्र खाऊन कितीक दिवस पडोन राहावें. यांत पूर्वीपासून तेज मिळविलें आहे. या प्रांतांत पराक्रमाच्या गोष्टी तीर्थरूपाच्या फार ऐकतों, त्या अशा कीं ज्या तऱ्हेनें पुराणांतील गोष्टी ऐकाव्या त्या तऱ्हेच्या. असें असोन हे तेथें राहाणें आणि कांहीं उद्योग न करणें हें काय समजून वडिलांचे मर्जीस येत असेल? वरकड जातीनें तो बहुत मानी आहेत. परंतु कालापुढें इलाज नाहीं. आम्हीं लेकरें, विशेष लिहिलें तर तीर्थरूप म्हणतील कीं, बाइको सारा वेळ आम्हांस गांजीत असते. तिला लेक झाला, तोही तसाच खोटा निघाला! यास्तव तुम्ही मर्जी पाहून पत्र वाचून दाखवणें आणि आज्ञा जे होईल ते लिहिणें. आम्हीं वडिलांस तीळ शर्करा व पत्र पाठविलें आहे तें प्रविष्ट करून उत्तर पाठवावयाची विनंती करणें. जाणिजे छ १ माहे जिल्हेज.

---

श्री

१५६ शा. १७०० ज्ये. व. १३
(भा. व. २.९) ता. २२-६-१७७८

राजश्री बाळाजीपंत नाना गोसावी यांस

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित बिंबाजी भोसले दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित असलें पाहिजे विशेष. बहुत दिवस जाहले. तुह्मांकडील कांहीं वर्तमान कळत नाहीं. तरी सविस्तर लेखन होऊन संतोषावाप्ति व्हावी. इकडील मजकूर सविस्तर राजश्री बाबूराव विश्वनाथ यांनीं आपलेकडील बोलणियाचे भाव सांगितले आणि लिहिलें त्या लक्षानरूप असों. आपली भेट सत्वर व्हावी हेंच निशिदिनीं मनांत धरून आहें. एतद्विषयींचें सविस्तर राजश्री महिपतराव विश्वनाथ अवगत करतील. आपले वचनावर कांहीं चित्तांत न आणितां सर्वार्थी सिद्ध जाहलों, ऐसें असतां आपलेकडील पत्रच येत नाहीं, त्याजवरून अपूर्व वाटलें. हल्लीं पंतमशारनिल्हे आपणापाशीं असावे. आमचें वृत्त वरचेवर आपणास कळत जावें. आपले वेगळें दुसरें साधन न ठेवितां अविटपणें लक्षांत असों हें चित्तांत असावें. ऐसें ल्याहावें तरी आपण इकडील मनवृत्ति आकर्षण अगोदरच करून घेतल्या आहेत. सूचनार्थ मात्र लिहिलें असे. सविस्तर वर्तमान राजश्री महिपतराव विश्वनाथ सांगतां कळों येईल. रवाना छ २६ जमादिलावल. बहुत काय लिहिणें? लोभ असों दीजे हे विनंती.

---

श्री

१५७ श. १७०० आश्विन

( भा. व. २, अ. दि. १५ ) आक्टोबर १७७८

१ अंद्रास[1] दिवाण चेनापट्टणचा याणें वलीयम हौरनबी[2] जनरल मुंबईचा यास लिहिलें कीं, पांच सहा दिवस झाले, तुम्हांस पत्र आज्यांगाचे वाटेनें पाठविलें व हें पत्र चेनापट्टणाहून मच्छलीबंदरास आलें तें पुण्याचे मार्गे पाठविलें आहे. खबर आली कीं, पातशहाचें जहाज कावेत्री त्रांकिबार येथें जाणार होतें. सर एदवर्द बर्नन आणावयास गेले होते. तें जहाज निगापट्टणास गेलें. कां म्हणाल तरी वारा फार लागला. त्याणें तोफा व डोलकाठी समुद्रांत टाकिली. जहाजांत पाणी सा हात झालें तेव्हां बचाव केला. जहाज सामान उतरलें तेव्हां जगलें. वलंदाजयाचें बंदर त्रिंकमले येथें नेलें, आणि नीट करावयासी सिहर्ष जहाज त्रांकीबार येथें पोहोंचलें. एदवर्द बर्नन यास बसावयास दिलें. ऐसे सिहर्ष जहाज कावेत्री जहाज मोडलें त्याचे मोबदला नेलें होतें. कप्तान हीकस[3] एक जहाजाचा सरदार तो बातमीस गेला होता, तो फिरोन बातमी घेऊन आला. यास दर्यांत जहाज फरानसीसाचे नजरेस पडलें नाहीं. आणीक दोन दिवशीं मलाकाकडे बातमीस जाणार आहेत. एक सावकारी जहाज फरानसीसाचें त्रिंकमलेजवळ आहे. माही फरानसीसाचें ठाणें घ्यावयाचा डौल दिसत नाहीं. परंतु सामान तयार करून ठेविलें. मेस्तर रंबलद[4] तंजोरीचे राजास भेटावयास जाणार. मुलेंमाणसांसुद्धां जाणार आहेत. मेजर मक्लीन तंजोर येथील किल्लेदार चेनापट्टणाहून तंजोरास जाणार आहे. बंगाल्याहून पत्र आलें कीं, एक जहाज वलंदेज याचें व इंग्रजाचें एक व डिंगमार याचें एक एकूण तीन जहाजें विलायतेस जाणार आहेत, व एक जहाज लाखोटे घेऊन विलायतेस जात आहे. विलायतेहून मच्छलीबंदरास लाखोटे आले होते ते कलकत्यास पोहोंचले. आपले नबाबाचे लाखोटे अजून पावले नाहींत. वाटेजवळ आहेत. इकडे खबर आली कीं राघोबा पुण्यास पोहोंचले आहेत.

१ अंद्रास दिवाण याणें मुंबईस वलीयम हौरनबी यास लाखोट्यावरी लिहिलें. चार दिवस झाले. कावेत्री जहाज तवाईखालीं आलें. याचा मजकूर तुम्हांस लिहून पाठविला. जनरल कोटस[5] मुलेंमाणसांसुद्धां विलायतेहून येथें पोहोंचले. ष्टाफर्द जहाजांत बसोन आले. पातशाही जहाज याजवर लढाईचा * * * त्यास सावकारी जहाजें पांच केप येथें भेटलीं. एकूण सहा जहाजें. पैकीं दोन जहाजें मुंबईस आलीं व एक चेनापट्टनास आलें व दोन बंगाल्यास गेलीं. एक जहाज आलें नाहीं. केप येथें जनरल कोटस याणें ऐकिलें कीं, इंग्रजानें चंद्रनगरचा किल्ला घेतला. याजकरितां जनरल कोटस मुंबईस जाणार होता तो मुंबईस जाणें सोडून चेनापट्टणास आला. केपस येथें दोन जहाजें फरानसीसाचीं पाहिलीं तीं दोन जहाजें

---

1. Andrews. 2. William Horuby. 3. Hicks. 4. Rumbold.
५ Coote.

गल्ला ध्यावयाकरितां मोरस येथें आलीं. आम्हांस खुशाली कीं राघोबास मुंबईहून घेऊन पुण्यास जातां म्हणोन ऐकिलें त्यास जनरल कोटस् यास खबर पोहोंचवितों. तेही खुशाल होतील. जनरल कोटस याणें केपेस ऐकिलें कीं, मारेस सामान सरंजाम तयार होत आहे. फुलचरींचे कुमकेकरितां मोरेस नऊ जहाजें फरानसीसाचीं लढाईचीं तयार आहेत.

१ अंद्रास दिवाण चेनापट्टण यानें जनरल मुंबईचा वलीयम हौरनबी यास तिसरें पत्र लिहिलें, त्याचा मजकूर. तुमचें पत्र आज मोठें सकाळ आह्मांस पावलें. मेस्तर च्यारलेस याचें पत्रही पावलें. तुम्हीं लिहिलें कीं हा कागद मेस्तर चारलेस यांचे पत्राबरोबरच कागद आहेत म्हणोन लिहिलें तें पावलें नाहीं. मेस्तर रंबल याजवळ कागदाची नकल आहे त्यावरून त्याचा मजकूर आम्हांस समजला. एक पातीमाराचें गलबत आतां तयार होत आहे. त्रिकमलेस खबर पाठवावयाकरितां दोन जहाजें सावकारी बंगाल्यास जावयासी विलायतेहून आलीं. त्यांनीं खबर पाठविली कीं, आह्मीं दोन जहाजें फरानसीसाचीं लढाईचीं वाटेनें पाहिलीं. तुह्मीं लिहून पाठविलें कीं मुंबईहून राघोबास घेऊन पुण्यास जातों यावरून खुशाल झालों. आह्मीही वाट पाहतों कीं तुह्मीं राघोबास पुणेयास तक्तीं बसवावें. जनरल कोटस यास चार पांच रोज बरें वाटत नव्हतें. तो हल्लीं बरा झाला.

१ अंद्रास दिवाण चेनापट्टण यानें मुंबईचे जनरल वलीयम हौरनबी यास चौथा लाखोटा लिहिला, त्याचा मजकूर. जासुदाबरोबर पत्रें दोन पाठविलीं. आणीकही दोन जहाजावरी पाठविलीं त्याच मजकुराचीं आहेत. मेस्तर चारलेस याजकडील कागद आह्मांकडे पाठविले ते पावले. तोफखाना दर्याचे वाटेनें बमयसामानसुद्धां देखील गोलंदाज आंज्यागेस चेनापट्टणाहून रवाना केला. आंज्यागाहून माहीस जाणार आहे. बाकी सरंजाम सुलासे*** जहाज याजवरी पाठवून देतों. माहीस मोर्चे लावावयाचा सुमार दिसत आहेत. मेस्तर रंबल तंजोर येथें जाणार होता तो राहिला. त्याचे मोबदला जनराल मनरो यास रवाना केला. तंजोर किल्ला पाहावयास जातात व आणखीही किल्ले दक्षणेकडे कर्नाटक प्रांतीं आहेत तेही पाहावयास जातात. फुलचरी घेतली.[1]

तेव्हां किल्ल्यांतील मोशे बेलकोम जनरल यानें करार केला कीं, आह्मांस चेनापट्टणास नेऊं नये. आह्मीं ऐकिलें कीं, मोशे बेलकोम व मुशे के व मुशे शेरोई चेनापट्टणास आपणांस भेटावयास येतील. मग फुलचरीस जातील. तेथें बंगाल्याहून जहाज आलें म्हणजे जहाजांत बसोन जातील. तीन जहाजें तिकडून येतील. जहाजें जलदीनें येणार आहेत त्यांची वाट पाहतों; आणि तीन जहाजें बंगाल्याहून विलायतेस गेलीं. जनरल कोटस येथें महिना सव्वा महिना राहणार आहत. कुटस जनरल फुलचरी पाहावयास जाणार आहे. याजकरितां आमचे चित्तांत येतें कीं, फुलचरी मोडावयाचा मनसुबा दिसतो. केरो येथील

---

१. स. १७७८ च्या ऑक्टोबरांत इंग्रजांनीं पांदिचरी हस्तगत केली.

लाखोटा येणार होता तो आह्मांकडे आला नाहीं. आह्मांजवळ येता तरी लाखोट्यांतील मजकूर काय होता तो समजता. ' मारनिंग स्तार ' जहाज याजवरी लाखोटे बिलायतेस पाठविले. ' आसिये ' जहाज बिलायतेहून येणार आहे तें अद्याप आलें नाहीं. दोन कंपनी एकूण दोनशें माणसें गोलंदाज याची रवानगी चेनापट्टणाहून आंज्यागास जहाजावरी केली. आणीक तिसरी कंपनी शंभर माणसांची तंजोर येथून कूच करून जाणार.

---

१५८ श्री

श. १७०० माघ व. १०

(भा. व. २ अ. दि ७) ता. ११-२-१७७९

मेणकापडावर चिठ्ठी बसविली आहे, तींत लिहिलें कीं, मसोलीपताम येथून रवाना पुण्यास, छ २३ मोहरम दोन प्रहर चार घटका दिवस दोन आंत लाखोटे, लाखोट्यावरी नांव ताबस माष्टीण पुण्यांत राहातो त्याचे, आंत लाखोटा, त्याजवर नांव विलियम हरनबी मुंबईचा जनराल. याजवर कागद मोकळा होता. त्याचा मजकूर ताबस माष्टीण यास पत्र एदवर्द अटसफर्द मसलीबंदर येथून लिहिलें कीं, बंगाल्याचा जनराल यांचें पत्र मुंबईचे जनराल यास पाठविलें आहे. त्यास जलदीनें पाठवणें. चार कागद मेस्तर माष्टीण यास व एक मुंबईस. छ २२ मोहरम, त्यांत कागद इंग्रजी सहा व गुजराथी सहा व तीन लाखोटे.

१ प्रत कागद मुंबईचे जनरलास बंगाल्याचे वारिन हेस्तिंग व रिचर्द चर्च व पितर फरानसिस व एदवर्द होईलर यांनीं लिहिलें कीं, तुह्मांकडे हुंडीचीं पत्रें पाठविलीं आहेत. ज्याप्रमाणें लिहिलीं त्यापासून पैका घ्यावा, आणि बंगाल्यावरी तीन महिन्याचे वाइद्यावरी चिटी लिहून देणें. बंगाल्यांत दोन हिसे रोख देणें व एक हिशाची चिटी कंपनीवर देणें. आणखी हुंडी पाठवितो तो ऐवज तुमच्या खर्चास पाठविला. कंपनीनें हुकूम केला त्याप्रमाणें पाठविले. आम्ही तुह्मांस खबर पाठवितों. तूर्त इतक्या हुंड्या हल्लीं सालचे खर्चास पाठविल्या. एक हुंडी जेमस बर्ण बंगालेकर यानें जेमस जामसेन याजवरी रुपये ९५०० व जान पाफान, जार्ज बर्च याजवर रुपये २५०० व हातजी लोर्बली महंमद व मिर्जा महमदअली व हातजी महंमद रजीया यांनीं हेनरी मोर याजवर रुपये २०००० हर्जी लोर्बली, व महंमद व मेर्ज महमदअली देवीज इस्कार्द याजवर ८०००, व अर्जुनजी नतजी सुरतवाला याजवर अर्जुनजी नतजी बंगालेकर यानें हुंडी रुपये ३१०००, आणखी हुंडी सुरतवाला याजवर बंगालेकर यानें रुपये २००००, व रघुनाथदास बंगालेवाला यानें प्रेमजी बनारसीदास याजवर हुंडी रुपये ४००० व कानदास ब्रिजाब्रामदास ( ब्रिंदाबनदास ? ) यानें विष्णुदास कानदास सुरतवाला याजवर हुंडी रुपये २५०००, व आणखी कानदास यानें विष्णुदास याजवर रुपये २०००, व ब्रिजीदास मोतीचंद बंगालेकर यानें मोतीचंद भुकणदास सुरतवाला याजवर रुपये १५०००) एकूण एक लक्ष पंचावन हजार रुपये.

ए ९

छ २ मोहोरमी एकूण हुंड्या, ४ इंग्रजी अक्षराच्या, ६ गुजराथी अक्षराच्या. १० त्या

४०००० इंग्रजी मुंबईस हुंड्या

९५०० जेमस जामसेन याजवरी

२५०० जान पाफाम जोर्ज बर्च याजवर

२०००० हातजी लोर्बली महंमद व मिर्जा महंमदअली व हाराजी महंमद रर्जी यांनीं हेनरी मोर याजवरी

८००० हार्जी लोर्बली महमद व मिर्जा अली देवीज इस्कार्द याजवर

४००००

११५००० गुजराथी ६ एकूण,

५१००० अर्जुनजी नतजी सुरतवाला याजवरी.

३१००० प्रा १

२०००० प्रा १

५१०००

४००० प्रेमजी बनारसीदास याजवर सुरतेस,

४५००० विष्णुदास कानदास सुरतवाला,

२०००० प्रा १

२५००० प्रा १

४५०००

१५०००मोती भूकणदास याजवर सुरतेस,

११५०००

१५५०००

१ प्रा पत्र मुंबईचे जामदारखान्यांत पैका जमा करावा म्हणोन चौघांचीं नांवें.

२५००० क्लोद अलीकसंदर.

१५००० जोर्ज गारनर.

६३८३८ जोर्जी फमखनर्वाख.

५०००० मेस्तर औरएल.

१५३८३७

कागद.

१ प्रा कागद जेमस बर्ण बेंगालकर याचे जेमस जामसेन मुंबईचा यास कीं आह्मी खुशाल असो. तुह्मी खुशाल आह्मा ह्मणोन मेस्तर मोर याणें पत्र पाठविलें त्यावरून कळलें;

व उसने रुपये तुह्माकडे आहेत ते मुंबईचे जनरलास ९५०० देणें. याचे ऐवजीं आम्ही देऊन बंगाल्याचे जनरलापासून घेऊन पुढील सालीं विलाइतेस जाऊं, तेव्हां सिवेजचे वाटेनें जाऊं. अगोदर तुह्मास पत्र पाठवूं. सर्व बंदोबस्त आमचा तुमचा पक्का करूं. कर्नल गादर्द बंगाल्याहून जमाव घेऊन पुण्यास जाणार. हा मुंबईस तुह्मांकडे येईल. याचा आदर मान चांगला करणें. हा मर्द माणूस आहे. आमचाही स्नेही आहे.

१ जेमस बाईली बंगालेकर याणें जेमस हरतुली मुंबईस आहे यास पत्र लिहिलें कीं, तुमचें पत्र आह्मांस पावलें. ब्रितानें जाहाज याजवर आलें, तें व तुम्हांस आह्मी मुंबईचे जाहाजावरी पत्र पाठविलें आहे, तें पावले; व बोरे दोन पाठविले आहेत. तुह्मी लिहिल्याप्रमाणेंच पाठविले आहेत. आम्हांस तुमचा भरंवसा आहे. तुमचे हातास बोरे येतील; कां म्हणाल तरी जाहाजाचा कप्तान याणें आम्हांस सांगितलें कीं, तुमचा स्नेह चांगला आहे. म्हणोन आम्हीं त्याजबरोबर पाठविले आहेत. आणीक तुम्हाकरितां जिन्नस ठेविला आहे. इकडून जाहाज जाईल त्याजवर पाठवून देऊं. याचा पैका तुम्हीं देऊं नये. आम्हीं तुम्हांस बक्षीस केला. आम्हांवर तुमची कृपा पाहिजे. विसरूं नये. आम्हांस आणखी तुमचें काय काम असेल तें लिहून पाठवणें. करून देऊं. आमचा भाऊ जार्ज फुलचरी घ्यावयास गेला होता, तो आतां फिरोन येतो म्हणोन त्याची वाट आम्ही पाहतों. त्याजकरितां आम्ही फार कष्टी आहों. तुम्ही इकडे येऊन आम्हांस भेटी द्यावी. आम्ही तुम्हांस मेजवानी चांगली करूं. पारशी मुनसी याचा दरमहा आठराशें रुपये कलकत्त्यांत आहे. त्यास या जाग्यास सहाशें रुपये मिळतात. आम्ही लग्न करितों म्हणोन तुम्हीं ऐकिलें, त्यास आम्हांस येथें बायको चांगली गरिबाची लेक आहे, त्याचें पदरीं पैका फार नाहीं, परंतु बायको लिहिणार शहाणी चांगली आहे. आमचें लग्न झाल्यावरी तुम्हांस लिहून पाठवूं व पोषाखही पाठवून देऊं.

---

श्री

१५९ श. १७०० फाल्गुन वद्य ९

(भा. व.२-१२२) ११-३-१७७९?

श्रीमंत राजश्री नाना गोसावी यांस

अखिलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य आज्ञांकित सुलतानजी धायेबार दंडवत विनंती उपरी. येथील क्षेम तागाईत फाल्गुन वद्य ९ नवमीपर्यंत मुक्काम शिकरापूर यथें आपले कृपेवरून सुखरूप जाणोन स्वकीय कुशल लेखनाज्ञा केली पाहिजे विशेष. दिवस जाहले. आपणाकडोन पत्र येऊन स्वकीयांचा परामृश होत नाहीं. तेणेंकरून चित्त सापेक्षित असे. तर सदैव पत्रद्वारें सांभाळीत असावें. यानंतर पूर्वी तीर्थरूप धायेबार कैलासवासी यांणीं राघो मुद्गल तिखे कैलासवासी याजला कारकून ठेवून झाडोन कारभार

सांगितला, त्याअन्वयें कामकाज करूं लागले. तेव्हां आमचे वडील तीर्थरूप मृत्यु पावल्यावर आह्मीं मुलें लहान. ते समयी आमचे बंधु तानाजीबावा हे तिखेमजकुरास हिशोब पुसों लागले. ते वेळेस उभयतां भाऊपण्यामध्यें कटाक्ष करून वाटण्याचा फडचा सन इहिदे खमसेनचे सालांत पुण्याचे मुक्कामीं झाला. ते वेळेस सरकारांत गैरवाका समजावून दो हजार रुपये कमबेश याचीं गांवें मुशाहिऱ्यांत तोडोन घेतलीं. त्या वेळेस आम्हांस कांहींच समजत नव्हतें. बरें चाकरी करून गांवचा सरंजाम मोकासबाबेचा ऐवज घेत जावा, त्यास सबा सबैनचे सालापासून मशारनिल्हेस दूर केलें. त्यास आमचा हिशेबाचा व गांवचा लढा तोडोन टाकावा तें न करतां दिवसगतीवर लांबवीत चालले. त्यास येविशीं आह्मीं उभयतां राजी होऊन पंचाईत नेमली, त्यास पंचाईत रुईनें वर्तणूक करीत नाहीं. तर येविशीं आपण कृपावंत होऊन आमचा बंदोबस्त करून देविला पाहिजे. तरी बंदोबस्ताविशीं आलाहिदा याद करून पाठविली असे, तेणेंप्रमाणें साहेबीं बंदोबस्त करून द्यावा. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

श्रीलक्ष्मीकांत

१६०

(ना. भो. ५७)

श. १७०१ वैशाख शु. ५
२१-४-१७७९

राजश्री नारो शिवदेव गोसावी यांस

अखंडितलक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित रघोजी भोसले सेनासाहेबसुभा दंडवत सु॥ तिसां सबैन मयाअलफ. परगणें दान्हवे वगैरे महालबद्दल,

१ परगणे दान्हवे　　१ परगणे शिरवली　　१ परगणे महागांव

एकूण महाल तीन चिरंजीव राजश्री खंडोजी भोसले यांचे खासगीचे सरंजामास दिल्हे आहेत; तरी सदर्हू महालाचा अमल दरोबस्त पेस्तर सन ११८९चे अव्वल सालपासून त्याजकडील मामलेदाराकडे देणें. जाणिजे छ. ४ माहे रबिलाखर. बहुत काय लिहिणें?

---

श्रीलक्ष्मीकांत

१६१

(ना. भो. ६०)

श. १७०१ वै. शु. ५
२१-४-१७७९

राजश्री गणेश महादेव गोसावी यांस

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित रघोजी भोसले सेनासाहेबसुभा दंडवत सु॥ तिसा सबैन मया [ व ] अलफ. परगणे खडीधामणी वगैरे महालबद्दल,

१ प्रगणे खडीधामणी, १ खडखडे, १ हवेली माहूर, १ कुरबड उर्फ भाम

एकूण महाल चार चिरंजीव राजश्री खंडोजी भोसले यांचे खासगीच सरंजामास दिल्हे आहेत; तरी सदर्हू महालांचा अमल दरोबस्त पेस्तर सन ११८९ चे अव्वल सालपासून याजकडील मामलेदाराकडे देणें. जाणिजे. छ ४ माहे रबिलाखर. बहुत काय लिहिणें?

---

श्री

१६२ श. १७०१ श्रा. शु. ९
(भा. व. २-५८) ता. २०।८।१७७९

पो छ २२ साबान अस्तमान

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री विसाजीपंत बापू स्वामींचे सेवेसी

पोष्य नारो हरि निकम निा बाळाजी शंकर निकम फरासखाना साष्टांग नमस्कार विनंती विशेष. आम्हांस सरकारांतून डाक बसवावयासी पाठविलें होतें. त्यास आम्हीं कोंडाईबारीवर असों. यानंतरी केसोपंत दातार व केशरासिंग परदेशी पांचशें फौजसुद्धां गुलजारखान याजकडे गेले ते आपणास कळलेच असतील. यांणीं छ ६ साबानीं शुक्रवारीं सायंकाळीं नवापुरचें ठाणें घेऊन गांव लुटून पांच हजार खंडणी घेतली. अद्यापि ठाणें आहेत. विसरवाडी व हालदाणी व नवापूर मिळून तीनशें गाडदी आहेत. मागाहून सौभाग्यवती आनंदीबाई व अमृतराव व बाजीराव हेही येणार आहेत. बायजीपुऱ्यावर आले म्हणून आवई आहे. तरी तुम्हीं सावध असावे, याप्रमाणें सरकारची आम्हांस आज्ञा आली म्हणोन आपणांस लिहिलें आहे. आपण आमच्या डाकेनें डाक मिळवून एक वाचणार जासूद ठेवावा म्हणजे आम्ही आपणास पत्र लिहीत जाऊं. वकिलाचे नांवाचा एक लखोटा होता तो रवाना केला. कळावें. लोभ करावा हे विनंती.

हे पत्री येसाजी नाईक याचा रामराम. पत्र पाठवून सांभाळ करावा.

---

श्री

१६३ शके १७०१ श्रा. शु. १४
(भा. व. २-५६) २५-८--१७७९

पौ छ ७ रमजान समानीन भाद्रपद

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक गोविंद यादव परचुरे दिंमत नारो कृष्ण कृतानेक नमस्कार विज्ञापना तागायत छ १२ साबान मुक्काम चोपडें येथें स्वामीचे कृपावलोकनें सेवकाचें वर्तमान यथास्थित असें विशेष. स्वामींनीं छ १५ रजमानचें आज्ञापत्र सादर झालें, तें छ ५ साबानीं पावलें. तेथें आज्ञा कीं गुलजारखान टोके याचे पारपत्यास वगैरे बंदोबस्तास सरकारांतून फौजसुद्धां राजश्री विसाजी आपाजी रवांना केले आहेत, त्यास तुह्मीं मशारनिल्हेस अनुकूल

होऊन हे सांगतील त्याप्रमाणें सरकार कामकाज करणें ह्मणोन आज्ञा. ऐसियास हुजुरून आनंदराव जिवाजी पथकसुद्धां खानमजकुराचे पारिपत्यास रवाना केला. ते नांदेडचे मुक्कामास आले. तेंच मुक्कामीं आह्मी मशारनिल्हेजवळ येऊन दाखल झालों. राजश्री त्रिंबकराव नारायण राजेबहादर याणीं खानमजकुराकडील तह करून माघारे मालेगांवास येऊं लागले. तेव्हां आह्मी आनंदराव जिवाजी याजपाशीं निरोप मागोन जात होतों. परंतु मशारनिल्हेस चोपड्यास यावयाचें या अर्थी निरोप न देत. समागमें घेऊन आले त्या दिवसापासून येथेंच आहों. सरकारचें काम समयोचित घडोन आलें, तें करावें लागलें. त्या अन्वयें वर्तणूक केली आहे. राजश्री विसाजी आपाजी फौजसुद्धां छमजकुरीं चोपड्यास दाखल झाले. गुलजारखान स्वारी करून कसबे मजकुरीं आला होता, त्याचे लढाईचा मजकूर राजश्री बाबूराव निकम यांणीं लिहिला आहे त्याजवरून निवेदन होईल. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञाप्ति.

---

श्री

श. १७०१ श्रा. वद्य. ३
ता. ३०-८-१७७९

१६४
( भा. व. २-४० )

श्रीमत् राजश्री नाना स्वामींचे सेवेसी

विनंती सेवक चिमणाजी खंडेराव साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ १७ साबान जाणून स्वकीय कुशल लेखन करावयास आज्ञा केली पाहिजे विशेष. आपली आज्ञा घेऊन स्वार जाहलों त्यातागाईत आजपरियंत जांबगांवीं होतों. छ १८ रोजीं स्वार होऊन खानदेशप्रांतीं गेलों. त्यास वीस रोज जांबगांवचे मुक्कामीं लष्करांत होतों. त्यास येथील सर्व मजकूर समजला. राजश्री महादजी शिंदे व तुकोजी होळकर हे उभयतां एकविचार होऊन राजश्री चिंतो विठ्ठल व सदाशिव रामचंद्र व महादेव गोगटा व नारो गोपाळ दिसत आबाजी महादेव यांचीं खलबतें नित्य होतात. त्यांत मजकूर हाच कीं, उभयतां सरदारांनीं पुणियाचे मुक्कामीं जाऊन आपल्यास व राजश्री हरिपंततात्यास दगा करावा, हा निश्चय येथें जाहला आहे. त्यास हे पुणियास आलिया आपण बहुत सावध असावें. यांचा इतबार एकरूप न करावा. खलबतास बोलावून दगा करावा हें यांचें मानस आहे. त्यास यांशीं आतां जें खलबत करणें ते आपल्या मजबुतीनें करावें. राजश्री देवाजीपंत निसबत भोसलें याचे वियमानें आंगरेज याचा सलुख होतो, म्हणून यांस बहुत कठिण आहे कीं, आमचे हातीं कांहीं संधान राहिलें नाहीं. नाना जैसें बोलेल तैसें करून, हे चारपांच जण शिंदे याजपाशीं आहेत, यांस हस्तगत करून घ्यावें, मग फितूर मोडलासा होईल. नाना, मी गरीब; मीं हें लेहूं नये. परंतु मी आपले पदरचा. मजला दुसरा उपाय नाहीं. सर्व माझी लज्जा आपल्यास आहे. श्रीमंत एक होऊन मज गरीबावर आरोप न ये तें करावें. जाहलें वर्तमान सेवेसीं लिहिलें आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

१६५ श्री

[भा. व. २-८२] श. १७०१ श्रा. वद्य ६

ता. २-९-१७७९

पौ छ ७ रमजान समानीन भाद्रपद

राजश्री नानासाहेबांचे सेवेसी

श्रीमंत आज्ञाधारक बाबूराव निकम दंडवत विज्ञापना. तागाईत छ २२ साबानपर्यंत साहेबांचे कृपेंकरून कसबे चोपडें येथें वर्तमान यथास्थित असे विशेष. छ १६ रजबचें आज्ञापत्र सादर झालें तें छ २४ मिनहूस पावलें. तेथें आज्ञा कीं राजश्री विसाजी आपाजी बरोबर मुसा नारने[1] तोफा तुह्मांकडे रवाना केले. लौकरच येऊन पोहोंचतील. गुलजजारखानाचें पारपत्य पुरतें करणें प्राप्त आहे. तुम्हीं सर्व लोकांची खातरजमा करावी. आपले पथकांतही सरदार येथून लवकरच पाठवूं. तुम्ही या प्रसंगीं तेथें होतेत हें उपयोगीं फार पडलें म्हणोन आज्ञा. ऐसियास आज्ञेप्रमाणें सर्व लोकांची खातरजमा केली. पुन्हा लढाईवर कायमच आहेत. आम्हीं येथें राहिल्यानें फार उपयोगीं पडलें. त्यास आम्हांस सेवक लोकांचा स्वधर्म आहे तोच आम्हीं करावा. राजश्री विसाजी आपाजी यांची रवानगी केली. ते गंगेवर येऊन तेथून आह्मांस पत्र पाठविलें कीं, तुम्ही कोठें आहां व गुलजारखानापाशीं जमियत किती आहे तें सविस्तर लिहोन पाठवावें. त्याप्रमाणें आम्हाकडील व खानमजकुराकडील जमियतीचा प्रकार लिहोन पाठविला. त्याउपर त्यांणीं तेथून कूच करून राजश्री पाराजीपंत व भगीरथराव शिंदे कासारबारीवर पंधरा दिवस मुक्काम करून होते, त्याजपाशीं येऊन दाखल झाले. ते व हे कासारबारी उतरोन प्रतिनिधींची फौजसुद्धां मुक्काम करोन आहेत. अद्याप चोपड्यास येऊन दाखल झाले नाहींत. राजश्री उमाजी लक्ष्मण त्यांचे फौजेंतून आले, ते छ १३ साबानीं चोपड्यास दाखल झाले व दुसरें आज्ञापत्र छ १९ रजबचें सादर झालें. तेथें आज्ञा कीं राजश्री गोविंद कृष्ण कमावीसदार तूर्त मामलतसंबंधें कारभार करतील त्यास मोकळें करावें. गुलजारखानाचे पारपत्याची मसलत तुम्हीं करावी. गोविंद कृष्ण पूर्ववतप्रमाणें तूर्त कारभार करतील; त्यास आज्ञेप्रमाणें मशारनिल्हे कामकाज करूं लागले. आम्हांस इतका प्रकार करण्याचें कारण नव्हतें. परंतु आह्माकडील जामियत कमी, शत्रु समीप; तेव्हां आपला आबताब ठेवून सरकारचा नक्ष रक्षणें. त्या पधतींस याची चाल उपयोगीं न पडे त्या अर्थी सरकारच्या नक्षाचें लक्ष जाणून हें काम करणें प्राप्त झालें. यास अटकाव केल्यामुळें परगणे मजकुरची लावणीची घालमेल झाली इतकें दूषण आलें. त्यास चोपडे कसबा परगण्याच्या शेवटावर अगदींच गांव कसुराच्या तणाव्यांत. खानमजकुरापाशीं फौजेचा जमाव भारी, पांच सात गांवें मातबर तीं बळकावून पाटलाचें खंड केलें व गांवें लुटलीं. या दहशतीमुळें रयत सहजच परागंदा झाली. ऐसें असोन रयत आवतें धरूं लागले म्हणजे राऊत पाठवून त्याचें पारपत्य करूं लागले. तेव्हां लावणी कशी होणार? येविशीं वारंवार विनंतीपत्र लिहीत गेला कीं, हजार फौज जलद येऊन पोहोंचल्यास खुलासे उपशमन होऊन लावणीचा वगैरे बंदोबस्त

1. Noronha

होऊन येईल. परंतु कुमक यावयाची उपेक्षाच झाली; तेव्हां लावणी व्हावयाचा विचार सहजच राहिला. ऐसें असोन कसब्याचे आसमंतभागीचे गांव आहेत त्याची लावणी प्रसंगोपात व्हावयाची ती केलीच आहे. हल्लींही सरकारांतून फौजा रवाना झाल्या आहेत. त्याही वाटमार्गे येतच आहेत. राजश्री विसाजीपंत येथें आलियावर त्यांची भेट घेऊन त्यांस सविस्तर येथील समजावून आम्ही साहेबांचे भेटीस येतों, तेव्हां येथील सविस्तर मजकूर निवेदन होईल. सरकारचीं पत्रें हुजऱ्याबरोबर विंचूरकर व पान्हेळेकरास तोफाविशीं व रामचंद्रराव पवार साकरीकर, भोसले व भोईटे यांस पथकसुद्धां मदतीविशीं आलीं, त्यास भोसले व पवार आले आहेत म्हणून पेशजीं विनंतीपत्रीं लिहिलेच आहे. विंचूरकरांचा व भोईट्यांचा मजकूर हुजरे सांगतील त्याजवरून ध्यानांत येईल. बहुत काय लिहिणें हे विज्ञापि. गुलजारखान फौजसुद्धां छ १४ साबानीं कसबेमजकुरीं मागील प्रहर रात्रीस येऊन कसब्याचे पश्चमेस देशमुखाची गढी गांवलगतीच आहे तीस मोर्चे लावून कसब्यासही लाविले. रात्रीचा समय. अभ्र आलें होतें. यामुळें राउतांनीं बाहेर निघोन मोर्चे उधळून यावयाची सोय न पडे, त्याचे फौजेचाही गर्भ न समजे, या अर्थी गांवांतील व गढीवरील मोर्चे धरून एक प्रहरभर लढाई झाली. शें दीडशें माणूस जखमी व पंचवीस माणूस ठार पडलें. उजाडतांच स्वारीची तयारी होऊन गांवाबाहेर निघोन त्याचे मोर्चे व फौज उधळून दिल्ही. एक कोस पर्यंत पाठलाग केला. पांच सात घोडीं ठार पडलीं. एक मातबर शिलेदार कामास आला. आपल्याकडीलही दोघे चौघे भले लोक जखमी आहेत. राजश्री विसाजी आपाजी फौजसुद्धां छमजकुरीं चोपड्यास दाखल झाले. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापि.

---

१६६ श्री श. १७०१ श्रा. वद्य ११
(भा. व. २-५३) ता. ६-९-१७७९

पौ छ ४ रमजान समानीन दोनप्रहर भाद्रपद

राजश्रिया विराजीत राजमान्य राजश्री विसाजीपंत बापू स्वामीचे सेवेसी

पोष्य नारो हरि साष्टांग नमस्कार विनंती विशेष. आम्ही कोंडाईबारीवर छ २४ साबानपावेतों डाकेवर असो. विशेष. पेशजीं आपणाकडे पत्र पाठविलें त्याचा मजकूर ध्यानास आणून उत्तरीं पाठवावें. यानंतरी हल्लीं वर्तमान तरी श्रीमंत दादा कुटुंबसुद्धां सुरतेसच आहेत. परंतु आमावस्या झाल्यानंतरी राजाराम गोविंद दोन तोफा घेऊन केसोपंतांकडे[२] जाणार आहे. तुम्हीं त्यासागें सावध असावें. आम्हीं एक जोडी सुरतेस व येसाजी नाईक पाठविला आहे, त्यास ते आल्यानंतरी आपणास काय तें लिहून पाठवूं. कळावें. लोभ करावा हे विनंती.

---

१ देशस्थ ब्राह्मण, उपनांव कापुरवाडीकर, दादासाहेबांचे पक्षांतला.

२ केसो कृष्ण दातार.

१६७ श्री
( भा. व. २. ८० ) श. १७०१ भाद्र. शु. ८
ता. १८-९-१७७९

सेवेसी विनंती. सेवक मल्हार विठ्ठल दिंमत रास्ते ठाणें बागलकोट शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान तागाईत भाद्रपद शुा ८ पावेतों स्वामीचे कृपावलोकनें-करून क्षेम असे विशेष. अलीकडील वर्तमान सावनूरकर नबाब यांणीं आपला दिवाण खंडेराव यास हैदरखानाकडे पाठवून आपली लेक मशारनिल्हेचा धाकटा पुत्र करीमास द्यावयास केली. बंकापुरीं शादी होणार. उभयपक्षीं सरंजामाची तरतूद होत आहे. खासा हैदरखान बंकापुरास शादी करावयास येणार. लग्नकार्य सिद्धीस गेल्यानंतर सावनूरकराचे बेवीस महालांपैकीं अकरा महाल त्याजकडे चालत नाहींत, ते त्यास घेऊन देऊन पूर्ववत-प्रमाणें बंदोबस्त करून द्यावा, याप्रमाणें निश्चय ठरला आहे, म्हणोन पट्टणाहून सौदागर वगैरे बेपारी येतात ते सांगतात. घडेल तें पहावें. प्रांताचा मजकूर तरी बागलकोट पर-गण्यापैकीं पन्नास हजारांचीं खेडीं घेतलीं तीं कांहीं सुटत नाहींत. वरकड प्रांत राहिला त्याचीं गुरें नेलीं व दाणादुणा लुटून नेला. याजमुळें लावणी होत नाहीं. फौजा येऊन बंदो-बस्त जाहला तरी उत्तम. नाहीं तरी परिणाम सुधा नाहीं. रमजान महिना गेल्यावर हैदर-खान बंकापुरास येणार म्हणून चहूंकडून वर्तमान येत आहे. सेवेसीं कळावें म्हणोन विनंती लिहिली असे. श्रुत होय हे विज्ञापना.

---

१६८ श्री
( ना. भो ११ ) श. १७०१ भाद्र. शु. १२
२२-९-१७७९

( सवाई माधवराव पेशवे व रघोजी सेनासाहेबसुभा यांचे सवालजबाब+ )

१. सवाल-ब्रम्हेश्वरचा तह झाला तो कैलासवासी रावसाहेब यांची मर्जी रक्षून निरोप घेतला; दोन वर्षे प्रचीत पुरवून विनंती करावी हा निश्चय होता, त्या वेळेस बोलणें तसेंच राहिलें. त्यास सांप्रत तें ऐकून काय तें सांगितलें पाहिजे. कलम १

जबाब-उचित आहे तेंच बोलावें. याप्रमाणें करार करावे.

२. सवाल-तीर्थस्वरूप सेनाधुरंधर यांचा व नबाबाचा अलजपुरावर तह झाला त्यासीं पांच वर्षे झालीं. तहांत करार कीं, रा रघुनाथराव दादा यांशीं सोडावें आणि रा पंतप्रधान यांचा पक्ष धरावा, त्याप्रमाणें अमलांत घडून आलें किंवा नाहीं हें उत्तर व्हावें. कलम.

---

+ भोसल्याचे सवाल, पेशव्यांचे जबाब. पहा इ. सं. पे. दप्तरांतील सनदापत्रें पृ. १८१-८३.

जबाब—तीर्थस्वरूप राजश्री दादा साहेबांचा पक्ष सोडून सरकार लक्ष्यांत राहून वर्तणूक केली येविशीं निशा आहे. लौकिकांतही प्रसिद्ध आहे. सरकारची खातरजमा जाहली. येणेंप्रमाणें करार करावे.

३. सवाल–इंग्रज येऊन दोन महिने हुसंगाबादेवर बसले. इंग्रजांची व आपली तूट आणि कटकचे बदल खातर. आम्ही त्यांशीं स्नेहाचे रीतीनें दोन अडीच महिने दिवस घेतले. येणेंकरून चोंहींकडे एक प्रकार दिसला, परंतु येथें लक्षांत रतिमात्र अंतर झालें कीं काय येविषयींचें उत्तर झालें पाहिजे. कलम १

जबाब.—येविशीं पक्की खातरजमा झाली. संदेह राहिला नाहीं. इंग्रजांकडील पत्रें दाखविलीं त्यावरून पूर्ते समजलें. येणेंप्रमाणें करार करावे.

४. सवाल—इंग्रजांचा व सरकारचा बिघाड; इंग्रज रा॥ रघुनाथराव दादा यांशीं पुढें करून दौलतीस उपद्रव करूं लागले; तेव्हां आम्ही सरकारचे लक्षांत याजमुळें कटक प्रांतांस व प्रतिवर्षी १४ लक्ष रुपये द्यावे, या शिवाय वीस वर्षे मकसुदाबादेस मागील बाकी आहे, यास इंग्रज पेंच बसवितील त्यास बिघाडाचे पोटांत पेंच बसविला तरी चिंता नाहीं. सरकारची मदत असावी. समजून घेऊं. इंग्रजाचा आपला सलूख होऊन तह झाला तरी आमची वाट काय त्याची आज्ञा करावी. कलम १

जबाब—कटकास इंग्रजाचा पेंच पडल्यास सरकारांतून मदत केली जाईल. येणें-प्रमाणें करार करावे.

५. सवाल—सर्वांचा आमचा वालीपणा ईश्वरदयेनें येथें राखिला आहे, यासी उपद्रव इंग्रज, हैदर नाईक अगर कोणी करूं लागले तरी आह्मांस इतला अगोदर दोन महिने व्हावा. जमि-यतीनिशीं शक्तीप्रमाणें हजर आहों. या खेरीज कोठेंही फौज पाठवा अगर आमचे सरकारची फौज जाती, याजबरोबर आपली फौज यां ही गोष्ट नसावी, सबब घरांत भाावबंदाचे पेंच व वऱ्हाडांत नाना प्रकारचे उपद्रव व संबलपूर आदिकरून रजवाडे व मंडल आदिकरून कामें, भोपाळ आदिकरून कामें बिघडून राहिलीं आहेत; याज-करितां फौज पाठवावी हें माफच असावें. केवळ दौलतीवर पेंच बसल्यास एक इशारा आला म्हणजे बेउजूर आहों. कलम १

जबाब—मातबर मसलतीस बोलाविलें जाईल, ते समयीं फौजसुद्धां तुम्ही यावें. शिवाय मसलतींत दरसाल बोलावणें होणार नाहीं. येणेंप्रमाणें करार करावे.

६. सवाल—तीर्थरूप सेनाधुरंधर याजकडून राजश्री रघुनाथरावदादा यांनीं तेरा लक्ष रुपयांचा रोखा लिहून घेतला आहे; त्यास त्यापैकीं साडेसहा लक्ष रुपये त्यांनींच माफ केले. बाकी साडेसहा लक्ष रुपये त्यांनीं आह्मांजवळून घ्यावे अथवा त्यांनीं माफ करावे हा जिमा ईश्वरेंच त्यांजकडे ठेविला नाहीं. तेव्हां ईश्वरसत्ता आपणाकडेस आहे. त्यास आम्हांकडून जी वर्तणूक घडली आहे ती ध्यानांतच आहे. येविषयीं काय आज्ञा ते

करावी. हें न लिहितों, परंतु तेरा लक्ष रुपयांचें खत राजश्री बाबूराव विश्वनाथ यांनीं दाखविलें तेव्हां हें लिहिणें प्राप्त आहे. यास्तव येविशीं आज्ञा केली पाहिजे. कलम १

जबाब—तुम्ही बंगाल्याची मसलत अंतःकरणपूर्वक कबूल केली; सबब १३ लक्ष रुपये माफ केले आहेत. रोखा माघारा द्यावा. येणेंप्रमाणें करार करावे.

७. सवाल—आम्ही आपलेही पूर्ती खातरजमा झाली असली तरी दायादसंबंधी प्रकरण घरकृत्यें घडतच असतात; त्याची नालीश सरकारांत येत असती, त्यास येथून मनोधारण त्याचे रक्षायास पत्रें जातील त्याशीं हे गोष्ट न घडावी; आमचे दायादसंबंधी आहेत त्यांजला जागा सरकारांत न व्हावी, अगर नबाब निजाम अलीखान बहादूर, व शिंदे, होळकर सरदार यांजकडेस कोणी पत्रें लिहील अथवा जाईल याशींही येविषयीं पत्रें लिहून त्यांचा थारा न व्हावा; अखंड लोभ करून आम्हांवर अंतरबाह्य मदतच असावी. आमचे दायादसंबंधाचीं पत्रें व राज्यकारण येईल तरी त्याचा इतल्ला आम्हांस होत असावा, आम्हाकडेस कोठीलही पत्रें अथवा राज्यकारण आलें वर त्याचा इतल्ला वरचेवर करण्यांत येईल. कलम १

जबाब—सरकारचा तुमचा स्नेह व तुम्ही सरकारलक्ष्यांत त्या पक्षीं अशा गोष्टी घडणार नाहींत येविशीं खातरजमा असावी. येणेंप्रमाणें करार करावे.

८. सवाल—आम्हांकडील संपूर्ण प्रांत किती, यांत वसूल काय, याजपैकीं धर्म परंपरा कैलासवासी तीर्थस्वरूप बावासाहेब व बाबासाहेब यांजपासून चालत आला आहे किती, बाकी राहिली काय, त्याजपैकीं चिरंजीव चिमणाबापू व चिरंजीव मन्याबापू आदिकरून यांजकडेस काय, व संसारखर्च व खाजगीचा खर्च किती आहे, जाऊन बाकी राहिली त्यांत फौज किती असावी ही आज्ञा करावी; याखेरीज अधिक फौज ठेवणें, सरकारचे आज्ञेप्रमाणें महत्कृत्यावर उपयोगी येणें, याजविषयीं मार्ग दाखवावा. कलम १

जबाब—तुम्ही सर्वजाण आहां; दौलतीप्रमाणें समजून सावधपणें खर्चेंच करीत जावा. येणेंप्रमाणें करार करावा.

९. सवाल–नबाब निजाम अलीखान बहादूर याचा व आमचा अलजपुरावर तह झाला, ते वेळेस नबाबांनीं तहांत लिहून दिलें कीं, गंगथडी व वऱ्हाड आपले मामूल घेत जाणें, आणि स्नेहामध्यें अंतर नसावें, त्यास आम्हांकडून त्याचे स्नेहांत कांहीं अंतर आहे कीं काय, त्याचें उत्तर झालें पाहिजे. नबाबांनीं मामूल रुपया घेत जाणें म्हणून तहांत लिहून दिलें असतां, त्याप्रमाणें त्यांजकडून घडून आलें कीं काय, हें मनास आणून वडीलपणें सांगणें तें सांगावें; अगर मामुलप्रमाणें पैसा वसूल झाला नसला तरी मनास आणून आम्हांस मिळावा येविषयीं आज्ञा करावी. कलम १

जबाब.—येविशीं नबाबाशीं बोलून बंदोबस्त केला जाईल. येणेंप्रमाणें करार करावे.

१०. सवाल—वऱ्हाडांत अलजपुरी सुभा असावा; फुटकर जहागीरदारांपाशीं परगणे मात्र असावेत. अलीकडेस बमोजीब फौज त्याचा राहिवास तेथेंच पडला. त्यास जहागीर पांचचार हजार फौजेनिशी राहूं लागलें आणि प्रांतांत उपद्रव करितात; मामुल चालत नाहीं, तेव्हां नागपुरीं फौज दहा हजार नेहमीं असावी हे प्राप्त. येविशीं काय आज्ञा ते करावी. नबाबाकडून मामुलींत अंतर पडूं नये हें वडीलपणें सांगावें. कलम १

जबाब—येविशीं नबाबाशीं बोलण्यांत येईल. येणेंप्रमाणें करार करावे.

११. सवाल—तालुके कडेवर्लात येथें देशमुशखीचे कामावर आम्हांकडून गुमास्ते पुरातन आहेत. त्यास त्यांचे तेथील जबानी हकीकत ऐकून व मागील पत्रें आपण पाहून वतनाचा बंदोबस्त आपण करून द्यावा. कड्याचें ठाणें आम्हांकडेस द्यावें हें उचित आहे. सांप्रत वतनांवर गुमास्ते हक्क रुसूम कानूकायदे घेत आहेत. परंतु दरम्यान पेंच आहेत ते दूर करावे. पेंचामुळें वतन सुरळीत नाहीं. कलम १

जबाब—इनसाफाचे रुईनें होईल त्याप्रमाणें अमलांत येईल. येणें प्रमाणें करार करावे.

१२. सवाल—सरकारांतून वकील आम्हांजवळ एक वर्तमान लिहावयास असावा व आम्हांकडील सरकारांत एक ब्राह्मण राहील. त्यास आपलेकडील वकील ऐसा नसावा कीं हातीं बहुमान देणें लागे, व उगाच दरबार भरून मनस्वी राजकारण करीत असावा, असा नसावा. खरें लिहिणार व गरीब असा असावा. अथवा आह्मीं बोलूं तो समागमें द्यावा कीं सदैव आपली ममता यथास्थित राही, आणि संदेह न येई, गृहस्थ पापास भिये ऐसा योजून द्यावा. कलम १

जबाब—सरकारांतून शाहणा मनुष्य देऊं तो तुमचे मर्जीप्रमाणें चालेल. येणेंप्रमाणें करावा.

१३. सवाल—नबाब आम्हांवर चालून आले तेव्हां जफरुदवलाचे[1] विद्यमानें भेटींत तह झाला. हें त्याचें एहसान समजून परस्परें भाईचारा आहे हें समजून पत्रें येतात जातात, घरोबा चालतो, येविशीं चित्तांत संशय ठेवूं नये. आह्मी क्रियापूर्वक साथी आपले आहों. कदाचित् मामलतीमुळें अगर कसाही आपले मनांत विक्षेप आला तरी आम्ही मध्यस्थीनें बोलूं; परस्परें बजाऊन देऊं. जर हें उभयपक्षीं न च घडे आणि इरादा शेवटास गेला तरी इरादासारिखें काय तें घडेल. कलम १

जबाब—दिवाकर पुरुषोत्तम यांनीं निर्मळेस जाऊन वाजवी मामुलप्रमाणें स्वराज्याचा

---

१. हा निजामाचा वजीर असून 'निर्मल'चा सुभेदार होता. याचें इस्मायलखान, इलिचपुरचा सुभेदार याच्याशीं फार वांकडें होतें. यासच "धौंशा" असें म्हणत. याच्या हाताखालीं इतिहासप्रसिद्ध मुशीरउल्मुल्ख कांहीं दिवस वकीलीवर होता. याचें पूर्ण नांव —इब्राहिम बेग जफरुदवला झाबिदजंग. यानें सन १७७३ मध्यें कुंभारी येथें लढाई झाल्यावर साबाजीस चांगली मदत केली.

सरकारचा अंमल जफरुदवला याचे तालुक्याचा फडशा करावा. वाजवी फडशा झाल्यावर त्याविशीं दुसरा प्रकार नाहीं. त्यांनीं सरकारलक्षाप्रमाणें वर्तावें. येणेंप्रमाणें करार करावे.

१४. सवाल—मंडळाच्या राजाचा निर्वंश जाहला. उगेच गोत्रपुरुष एक म्हणतात आणि आमचे तों मंडलेवाल्याकडे सोळा परगणे थोरले कैलासवासी रावसाहेबांनीं जे समयी मंडलें घेतलें ते वेळपासून त्यानीं करारांत अंतर केलें. परगणे आह्मांकडे न दिले. आह्मांवर बंगाल्याची मोहीम दरसाल जाणें व स्वराज्यांत बदनिशा अखण्ड, तेव्हां बनेल तसें घेऊन नातें चालवित गेलों. जेव्हां तिगस्तां फौजेसुद्धां तीर्थरूपाचें जाणें जाहलें ते वेळेस पत्रें व खलिते वरचेवर पाठविण्यांत आले कीं आषाढ जवळ आला; आतां अटकूं नये. हें पत्रें जातां फिरणें जाहलें. फौजेचा पेंच बसला; त्यास मंडल्याचें पारपत्य करून सोळा परगणे आह्मी आपले घेऊन बाकी पैका अगर परगणे स्वस्थान निमे सरकारांत आणि निमे आह्मांकडे द्यावें हीं आश्वासनपत्रें आपलीं आहेतच. करार झाला आहे. स्वराज्य बलाढ्य व्हावें, हें यांत आहे. कलम १
जबाब—मंडल्याचें राज्य तुम्हीं सोडवावें, त्यांपैकीं तुमचे करारांचे महाल आहेत ते जाऊन बाकी महाल राहतील ते खंडोजी भोसल्यांस "सेनाबहादर" किताब देऊन सरकारांतून फौजेस सरंजाम करार करून दिला जाईल. सरंजामाबरहुकूम त्यांनीं एकनिष्ठपणें सरकारची सेवा करावी, मग ही मसलत करावी, आधीं या स्वस्थानास गुंतूं नये. येणेंप्रमाणें करार करावें.

१५. सवाल—भोपाळवाल्यांनीं हुसंगाबाद शिवनी आज तीस वर्षे देवगड प्रांताची पुरातन असतां दरम्यान घेऊन राहिला. सरकारांतून ताकीद कैलासवासी नानासाहेब व रावसाहेब यांच्या वरचेवर पाठवीत गेलों. तो ऐकत नाहीं; तेव्हां तंबी करणें हेंच प्राप्त; येविशीं कायतें सांगितलें पाहिजे. कलम १
जबाब—सरकारचीं ताकीदपत्रें घ्यावीं, वरचेवर ताकीद केली जाईल. येणेंप्रमाणें करार करावें.

१६. सवाल—इंग्रजाचा व सरकारचा तह झाला तरी फार उत्तम आहे. न होय आणि बिघाड ठरला तरी फौजा बंगाल्यास आज्ञेप्रमाणें जातील. त्यास बंगाल्यांत फौजा जाणें आणि नागपुरांत फौज राहणें हे संकट आहे; दोनचार हजार फौज राहील. थोडकी फौज पाहून कुटुंबासुद्धां तरी तेथें राहणें; त्यास उपद्रव कोणीकडून होऊं नये याविशीं मदतच होत असावी. दायादसंबंधी व इतर पेच पडूं नयेत येविशीं खातरजमा आमची असावी. आणि येविशीची कळकळ सरकारांत राहात असावी. कलम १
जबाब—किरकोळ उपसर्गास तुमची फौज राहील, व सरकारांतूनही मदत होईल. मातबर पेंच पडल्यास मुलें मनुष्यें गाविलीवर न्यावींत. येणेंप्रमाणें करार करावे.

१७. सवाल—परगणे उमरखेड तेथें पहिलेपासून पांच हजार रुपये ऐन व एक हजार रुपये कारकुनी, एकूण सहा हजार रुपये पुरातनपासून घेण्यांत येत होते. दरम्यान सदरहूप्रमाणें ऐवज पावत नाहीं याजकरितां येविशीं कमावीसदारांस ताकीद होऊन सहा हजार रुपये देवविले पाहिजेत. कलम १

जबाब—तीन हजार रुपये दरसाल घेत जावे. माहालास कोणेविशीं तुमचा उपद्रव लागूं नये. येणेंप्रमाणें करार करावे.

१८. सवाल—आपण सोळा वर्षांचे होतेपर्यंत आम्ही कोणही मुलूख अगर महाल मागूं नयेत येविशीं शपथ वाहिली आहे. त्यास आह्मांपासून एकनिष्ठेंत रतिमात्र अंतर नाहीं; आम्ही पुरते सरकारचे सोबती ही पक्की खातरजमा जाहली. ऐसें असल्यास संतोषें करून जें उचित असेल तें सरदारीच्या हवाल्यातून लोभें करून करावें. येणें करून लौकिक सरदारीचा चांगला दिसेल आणि सर्वत्रांस कळे कीं यांणीं निष्ठेनें वर्तणूक केली, याजकरितां यांजवरी सरकारांतून कृपा जाहली हें दिसावें. कलम १

जबाब—येविशीं उचितानुचित तें समजोन उचित केलें जाईल. येणेंप्रमाणें करार करावे.

१९. सवाल—चिरंजीव खंडोजी भोसले जवामर्द बेहोष आहेत, फौजकशी व सरदारीची हमेष उमेद राखतात. त्यास आळा होय आणि सरकारच्या व आमच्या उपयोगी पडत याजकरितां परभारां त्यांचा कांहीं बंदोबस्त घडत असला, सरकारांतून देण्याचा पेंच नाहीं, ऐसें असलें तरी विनंती मान्य करावी. कलम १

जबाब. जवामर्द सरकार उपयोगी हें जाणून मंडल्याचे सरंजामाचा आलाहिदा करार करून दिला आहे. येणेंप्रमाणें करार करावे.

एकूण एकुणीस कलमें सदरहूप्रमाणें करार करून दिले असेत, येणेंप्रमाणें करार करावे. चंद्र ११ माहे रमजान सुा सुमानीन मया व अलफ. भाद्रपद मास, मुक्काम गारपीर, पुण्यावर स्वारी गेली ते वेळेस तह ठरला.

---

श्री.

१६९

[भा. ब. २. ८३]

श. १७०१ भाद्र. वद्य ४
ता. २९-९-१७७९

सेवेसी केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ १८ रमजान बुधवार मुक्काम तोनदे परगणे चोपड येथें श्रीकृपेंकरून कंपितानेंसुद्धां मंडळी सुखरूप असो विशेष. छ ८ रमजानीचे लढाईचें व छ १० रमजानचें वर्तमान पेशजी छ १२ रमजानचे पत्रीं लिहिलें आहे त्यावरून कळलेंच असेल. आलीकडील वर्तमान नगरदेवल्याहून तोफा २ बहुत श्रमेंकरून आणविल्या. त्यापैकीं एक तोफ चार शेरी गोळ्याची मोठी, परंतु तिजला कोटी त्यामुळें तिचा गोळा लागूं न होय. दुसरी लमछड, तिचा कान वांकडा.

ऐकूण दोन्ही तोफा उपयोगी पडल्या नाहींत. बहुत दिवस मातींत पडल्या होत्या यामुळें लागू न झाल्या. आह्माकडील गोलंदाज आणावयास गेला होता, त्याणें लांब चांगल्या जाणून आणल्या. कानाचा व कोटीचा शोध त्याचे दृष्टीस आले नाहीं. तत्रापि छ १७ रमजानसि मागील सहा घटका रात्रीस फौजसुद्धां व तोफा ४ कंपितान वगैरे यांस घेऊन राजश्री विसाजीपंत बापू लासुरास गेले. लागभाग पाहतां तळ्याकडून मार गांवांत चांगला पडतो ऐसे जाणोन फौज घेऊन तळ्याकडे गेले. तेथें चार तोफा लावून गोळे चालते केले. परंतु नगरदेवळयाच्या तोफा लागू न होयेत. गोळे आलीकडेच पडत. आमचे तोफांचे गोळें मात्र गांवांत जात व बुरजावरील तोफांवर मार धरली. चाळीस पन्नास गोळे डागले. ऐसे करितां दीड पावणेदोन प्रहरपर्यंत मारगिरी जाहली. त्याजकडील एक तोफ बुरजावरील अर्धकोस माऱ्याची होती, तिनें इकडील चार पांच घोडीं व दोन तीन माणसें जायां केलीं. गोळे तों उदंडच आले. परंतु कोणास लागले नाहींत. आमचे तोफा व लोक त्याजकडील माराचे पोटांत आले म्हणोन कोणास लागलें नाहीं. याप्रमाणें होऊन पाणी नाहीं सबब मोर्चे न ठेवितां बापू फौजसुद्धां माघारे आले. बापूजीची तरतूद व मेहनत फार चांगली. दारूगोळ्याचें वगैरे सामान कांहींच नव्हतें, तितकें या प्रांतीं त्वरेनें करविलें. केसो कृष्ण गढींत आहे. जगन्नाथ नारायण पूर्वी श्रीमंत दादासाहेबांकडून जप्ती घेऊन आला होता, तो पळून गेला म्हणोन वर्तमान आहे. खानानें दाजी बाळकृष्ण यांजला उलटें टांगून लांकडाची मेख गांडींत मारली. जिवें मारिलें. त्याचा भाऊ नारोपंत त्यास कैद करून ठेविला आहे. गांवांत महागाई. पीठ दहा शेर व दाळ आठ शेर याप्रमाणें आहे. रयतलोक झाडून गांवांतून काढून दिल्ही. शिबंदीचें माणस आहे. पिंपळनेरच्या तोफा २ चांगल्या सरंजामासुद्धां सरकारच्याच आहेत. त्या धुळयास जासूद सोडून आला होता, त्या उद्या परवां इतक्यांत तेथें पोंहचतील. आल्यावर त्या तोफांनीं शत्रूचें पारिपत्य यथास्थित घडेल. बाहेरील आमचें सामान वगैरे बंद जाहलें. गांवांतील साहित्य कोठवर पुरेल. आम्हांसमागमें दारू व गोळयांचा व गोळे तोफांचे याचा सरंजाम दिल्हा होता, तो आठवे रमजानीचे लढाईंत फडशा जाहला. त्यापैकीं दारू कांहीं राहिली होती ते छ १० व छ १७ रमजानीचे लढाईत खर्च जाहली. इकडील दारू बापूनीं खंड्या दोनतीन पर्यंत आणविलीं, तेच हल्लीं खर्चास आहे. गोळेही लहानमोठे करविलेच आहेत. मुरारराव जाधव यांजकडील परगणे अमळनेर येथील मोकाशाचे ऐवजीं पान्होळेकरांकडे वरात वीस हजार रुपयांची आहे. पैकीं परभारें वराता झाल्या दहा हजाराच्या. बाकी दहा हजार राहिले होते ते हल्लीं सक्तीनें वसूल करून निशा बापूकडे करविली. त्यापैकीं त्याणीं आम्हांस दोन हजार रुपये खर्चास दिल्हे. पुढें आम्हांस खर्चाविषयीं परवानगी बापूसच लिहावी, तेथें रानांत आम्हांस कर्जवाम कोण देतो? यावर जैसी आज्ञा येईल तैसी वर्तणूक करूं. छ २६ साबानचें आज्ञापत्र आलें तें पाहून परम संतोष जाहला. कंपितानाचे नांवचेंही पत्र पावलें. ते सरकारचाकरीस फार सावध, मेहनतीस आळस करीत नाहींत. त्यांचें पत्र त्यांस वाचून दाखविलें. तेही बहुत संतुष्ट जाहले. वरकड वर्तमान

विस्तारें राजश्री बापूनीं सेवेसी लिहिलें असेल. इकडील गुंता लौकर उरकून चरण दृष्टीस पडावे हा निजध्यास रात्रंदिवस लागला आहे. बहुत काय लिहिणें ? लोभ असावा हे विज्ञापना.

---

श्री

१७० श. १७०१ भाद्र. व. १२
(भा. व. २-५७) ता. ६-१०-१७७९

पोा छ ३० रमजान अश्विनमास समानीन

सेवेसी गणेश काशी[1] साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ २५ रमजान वर्तमान यथास्थित असे विशेष. आज्ञापत्र सादर जाहलें तेथें आज्ञा कीं बाळाजीपंत व आदोपंत परगणे चोपडें येथें फौजसुद्धां आहेत, त्यास खर्चाची ओढ बहुत आहे, म्हणून राजश्री विसाजीपंत यांणीं लिहिलें आहे, तरी त्याचा खर्चाचा बंदोबस्त करावा म्हणून आज्ञा. त्यास चार पांच सालांचा फडशा तटला होता. जितकी गांवची जमा त्याच्या दुपट बाकी हिशेबीं राहिली. फडशा सोडी घालून केला तर पर्जन्य नाहीं, यामुळें खरीफ दरोबस्त गेलें, यामुळें फारच ओढ बसली. स्वामी सर्वज्ञ आहेत. आज्ञेप्रमाणें तरतूद करून रवानगी करितों. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

श्री

१७१ श. १७०१ आश्वि. व. १
(ना. भो. ६५) ता. २५-१०-१७७९

श्रीमंत महाराज राजश्री आपासाहेबाचे सेवेशीं

आज्ञाधारक परमोदसिंग जमातदार किल्ले गावेलगड व किल्ले नरनाळा व सावलीगड व भवरगड व भैरवगड कृतानेक विज्ञापना ऐसी जे. कै. झामसिंग हे बंगाल्याहून सरकारांत बक्षीरायाबरोबर पाडाव येथें आले. त्यास महाराजांनीं झामासिंग याजवर कृपाळू होऊन सर्फराज केलें. ते याप्रमाणें केलें कीं, वराडांत व संपूर्ण दक्षिणेंत लौकिक केला. त्यास हे मोठेपण आपल्यास. वर्तणूक ही त्यांजकडून चांगलीच जाली. परंतु खाविंदी नौकरीच्या चाली व निमकाची शर्त बजावणें व हुकुमदारीवर कायम राहणें हें सरकारांत गडबड झाल्यामुळें कोणकोणे वेळेस चूक सारखी दिसूं लागली. त्यास जो नवकर कुळीण आणि आपले बापांचे × × × असेल त्यास हुकुमाप्रमाणें वर्तणूक करणें.

किल्याचें काम नाजूक त्यास दस्तुर पूर्जा जसा येईल, अगर खांसा स्वारी आल्यास जितकी सरकारची मर्जी असेल तितकीं मनुष्यें किल्यावर घेण्यास नौकरीचा कायदा बेउजूर असावा. उगाच संदेह घेणें हे नौकरांस उचित नाहीं. यांत श्री ईश्वरापासून दूर पडेल तो

---

१. उपनाम कात्रे.

त्यास झामसिंग तो कैलासवासी झाले. महाराजांनीं झामसिंगाची आवलाद जाणून आमचे स्वाधीन केली तरी आह्मीं त्या अवलादीचे असूं व आमचे वंशज बावा नसेल, तरी आज्ञे-प्रमाणें वर्तणूक घडेल. दुसरें घडणार नाहीं. रतिमात्र अंतर पडेल तरी आह्मी रजपुताचे वंशीं नाहीं हे आमची महाराजांचे पायापाशीं शपथ असे. जे वेळेस जे समयीं अर्ध रात्रीस हुकूम येईल तो बजाऊनच आणण्यांत येईल; आज्ञेशिवाय दुसरें घडणारच नाहीं. शके १७०१ विकारीनाम संवत्सरे, आश्विन बहुल प्रतिपदा.

---

१७२ श्री

( ना. भो. ६३ ) श. १७०१ आश्वि. व. १
२५-१०-१७७९

श्रीमंत राजश्री आप्पासाहेबांचे सेवेशीं

आज्ञाधारक रामाजी केशव कृतानेक विज्ञापना ऐसी जे. कैलासवासी झामसिंग जमा-तदार बंगाल्याहून सरकारांत बक्षीरामाबरोबर पाडाव आले त्यास महाराजांनीं त्यावर कृपाळु होऊन सर्फराज केलें. किल्ले गाविलगड व किल्ले नरनाला आदिकरून स्थळें स्वाधीन केलीं, आणि सोर दक्षिणेंत लौकिक केला. येणेंप्रमाणें वाढविलें. त्यानेंही आपले इमानें सरकारची चाकरी केली. त्यावर त्याचा काल झाला. तेव्हां त्याचे वंशीचे त्याचे सख्ये पुतणे राजा-परमोदसिंग जमातदार किल्यावर होते ते व दर्याबसिंग आदिकरून मंडळी साहेबांचे पायां-जवळ आले, त्यास महाराजांनीं पूर्वीप्रमाणें कामकाज राजश्री परमोदासिंग जमातदार किल्ले-दार यास किल्ले गावेलगड, नरनाला, सावलीगड, भाबरगड, भैरवगड, येथील किल्लेदारी दिली; आणि परमोदसिंग लेकरूं म्हणून आमचे स्वाधीन केलें कीं, यांस तरबीज करून सरकारचाकरी एकनिष्टें करवावी, हे आज्ञा केली ती शिरसावंद्य केली.

मी साहेबांचे पदरचा नोकर पूर्वीपासून आहें. आज्ञेप्रमाणेंच वर्तणूक करून राजश्री परमोदसिंग जमातदार व राजश्री दर्याबसिंग जमातदार यांणीं सरकारांत शपेतेचे पूर्जे लिहून दिल्हे आहेत त्याचप्रमाणें त्याजकडून व सर्व लोकांकडून करवीन. यांत अंतर करीन तरी मी श्रीव्यंकटेश स्वामीचा भक्त आहें याची शपत असे; आणि मी ब्राह्मण वंशीचा आहें व आपले तीर्थरूपाचे वेळचा आहें, तरी महाराजांचे पायाशीं कदापि अंतर करणार नाहीं. हे शपत लिहून दिली असे. दुसरें घडणार नाहीं. आज्ञेप्रमाणेंच वर्तणूक घडेल.

ता. १४ माहे शौवाल शके १७०१ विकारीनाम संवत्सरे आश्विन बहुल प्रतिपदा समानीन मया अलफ; हस्ताक्षर व्यंकाजी भास्कर.

सही—रामाजी केशव. लिहिल्याप्रमाणें वर्तणूक घडेल. साहेबांचें पायाशीं अंतर होणार नाहीं. ता. छ. १२ माहे जिल्हेज सन ११८९ मु. किल्ले गावेलगड.

---

१७३ श्री

(ना. भो. ५६)

श. १७०१ आश्विन वद्य १
ता. २५-१०-१७७९

श्रीमंत महाराज राजश्री आप्पासाहेब साहेबांचे सेवेशीं

आज्ञाधारक दर्यावसिंग सोमवंशी वनतवाडी हिंदुस्थान गंगापार कृतानेक विज्ञापना ऐसी जे. कैलासवासी झामसिंग जमातदार बंगाल्याहून सरकारांत बक्षीरामाबरोबर पाडाव आले, त्यांस महाराजांनीं त्याजवर कृपाळु होऊन सर्फराज केलें कीं, किल्ले गाविलगड व किल्ले नरनाला आदिकरून स्थळें स्वाधीन केलीं. थेट दक्षिणेंत लौकिक केला ऐसें वाढविलें. त्यांनींही आपले इमानानें सरकारची चाकरी केली. त्याजवर त्यांचा अंतकाळ झाला. तेव्हां त्यांचेविषयीं त्याचे सख्खे पुतणे राजश्री परमोदसिंग जमातदार किल्यावर होते, त्या समवेत आम्ही हुजूर रायापाशीं आलों, त्यास महाराजांनीं कृपाळु होऊन पूर्वीप्रमाणें कामकाज राजश्री परमोदसिंग जमातदार किल्लेदार यास किल्ले गावेलगड व किल्ले नरनाला, किल्ले सावलीगड, भवरगड व भैरवगड एथील किलेदारी दिली, आणि परमोदसिंग लेंकरू आहे म्हणून आमचे स्वाधीन केलें कीं, यास तर्बेत करून याचे ताबेदारींत राहून किल्याचा बंदोबस्त राखावा; याप्रमाणें आज्ञा केली ती आम्ही सिरसा वंदून मान्य केली. आम्ही परमोदसिंग यास कैलासवासी झामसिंग जमातदार याचे जाग्याहून याचे ताबेदारींत राहूं आणि तर्बेत करूं आणि किल्याचा बंदोबस्त राखून समयीं जो सरकारचा हुकूम होईल तो त्याच वेळेस बजावून आणूं. दुसरी गोष्ट आम्ही व परमोदसिंग याजकडून, सर्व जमातदार लोक यांजकडून चुकी होऊं देणार नाहीं. खांसा स्वारी किल्यास आली तरी जितक्या मानसांनिशीं साहेब किल्यावर येतील तितक्यांनिशीं यावें. येविषयीं कांहीं कोणी शुभा[1] करणार नाहीं. सर्व लहानथोर साहेब धनी यांस श्री ईश्वराचे ठायीं मानून एकनिष्ठ चाकरी करूं, हा सर्व जिम्मा आमचा असे. परमोदसिंग मोठे होऊन आपलें कामकाज आटोपून, साहेबांची मर्जी रक्षून, चाकरी करी तोंपर्यंत आम्ही वतनास जाण्यास निरोप मागणार नाहीं. जेव्हां साहेब स्वसंतोषानें आज्ञा देतील तीच मान्य आहे. निष्ठा परी जन्मवरी, सेवा एकनिष्ठ आपण व सर्वांकडून करवूं, यांत अंतर करणार नाहीं. आपण रजपुताचे वंशीं असूं व आपले बापाचे वीर्याचे असूं तर ज्याप्रमाणें लिहिलें आहे त्याचप्रमाणें वर्तणूक करूं. दुसरें करणार नाहीं. ही शपत महाराजांचे पायांजवळ लिहून दिली असे. शके १७०१ विकारीनाम संवत्सरे आश्विन वद्य प्रतिपदा इंदुवासरे.

---

१. शुभा = वहीम, संशय.

१७४ श्री श. १७०१ आश्वि. व. ४
(भा. व. २. ७३) ता. २९-१०-१७७९

पौ। छ २१ सवाल समानीन अश्विन

श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसी

विनंती सेवक गोविंद राम मुक्काम कल्याण कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ १८ माहे सवालपावेतों वर्तमान यथास्थित असे विशेष. मुंबईकडील बातमीकरितां कारकून पाठविला होता तो आजच आला. त्यांणीं सांगितलें कीं गायकवाडांची व इंग्रेजांची लढाई भडोजेस झाली. याजकरितां हजार गारदी व सामान मुंबईहून गेलें. त्यास आह्मीं पुशिलें कीं, कलकतेवाले यांचे सात आठ हजार गारदी सुरतेस असतां मुंबईहून जावयास कारण काय? त्यास त्यांणीं उत्तर केलें कीं, कलकतेवाला मुंबईकराची व सुरतकराची कुमक करीत नाहीं, याजकरितां येथून गारदी रवाना केले. गायकवाडाची लढाई व इंग्रजाची भडोजेस बरीच झाली. शें दोनशें माणूस इंग्रेजाचें जाया झालें. याप्रमाणें वर्तमान तिकडील आहे. व मुंबईस वर्तमान आहे कीं, विलायतेस इंग्रेजांनीं पत्रें लिहिलीं आहेत, तीं आलियानंतर पुढें बिघाड करणें तरी करील. तेथील आज्ञेशिवाय बिघाड होतां दिसत नाहीं. वसईचा रोख पहिला लोकांचे सांगण्यांत व त्यांचे करण्यांत होता. तोही अर्थ आतां दिसण्यांत येत नाहीं. सामानाचीं गलबतें होतीं तीं तालचिरीकडे रवाना केलीं. याप्रमाणें वर्तमान आहे. व मुंबईतोन मातबर माणूस साष्टीस येऊन किल्याचे आसमंतात भागीं घरें आहत, तीं सरकारवाडा व राजश्री बलवंतराव फडनीस यांचे घरापर्यंत घरें मोडावयास काम लाविलें याचें कारण काय? हें न केल्याप्रमाणें आहे. पुढे बातमीस फिरोन मुंबईस कारकून व शिपाई पाठवितो आणि बातमी येईल ती सेवेसी लिहीत जाऊं. कोकणांत फौज पाठवावयाची तयारी झाली आहे. त्यासी तूर्त रवानगी न झालियास कामास येईल. विशेष बातमी असलियास ताबडतोब सेवेसी लिहून पाठवूं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

१७५ श्री
(ना. भो. २२) श. १७१०१ आश्वि. व. ५
ता. २९-१०-१७६९

रघोजी भोसले सेनासाहेब यांचे नांवें खंडोजी भोसले यांनीं पत्र लिहून दिलें. तें तीर्थरूप राजश्री आपासाहेबीं वडिलांचे व आमचे दवलतीचा बंदोबस्त करून देऊन परस्परें एकजीव एक प्राण होतों, तैसेंच तीर्थरूपें करून आपल्या आमच्या शपथा घेऊन खासदस्तूर पत्रें शपथेची लिहून घेतलीं. त्यास आपण वडील तीर्थरूपाचे जागीं आहांत. वडिलांचें पुण्यांनीं पद व मंडले सरंजाम त्याजपैकीं सोळा महाल सेनसाहेबसुभ्याचे दवलतींतील वजा देऊन मिळाले याचा बंदोबस्त राखून असों. वडिलांचे दवलतीवर काळ वेळ प्रसंग पडला

तरी वडिलांची आज्ञा येतांच अथवा वर्तमान ऐकतांच आम्ही जातीनें फौजेसुद्धां घेऊन शत्रूचे पारपत्यास साह्य होऊन शत्रूचे ताले न पडेत ऐसेंच घडून येईल. कदाचित् वडिलींही रोषही केला तरी अमर्याद वर्तणूक करणार नाहीं. येविशीं अन्तर करूं तरी आपल्यास श्री रामचंद्राची शपथ असे, व तीर्थरूप आपासाहेबांचे पायांची शपथ असे. सारांश आपण आम्ही एकोदरीं जन्म घेतला आहे त्यास ज्याप्रमाणें वडिलांस लिहून दिल्हें त्याजप्रमाणें चालूं. यांतच कल्याणदायक आहे. शके १७०१ विकारीनाम संवत्सरे मित्ति आश्विन बहुल पंचमी भृगुवासर.

---

१७६ श्री

(ना. भो. २०) श. १७०१ आश्विन वद्य ५

ता. २९-१०-१७७९

रघोजी भोसले यांणीं मुधोजी भोसले यांचे नांवें लिहून दिल्हें तें चिरंजीव राजश्री खंडोजी भोसले मजला सहोदर धाकटे बंधु आहेत. उभयतांचा जन्म वडिलांचे उदरीं आहे. आम्हीं परस्परें ऐक्यतेनें चालून आपल्या आपल्या दौलती रक्षाव्या; कारण राजमंडलांत, बंधुत्वांत व वडीलधाकटेपणांत विक्षेप होऊन बहुतांनीं आपल्या दवलती बुडविल्या, हें पुर्तें आमच्या ध्यानांत आहे. श्री ईश्वरें आजवर, सेनासाहेबसुभ्याची दवलत अक्षतमरिष्ट निभवली; आठ पिढ्या जाहल्या; पुढेंही श्री ईश्वरें ऐसेंच हजारों पिढ्या दवलत निभवावी हेंच आहे. याच अर्थीं चिरंजीवासी आपण तिळमात्र अंतर करणार नाहीं. काळवेळ समयीं दवलतीवर पेंच येत असतो; त्यावेळेस आह्मीं उभयतां एकजीव एकप्राण आहोंच, त्याप्रमाणें होऊन दवलतीविशीं एकासी एक अंतर न देतां वर्तून दवलती रक्षूं. चिरंजीवास जिवप्राणाप्रमाणें मानून परस्परें प्रेमानें राहून अंतर लौकिकांत दुसरें दाखविणार नाहीं; येवेशीं अंतर करूं तरी श्री रामचंद्र स्वामीची शपथ असे, वडिलांचे पायांची शपथ असे व तीर्थस्वरूप सौभाग्यसंपन्न मातोश्री बाईसाहेब यांचे पायांची शपथ असे. एक वेळ चिरंजीवा-पासोन लेकुरपणाचे अर्थे कांहीं अंतरही पडलें तर ध्यानांत आणणार नाहीं, बोधच करूं; दुसरें दाखविणार नाहीं. सारांश, आम्हीं उभयतां सहोदर आणि वडिलांनीं समक्ष प्रेमाची गठन घालून दिल्ही, ते आह्मी आपले उदरीं जन्म घेतला आहे. परस्परें अंतर करणारच नाहीं, येविशीं ज्या शपथा लिहून दिल्या आहेत त्या ईश्वर खऱ्याच करील; चिरंजीवास पद व मंडळा प्रांत सरंजामास मिळाला, त्यांत सेनासाहेबसुभ्याचे दवलतींतील सोळा माहाल वजा करून बाकी प्रांत चिरंजीवाकडे पदाचे व फौजेचे बेगमीस आहे; काळसमय कोठील पेंच उभारिला, हें वर्तमान कळतांच आम्ही सर्वात्मना साहित्य करूं. शत्रूचे ताले पडूं देणार नाहीं. या दवलतीवर प्रसंग पडल्यास तसेंच चिरंजीवाकडून साहित्य घडेलच; येविशीं परस्परें ज्या शपथा लिहिल्या आहेत त्या प्रमाणच आहेत. शके १७०१ विकारी संवत्सर, आश्विन बहुल पंचमी, भृगुवार.

---

१७७ श्री

(भा. व. २-६३) श. १७०१ कार्ति. शु. १

ता. ९-११-१७७९

विनंती सेवक बाळाजी रघुनाथ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ २९ माहे सवालपावेतों किल्ले डबईचें व सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. एक दोन पत्रें सेवेसी पाठविलीं आहेत त्यांजवरून सेवेसी विदित होईल. हल्लीं सुरतेची बातमी आली की, इंग्रज व श्रीमंत एकत्र होऊन या प्रांतीं येणार. शुद्ध पंचमीस निघणार. आधीं डबईस यावें हा मनसबा आहे. फकार[1] नामक यांणीं वस्तवानी मुलें माणसें सर्व काढून सडे झाले आहेत. हुजुरून फौज येणार ते एखादें स्थळ गेलियावर आल्यास मग स्थळ येणें कठिण आहे. यास्तव दहा पंधरा हजार फौज जलद सोनगडपावेतों आली म्हणजे यथास्थित आहे. चंद-रराव पवार डबई परगण्यांत आले होते; येथून काढिले; ते अमोदेस आहेत. त्यास शिबंदी ठेवावी म्हणोन सुरतेहून आज्ञा. त्याजवरून शिबंदी ठेवितात. सर्वांनीं मिळोन येथील स्थलास लगट करणार ऐसी बातमी आहे. कुमक दुसरी कोणी करतील ऐसें नाहीं. प्राणपर्यंत दम धरितों. परंतु कांहीं उपराळा असावा. वारंवार विनंती लिहितों. अव्हेर नसावा. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

१७८ श्री ता. १७०१ कार्ति. शु. २

(भा. व. २-३४) ता. १०-११-१७७९

पौा छ १६ जिल्काद

विनंती सेवक बाळाजी रघुनाथ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ १ माहे जिल्कादपावेतों किल्ले डबईचें व सेवकाचें वर्तमान साहेबांचे प्रतापेंकरून यथास्थित असे विशेष. राजश्री चंद्रराव पवार याजला श्रीमंतानीं डबईच्या जप्तीस पाठविलें. त्यांनीं परगणे-मजकुरीं येऊन कारवानचें ठाणें घेतलें. तदनंतरीं शिबंदी ठेवून मशारनिल्हेचें पारपत्य करून ठाण्याबाहेर करून दिलें. ये मसलतीस पंचवीस हजार खर्च झाला. हल्लीं पवारमजकूर आमोदेस तीन हजार प्यादे व पांचशें स्वार ठेवून ठाण्यांत आहेत. मागती परगणे डबईस येणार. त्यासी गकारपूर्व याच्या मुलुखास उपसर्ग नाहीं, व सरकारच्या मुलुखांत उपद्रव हुजुरची कुमक न झाली याची स्थित राहणार नाहीं. सरकारचीं आज्ञापत्रें गायकवाडावर येतात, परंतु कुमक होय ऐसा प्रकार दिसत नाहीं. इकडील आस्था असलियास कुमक करावी. सेवेसी श्रुत हे विज्ञापना.

---

१. फत्तेसिंग गायकवाड.

१७९ श्री

( भा. व. २-६५ )

श. १७०१ कार्तिक शुा ७
१५-११-१७७९

पैा छ २७ जिल्काद सन समानीन

वडिलांचे सेवेसी शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत कार्तिक शुा ७ मी जाणोन आपले आशीर्वादेंकरून सुखरूप असो विशेष. नवल विशेष वर्तमान पेस्तर गाडर बंगालकर येथें येऊन करार केला कीं, तुवां गुजराथ सही करून मग वसई कोंकण हस्तगत करावें. त्याविना पुणेंकर बदणार नाहींत. याजकरितां येथून दोन हजार गाडदी व हजार कामाठी व एक हजार बेलदार एकूण चार हजार लोक आज रवाना होतील. याशिवाय हजार सरंजाम तऱ्हेतऱ्हेचा पेशजीं गेला आहे, व हालीही जाणार कळावें. राजश्री फत्तेसिंग गाइकवाड यांजकडेस सलुख ठेवावा ऐसें म्हणतात; पण न कळे. बंगालकर गाडर मुंबईस नेहमीं ब्रगेडर राहिला. त्याची फौजही सात हजार गाडदी मुंबईचे खातीं राहिली, या प्रमाणें विचार जाहला असे. तरी हें वृत्त श्रीमंतांचे कानावर घालावें. प्रांत गुजराथ गेल्यानें मग बल विशेष झालें. सारांश हैदरअल्ली याचा बिघाड व फरासजांचा बिघाड वगैरे हरकती ऐसें असतां मधेंच हीं कामें करितात हें अधिक आहे. आपली तबकीर व चहा[1] आज उदईक रवाना करितों. सेवेसी हे विज्ञाप्ति.

---

१८० श्री

( भा. व. २ ५९ )

श. १७०१ कार्तिक शु. १२
ता. २१-११-१७७९

सेवेसी कृष्णराव नारायणराव जोशी साष्टांग नमस्कार विनंती. तागाईत छ १२ जिल्काद मुक्काम नजीक कोडोवली वर्तमान यथास्थित असे विशेष. आपली आज्ञा घेऊन स्वार झालों तें घरास जाऊन सरंजाम सिद्ध करून कार्तिक शुद्ध ७ मुहूर्तें निघोन मुक्काम मजकुरास आलों. आज्ञेप्रमाणें आम्ही निघण्यास गुता केला नाहीं. निघण्याचे त्वरेविशीं राजश्री गोविंदराव निा रास्ते व नरसिंगराव यासी दोन वेळ पत्रें लिहिलीं, व एक वेळ कारकून पाठविले. त्यांचें उत्तर आलें कीं, राजश्री शिंदे यांजकडील कारकून आले नाहींत, आलियानंतर येतो. परंतु त्यांचें येणें अद्याप होत नाहीं. आज मागती पत्रें रावमशारनिल्हेकडे पाठविलीं आहेत. काय उत्तर येईल तें पहावें. तें आलें म्हणजे स्वार होऊन जातों. तिकडूनही निघण्याविशीं त्यांस ताकीद झाली म्हणजे निघोन येतील. पत्राचे उत्तराची आज्ञा त्वरेनेंच झाली पाहिजे. राजश्री महादजी शिंदे यांजकडील कारकून आले म्हणजे राजश्री गोविंदराव व नरसिंगराव निघोन येतील. आह्मांकडे गुता राहिला नाहीं. कळावें याजकरितां लिहिलें आहे. आजपावेतों त्रिवर्गांचे येण्याची मार्गप्रतीक्षा केली. न आले याजकरितां सेवेसीं पत्र लिहिलें आहे. बहुत काय लिहिणें ? कृपा केली पाहिजे हे विनंती.

---

१. हे जिन्नस त्या वेळीं सुरतेहून पुण्यास मागवीत.

१८१ श्री

श. १७०१ कार्तिक वद्य १ ?
पौ ता. २४-११-१७७९

( भा.व. २. ६८ )
पौ छ १५ जिल्काद

वडिलांचे सेवेसी साष्टांग नमस्कार विनंती ऐसी जे. इकडील राजकीय मजकूर फिरंगी तयार झाला असे. सावताचें त्याचें सख्य नाहीं. यास्तव याच्या रदबदलीस बहुत पडलेत कीं, तुमचीं ठाणीं व गांव देतों, तुम्ही आम्ही स॥गूं तिकडे पायवाटेनें चलावें. नाहीं तर तुमचेंच प्रथम पारपत्य घडेल. आमच्यामुळें तुम्हावर गनीम आला तर त्यास आम्हीं पुढें होऊन निवारण करूं. एकूण दोन्हीही गारदींचें संकट याजला झालें असे. सावताशीं बिघाड करून त्याजला कोणत्याही मसलतीस जावत ऐसें नाहीं. तयारी झाडून केली तेव्हां गोव्यांत जमाव थोडा राहील. मसलतीस जाणें त्याअर्थी तेथें दिवसगत लागले म्हणोन पुख्त विचारणीनें आहेत. केवळ कच्ची सल्ला करून जात नाहींत. याच्या त्याच्या रहस्यास आठ पंधरा दिवस लागणार ऐसें आहे. पुढील मनुसुबा लेखन करावा तर तेथे कोणी ध्यानास आणीत नाहीं. कोंकणपट्टी जाईल तेव्हां सावध होतील. परंतु उपरांतिक याचें काय होणार हें कळतच आहे. दुसरें या प्रांतीं भिवगड, पारगडचा मा॥र व कितूरकर यांच्या पारपत्याचा प्रकार थोरली स्वारीशिवाय होतां दिसत नाहीं. परंतु आम्ही येथें चाळणा केली. त्यास इकडील छोटे मोठे संस्थानिक चिकोडकर राजश्री आपाजी शामाजी व विरुपाक्षपंत याचे चिरंजीव येथें वानुत्तव ( ? ) आहेत. त्याशीं बोललों; ते म्हणतात, कोणी सरकारांतून दोन तीन हजार फौज घेऊन आल्यास कित्तूरकराचें पारपत्य करूं. आम्ही पदरचे दोनशें चारशें स्वारांनिशीं हजार दीड हजार दोही तिही संस्थानांचे जमा होऊन कितूरकराचें पारपत्य करूं. त्यास आम्हीं म्हटलें, मिरजकर येवढे सामर्थ्यवान त्यांचे परगणें दाबलेत, व गुदस्तां फौज घेऊन आले त्यांच्यानें काय झालें. तुमचा जमाव किती व सरकारची दोन तीन हजार येणेंकरून काय होणें. त्यास त्यांनीं अंतरंगीची बातमी सांगितली कीं, गुदस्तां चार लक्षाचे मिरजकरानें सावळे गोंधळ करून घेतले. जीव तोडून कोण काय करीतलें. हल्लीं सरकारचा प्रांत व ठाणीं घेत चालला आहे. तर वडिलीं हें वृत्त ध्यानास आणून श्रीमंत हरिपंत तात्या यांस सांगावी आणि भिवगड, पारगड व बेळगांवचा किल्ला हे संस्थानांच्या सनदा करून घ्याव्या. व नूतन परगणे कितूरकर यानें दाबलेत व चदगड ऐसे करून घेऊन सरकारची दोन हजार फौज चांगली नेमानें दिधली तर याचें पारपत्य होऊन येई ऐसें आहे. या गोष्टीस कितूरकर याजकडीलही लोकांचे संदर्भ आहे. तथापि साधन आणखीही तेथें कर्तव्यता प्राप्त झाल्यास आहेत, तर या गोष्टीची चालणा करून पाहून लेहून पाठवावें. दुसरें येसाजी शिंदे याजकडील किल्ले रांगणा येथीलही संदर्भ आला आहे कीं किल्ला देतों. परंतु तेथें कांहीं राजकारण करावयाचें अगत्य असल्यास उद्योग करावा. आम्हीं रुवांस नादीं लावून ठेविलें आहे. कळलें पाहिजे. बहुत काय लिहिणें हे विज्ञापि.

---

१८२ श्री

(भा. व. २-७८)

पौ। छ ३ जिल्काद समानीन

श. १७०१ कार्तिक वद्य ५
ता. २८-११-१७७९

राजश्री बाळाजीपंत नाना गोसावी यास

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित फत्तेसिंगराव गायकवाड सेनाखासखेल समशेरबहादर दंडवत विनंती. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे विशेष. तुह्मीं पत्र छ १० सवालचें पाठविलें तें छ ९ जिल्कादीं पावलें. पत्रीं लिहिलें कीं तुम्हाकडील कररमदार पांच वर्षे होतात त्याप्रमाणें अमलांत येत नाहीं. सरकांतून कोणकोण प्रकारें रयाती होत आल्या आहेत हें तुमच्या ध्यानांत आहे किंवा नाहीं हें समजत नाहीं. याजकरतां एक शहाणा मातबर दरबारांत असावा. कारण कोण समय कशी मसलत पडती बोलावें लागतें. खातरजमा असल्यास बोलावयास येईल असें कितीक प्रकारें लिहिलें. त्यास आम्हाकडील बोलणें तें राजश्री बाळाजी नाईक भिडे यांजपाशीं बोलावें. ते आपणाशीं बोलतील. पहिलेपासून आह्माकडील बोलणें मशारनिल्हे बोलत आले आहेत. त्याजविशीं उभयपक्षीं खातरजमाच आहे. त्या अर्थी दुसरेनें अधिकोत्तर काय बोलावें? येथून राजश्री नाईक यासी वरचेवर लिहीतच आहों. तें आपलेशीं बोलतच असतील. आमचें लक्ष सरकाराशिवाय कांहींमात्र नाहीं. दौलतीस वोढा बहुत पडला आहे. त्यांत हे प्रांतीं पर्जन्य गेला. दुसरें दंग्यामुळें बहुत पेचांत आलों. कांहीं ताकत राहिली नाहीं. आपण सांभाळून घेतील तर निभेल. नाहीं तर निभणें कठिण आहे. सविस्तर अर्थ मशारनिल्हे आपणापाशीं बोलतील त्यावरून ध्यानास येईल. रवाना छ १९ माहे जिल्काद. बहुत काय लिहिणें? लोभ कीजे हे विनंती.

---

१८३ श्री

(भा. व. २-७०)

पौ। छ ३ जिल्हेज

श. १७०१ कार्तिक वद्य १४
ता. २९-११-१७७९

श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांचे सेवेसी

विनंती सेवक बाबाजी भिकाजी व राघो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ २० माहे जिल्कादपावेतों स्वामीचे प्रतापेंकरून सेवकाचें व तालुके अमदाबाजेचें वर्तमान यथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान कंपि[1] सुरतेस आले. पुढें श्रीमंत दादासाहेबही सुरतेस आले. त्या दिवसापासून या प्रांतास वेध लागला. हें वर्तमान पयदरपइ विनंती लिहीत गेलों. सरकारचीं उत्तेंरही येत गेलीं कीं, सलुखाची भानगड घाटत आहे. बिघाड झाला तर आश्विन शुद्धांत सरकारच्या व सरदार शिंदेहोळकर यांजकडील फौजा ते प्रांतीं येतील. तावत्कालपावेतों तुम्ही हिंमत धरून बंदोबस्त राखणें. फत्तेसिंगराव यांस

---

1 इंग्रज.

लिहिलें आहे, तेही उपराळा करतील. याप्रमाणें आज्ञापत्रें येत गेलीं. त्याप्रमाणें श्रीमंतांचे प्रतापें बंदोबस्त रक्षिला. शिबंदी कांहीं जुनी होती व कांहीं नवी ठेविली. दोन वर्षांचे शिबंदीचे मागील देण्याचा पेंच धरणींपारणीं करून दिवस काढले व फत्तेसिंगरावही कुमक करूं म्हणत होते. आश्विनमासापासून इंग्रेजांचा सलुख लांबणीवर पडला त्या दिवसापासून या प्रांतास वेध अधिक पडला. त्याच सूत्रानें राजाराम गोविंद या प्रांतीं रवाना झाले. परंतु दैवयोगें माळव्यांत निघोन गेले. पुन्हा चंदरराव पवार श्रीमंतांकडून या प्रांतीं रवाना झाले. त्यावर फत्तेसिंगराव यांजकडे कुमक करण्याविशीं कारकून व पत्रें पाठविलीं. त्यांणीं लिहून पाठविलें व कारकुनाजवळ सांगितलें कीं, आमचा अर्थ दुसरा किमपि नाहीं. उपराळा करावयाचें संकट नाही, परंतु इंग्रजाचे तोंडांत आमचा प्रांत व संस्थान, त्यास उपराळा न करावा व आमचे लक्षांत असावें असा त्यांचा मनोदय. तथापि उभयतां सरदारांकडील आश्विनमासीं फौज इकडे यावयाचा मजकूर पुण्याचे सरकारचे पत्रांत व तुमचे बोलण्यांत होता. त्यास कार्तिकमासपावेतों कोणी आलें नाहीं. अद्याप फौजा कांहीं आल्या तरी मजला इंग्रजाचें पारपत्यास चुकावयाचें नाहीं. तेथें अमदाबाजेसंबंधीं कुमक करणें गुंता नाहीं, याप्रमाणें त्याचें उत्तर आलें. सारांश, गायकवाड यांजकडील फौज तूर्त येत नाहीं. सांप्रत चंदरराव पवार यांजबळ जमाव फार होऊं लागला, यास्तव संस्थानची फौज होती तीच तोंडावर रवाना केली. त्यांची व पवाराची लढाई कार्तिक वद्य पंचमीस पेटलादेनजीक झाली. परस्परें घोडीं, माणसें ठार व जखमी फार जाहलीं. माघारे फिरून फौज बोरसदेस जातां दोन लहान तोफा पवाराकडे गेल्यामुळें सेर बाजू त्याची झाली. सांप्रत बोरसदेस शह बसला आहे, अमदाबाजेसही बसेल. मुलकी ऐवज बंद झाला. कर्जही मिळत नाहीं. तथापि हिंमत धरून दिवस काढीत आहों कीं लौकर उच्च सरदारांच्या व सरकारच्या फौजा येऊन उपराळा होईल आणि सरकारचें संस्थान जतन राहील. सरकारची फौज आली म्हणजे गायकवाडही सामील होऊन उपराळा करितील. तूर्त शिंद्याकडील संस्थान चांपानेरजवळ आहे. त्यांजकडील अमलदार जयरामपंत याजबळ थोडाबहुत सरंजाम आहे. त्यास शिंदे यांचें पत्र लौकर कुमक करण्याविशीं आलें तर उपयोगीं या समयीं फार पडेल. झालें वर्तमान सेवेसी लिहिलें आहे. पत्रें मार्गीं निभावत नाहीं. याउपरी फौज येण्याविशीं विलंब लागलियास केली चाकरी व्यर्थ जाऊन संस्थानास अपाय होईल. या संस्थानास अपाय झाल्यानें गुजराथप्रांतच गेला ऐसें आहे. पुढें या प्रांताचा बंदोबस्त करण्याविशीं महदश्रम लागतील. सेवकांनीं विशेष विनंती काय लिहावी ? शेवटील विनंतीचें हें पत्र लिहिलें आहे. विनंतीची दिनावधि होऊन उपेक्षा न झाली पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

---

१८४ श्री

( भा. व. २-६७ ) श. १७०१ कार्तिक वद्य ११
ता. ३-१२-१७७९

पौ छ २७ जिल्काद

विनंती सेवक गणेश बल्लाळ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ २४ जिल्कादवावेतों स्वामींचे कृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. काल गुरुवारीं लोक सरंजाम दिवसभर जहाजावरून चढत गेला. जो चढोन भरगत जाहला तो हाकांरत गेला. उपरांत संध्याकाळीं अस्तमानीं गाडर माहीमास निघोन गेला. तेथें बंदरबोटेंत बसून वेसाव्यास जाऊन थोरल्या रेवंचावर चढेल. पहिले लोक सरंजाम गेला आहे, तो कुल डोमस बंदर उतरोन राहिला आहे. त्या फौजेंत श्रीमंत निघोन आले आहेत. तेथून गाडरास पत्र लिहिणार होते. त्याचें उत्तर त्याकडील कारभारी मागत होते. त्याणीं सांगितलें आम्हींच जातों, उत्तर द्यावयाचें नाहीं. मद्रासचीं पलटणें आदणीस येत होतीं, निभावलीं नाहीं. माघारीं गेलीं. तीं खुषकीनें तालचिरीपलीकडे अंजग्नास आलीं आहेत. ते लोक पहिले तालचिरीहून आणावयासी सिबडा गलबतें गेलीं आहेत; ते ऐसे तेथें गलबतें तोडमोड दुरुस्त करून चढत होते. एकूण मिळोन तिकडील सातेक हजारपर्यंत लोक तिकडून येणार. त्यांत सातशें टोपीवाला आहे असें टोपीवाले म्हणतात. तेथून आजपर्यंत तीन काफले मिळोन झुंजतें माणूस परमावध टोपीवालेसुद्धां साडेतीन चार हजारापावेतों गेलें. शिवाय मजूरदार खलकच गेले आहे. गाडराजवळचे स्वारसुद्धां सात हजार पावेतों आहे व खंबाइतवाल्यानें २००० तिकडील काठे स्वार ठेवून पाठविले ते येऊन याजवळ सुरतेस दाखल जाहले म्हणतात. मग किती असेल त्याची बातमी सरकारांत तिकडून असेल. तेथें प्रस्तुत बारा पंधराशेंपर्यंत जदीद माणसांपैकीं गाळ राहिला आहे. शिवाय टोपीवाले नाजूक ठिकाणीं दारूखाने वगैरे येथील ठिकाणीं चौक्यांस अडीच तीनशेंपर्यंत आहेत. आणखी दररोज जे येतात ते सही करितात. लोकांच्या शकांत बोलतात. डोमस बंदरीं जमीयत करून वसईकडेसच चाल करणार. श्रीमंतांस खाशांस समागमें घेत नाहीं. अमृतरावास घेणार. दाट बोली तर भडोचेस जोंपर्यंत गलबतांतून सरंजाम जाईल तेथवर नेऊन तेथून डबईस जाऊन ती जागा कायम करावी. उपरांत गायकवाडाशीं न बने तर तेथून सुरू(?) अगर आमदाबादेस जावें. गाडर टोपीवाल्यांत आपलें आपल्यांत म्हणत होता, मराठे यांची अद्याप फौज येत नाहीं, याचें कारण काय ? सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

श्री

१८५ श. १७०१ मार्गशीर्ष शुद्ध ३
( भा. व. २-६२ ) ता. १०-१२-१७७९

सेवेसी गंगाजी अव्हाड[1] विज्ञापना ऐसीजे. तागाईत छ १ जिल्हेजपावेतों वर्तमान साहेबांचे कृपेंकरून यथास्थित असे विशेष. येथील मजकूर जो आज दो प्रहरा झाला तो राजश्री दाजींनीं लिहिलाच आहे. सारांश आम्ही तेथून आल्यावर इकडील संशय कांहीं काढिले. पुढें साधन तेंच चालत होतें. तों आज कोण्या गृहस्थाचें पत्र दो प्रहरा आलें. त्यांत बजिनस खोलून लिहिलें आहे, तो दाजीनें पत्रीं सविस्तर लिहिलाच आहे. त्यास श्रीमंतांचे ठायीं दुसरा अर्थ धरावयाचा नाहीं. कारभारी बोलतात, काय चिंता आहे पाहून घेतों. तरी येविशीं आम्हीच रामराम करावयास पुण्यास जातों. न कळे पुण्यास गेल्यावर श्रीमंतांची गादी व भावास अभाव होईल याजकरितां पुण्यास जाऊं नये. कारभारी पुढें येणार त्यांचेच सामोरा जाऊन रामराम करून मग देवास जावें. या अर्थे आज झाडून पागा व शिलेदारांस पत्रें गेलीं. लोकांचा जमाव पाडितात. आम्ही मोठी मिनतमाना करून आपण येथें येतात तावत्काळ सबुरी करावी म्हणोन विनंती केली. मींच यावें ऐसें होतें. परंतु घटके घटके येऊन जनापवाद होतो याजकरितां मुजरद विनंतीपत्र लिहिलें आहे. शेवटास गोष्ट येऊं म्हणते. विना श्रीमंत येथें आल्याखेरीज हा संशय दूर होत नाहीं. फौज तों जमा करितातच. देवास जाणेंच होतें त्यांत हे पत्रेवर पत्र आलें. यावरून मर्जी विलयास गेली. आतां अविच्छिन्न श्रीमंत आल्याखेरीज रहस्य पडत नाहीं. श्रीमंताचे येण्याविशीं इकडील कांहीं अभाव चित्तांत येईल तरी याची खातरजमा पाहिजे तशी आम्ही करूं. इकड्डन श्रीमंतांचे ठायीं भाऊपण्यांत दुसरा अर्थ तिळतुल्य नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.[3]

---

१८६ श्री
( भा. व. २-५४ ) श. १७०१ मार्ग. शु. ३
पौ छ १२ जिल्हेज ता. १०-१२-१७७९

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसी

विनंती सेवक बाबाजी भिकाजी व राघो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत मार्गशीर्ष शुा ३ पावेतों सेवकाचें व तालुके अमदाबादेचें वर्तमान यथास्थित

---

१ नानाचा हुजऱ्या महादजी जवळ.

२ सदाशिव दिनकर.

३ यासंबंधानें ग्वालेर पत्रव्यवहार भा. ४-४९, ऐ. स्फु. ले. ७. १४ व खेर ले. २५१६ हे कागद मननीय आहेत.

असे विशेष. इकडील वर्तमान पेटलादेस चंदरराव पवार येऊन लढाई जाहलियाचें सविस्तर कार्तिक वा। ८ अजुरदार जोडी करून सेवेसी पाठविला आहे. पत्रें पावून वर्तमान विदित झालें असेल. अलीअडे पवाराचा जमाव फार झाला आहे. आम्ही संस्थानचा व ठाण्यांचा बंदोबस्त केला आहे. पवाराचे फौजेवर चालून जावें तर त्याचा सरंजाम भारी, यास्तव घाट घालीत नाहीं. शिंदे होळकर यांच्या फौजा रवाना झाल्या आहेत ऐसें दोन आज्ञापत्रीं लिहिलें. त्यास धणी लिहितात तें प्रमाण वाटतें. परंतु अद्यापि या प्रांतांत फौज आली नाहीं. येते म्हणून चातकन्यायें वाट पहात आहों. बडोदेकर सरदार सरकारची फौज आल्याखेरीज कुमक करीत नाहीं. सरकारची फौज आलियावर सहजच त्या फौजेस मिळणें प्राप्त आहे. संस्थानास अपाय जाहलियास जिकडे संस्थान अहमदाबादचे त्या लक्ष्यांत बडोदेकरास राहणें प्राप्त. मग फौज आलियानें सार्थक काय ? पांच सात लक्ष रुपये शिबंदीचें देणें. हुजूरची फौज येत नाहीं. बडोदेकर कुमक करीत नाहीं. सुरतेहून जलचर व योगीराज या प्रांतीं येणार या आवईनें आमचे शिबंदीचा धर सुटूं लागला आहे. याउपरी जलदीनें फौज येऊन पोंहचलियास परिणाम संस्थानचा आहे. फौज आली म्हणजे आम्ही पुढें जाऊन फौजेस घेऊन येऊं. पवाराचें पारपत्य अगोदर करूं. सुरतेकडील येणार त्याचेही शहावर जाऊं. रात्रीचा दिवस करून रवानगी व्हावी. याउपरी उपेक्षा जाहलियास स्थळास अपाय होईल. आह्मी अर्थे प्राणें जाऊंच, परंतु सरकारचें संस्थान मातबर, गुजराथ प्रांत जाऊन माळवा प्रांत येथून संन्निध, त्यास वेध लागेल. लौकर फौज येऊन पोंहचावी. संस्थानचा बचाव व्हावयास्तवच या समयीं अवज्ञा करून विनंती लिहिली आहे. सेवेसी श्रुत हे विज्ञापना.

---

१८७ श्री

श. १७०१ मार्ग. शु. ४
ता. २२ डिसेंबर १७७९

( भा. व. २-१४७ )

सेवेसी गणेश विश्वनाथ साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १३ जिल्हेज प्रातःकाल दीडप्रहरपावेतों मुक्काम मौजे उमरपाटेनजीक सादडविहिरी येथें स्वामीचे कृपेंकरून सेवकाचें व फौजेचें वर्तमान यथास्थित असो विशेष. इकडील वर्तमान तरी आजच सोनगडचे बातमीचें पत्र राजश्री भिकाजी नारायण कारकून सादडविहिरीचे कमावीसदार दिमत गायकवाड यांचें आलें. तेंच बजिनस सेवेसी पाठविलें आहे. याच प्रकारें आमचे काशीद बातमीस पाठविले होते, तेही आतांच आले. त्यांणींही हेंच वर्तमान सांगितलें. तिसरें जगदेवरावाकडून शिलेदार राजश्री बाळाजी यमाजी याजबरोबर वसि स्वारांनशी चाकरीस राजश्री विठ्ठलराव गोळे यांचे मार्फतीनें येऊन नेले होते, ते त्याचा निरोप घेऊन आले ते मुरारराव गायकवाड व आनाजी अनंत तीन चार हजार जमावानिशी बाबापिराचे घाट उत्तरोन तापीपावेतों समागमेंच आले व त्यांणींही हेंच वर्तमान सांगितलें; व दुसरें वर्तमान

कडूनीं सांगितलें कीं, आमदाबादेहून तीन पलटणें आलीं तीं भडोचेजवळ उत्तरोन कलेश्वरास मुक्काम केला. तों इकडून बर्वे व भोसले व गुलजारखान मिळोन हजार स्वारांनिशीं सुरतेहून निघोन बडोद्यास जावयाकारितां गेले. त्यांची यांची पलटणाची गांठ अकलेश्वरावर पडली. तेव्हां त्याचें व पलटणाचें व बर्वे यांचें बोलणें होऊन पलटणें कूच माघारी नर्मदा-पार ते वेळेस जलदी करून गेले. बर्वे व भोसलेही कूच करून बाबाप्यारियाचे घाटें उतरा-वयास गेले. पलटणांनीं व भोसले बर्वे यांणीं रणगडावर एकत्र होऊन बडोद्यास जावें; आणि फत्तेसिंगराव गायकवाड यांस घेऊन सुरतेस यावें हा मनसबा आहे. हें वर्तमान खरें आहे. आज अथवा उद्यां मुरारराव व आनाजी अनंत सोनगडास दाखल होतील. त्यास पहिलीं तीन चार पलटणें सुरतेभोंवतालीं आहेतच. हल्लीं हा सरंजाम आला; तेव्हां सात आठ हजार जमयत आज त्याची जाहली. मागाहूनहि आणखी सरंजाम होतच आहे. आम्हां-जवळ सरंजाम किती आहे तो स्वामींच्या ध्यानांतच आहे. भापकर उगेच उतावळी करून डोंगर किनाऱ्यानें वासदेपावेतों गेले. तेव्हां रान रिकामेंच होतें. हें वर्तमान सुरतेस समज-ल्यानंतर सुरतेहून व कामरेजेहून पलटणें घनदेवीकडे चिखली व बलसाड व मोहोवा या रोखें तीन तिही ठिकाणीं जाऊन पोंहचलीं. तेव्हां भापकर माघारे सादडविहीरीच्या सुमारें आले. हें वर्तमान आजच पक्कें समजलें तेव्हां सडे होऊन पुढें भापकराचे उपराळयास जाऊन पोहोंचावें तों गायकवाडाचे फौजेचें वर्तमान पक्केंच आलें. याजकरितां येथेंच मुक्काम आहे. दुसरीं माणसें बातमीस रवाना केलीं आहेत. आलीं म्हणजे मागाहून सविस्तर लिहीन. परंतु हें वर्तमान दिलें आहे. इकडील पैरवीस दिरंग नसावा. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. हें वर्तमान जलद कळावें म्हणून चार रोजांचा करार करून सांडणीस्वार केला आहे. करारा-प्रमाणें पावल्यास यास इनाम द्यावयाची आज्ञा जाहली ( पाहिजे ) हे विज्ञापना.

---

१८८ श्री

( भा. व. २–७९ ) श. १७०१

स. १७७९

सेवेसी विज्ञापना. नरगुंदाहूनही गृहस्थ येणार व दुसरा नवलगुंदकराकडून आणविला आहे. येणार. सिद्ध आहेत. परंतु मार्गी गडबड. बदामीकडे हैदराचे फौजेची गडबड व मनो-लीस सटवोजी भोसले व गोकाकेस कितूरकराची गडबड याजमुळें मार्ग बंद म्हणोन दिवस-गत लागली. गडबड वारतांच सवड पाहून रवानगी करितों म्हणोन लिहिलें आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

१८९ श्री

( भा. व. २-४७ )

श. १७०१
स. १७७९

सेवेसी घनःश्याम त्र्यंबक साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसी जे. परगणे एरंडोल येथील तजकऱ्यासंबंधें[1] राजश्री शिवराम नारायण यांणीं बोलों नये व त्याजकडे या कामाची चौकशीची आज्ञा नसतां हल्लीं कमरेस शेला बांधोन तजकरनिसाचें बोलणें आपण बोलतात. त्यास हल्लीं गुलजारखानाचे मसलतीस जावयाविशीं आज्ञा जाहली ह्मणोन तजकऱ्याचे फडशाची जलदी करून गैर समजावून फड मारून नेणार. त्यास ऐशा जलदीनें तजकऱ्याचा फडशा पुर्तेपणीं समजानें होत नाहीं. तर ही मसलत मजला आज्ञा दोनशें स्वार व खर्चास दहा बारा हजारपर्यंत देऊन आज्ञा झालियास जाऊन सरकारआज्ञेप्रमाणें गुलजारखानाचें पारिपत्य करितों. झाडींत अथवा पळोन गेल्याचा दोष मजकडे स्वामीनीं न ठेवावा. समरांगणीं आल्यास स्वामीचे प्रतापें पारपत्य होईल. येविशीं आज्ञा झालिया यादी लिहोन देईन आणि शिवरामपंत येथें राहोन स्वस्थपणें फडशा तफावतीचा त्यांचे हातें करावा. ऐसी स्वामींची मर्जी असिलियास करवावा. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

१९० श्री

( भा. व. २-७२ )

श. १७०१ मार्ग. व. १०
ता. १-१-१७८०

श्रीमंत राजश्री आण्णा स्वामीचे सेवेसी

विनंती विज्ञापना. येथून राजश्री लक्ष्मणराव चिटणीस[2] निघोन पुण्यास गेल्यावर जोड्या दोन रवाना झाल्या. मार्गशीर्ष वाा ४ व एक बलसाडेहून सरकारचे जासूदांपैकीं एक व पयदां मोहनसिंग वाा ७ त्याजवर राजश्री राजारामपंत यांचे जासूदाबरोबर एक पत्र. आठा रोजांत तीन पत्रें सेवेसी रवाना केलीं. हल्लीं मजकूर राजश्री गोपाळराव नवसरीस शिबंदी येऊन राहिले. राजश्री अनाजीपंत हे ते मिळून एकत्र आजपर्यंत राहिले. तों इंग्रजाकडील मेस्तर बुचर सरंजाम घेऊन बाहेर आला आणि गाडदी सरभुवन व सुपे येथें पाठविले. वाा ९ शुक्रवारीं दोही महालीं अंमल बसले. नंतर अनाजीपंत याणीं गोपाळपंत यांस सांगितलें, तुम्ही चार रोज निघोन स्थलांतर करावें. त्यावरून वाा १० निघोन येथें आले. राजश्री आनाजीपंत यांचें अवसान गेलें. कारण गायकवाड दूर राहिले, सरकारची कुमक असावी तोही प्रकार तूर्त नाहीं. जर जावें तर रीग नाहीं आणि बदलौकिक, तेव्हां गांठ पडल्यांस जिवासी गांठ. तेव्हां तुम्ही आम्हाजवळ राहून सरकारचा शब्द लागेल

---

१. अफरातफर झालेली रकम. २. बारभाईकडून सुरतेस दादासाहेबांशीं समेट करण्यास गेला होता. हा गोविंदराव चिटणिसाचा पुत्र.

यास्तव स्थलांतर करणें. त्याबरून आले. कांहीं शिबंदी ठाण्यांत आहे, परंतु अंमल इंग्र-जाचा सायंकाळीं दाखल झाला असे. उरपाड चौथाई व जकाती सरभुवन सुपें येथें सरकारचे ठाण्यांत कोणी नाहीं. आजपर्यंत जलालपूरचा वचक ह्मणोन ठाणें न आले. जल-मार्गें चार होड्या तयार करून बलसोड पारनेरा याजवर येणार. सात जहाजे दोन हजार गाडद भरून भडोचेस जाणार. श्रीमंत सरंजामसुद्धां बळाछेयास आले. अमृतराव व कांहीं इंग्रज झाडून नर्मदापार जाणार. तूर्त बडोयाची मसलत करून मग पुढें करणें तें करावें. आजपर्यंत गायकवाड यांचें लक्ष इंग्रजांकडे किमपि नाहीं. कारण पवार तिकडून इकडे आले, तेव्हां नर्मदातीरीं फत्तेसिंग यांजकडील सरंजाम येऊन छापा घालून लुटून घेतला. सडे स्वार मात्र निघोन आले. अठाविशींतील महालपैकीं तापी उत्तरतीराच्या जकातीचीं ठाणीं इंग्रजांनीं बसविलीं. कीमचे ठाण्यांत इंग्रजाचा अंमल तूर्त भयप्रीत आहे. निःशेष गायकवाडाशी बिघाड असें तर दाखवीत नाहीं. जकातीची तर जप्ती केली. गायकवाड तों सरकारचे कुमकीची वाट पहात आहेत. जर कांहीं सरंजाम न ये तर तेही रंग पाहून समय काढतील. करणेंही प्राप्त असा रंग दिसतो. न चालल्यास त्याच्यानें इंग्रज पेलणार नाहींत. अठाविशीची सरदारी मेस्तर बुचर सुरतचा कोसलदार याजकडे झाली. किल्ले पारनेरा यासी तोच जहाजाचे मार्गें एका दो रोजांनीं बलसोडेस येणार. पुढें आम्ही कोठें रहावें? देशीं यावें कीं काय? शिबंदी चढते याची आज्ञा करावी, त्याप्रमाणें वर्तणूक करीन हे विज्ञापना.

---

१९१ श्री

श. १७०१ मार्ग. व. ११

( भा. व. २-७१ ) ता. २-१-१७८०

श्रीमंत राजश्री आण्णा स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक नारो विश्वनाथ कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना. तागाईत मार्गशीर्ष वद्य ११ रविवार प्रथम प्रहर मुकाम बलसोड येथें वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामीनीं कृपा करून शुद्ध १५ चे पत्रें नयनसिंग याजबरोबर पाठविलीं तीं वा। ८ पावलीं. राजश्री लक्ष्मणराव चिटणीस यांस सरकारचीं पत्रें, परंतु मशारनिल्हे देशीं रामनगरचे मार्गें गेले. इंग्रजांनीं सुपें वगैरे अंमल बसविला, तेव्हां गोपाळरावही निघोन आले. या प्रसंगीं कांहीं आधार फौजेचा असता तर इंग्रजांनीं अंमल काय बसवावयाचे. असो. त्याजकडील बातमीचा मजकूर तर तीन रोज बातमीदार बैरागी होऊन गेले आहेत. आले नाहीं. पल्ला लांब पडला. ते येतील. आल्यानंतर सेवेसी विनंती लिहून पाठवीन. बातमी लिहितों यांत सारी खोटी नाहीं. एखादी खोटी पडेल तर पडो. कारण जाब येतात हे इंग्रजाकडीलच बातमी आणून लिहीत असतों. एक ब्राह्मण दरवाजावर सांपडला. दोन तीन रोज हैराण झाला. नंतर गच्छ करून आला. आतां बैरागियाचे मिसें जात येत अस-

तात. पुढें इंग्रज बलसोडपर्यंत आल्यानंतर मग वर्तमान समजावयाचें नाहीं. अर्जुनगडास टिकाव झाल्यास प्रयत्नांत चुकणार नाहीं. तेथेंही तळ न ठरे तेव्हां उपायच नाहीं. श्रीमंत बडोद्यास मोहीम करणार. फौजेस वगैरे खर्चास पैका पाहिजे म्हणून शहरचे साहुकारापासून पंधरा लक्षांची निशा कर्ज म्हणून घेतले. पैकीं साहुकार फक्त दहा लक्ष व नबाब यांजपासून पांच लक्ष एकूण पंधरा लक्ष कर्जाऊ घेऊन श्रीमंत बाहेर निघाले. इंग्रजाचे कुंपिनींत पैका नाहीं असा प्रकार झाला आहे. दातीं बल धरूनही व्यावृती मांडली. सिद्धीस जाऊं अथवा न जाऊ, परंतु मेहेनत करीत आहेत. इतका उपद्रव यांणीं मांडिला आणि सरकारच्या फौजानाहीं कांहीं तरी तूर्त दबाब पडता म्हणजे राजश्री फत्तेसिंगराव यांस हिंमत येती आणि फैलही इंग्रजाचें कमी पडतें. असो. हा प्रकार सेवकानें लिहूं नये. प्रसंगीं विनंती केली आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

सेवेसी गोपाळ सिद्धेश्वर साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना. लिहिली परिसोन घोड्याकरतां शोध बहुत घेतला. परंतु सालगुदस्तचा पठाण लष्करांतच नाहीं. दुसराही तसा नाहीं म्हणोन अंतर झालें. क्षमा करावी हे विज्ञापना.

---

१९२ श्री

( भा. व. २-६६ )

श. १७०१ मार्ग. व. ११
ता. २-१-१७८०

श्रीमंत राजश्री सुभेदार दादा स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक जनार्दन नारायण मुक्काम पारनेरा कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ २४ माहे जिल्हेजपावेतों स्वामीचे कृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. सुरत अठाविशींत इंग्रेजाचीं ठाणीं बसलीं. काल छ २३ जिल्हेजीं प्रो सुपे व पारचोन हसरभुवन येथें बसलीं. आज उद्यां येईल ( येऊन ? ) किल्ले पारनेर याशीं शह देणार. जलमार्गीं गाडदही व तोफा वगैरे संरजाम रवाना सुरतेहून जाहला. आजही दोहो चहूकडोन बातम्या आल्या. वर्तमान खरें आहे. सुपेकर हिसेदार काल या मार्गे गेले. त्यांणींहि हेंच वर्तमान सांगितलें. राजश्री त्रिंबक खंडेराव निसबत गायकवाड याचीं दोन पत्रें आलीं तीं सेवेसी पाठविलीं आहेत त्यांजवरून विदित होईल. गुजराथप्रांतीं नर्मदापलीकडेस इंग्रेज व अमृतराव जाणार. श्रीमंत राजश्री दादासाहेब सुरतेसच राहणार ऐसें वर्तमान आहे. पावसाचा तोटा याजकरितां कोठीखालीं विहिर आहे तेथें मोर्चा घालोन पाणी राखून बेगमी करावी म्हणोन आज्ञा, त्यास पांचशें माणूस किल्ल्याचे तटबंदीस चौकी पहाऱ्यास रात्रंदिवस असावें; आणि पांचशें माणूस पाहण्याचे मोर्चेबंदीस वगैरे असेल तेव्हां पाण्याचा बंदोबस्त होऊन पाणी पोचेल तर लोकांची परवानगी जलद झाली पाहिजे. पांचसातशें राऊत इकडे आल्यास इकडील बंदोबस्त होईल. किल्ले अर्जुनगड दिंमत यशवंत गडकरी याचे पांच शिपाई

पळोंन सुरतेकडेस गेले. दुसरा रोजमरा किल्लेहायेचे लोकांस लौकर पावे तें करणार स्वामी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

१९३ श्री
(भा. व. १३)

श. १७०१ मार्ग. व. १३
ता. ४-१-१७८०

पौ। छ २९ जिल्हेज

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बाबूराव स्वामीचे सेवेशीं

पोष्य बाळाजी जनार्दन साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय लिहित जावें विशेष. तुम्ही पत्र पाठविलें तें पावलें. अलीकडे कांहीं वर्तमान समजत नाहीं. भोसले वराडांतून भारी फौजेनिशीं येतात येविशीं मला संशय उत्पन्न जाहला आहे, म्हणून विस्तारें व आपले एकनिष्ठतेचे अर्थे लिहिलें तें कळलें. त्यास इंग्रजांनीं मातबर पाठवावे म्हणून पूर्वी लिहिलें होतें, त्यावरून राजश्री लक्ष्मणराव चिटणीस सुरतेस पाठविले होते. त्यांचें इंग्रजांचें बोलणें सुरतेंत चार महिने जाहलें. शेवटीं दादासाहेबांस द्यावें, साष्टी द्यावी हें कांहीं त्यांच्या मनांत नाहीं, व गोष्टीही मगरूरीच्या. बाहेर गोड बोलावें, आंतून लढाईचें सामान करावें, तेव्हां पारपत्य करणें जरूर. इंग्रजांनीं चहूं दिशेस आकर्षण केलें आहे. कोणे समयीं काय करतील हा भरंवसा नाहीं. याकरितां नबाब निजामअलीखान याणीं सिकाकोल राजबंदराकडे इंग्रजांचें पारिपत्य करावें. भोसल्यांनीं भारी फौजेनें जाऊन बंगाला मारावा व हैदरनाईक याणीं चेनापट्टणाकडे जाऊन इंग्रजांचें पारपत्य करावें व सरकारांतून सुरत, अमदाबाद वगैरेकडे इंग्रजांचें पारपत्य करावें. याप्रमाणें परस्पर निश्चय ठरला, त्यावरून भोसले फौज घेऊन बंगाल्यांत जात आहेत. दुसरा संशय किमपि नाहीं. शिंदेहोळकरही लौकर सुरतेकडे जाणार. पुढें होईल तें लिहुन पाठवूं. श्रीमंतांचें दैव विचित्र आहे. सर्वही गोष्टी उत्तमच होतील. तुम्ही आपले एकनिष्ठतेविषयीं लिहिलें त्यास ही गोष्ट जगद्विख्यात जाहली आहे. तेथें तुम्ही लिहावें, मग ध्यानांत यावें असें नाहीं. रवाना छ २६ जिल्हेज. बहुत काय लिहिणें? लोभ असो दीजे हे विनंती.

---

१९४ श्री
(भा. व. २, ७७)

श. १७०१ पौष शु. ३
ता. ९-१-१७८०

पौ। छ ६ मोहरम समानीन

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

पौष्य सर्वोत्तम शंकर[1] कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल तागाइत छ १ मोहरमपर्यंत यथास्थित असे विशेष. आपण पत्रें पाठविलीं तीं पावलीं. गोवेकर फि-

---

१ शंकर केशव फडके वसईकर याचा मुलगा.

रंगियाचा तह जाहला. सविस्तर लिहून येईल. उत्तम झालें, व सावताहीं सरलपणें वर्तावें येविशीं पत्रें वकिलाकडे गेलीं; येणेंकरून उपयोगीं पडेल व राजश्री चिमणाजी रामचंद्र तालुके देवगड हे येथें येऊन माहीत होऊन कलमें त्यांस समजावून रवाना सुजम केलें. मसलती बेहड्याखेरीज दोनशें माणूस पेशजीं होतें, तें साल मजकुरीं अव्वल सालीं दूर झालें. त्याविशीं रदबदली त्यांणीं येथें केली. परंतु अधिकोत्तर प्रांतांत उपद्रव नाहीं. एका ब्राह्मणाचे घरीं चोर येऊन वस्तभाव घेऊन गेले. यांणींही जागां जागां भरण्याप्रमाणें चौक्या ठेविल्या आहेतच. कांहीं असावे ते जाजती शिबंदी आज्ञेखेरीज कसे नेमावे, याकरितां पत्र आपणांस लिहून त्याजवळ दिल्हें आहे. सर्देची जागा, बखेडा असल्यास गाडदी विजयदुर्गांस आले यांतील द्यावे. हें राजश्री गंगाधरपंत[२] यांस सांगोन ठेवलें. कांहीं जाजती त्यांस द्यावयाचें असल्यास त्यांणींच ठेवावयाची आज्ञा झाली तर सालसी प्रांतांतलि वस्तीचा साराच भरणा चाकरीस आहे. हल्लीं इकडील ठेवितील यास्तव दुसरे वस्तीचे ठेवावयाचें असल्यास आज्ञा झाली तर सुवर्णदुर्ग प्रांतांतील ठेवून याकडे पाठवूं. बहुत काय लिहिणें? कृपा करावी हे विनंती.

---

श्री

१९५

श. १६०१ पौष शु. ६
ता. १३-१-१७८०

( भा. व. २-७५ )

विनंती विशेष. मसमती बोटेवर इंग्रज चौघे सांपडले त्यांस निगसें (?) ठेवावयाची जागा योजोन पाठवावयाची आज्ञा झाली. त्यावरून स्थल पाहतां मंडणगड बाणकोटजवळ आठ कोस आहे. यास्तव अलीकडे सुवर्णदुर्गाहून आठ कोस पालगड व घाटसरीकडे पुढें रसालगड ऐसे दोन किल्ले निश्चयांत आणून तेथें इंग्रज बडा शहाणा कारकून व माणसें व डोल्या करून देऊन बंदोबस्तानें राजश्री मोरोपंत यांस सुवर्णदुर्गास येविशीं पत्रें लिहून रवाना करितों. स्थल येथें व चौघास कोठें हें त्याचें त्यांत कळों देत नाहीं. गुप्तच रवाना निगारीतीनें खबरदारीनें ठेवावें ऐसें लिहितों. परंतु तेथून राजश्री मोरोपंत यांसी सुवर्णदुर्गास पत्र येविशीं जावयाची आज्ञा व्हावी. आरमारास बेगमीस गल्ला जागा जागाहून देविला. त्यापैकीं रत्नागिरीचा निकर्डीनें घेतला. वरकड सर्व जागाचे तपशील आहेत. आरमार रवाना करतेसमयीं दास्तान किंवा सरळपणें त्या दिवसांत एक खंडी गल्ला जमा व्हावयाचा नाहीं. परंतु कांहीं तालुक्यांतील व सौदलची मळणी घालवून सख्तीनें आणून पौष शु। १५ बेगमी कदाचित होईल. पुढें सेर नाहीं. आरमार स्वारी समुद्रांत फिरणें. अडीसेरीस कोणीकडून तूर्त गल्ला पावेसा अर्थच नाहीं. सुवर्णदुर्ग अंजनवेलीहून दोनशें खंडी भात

---

२ गंगाधर गोविंद भानु, नाना फडणिसांचा पुतण्या, विजयदुर्गाचा कारभारी.

जलद पावतें झाल्यास दीड महिना बेगमी होईल. त्याची तरतूद निकडीनें तेथूनच आधीं झाली पाहिजे. बहुत काय लिहिणें? कृपा करावी हे विनंती.

---

१९६ श्री

( भा. व. २-७४ )

श. १७०१ पौष शुद्ध ६

ता. १३-१-१७८०

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसी

विनंती सेवक मोरो बापूजी मुकाम जंजिरे सुवर्णदुर्ग कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ ५ मोहरमपावेतों स्वामीचे कृपावलोकनें करून सेवकाचें व प्रांतमजकूरचें वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामींचें अज्ञापत्र २९ जिल्हेजचें सादर जहालें. तेथें आज्ञा कीं राजश्री सर्वोत्तम शंकर यास चार असामी इंग्रज सांपडले आहेत, ते तुम्हाकडे किल्ले पालगड अगर रसालगड तालुके सुवर्णदुर्ग येथें अटकेंत ठेवावयासी पाठवितील, त्यास तुम्ही किल्लेमजकुरीं पक्का बंदोबस्तानें अटकेंत ठेवून त्यांचे पोटाचे बेगमीविशीं मशारनिल्हे तुम्हास लिहितील त्याप्रमाणें तालुके मजकूरपैकीं बेगमी करणें. किल्लयावर ठेवणें ठीक नाहीं. याजकरतां तुमचे तालुक्यांत घाटसरीस किल्ला असेल त्याचे खालीं गांव मजबूत असेल तेथें एक घर चांगलें पाहून त्यांत ठेवणें. चौकी पहारा चांगला असावा. बोभाटांत येऊं नये. इंग्रज आहेत. पोटापाण्याची बेगमी चांगली करून देणें. बंदीवानाची शिरस्ता आहे तो त्यांजकडे करावयाचा नाहीं. पोटाविशीं व किरकोळ साहित्याविशीं उणें न करणें. वर्तमान वरचेवर लिहीत जाणें ह्मणोन आज्ञा ते शिरसा. इंग्रज अद्याप आले नाहींत. आल्यावर आज्ञेप्रमाणें बंदोबस्त करून पोटापाण्याची बेगमी करितों. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

१९७ श्री

( भा. व. २-६० )

श. १७८० पौष शु. ६

ता. १३-१-१७८०

विनंती विशेष. इंग्रेज आरमाराकडे पाडाव आले ते खुषकीचे किल्लयास अटकेस ठेवावयाविशीं आज्ञा जाहली, त्याजवरून रसालगड व पालगड तालुके सुवर्णदुर्ग व बहिरवगड तालुके अंजनवेल हे तीन जागे योजून विलायती तीन असामींपैकीं एक रसालगडावर व दुसरा थोर आहे तो व लहान मुलगा ऐसे दोन असामी पालगडावर व बसराईस लिहिण्याचे कामावर होता तो बहिरवगडास याप्रमाणें चार असामी तिहीं जागा ठेवावयाची योजना करून बरोबर पंचवीस माणूस व कारकून व डोल्या वगैरे सरंजाम देऊन पुण्यास जातात. हें बाह्य समजण्यांत आणून तिही किल्लाचे लोक व कारकून पुढें वाटेस येऊन बेग-

झाले तिहीकडे कोणाचें कोणास न कळतां नेऊन ठेवावे. बरोबरचे लोक वगैरे माणसें येथून दिले आहेत त्यांस कोठें नेतात हें न कळतां वाटेंतूनच माघारें यावें, ऐशा रीतीनें गुप्तपणें जाऊन तिही जागा बंदोबस्तानें ठेवावयाची तरतूद करून रवाना केले. त्यांचे पोटाची व पांघरुणाची नेमणूक करून दिल्ही आहे. त्याचे चौकशीस वरचेवर त्यास जें लागेल तें देण्याविशीं व खबरदारीच कामावर एक एक कारकून ठेवून बहुत सावधता राखण्याविशीं तालुकदारास लिहून पाठविलें आहे. त्याची वस्तवानी बहुत चौकशीनें ठेवावी म्हणोन लिहिलें, त्यास त्याचीं पोशागीं चिरगुटें आंगरखे वगैरे यादीवर लिहून त्याचेबरोबर जागाजागा वेगळालीं ज्याचीं त्यास लागतील त्याअन्वयें द्यावीं. याप्रमाणें करून तिही जागा लिहिलें आहे. बाकी जिन्नस आरमारचे जामदारखान्यांत ठेविले आहेत. त्याचा जाबता मागाहून पाठवून देतों. इंग्रजांबरोबर औषधें चालती व खडीसाखर वगैरे किरकोळ उपयोगी दिल्हे. किल्ल्यावर पाहिजेच. बहुत काय लिहिणें ? कृपा कीजे हे विनंती.

---

१९८ श्री[1]

( भा. व. २-१०६ ) श. १७०१ माघ. व. १

ता. १-२-१७८०

राजश्री बाळाजीपंत नाना गोसावी यांसी

दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे विशेष. राजश्री त्रिंबकराव नारायण राजेबहादर यांची सरदारीची स्थापना आपण केली. त्या समयीं सरकारच्या नजरेच्या केल्या कराराप्रमाणें फडशा व्हावा व सरकारची चाकरी व्हावी आणि पूर्ववत्प्रमाणें जंबूसर महाल इंग्रजांकडील सुटल्यावर द्यावा. न सुटल्यास मोबदला महाल लावून द्यावा याप्रमाणें करार. त्याप्रमाणें याजकडून पार पडावें व सरकारांतूनही केल्या कराराप्रमाणें निर्वाह व्हावा.मध्यस्थींत आह्मी, त्यास केल्या कराराप्रमाणें फडशा व सरकारची चाकरी याजपासून घडून येत गेली. सरदारी सर्वोपरी ओढगस्त, दौलतींत उत्पन्न काय आणि खर्च पडला काय ? सखारामपंत बापूबाबत लाख रुपये रयात करावे म्हणून राजश्री नारो शिवदेव यांजबरोबर सांगून पाठविलें होतें व पत्रेंही वरचेवरी लिहीत गेलों. परंतु कांहींच न घडलें. सरदारी गळाठ्यांत आली. तिची उस्तवारी होऊन सरकारचाकरी याजपासून घडली पाहिजे, याकरितां परगणा जंबूसर महाल पूर्वींचे कराराप्रमाणें यांजकडे द्यावा येविशीं दोन चार पत्रें पूर्वीं लिहिलींच आहेत. हल्लींही हें पत्र लिहिलें असे, तरी परगणामजकूरची सोडचिठी येथें पाठवून द्यावी. पेशजीचे करारापैकीं याजकडे बाकी राहिली असल्यास बाकी काय ते लिहून पाठवावी. त्याप्रमाणें यास सांगून निकाल देविला जाईल. सरकार चाकरीविशीही गुंता पडणार नाहीं. ज्यापक्षीं आम्ही मध्यस्त त्यापक्षीं खातरजमा

---

१ पत्र महादजी सिंदे यांचें.

असावी. त्या सरदारींत चार लबाड आहेत. मनस्वी सांगतील तें न ऐकतां लबाडी करतील त्यास निक्षून ताकीद करून बंदोबस्त केला पाहिजे. सारांश परगणे जंबूसरची सोडचिट्टी पाठवून यावी. वरकड राजश्री नारो शिवदेव यांस सांगितलें आहे; ते बोलतील त्याप्रमाणें बंदोबस्त करून यावा. रवाना छ १५ सफर. बहुत काय लिहिणें ? लोभ कीजे हे विनंती.

---

श्री

१९९ — श. १७०१ फाल्गुन वद्य ४
(भा. व. २-८६) — ता. २४-३-१७८०

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

पोष्य त्र्यंबकराव नारायण कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. तेथील क्षेम तागाईत फाल्गुन वद्य चतुर्थी भृगुवासर मुक्काम मालेगांव स्वामीकृपावलोकनें यथास्थित जाणोन स्वकीय कुशल लेखनाज्ञा करीत गेलें पाहिजे विशेष. पेशजीं फौज चाकरीस पाठवावी म्हणोन आज्ञापिलें त्याप्रमाणें फौजेची तयारी होऊन आज्ञेप्रमाणें हजर. यास्तव त्याच उद्योगास लागोन दौलतसंमंधीं हरद्र समजावें आणि कृपा करोन बंदोबस्त होऊन यावा. याकरतां येथून चिरंजीव राजश्री रंगरावआप्पा[1] यांस स्वामीचरणापाशीं पाठविलें आहे. दाखल होऊन सर्व दौलतसंमंधीं कचें पकें निवेदितां ध्यानारूढ झालेंच असेल, त्यास चिरंजीव विनंती करतील ते ध्यानास आणोन ज्या हस्तें अंकूर निर्माण होऊन वृक्षाची लावणी त्याच हस्तें पुढें संगोपन होऊन निर्वेध दौलत चाले तो अर्थ चितीं धरून हरद्र मनास आणोन कृपा करून बंदोबस्त करून देणें खावंदाकडे आहे. सेवक लोक तो पदोपदीं अपराधीच, परंतु पालनकर्तेयांस दिवसेंदिवस अधिकोत्तरच कृपावृद्धि करावी लागते. यास्तव चिरंजीवांचे, विनंतीअन्वयें बंदोबस्त करून देऊन चाकरी घेऊन सरदारीस जिल्हे आपणावर (?) स्वामी समर्थ आहेत. फौजेची रवानगी आज्ञेप्रमाणें सत्वरच करीत असों. सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

---

श्री

२०० — फा. व. १२ श. १७०१
(ना. भो. ७०) — १-४-१७८०

श्रीमंत महाराज राजश्री आपासाहेबाचे शेवेसी

आज्ञाधारक बळवंतराव विष्णु व भवानी नागनाथ कृतानेक विज्ञापना ऐसी जे येथील कुशळ तागायत तारीख २५ माहे रौवल मु० लष्कर नजीक हैदराबाद येथें महाराजाचे पुण्यप्रतापें करून सेवकाचें वर्तमान यथास्थित असो विशेष. लाला संपतराम पेशकार

---

१. लेखकाचा पुत्र.

आहाराम हे येथें नबाब बंदेगानअली याचे सरकारांत खास हुजरातीस नोकर आहेत. यांची शादी नागपुरास नेमस्त झाली आहे, याजकरतां तेथें आले असत. सरकारची मुलाजमतही करतील, ऐशियास शादीचा लवाजिमा सरकारांतून हत्ती घोडा ताशामरफा व मशालची-दुशाख पंचशाख व कनाता, छिमिने, जाहजम वगैरे सरंजामाविषयीं सरकारांतून आज्ञा होऊन शादीचा प्रसंग उत्तम प्रकारें घडून शोभा होय, तो प्रकार करविणार महाराज समर्थ आहेत. मशारनिल्हे राजश्री रायेराया व जानकरामपंत यांचे स्नेहांत आहेत याजविषयीं उभयतांनीं बहुत प्रकारें सांगितलें आहे कीं, यांजवर ममता करून लग्नप्रसंगास जें साहित्य लागेल त्याजविषयीं परवानगी होऊन शोभा होय तें जाहलें पाहिजे. याजवरून हें पत्र सेवेसीं लिहिलें असे. तरी येविषयीं आज्ञा करणार महाराज समर्थ आहेत. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.[१]

---

२०१ श्री

( भा. व. २-९४ ) श. १७०२ शु. १

ता. ५-५-१७८०

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक त्रिंबकराव नारायण कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील क्षेम तागाईत छ २९ रबिलाखरपावेतों स्वामीकृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. आज्ञापत्र सादर झालें, तेथें आज्ञा कीं गुलजारखान याणें आंबे परगणियांत जमाव केलेला आहे. सरकार तालुकियात उपद्रव करील तरी पत्र पावतांच तेथें जाऊन गुलजारखानाचें पारपत्य करणें म्हणून आज्ञा. त्यास चिरंजीवाचे लग्नाचा निश्चय वैशाख शुद्धपक्षीं जाहला आहे. कार्य संपादून गुलजारखानाचे पारपत्यास फौज रवाना करितों. सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

---

२०२ श्री

श. १७०२ वै. शु. १

( भा. व. २-९५ ) ता. ५-५-१७८०

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

पोष्य त्रिंबकराव नारायण कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति. येथील कुशल तागाईत छ २९ रबिलाखरपावेतों मुकाम मालेगांव वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामींनीं पत्र

---

१ पत्र मुधोजी भोसल्यास, पहा. ना. ब. पृ. १२०. भवानी नागनाथ मुनशी ता. १०।२।१७९० रोजीं मृत्यु पावला ( पहा, राज. खं. १०. ३५३ ). चौकडीचें कारस्थानांत हा हैदराबादेस गेला होता.

पाठविलें तेथें आज्ञा कीं, चोपडेकर कमाविसदारांनीं गुलजारखानाचा मजकूर लिहिला कीं, महालीं फिरून धामधूम करितो. तुम्हाकडील फौज अद्याप त्याचें पारपत्यास गेली नाहीं. लवकर फौज रवाना करणें म्हणून आज्ञा. त्यास सरकारचाकरीस सेवकास उजूर नाहीं. साहेबचाकरीस अर्थे प्राणें करून हाजरच आहों, परंतु चिरंजीव[1] स्वामीपाशीं तीन महिने कंबेश होत आले. अद्यापवर प्रथम दिवसच आहे. विना खावंदांनीं या सरदारीचा बंदोबस्त निरवेध करून दिल्यावितारिक्त सेवकाच्यानें कांहींच घडत नाहीं. सेवकाच्या सरदारीचा वोढोचा प्रकार कोणे रीतीचा आहे हें सर्व हरद्र चिरंजीवांनीं व राजश्री नारोपंत यांणीं सेवेसी विनंती केली आहे. मुख्यत्वेंकरून आमच्या दौलतींत ऐवज सरकारबाकीस व आमचे उभारणीस मिळोन शिवराम नाईक आहे. तरी स्वामींनीं निक्षून चौकशी नायकाची समक्ष केल्यास इतक्याही गोष्टी सरबरा होतील. यात संशय न मानावा. आह्मी फौज रवाना करतों, परंतु दरम्यान चिरंजीव केसोराव[2] यांचे लग्नाचें योजून आलें. त्यास लग्नकार्य वैशाख शुद्धपक्षीं अथवा वद्यपक्षांत उरकून फौज लवकरच तिकडे रवाना करितों. आमची ही बातमी नेहमींच ठेविली आहे. खावंदाचे पुण्येंकरून त्याचें पारपत्य यथास्थित होईल. परंतु सेवकाचें चित्त स्वस्थ करणार स्वामी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

श्री

२०३
( भा. व. २-३ )

श. १७०२ आषा. शु. २
ता. ४-७-१७८०

राजश्री बाळाजीपंत नाना गोसावी यांस

सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित मुधोजी भोसले सेनाधुरंधर दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत असिलें पाहिजे विशेष. आपण पत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. लिहिला अभिप्राय कळों आला. चिरंजीव राजश्री सेनासाहेबसुभा येऊन राजश्री पंतप्रधान यांची भेट घेतली. आमची भेट होऊन बोलणीं झालीं. बहुत प्रेमाचा अर्थ दृष्टीस पडला. याचा अनुभव आला. त्याचें स्मरण वारंवार होतें. राजश्री पंत प्रधान याचा व आपले घराचा ऋणानुबंध पूर्वजन्मींचा. त्याचा बयान चिरंजीव सेनासाहेबसुभा व राजश्री दिवाकर पुरुषोत्तम व बाबूराव विश्वनाथ आपणाजवळ करतील ह्मणोन लिहिलें. ऐशियास या दौलतीशीं नातें कसें, येथून काय घडावें, तेथून कसें घडत असावें, स्वराज्याचा अभिमान आपणाकडे, आपण सदैव काळजी वाहत असावी. येथें ल्याहावें तैसें घडत असावें हे वडिलांनीं वर्तणूक करून दाखविली. ते

---

१ रंगराव त्रिंबक, २. केशव त्रिंबक हा तिसरा मुलगा.

जातांना हें सांगोन गेले कीं, त्या दौलतीशीं ऐसे वर्ता. हें सर्व दृष्टीस पाहिलें. त्याप्रमाणें कैलासवासी बाबासाहेबीं वर्तणूक केली. दरम्यान घरकृत्य तेथें एके प्रकारें झालें. याजमुळें चौघेजण मिळून बदनिशा पाडावी, लटकें सांगावें कीं, हे तिकडे मिळाले, तिकडे यांनीं ह्मणावें हे तिकडील दिसतात. या पेचांत नानाप्रकारें पेच. विश्वास पुरेना. ज्या शफथा न कराव्या त्या केल्या. परंतु शेवटवरीं विश्वास न पुरला. यामुळें मकसुदाबादेकडील पेच बसला. सांप्रत वराड गंगथडी शेवटवर नुकसानच होत गेलें. चौघांनीं मिळावें बदनिशा करावी, तेव्हां शेजाऱ्यास प्रबल करावें आणि घर दुर्बळ व्हावें हेंच घडत गेलें. अस्तु. एक इमान दुरुस्त होतें त्या क्रियेनें हा कालपर्यंत नांव मात्र जतन जाहलें. नाहीं तरी येथें कांहींच न राहावें ऐसे दिवस गुजरले. बहु तेरे उपाय केले. निकडीचे वेळेस सर्वांपेक्षां अगोदर येऊन जें घडलें तें सर्वत्र प्रसिद्ध आहे. लिहिणें काय? त्यास आज वीस वर्षांचें श्रेय आपण घेतलें कीं, सर्व एकोमय करून विश्वासाची वृद्धि केली. हें सविस्तर ऐकून जें समाधान झालें हा बयान काय ल्याहावा? श्रीहरि राजश्री पंतप्रधान यांशीं सलामत राखो, आणि त्यांचे दैवानें आपण बहुत दिवस सुखरूप राहोत. तेव्हां ज्या योगें हें घडलें तयाचें सार्थक विस्तारें काय ल्याहावें? चिरंजीव सेनासाहेबसुभा आणि हे फौज कायावाङ्मनें जेथपर्यंत उत्तीर्णता देव घडवील तेथपर्यंत अंतर होणारच नाहीं. जर ते दौलत नीट तरीच हे दौलत पुरते समजलें. यांत संदेह नाहीं. निभिवणार आणि खरें, खोटें समजणार येथील दैवानें फार दिवस कुशलरूप असावें. हें सर्व मंडळ आपलें ऐसें जाणावें. हेंही लिहिणें काय? जें आहेच तें लिहिणें कारण नाहीं. परंतु प्राप्त झालें याकरितां लिहिण्यांत येतें. वरकड सर्व अर्थ समजले. पत्रें मात्र वरचेवर येत जावीं. इतक्यावरी कोणी कांहीं लिहो अगर येऊन सांगो तें एकंदर नच ऐकावें. अथवा उत्तर देखील देऊं नये. पुरती पक्की खातरजमा असावी. या घराण्यांतून अंतर जाहलें नाहीं, आणि पुढें होणार नाहीं. ज्याशीं प्रेम जाहला आणि सर्वस्वें जो योगक्षेम वाहणार त्याशीं प्रतारणा किंवा रंगामेजी हेंच महत्पाप. यावर पाप दुसरें तें कोणतें? पाप जाहल्यास पापाचें फळ काय होतें तें कळतच आहे. त्यास चिरंजीवावरी लोभ जो आपण केला हें सर्वत्रांनीं सांगितलें, येविशीं जो आनंद चित्तास जाहला हें श्रीहरिच जाणतो. येथील सर्व लक्ष एक आपणाकडे आहे. दुसरें सुचत नाहीं ना सुचणार नाहीं. येविशींची दिवसोंदिवस उभयपक्षीं प्रचीतच दिसेल. येतद्विषयीं विस्तारें काय ल्याहावें? रवाना छ १ माहे रजब. येथील लक्ष सर्व प्रकारें आपणाखेरीज रतिमात्र नाहीं. श्री साक्ष असे. फार काय ल्याहावें? बहुत काय लिहिणें? लोभ असों दीजे हे विनंती.

---

२०४ श्री
(भा. व. २-१०७)

श. १७०२ आषाढ व. ५
ता. १९-७-१७८०?

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक आनंदराव भिकाजी (रास्ते) कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ १५ रजबपावेतों परगणे बलसाड येथील व सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. सेवकाचे कामकाजाचे बंदोबस्ताविशींचीं कलमें.

राजश्री रघुपतराव राजेबहाद्दर यांस सतरा हजार रुपये कर्ज देऊन सातपुरचें इनाम व नाशीक येथील घुमावाबाबद वाडे व बाग गहाण घेतले होते, त्यास मशारनिल्हेचे जहागिरीची वगैरे वाटणी जाहली; तेसमयीं सदरहू गहाणें राजश्री रंगराव राजेबहाद्दर यांचे वाटणीस गेली. याजमुळें सेवकाचे पैक्यास हिसका पडोन मशारनिल्हेकडील पैका न उगवे येविशीं पेशजीं विनंतीपत्र पाठविलें होतें, त्याचें उत्तर आलें. वरकड स्वामीस निवेदन करून मग व्यवहार करावा हे माझी चाल. त्यांत अंतर पडलें हें खरेंच आहे. मशारनिल्हेस परभारें सावकाराकडून कर्ज घेऊन ऐवज देविला, त्या सावकाराची निकड बहुत. तें पत्रीं कोठवर लिहूं. माझा सर्व प्रकारें अभिमान स्वामीस. राजेबहाद्दर यांस आज्ञा होऊन सेवकाची मुक्तता सावकाराकडून होय तें करणार स्वामी आहेत. कलम १

नाशीक येथील पाटील याणें बागेकरितां जमीन दिल्ही. त्या जमिनींत देवास फुलझाडें वगैरे लावणी करून विहीर बांधली आहे. मामलेदार जमिनीचे साऱ्याकरितां हमेशा तगादा करून दरसाल पंचवीस रुपये प्रमाणें मागतात. ऐशास सारा माफ होऊन मामलेदार यास आज्ञा जाहली पाहिजे. कलम १

मौजे सातपूर हा गांव नाशिककर पीरजादे यांजकडे इनाम व मौजे मजकूरची पाटीलकी राजश्री राजेबहाद्दर यांची. ते गांवची वहिवाट करून पीरजादे यांस हात उचलोन इनामाची बेरीज देतात, व मौजे मजकूरपैकीं जमीन नाशिकचे गुरेंचराईस दिली आहे. त्याएवजीं सरकारांतून मुरे गांवपैकीं मोबदला जमीन दिली. त्या जमिनीचा हिसा पीरजादे यांस पावत नाहीं म्हणोन नाशिकचे मुक्कामीं स्वामीस विनंती केली. त्याजवरून गांवची वहिवाट पीरजादे याजकडे चालू जाहली. ते आजपर्यंत बेदिकत चालत होती. मुरेगांवचे जमिनीचा हिस्सा पावत नव्हता. हल्लीं रंगराव गांवसुद्धां वहिवाट चालूं देत नाहीं येविशीं राजेबहाद्दर यांस ताकीद होऊन सातपूरची वहिवाट व गांवची जमीन पीरजादे यांजकडे चालती होय तें करणार स्वामी समर्थ आहेत. कलम १

सदर्हू तीन कलमें लिहिल्याप्रमाणें विनंती मान्य होऊन बंदोबस्ताविशींची आज्ञा चिरंजीव राजश्री बाबाकडे करणार स्वामी समर्थ आहेत. माझा अभिमान सर्वतोंपरी स्वामीस तेथें विस्तारें काय लिहूं ? सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

श्री

२०५ श. १७०१ अ. श्रा. व. १२

( भा. व. १. ७ ) ता. ९-८-१७८०

करारनामा रा. माधवराव पंडित प्रधान यांजकडून नबाब हैदरअली खान यांसी सन ११९३ हिजरी, शके १७०१ विकारीनाम संवत्सरे सुाा समानीन मया व अलफ.

सरकारचा व इंग्रजाचा बिघाड, याजकारितां तुम्ही इंग्रजांशीं बिघाड करून चेनापट्टण व अर्काट व त्रिचनापल्ली वगैरे इंग्रजाचा तालुका मारून इंग्रजास आयास आणावे. इंग्रजाचा वगैरे नवा मुलूख तुम्ही सोडवाल व खंडण्या घ्याल त्यांत निमे सरकार व निमे तुम्ही. सरकारांतून मातबर तुम्हांपाशीं राहतील त्यास इतल्ला असून निमे मुलूख व निमे खंडणीचा वगैरे ऐवज समजावून देत जावा, प्रतारणा करूं नये. १ कलम

सरकारांतून सरदार व फौजा इंग्रजावर सुरतप्रांतीं रवाना होतील. तुम्ही चेनापट्टणाकडे वगैरे इंग्रजावर चालून जावें. नबाब निजामअली खान बहादूर सिकाकोल रायबंदरीकडे शह देतील. १ कलम

रावरास्ते यांचे भाऊ सरकारचे दोन हजार फौजेनिशीं राहतील. १ कलम

इंग्रजाकडील सलुख्याचा पैगाम तुम्हांकडे आल्यास सरकारचे इतल्याशिवाय तुम्ही सलुख करूं नये; व सरकारांत पैगाम आल्यास तुमचे इतल्याशिवाय सलूख होणार नाहीं, अगर प्रसंगानुसार सलुख करणें झाल्यास सरकारचे व तुमचे मसलतीनें सलुख फलाणे तऱ्हेचा करावा असें ठरवून त्याप्रमाणें करणें तें केलें जाईल. १ कलम

तीर्थस्वरूप रघुनाथरावदादा व दादासाहेबासंबंधीं व स्वराज्यांतलि कोणी लहानमोठे यांसी तुम्ही राजकारण ठेवूं नये व सिलसिला राहूं नये. पैका देऊं नये. राजकारण सिलसिला असल्यास तोडावें. आसरा देऊं नये. १ कलम

चंदावर संस्थान पुरातनापासून भोसल्यांचें. तेथें इंग्रजांचा उपद्रव झाला आहे तो परिहार करून भोसल्यांचें राज्य निर्वेध करावें. याविषयीं उभयपक्षीं अगत्यवाद असावा. १ कलम

इंग्रजांकडील व महमदअलीखान यांजकडील मुलूख वगैरे तुम्ही सोडवाल त्यांत सरकारचे वांटणीचा निमे मुलूख येईल तो तुम्हांस लगत, सबब तुम्ही घेऊन त्याचे मोबदला सरकारचा मुलूख तुमचे शरीकांत आहे तो तुम्ही सरकारांत द्यावा. १ कलम

समयानुसार प्रसंग पडल्यास सरकारांतून लिहूं ते समयीं तुम्ही दहा हजार बार कुमकेस खर्चाची बेगमी करून पाठवून द्यावे, तुम्ही सरकारांत लिहिल्यास पांच हजार फौज खर्चाची बेबमी करून पाठवून दिली जाईल. १ कलम

तुंगभद्रेपारचा मुलूख कोटकिल्ले सरकारचे व पाळेगाराचे तुम्ही घेतले ते दरोबस्त व तुंगभद्रेअलीकडील मुलूख व मकान

घेतलीं. आजपावेतों तुमचे शरीकांत आहेत तीं तुम्हांकडे करार राहतील. याउपर सरकार तालुक्यास वगैरे तुम्ही उपसर्ग रतीमात्र देऊं नये. सरकारांतून तुमचे तालुक्यास उपसर्ग होणार नाहीं. तुंगभद्रेअलीकडील संस्थानें आहेत त्यांस तुम्हांकडून उपद्रव लागूं नये व त्यांची कुमक तुम्ही करूं नये. १ कलम

नबाब निजामअलीखान बहादूर यांचा व सरकारचा स्नेह याजकरितां त्यांचे तालुके आदवानी वगैरे यांस तुम्हांकडून उपद्रव लागूं नये. तुम्हांकडे सरकारचे पेशकशीचा ऐवज आहे त्याचा ठराव सन ११९३ हिजरी शके १७०१ विकारीनाम संवत्सरे अखेरपर्यंत पंधरा लक्ष रुपये करार केले आहेत. सदरहू पंधरा लक्ष रुपये पुण्यांत जरूर पावते करून पावल्याचा जाब घ्यावा. १ कलम

पेस्तर सन ११९४ हिजरी शके १७०२ पासून तुम्हांकडे बारा लक्ष रुपये करार केले असेत; तरी सदहू बारा लक्ष रुपये तुम्ही दरसाल सरकारांत देत जावें. याची सावकारी निशा नक्त रुपयांची यावी आणि पुण्यास भरणा करून पावल्याचा जाब घेत जावा.

---

श्री

२०६ श. १७०२ श्रा. व. २
(भा. व. २-४९) ता. १७-८-१७८०

विज्ञापना. श्रीमंत राजश्री दादासाहेबीं थोर तोफा ओतावयाचा कारखाना सुरू केला आहे. त्याचा सरंजाम पहिला येथें आहे तो व आणखी नवा घेऊन जावयाकरितां दोन खिजमतगार आले आहेत, ते सांगत होते. श्रीमंत कानाच्या उपद्रवानें हैराण बहुत आहेत. कान दुखत होता तो फुटोन फोड होऊन पू वाहतो, याप्रमाणें सांगत होते. येविशीं तिकडून सरकारांत बातमी मुद्दाम असेल. परंतु आढळला प्रकार लिहिला आहे. दुसरे दोन खिजमतगार व एक चोपदार हैदराकडे जावयाकारितां मुंबईस आले आहेत म्हणोन पूर्वी विनंतीपत्रीं लिहिलें होतें. ते तेथून रवाना जाहल्यास चार रोज जाहले. गोमंतकास जहाज गेलें त्यावरून गेले. सदाशिव महादेव सोवनी यांणीं आपले कुटुंबाचे खर्चाबद्दल गोव्यास ऐवज पाठवावा याकरितां येथें पाठविला होता. तोही येथून गलबतावरून गेला. छ १६ साबानचें आज्ञापत्र सादर जाहलें, तेथें आज्ञा बारीक मोठी बातमी वरचेवर लिहित जाणें. त्यास आज्ञेप्रमाणें बातमीचे चौकशींतच असतों. जी कळण्यांत येते ती लिहीत जातों. टोपकराचा कारभार खुलाशाचा नाहीं, याजमुळें बारीक बातमी समजावयासी प्रयत्न लागतो. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

श्री

२०७ श. १६०२ भा. शु. ७
( भा. व. २-६१ ) ता. ५-९-१७८०

पौ छ ११ सवाल

श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसी

विनंती सेवक गोविंदराव मुक्काम कल्याण चरणावरी मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ ६ माहे सवालपावेतों स्वामीचे कृपेंकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. मुंबईकडील बातमी महमदअल्ली राऊत मुसलमान मुंबईस आहे, त्याचें आमचें इष्टत्व; याजकरितां त्यांणीं मुजरद माणसाबराबर सांगोन पाठविलें कीं, इंग्रेज सामान सरंजाम गलबतांत भरून तयार झाला. एका दोहों रोजीं खाडी कांठाच्या तरी बंद करून वसईस जाऊन उतरणार, यास्तव सावध असावें, याप्रमाणें सांगोन पाठविलें. महमदअल्ली माणूस प्रामाणिक आहे. केवळ गलथ सांगून पाठवणार नाहीं. बातमी आली तो सेवेसी विदित झाली पाहिजे, याकरितां लिहिलें आहे. वसईसही हें वर्तमान लेहून पाठविलें. सारांश इंग्रेज उतरो अथवा न उतरो परंतु राऊत व गाडदी वसईस असावे, यास्तव विंनती लिहिली आहे. हजार स्वार व दोन हजार गाडदी यांची रवानगी होऊन दोहो चहूं रोजांत वसईचे दादरावर येऊन पोंहचत तें झालें पाहिजे. येथून राजश्री दादो हरि गोखले कारकून मुंबईस मुजरद बातमीकरितां रवाना केले होते. ते छ ५ मिनहूस आले. त्यांणींही महमदअल्ली राऊताचेच बातमीप्रमाणें सांगितलें. व गलबतें तयार झालीं त्यांत धाकटा ताड ( Todd ) इंग्रेज नेमला होता. तो मृत्यु पावला म्हणून मुंबईस बारकाईनें बोलतात. यास्तव मसलत तूर्त राहिली ऐसेंही बोलतात. परंतु तयारी झाली आहे. कोणीकडे जाईल हें समजत नाहीं. हजार इंग्रेज व मुंबई गुराब सुरतेस रवाना झाली हें वर्तमान आहे. तस्मात् सुरतेकडील रवानगी दिसते. त्यास लौकिकांत व बातमींत वसईचीच मसलत ऐकिल्यांत येते. सारांश त्याचें करणें एक व डंबर दाखवावें दुसरेकडे हीही रीत त्यांची आहे. सत्यमिथ्य कांहींच म्हणवत नाहीं. आपले स्थळाचा उपराळा जरूर असावा. कोण प्रसंग कसा येईल हें न कळे.याजकरितां राऊत व गाडदी यांची रवानगी त्वरित झाली पाहिजे. राऊत रवाना होतील त्यांसमागमें सरदार असतील त्यांस ताकीद असावी कीं, प्रस्तुत शेतें उभीं आहेत. सवंगणी झाली नाहीं. तरी कल्याणचे मामलेदार घाटबुडी तुम्हांजवळ येऊन दाखल होतील. ते ज्या मार्गे फौज वसईस घेऊन जातील त्या मार्गे जावें. मार्गी रयतेस किमपि उपद्रव देऊं नये. याप्रमाणें आज्ञा झाल्यानें रयतेचा बचाव होईल. आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत. इष्टोल फाकडा होता त्या प्रांतीं हल्लीं धाकटा ताड इंग्रज हिंमत भोगोन वसईची मसलत कबूल केली; आणि सामान शें दीडशें लहान मोठीं गलबतें भरून तयार होऊन निघावें, इतक्यांत मृत्यु पावला. त्यामुळें त्याचेप्रमाणें मर्द

मसलत शेवटास नेई असा योजोन वसईस उतरावें. तेथें उतरलियाजवर सुरतेची व भडोजची कुमक दोन हजार गाडदी यावी व मदरासेच गाडदीविशी इंग्रजानें गलबत पाठविलें होतें. तेथून चारशें गाडदी आले. सुरतेकडील कुमक अद्याप आली नाहीं. सारांश मुंबईकर वसईस उपद्रव करील असें दिसतें. आधीं उत्तरोन दादर बंद करावा म्हणजे टापूंत कुमक पोहचणार नाहीं. तेव्हां अर्थी दिसतें हा मनसबा खरा. दादरावर इंग्रज येऊन पोहचल्यावर मग बाहेरील कुमक पोहचणें कठिण. किल्ला सांभाळून दादरावर इंग्रजाचें पारपत्य होणें घडावयाचें नाहीं. याजकरतां दोन हजार स्वार, दोन हजार गाडदी असे चोहो पांचा दिवसांत येऊन दादरावर पोहचते झाले पाहिजे. मुंबईत कारकून चार दिवस याच कामाकरितां ठेविला, तो पांचवे सवाली दोन प्रहरी आला. सारांश इंग्रज वसईस उतरो किंवा न उतरो. फौज लवकर येऊन पोहचलियासी जाग्याची हुशारी राहून इंग्रजास दबाव बसेल. या वेळेस फौज पाठवावयाची स्थीरता झाल्यास स्थळाचा बचाव होणार नाहीं. ऐकिली बातमी लिहिली आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति. आश्विन शुद्ध पुर्णिमेचें उधान समीप आलें. यांजकरितां पुर्णिमेअलीकडे फौज वसईस पोहचली पाहिजे हे विज्ञाप्ति.

---

श्री

२०८ श. १७०२ मार्ग. व. १४

( भा. व. २-५२ ) ता. २४-१२-१७८०

विनंती सेवक गणेश बल्लाळ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ २७ जिल्हेजपावेतों स्वामीचे कृपावलोकनें करून सेवकाचा वर्तमान यथास्थित असे विशेष. येथील आजचा मजकूर अधिकोत्तर मेस्त्र सिबील मंगरूल, होनावर, तालचिरीकडे जावयासी सिद्ध जाहला आहे. आज जहाजावर चढेल असें आहे. तेथें जाऊन तेथील लढाईचा वगैरे जेरजबर पाहून उपरांत हैदरकडे सलुखाच्या राजकारणास जावें असेंही आहे. मेस्त्र टामस हाम तोही आज जहाजावर चढोन बसरा वाटेनें विलायतेस जावयाच्या जलदींत आहे. गेल्यावर लिहीन. परंतु आजच दोघेही हाकारून जावयाची तयारी आहे. फिरंग्याची फरकते मागें ( मस्कते मार्गें? ) माल घेऊन दोन साहुकारी आली होती ती दमण या ठिकाणीं जाऊन आली. तो काफला आज करून ( लादून? ) गोव्यास जावया सिद्ध जाहला आहे. साहुकारी इंग्रजी तरांडे माल भरून सुईसेहून बंगाला जावयाकरितां हाकारून जात होते. ते दोन फरासिसाचीं जहाजें लहान गोव्यास आलीं होतीं, तीं मोरीस जातां राहिलीं. दरम्यान गांठ पडोन इंग्रजी तरांडे धरून नेले असें वर्तमान आहे. तथ्य जाहल्यावर चौकस करून मागाहून सेवेसी लिहीन. सुरतेकडील कांहीं अधिकोत्तर समजण्यांत आलें नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

२०९ श्री

श. १६०२

( भा. व. २-७६ ) स. १७८०

विनंती विशेष. सालसी तालुका राजश्री चिमणाजी रामचंद्र यांकडे हल्लीं हुजुरून जाहला. तेथील ऐवज खर्चापुरता नाहीं. यास्तव मुलखांत अधिकोत्तर जमा होण्याचा अर्थ शोध पाहतां याउपरी आबादी पुढील लावणी नवीन होऊन बागाईत नारळ लाववावे. येविशीं कौल सढल रयाती झाल्यानें प्रयत्न पाहूं, म्हणोन एक दोघे तेथीलच येऊन विचारतात. त्यास लावणीची योजना पाहतां नारळ झाडें व खाजणे स्वारीची व मिठागर नवे व जमातीची बकर नवी चालती करावी. हे चारी कलमास पहिल्यापेक्षां कौल कांहीं वर्षे जाजती व बागायत नारळी नवेच जागा लावतील. त्यास चौथाई इनाम द्यावयाचें केल्यानें उमेदवार होऊन आबादी दहा वर्षांनीं होऊं लागेल. येवेशीं आज्ञा जाहलियानें पुढें पांच सात हजार आकार जाजती व्हावयाचा डौल होईलसें भासतें. यास कौल द्यावयाचें तें लिहिल्याअन्वयें फारच रयात व वर्सों महसूल धाऱ्यापेक्षां कौल केल्यानें नवेच जागां लावणी होईल. तर आज्ञा होईल तसे येथून कौल द्यावयाची आज्ञा जाहली तर देऊं. नवी लावणी हर तरतुदेनें करावी हें मामलेदाराचे प्रत्ययास आलें. बहुत काय लिहिणें ? कृपा करावी ही विनंती.

---

२१० श्री

६४ श. १७०२ पौ. व. १२

( ना. मो. ६४ ) ता. २१-१-१७८१

श्रीमंत राजश्री आपासाहेबांचे सेवेशीं

आज्ञाधारक दर्याबसिंग सोमवंशीं व रामाजी केशव कृतानेक विज्ञापना ऐशी जे. किल्ले गावेलगड येथील किल्लेदारीचें काम परमोदसिंग, झामसिंगाचा पुतण्या याचे जिमेस होतें, त्याजपसून अंतर पडलें; व त्याचे दैवानुरूप सरकारांतून शिक्षाही झाली. सांप्रत महाराजानें कृपाळु होऊन किल्ले मजकूरचे किल्लेदारीचें काम आपणास सांगोन सर्फराज केलें. निष्ठेनें वर्तोन एकविचारें चालोन इमानें इतबारें सेवा करण्याविषयीं आज्ञा केली, ती शिरसावंद्य करून आपलें इमानें सत्य स्मरून इमानपत्र सेवेशीं लिहून दिल्हें आहे. उभयतां मिळोन आज्ञेप्रमाणें किल्ले मजकूरचें किल्लेदारीचें वगैरे कामकाज करून महाराजांचे कृपेस पात्र होऊं. परस्परें आपसांमध्यें अंतर करूं अगर सरकारचे कामांत कसूर करूं तर आपणास श्री कुळदेवतेची व इष्टदेवतची शपत असे.

ता० छ २५ माहे मोहरम, सन ११९५ हे विज्ञापना. हस्ताक्षर रामाजी केशव.

---

श्री

२११ श. १७०३ वै. शु. ४

( भा. व. २-१४१ ) ता. २७-४-१७८१

सेवेसी गणेश विश्वनाथ[१] कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ २ जमादिलावलपावेतों मुक्काम हलदणी येथें स्वामीचे कृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. हणमंतराव ढमढेरे पथकसुद्धां सालगुदस्तां केसोपंताचे मसलतीपासून चाकरीस होते. सरकारचाकरी एकनिष्ठनें केली. लढाईंत खाशास जखमाही लागल्या, तेव्हां स्वामींनीं कृपाळु होऊन सरंजाम जप्त होता तो मोकळा केला. महालचा वगैरे बंदोबस्त झाला. पुढें घाटाखालीं सडी स्वारींत मशारनिल्हेस बरोबर न्यावें. त्यास शरीरीं समाधान नाहीं ह्मणोन खाशास मात्र घरीं जावयास निरोप दिला. तेथें जाऊन औषधी उपाय करावयाचे ते केले परंतु गुणास आले नाहींत. शेवटीं मृत्यु पावले. पथक तर चाकरीस समागमेंच आहे सरदारीचें नांव चालून बंदोबस्त जाहला पाहिजे. याजकरितां ढमढेरे याजकडील राजश्री शंकराजी गोपाळ कारकून सेवेसी पाठविले आहेत, हे विनंती करतील ते मान्य होऊन दत्तपुत्र घ्यावयाची आज्ञा केली पाहिजे. हणमंतराव याची स्त्री अगोदर मृत्यु पावली. मशारनिल्हेची मातुश्री आहे तिजलाच दत्तपुत्र घ्यावयाची आज्ञा असावी. मशारनिल्हे यांणीं साहेबचाकरी फार चांगली केली आहे. दत्तपुत्र घ्यावयास अनमान नसावा; कदापि नसावा. कृपा करून आज्ञा जाहलीच पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

श्री.

२१२ श. १७०३ वै. शु. १२

( भा. व. २-५१ ) ता. ५-५-१७८१

पौ छ १४ जमादिलावल इहिदे समानीन वैशाख

सेवेसी आज्ञाधारक गणेश बल्लाळ ओक ता जंजिरे उपरी चरणावरी मस्तक ठेवून शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ १० जमादिलावलपावेतों सेवकाचें व तालुकेमजकूरचें वर्तमान यथास्थित असे विशेष. मुंबईंतील बातमी तर, एकुणीस असामी मातबर इंग्रेज लढाईंत पडिले. त्यांत दोन चांगले मोठे, एक गाडरचे बरोबरीचा व एक हटली असे पडिले; व सरासरी जखमी व ठार अडीच तीन हजार माणूस जाहलें. बंदुखा चार पांच हजार लुटली गेली. अशी जरब आज तागाईत इंग्रजास बसली नव्हती. चढोन गेला होता. मुंबईंतील सारें जन हासतें. जिन्नस तेथून महाग जाहला. पैसा कोपिनींत नाहीं. सावकारांचीं तमाम दिवाळें निघालीं. रयत पळोन जाऊन भरली. खावयास नाहीं. मोठा कल्लोळ आहे.

---

* उपनांव बेहरे. याचें पत्र नानाफडणिसास.

मुंबईतील लोक झाडून मुंबईत साष्टी, उरण, बेलापूर या जागा बोलाविले व कलकतवाला याणें वसई कल्याणास रहावें, छावणी करावी, याजप्रमाणें मनसब ठरला आहे. मोठ्या हलाखींत जरब खाऊन आला. याउपरी उठोन चाल पुढें करावी हा दम राहिला नाहीं. आपले जागा सर्द जाहला आहे. कलकतवाल्याची व मुंबईकराची चित्तशुद्धि नाहीं. मद्रासेहून लेहून आलें कीं, लौकर कुमक होते तरी बरें, नाहीं तर हैदरनाईक मद्रास घेतात. याप्रमाणें निकडीचें आलें ते विलायतेहून आठ मनवर आले होते ते व दुसरे सावकारी नोरोसा करून चवदा रवाना केले. ते छ ५ जमादिलावलीं मुंबईहून हाकारोन उंदेरीचे बाऱ्यावर एक दिवस होते. नागरवाड्यास खालीं थेट मद्रासेस गेले. त्यावर भरती पालाचे लोक मात्र आहेत. जाजती नाहीं. आंतील बोलणें त्याचें आहे कीं, घेतले जागे सारे घेऊन साष्टी, उरण खेरीज करून देऊन सल्ला झाल्यास करावा. श्रीमंत राजश्री दादासाहेब यांची कांहीं तडजोड पाहून मात्र घ्यावी. आम्ही सावकार सरकारासी लावून परिणाम नाहीं. याजप्रमाणें मानस आंतील आहे. सारे सावकार व जन त्यास म्हणतें कीं, सरकार श्रीमंत त्याजवळ जाऊन तुझा शेवट नाहीं. आतां मन परिपाकास गेलें आहे. जिन्नस तेथून महाग. भातास पाड, परंतु रुपये तीसपासून पस्तीसापावेतों हल्लीं झाला. आजपावेतों भातें जुजबी गेलीं. आंता भातें आहेत कोठें? तमाम मुलूख जाळून लुटून फरत. मुलखांत भातास पाड विसा रुपयानीं खंडी मिळत नाहीं. भातच नाहीं. पुढें तमाम रयत जाऊन पळोन मुंबईत राहिली आहे. खात्ये काय? मोठी जरब इंग्रजानीं खाल्ली. आतां चार महिने जीव धरून जाग्यांत छावणी करून राहणार असा मनसबा आहे. दुसरी कांहीं मसलत नाहीं. वसई, अर्नाळा, कल्याण, बेलापूर, उरण इतकीं ठाणीं मात्र आहेत. बाहेर मुलखांत माणूस कोठें दिसावयाचें नाहीं. ठाण्यांत किल्ल्यांत राहून करितो काय? वसईतील व अर्नाळेयाची वस्तवानी, तोफा, दारूगोळा झाडून इळाखिळा देखील आणला. तेथें कांहीं ठेविलें नाहीं. तोफा नाकारी वस्त गैरउपयोगी तितकी ठेविली आहे, दागदोजी करीत नाहीं. तसेंच आहे. आतां तो आश्रा धरून छावणी करून चार महिने राहणार. त्याचे तोंडावर पांच हजार फौज चांगला हियाचा सरदार इतका असावा. बाहेर माणूस निघतांच उचलावें. मुलूख राहूं वसों देऊं नये. आंत राहून खातो काय? परिणाम लागतो कसा? तो आश्रयास राहून तोफांचे मारगिरीपुढें येऊं देणार नाहीं. लोक जाया करील. यास कोंडून आंतचे आंत राखावा. पांच हजार फौज आसिली म्हणजे पुरल्ये. एक वेळ मागें तोंड फुटलें. गाडर कलकत्त्याहून चढोन आला त्याची ही गत झाली. आतां दुसरी कुमक येऊन चढाई करील ते दिवस लांब आहेत. पांच मुर्दे गोणत्यांत बांधोन पांढरे कातडीचे बुडालेले येऊन जंजिरेमजकूरचे बंदरीं लागले आहेत. मुंबईतील आहेत. हैदरनाइकानीं तिकडे मोठी जरब दिल्ही आहे. याजप्रमाणें बातमी आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

---

श्री

२१३ श. १७०३ श्रा. शु. १
( भा. व. २-१४४ ) ता. २२-७-१७८१

सेवेसी गणेश विश्वनाथ साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ २९ रजब मकाम शहर आमदाबाद येथें स्वामीचे कृपावलोकनेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामीनीं छ १३ जमादिलाखरचें आज्ञापत्र सादर केलें, तेथें आज्ञा कीं, राजश्री गोविंदराव गायकवाड व खंडेराव गायकवाड हे उभयतां फौजसुद्धां जाऊन सावखेडचें व कलोलचें ठाणें घेतलें व म्हसाणचे ठाण्यास मोर्चे लागले आहेत. राजश्री फत्तेसिंगराव गायकवाड पेशजीचे कराराप्रमाणें अमदाबादेहून कूच करून मुलुकगिरीस गेले असतां प्रांतांत बखेडे होतात. उभयतां गायकवाड याजबरोबर तुम्हाकडील व राजश्री राघो भिकाजी याजकडीलही लोक मदतीस आहेत व आमिनखान पठाण फितुरी तो मुर्वतीनें मृत्यु पावला. त्याचा भाऊही तसाच. त्यामुळें त्यास फत्तेसिंगराव यांणीं लुटलें. गोविंदराव व खंडेराव गायकवाड यांची फौज शहरांत उपाशी मरूं लागली, खर्चास मागूं लागली तेव्हां खर्चास कोण देतो, याजकरतां बाहीर गेली. दसकुरईत होती. घासदाणा घेऊन दोन महिने कालक्षेप केला. ती फौज बाहेरच आहे. तेथें आमीनखानाचा भाऊ येऊन त्यास भेटला आहे. त्याजवळ मी त्यास चाकर मीं कशास ठेवावा. ऐसें असतां ते लिहितात हेंही उत्तम. परंतु आमीनखानाचा भाऊ कसा आहे हें देखील नजरेनें पाहिलें नाहीं. याप्रमाणें इकडील वर्तमान आहे. गोविंदराव व खंडेराव यांचीही फौज व पाईचे लोक चार हजारपावेतों जमले आहेत. त्यांचें यांचें दोन कोसाचें अंतर आहे. पुढें काय होईल पहावें. मी स्वामीचे आज्ञेप्रमाणें उभयतांस सांगतों. तेहि म्हणतात कीं, फौज आम्ही शहराजवळ आणितों, उपद्रव करीत नाहीं असें म्हणतात. घडेल तें खरें. जाहलें वर्तमान सेवेसीं कळावें म्हणून लिहिलें असे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

२१४ श्री
( भा. व. २-१४५ )

विनंती उपरी. कृपा करून स्मृतिदर्शक विशेष अपेक्षित पदार्थ परवरें सुमारें ५० पन्नास पाठविलीं तीं पावलीं. निशीस पचनोत्तर श्रीस नैवेद्य समर्पण करून मंडळीसहित शेष स्वीकारांत येईल. परवराचें बीज किंवा कलमें उपवनांत लागेत तो पदार्थ प्राप्त होयाचा असल्या सापेक्ष हे विनंती.

---

२१५ श्री

( भा. व २-१२ ) श. १७०३ मार्ग. शु. ६

ता. ११-१७८१

पौ छ २१ जिल्हेज इसने समानीन हस्तें कासीद

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

सेवक सदाशिव राम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागायत छ ४ जिल्हेज यथास्थित असे विशेष. स्वामीनीं मुजरद कासीदजोडीसमागमें आज्ञापत्रें मजला पाठविलीं तीं पावलीं. पत्रीं आज्ञा केली राजश्री बळवंतराव व भवानीपंत यांस आपल्याकडे पाठवावें. शफतपूर्वक पत्र लिहून पाठवावें म्हणून नवाबांनीं लिहून पाठविलें. त्यास उभयतांस हैदराबादेस नबाबाकडे बिदा करावें. त्यांचे भाव काय, चित्तांतील आशय काय असतील ते समजून घ्यावे. राजश्री कृष्णराव नबाबाकडे गेले आहेत. यांचें बोलणें नवाबाशीं होईल. भोसले व श्रीमंत राजश्री पंतप्रधान दोनी एक आहेत, ही गोष्ट सर्वांस असाह्य आहे. याजकरितां नवाब उभयतांमध्यें किंतु पडावा अशीं बोलणीं बोलतील. याजकरितां बळवंतराव व भवानीपंत गेले आहेत. त्यांशीं जें बोलणें तें कृष्णराव यांच्या बोलण्यास एकवाक्यता पडे असें बोलत असावें, त्यांत दरज दिसूं नये. स्वराज्याच्या वृद्धीची कळकळ राजश्री सेनाधुरंधर बाळगितात. दोनी दौलती एक, त्याअर्थी उचित आहे. नवाबास शफत लिहून देऊं नये. बळवंतराव व भवानीपंत असले तर समक्ष सविस्तर लिहिल्याप्रमाणें सांगवावें. गेले असल्यास सत्वर लिहून पाठवावें. म्हणून त्यावरून राजश्री सेनाधुरंधर यांशीं आज्ञेप्रमाणें सर्व अर्थ बोलण्यांत आणिले. आज्ञापत्रापूर्वी बळवंतराव व भवानीपंत यांची रवानगी हैदराबादेस जाहली आहे, त्या वेळेस उभयतांस सेनाधुरंधर यांणीं बहुत सांगितलें आहे. पंतप्रधान व आम्हीं एकविचारें आहों, दरज पडत नाहीं, याअर्थी तिकडील अर्थ तुम्हांस अनेक प्रकारें ममता दाखवून सांगतील तें श्रवण करून त्यांचें उत्तर देणें तें आपल्याकडून अंतर न दिसे असें यावें. कृष्णराव बल्लाळ तेथें आले आहेत. ते व तुम्ही एकविचारें होऊन जाबसाल बोलत असावे. गंगथडी व वराड वगैरे जाबसाल आहेत. हीं कामें उलगड्यांत आलीं नाहींत. येविशीं तुम्ही बोलाल त्यास कृष्णरावाकडून उपराळाच होऊन येईल. नवाबाच्या चित्तांतील खुलासा कसा आहे हें सर्व समजलें आहे. तुम्हीं समजून नवाबाशीं बोलणें तें बोलावें, व उत्तर करणें तेंहि समजून करावें. परस्परें ऐक्यता आहे ती नसावी म्हणून अंतर पहात आहेत. तें आज सहा वर्षांत नवाबाशीं मिळालें नाहीं व पुढेंहि मिळावयाचें नाहीं. येविशीं तुम्हीं फार सावध असून आपलीं कामें लक्ष्यांत आलीं आहेत तीं उगवून घ्यावीं. जो मजकूर घडेल तो हिकडे वरचेवर जलद लिहीत असावें. येथून उत्तरें लिहिलीं जातील त्याप्रमाणें करावें, म्हणून सांगून रवाना केले आहेत. शफतपूर्वक लिहून कागद मागितला. त्याचें उत्तर लिहून यांणीं पाठविलें. आपल्याशीं करारमदार, शफत, इमान

करणें ती गोष्ट पहिली अलजपूरच्या मुकामीं जाहली आहे व आपणहि करून दिली आहे. त्याअलीकडे त्या करारांत कांहीं अंतर आम्हांकडून दिसून आलें असल्यास नवीन घडावें. याचें उत्तर आल्यावर पुन्हा खातरजमा करावयास येईल. त्यावर नवाब चें उत्तर आलें. पहिल्या करारांत अंतर नाहीं. परंतु दिवाकरपंत गेले यास्तव असावें त्यावरून याणीं त्यास लिहून पत्र पाठविलें जे पहिला करार आहे, परस्परें तो प्रमाण आहे, म्हणून लिहून दिलें. शफत लिहिली नाहीं. माझ्यासमक्षच पत्र लिहून दिलें त्यांत पहिला करार परस्पराचा आहे तो प्रमाण ह्मणून लिहिला आहे. अधिक किमपि नाहीं. शफत लिहून देणार नाहीं येविशीं माझी खातरजमा पुरती करून यांणीं दिली आहे. आज्ञापत्रें हल्लीं आलीं त्याप्रमाणें पूर्वींच बळवंतराव व भवानीपंत यांस सांगितलें आहे व हल्लींही पत्रें आजच लिहून हैदराबादेस रवाना केलीं. त्यांत आणखी मजकूर स्वामीच्या आज्ञेप्रमाणें लिहिला आहे. कृष्णरावजी यांसहि यांणीं पत्र लिहिलें आहे. तेथें एकवाक्यतेनेंच जाबसाल करितील. दरज दिसूं देणार नाहींत. काशीहून इंग्रज कांहीं जमीयत घेऊन खुषकीच्या मार्गे कलकत्त्याकडे गेला. काशींत एक पलटण व कारभारी इंग्रज ठेविला आहे. चैतसिंगास पत्र पाठवून तुह्मीं आपला कारभार पहिल्याप्रमाणें येऊन करावा, तुमचे दुस्मान अवसानसिंग वगैरे आह्मी घेऊन गेलों. याप्रमाणें काशीहून सावकारी दोन तीन पत्रें आलीं आहेत. चैतसिंगाकडे बाळाजी गोविंद व शिंदे यांची फौज गेली. नंतर चैतासिंग परण्यापासून कूच करून काशीकडे गेला हें छत्रपुरचें लिहिलें आलें आहे. सेनाधुरधर यांचें लक्ष श्रीमंताच्या दौलतीच्या कल्याणाविशीं एकरूप सर्वकाल निखालसपणें आहे. याचा विस्तार किती लिहावा. स्वामींची व यांची भेट समक्ष घडेल त्या दिवशीं सर्व दृष्टीस येईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

२१६ श्री

( भा. व. २–५ ) श. १७०३ मार्गशीर्ष शु. १२

पौ छ २६ जिल्हेज सन इसन्ने ता. २७–११–१७८१

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

सेवक सदाशिव राम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागायत छ १० जिल्हेज यथास्थित असे विशेष. स्वामींनीं आज्ञापत्र सेवकास छ २५ सवालचें पाठविलें तें पावलें. राजश्री सेनाधुरंधर यास पत्र होतें तें प्रविष्ट केलें. हैदरखान याजवर इंग्रज चालून आले. कंचीच्या मैदानांत गांठ पडल्यावर खानबहादर यांणीं मोठ्या जुरतीनें इंग्रजाशीं लढाई प्रातःकाळपासून संध्याकाळपर्यंत करून त्याचा मार सोसून आपली जरब त्यास देऊन मोड केला. इंग्रजी सरदार दोन तीन लढाईंत कामास आले. इंग्रज माघारे घातले. त्यासमयीं इंग्रजाचा सरंजाम व गोरे पाडाव करून आणिले. इंग्रजाचा पराभव होऊन चनापट्टणास गेले. त्याच्यामागें खान याची जमीयत गेली आहे ह्मणून विस्तारें लिहिलें व काशीचा राजा

चेतसिंग याणें इंग्रजास तंबी करून चनारच्या किल्यांत कोंडून घेरा दिल्हा आहे. चेतसिंगाच्या कुमकेस राजश्री महादजी शिंदे व गंगाधर गोविंद[1] यांस फौज पाठविणें याविशीं पत्रें गेलीं आहेत. सिपरीवरील पलटणास शिंदे यांणीं जरब चांगली दिल्ही आहे, ह्मणून त्यावरून कळोन सेनाधुरंधर यांणीं बहुत संतोष मानिला. मोठ्या हिंमतीनें चनापट्टणवाले राहिले होते. त्यांची गुर्मी लढाईची फार होती, ती श्रीमंतांच्या प्रतापेंकरून जिरून हतवीर्य इंग्रज जाहले. याउपरी चनापट्टणवाल्याची हिंमत लढाईची राहणार नाहीं. इमामुदौल्याचाही[2] दम जिरला. याउपरी इंग्रजांत हिंमत राहिली अशी दिसण्यांत येत नाहीं. पुढें मसलतीचा विचार नवाब वडीलपणें जसा करितील तसा घडेल. जान हालन[3] याशीं बोलणें बोलत आहेत. त्याप्रमाणें सेनाधुरंधर यांणीं उत्तर केलें आहे. सिपरीवरील पलटणें शिंदे यांणीं यमुनापार घालविलीं. एक मजल कुच होऊन गेल्याचें व चेतसिंगाकडे पांच हाजर फौज शिंद्याची व गंगाधर गोविंद याची चार हजार फौज जाऊन मिळाल्याचें वर्तमान आलें आहे. चेतसिंग काशीकडे एक मजल पण्यांहून निघून गेला म्हणून छत्रपुरचीं पत्रें आलीं आहेत. इमामुद्दौला काशीहून निघून कलकत्त्यास गेला म्हणून दोन तीन पत्रें काशीहून गोसावी हुंडीवाले यांचीं आलीं. त्यांवरून पेशजी लिहिलें. हल्लीं काल काशीहून पत्र एका सावकाराचें आलें, त्यांत लेख नाहीं परंतु काशीद जबानी सांगतो. इमामुद्दौला काशींत आहे, पलटणें जमा करितो याप्रमाणें. त्यावरून सत्य मिथ्या कळत नाहीं. मागें पत्रें गेल्याचीं आलीं. हल्लीं जबानी गेला नाहीं म्हणतो असें आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

श्री

२१७ (भा. व १-८१)

श. १७०४ श्रा. वद्य १
ता. २४-८-१७८२

हैदरखान खुशवख्त बाशद

स्नेहांकित तहवर वजलादत दस्तगाहा. सुरू सन सलास समानीन मया व अलफ हणमंता बिन चाफाजी टिळेकर याणीं हुजूर विदित केलें कीं, मौजे कुंभसेत तालुका हवेली प्रान्त जुन्नर येथील पाटिलकी दरोबस्त महमुद अलमखान याणीं श्रीमंत कैलासवासी नानासाहेबांस पेशजीं नजर केली त्याप्रमाणें सरकारांत चालत होती. त्यास आपला बाप चाफाजी टिळेकर श्रीमंत कैलासवासी नारायणरावसाहेब यांसाबीध गर्दीत कामास आला. सबब सदरहू पाटिलकी दरोबस्त सरकारांतून आपल्यास बक्षीस देऊन भोगवटयास पत्रें करून दिल्हीं त्याप्रमाणें पाटिलकी आपलेकडे चालत आहे. परंतु मौजे मजकूरचे जाहागीरदार हैदरखान हे आपले हातून गांवचे लावणीउगवणीचें कामकाज यथास्थित घेत नाहीं, येविषयींची ताकीद

---

१ खेर सागरचे. २ वारन हेस्टिंग्स ग. ज. ३ Holland. Governor of Madras.

जाहली पाहिजे. म्हणोन त्याजवरून हें पत्र सादर केलें असे. तरी याचे हातून गांवचे लावणी-उगवणीचें कामकाज घेत जाणें. येविषयीं फिरून बोभाट येऊं न देणें. जाणिजे. छ. १४ रमजान. आज्ञा प्रमाण.

---

श्री

२१८ श. १७०५ वै. व. ५
(भा. व. २-१) तां. २१-५-१७८३

यादी तीर्थस्वरूप राजश्री दादासाहेब यांजपासून करार करून घ्यावयाचीं कलमें सुरू सन सलास समानीन मया व अलफ.

१ वडिलीं स्नानसंध्या करून स्वस्थ गंगातीरीं असावें असा करार, त्यापक्षीं कोणी-कडेहि राजकारण करूं नये, व आलें तर कळवावें. आम्हांस व दौलतसि विरुद्ध ती गोष्ट होऊं नये.

राजकारण कोणीकडे करणार नाहीं. कोणीकडून आल्यास तुम्हांस कळवीत जाऊं. तुम्हांस व दौलतीस विरुद्ध तें करणार नाहीं. तुम्हीं निखालस आम्हांशीं चालावें. आम्ही निखालस तुम्हांशीं चालूं. वरकड लिहिल्याप्रमाणें करार.

२ आपणाजवळ येथील कोणी मातबर माणूस, हजार दोन हजार फौज व कांहीं गाडद घेऊन सेवेमध्यें राहील, त्यास सर्व गोष्टीचा इतल्ला होत असावा.

दोन हजार फौज व कांहीं गाडदसुद्धां सरदार तुम्हांकडील ठेवावा. मनसुब्याची गोष्ट असेल त्याचा इतल्ला देत जाऊं. मातबर माणूस सरळ ठेवावा. येणेंप्रमाणें करार.

३ वडिलांजवळ फडणिशीचे कामकाजावर राजश्री बाळाजी जनार्दन फडणीस यांज-कडील कारकून राहील, त्याचे हातें कामकाज घेत असावें.

बाळाजी जनार्दन फडणीस यांचा कारकून फडणिशीचे कामकाजास असावा. त्याज-पासून फडणिशीचें कामकाज घेत जाऊं. तो मर्जीस न ये तरी दुसरा आणवीत जाऊं, पाठवीत जावा. येथील लिहिण्याचा शिरस्ता चालत आहे त्याप्रमाणें ल्याहावें. मर्जीप्रमाणें चालत जावें. येणेंप्रमाणें करार.

४ आम्हांस कोणेविशीं प्रतिबंध नसावा. स्वस्थतेनें राहणें हवें म्हणून आज्ञा, त्यास आपण स्वस्थ चित्तें, निर्मळतेनें, वेडेवांकडे फितूर, राजकारण न करितां, निखालसपणें असावें. प्रतिबंधाचें कारण नाहीं. येणेंप्रमाणें करार.

५ आम्हांकडील लोकांची तगिरी बहाली आम्ही करूं. त्यांत तुम्हांकडील उपरोध नसावा म्हणून आज्ञा; त्यास आपले स्वारीबराबर शागीर्दपेशाचें माणूस व चवकीपाहऱ्या-करितां चाळीस पन्नास स्वार पागेसुद्धां व दोनशें पावेतों गारदी राहतील. त्यांची तगिरी बहाली आपण करावी. त्यांत कुन्हा मात्र नसावा.

आम्हीं सरळतेनें चालतों तेव्हां उभयपक्षीं संशय न धरावे. आह्मांकडून कांहीं पेंच पडावयाचा नाहीं. वरकड लिहिल्याप्रमाणें करार.

६ मर्जीची जागा हरएक चांगली पाहून तेथें राहूं म्हणून आज्ञा. त्यास गोदातीरीं आनंदवल्ली, कचेश्वर, कोपरगांव यांत मर्जीस येईल तेथें राहावें.

दहा पांच जागे चांगले पाहून मर्जीस येईल तेथें राहूं; परंतु तुमचे विचारास न ये तेथें राहावयाची आड धरणार नाहीं. तुम्ही सरळपणें सांगत जावें. येणेंप्रमाणें करार.

७ गंगातीर, कृष्णातीर, भीमातीर यांमध्यें यात्रेस येणें जाणें होईल, त्यास दिक्कत मनास न आणावी म्हणून आज्ञा, त्यास सुभत्याचे दिवस असल्यास लिहून पाठवीत जावें. विनंती करीत जाऊं. त्याप्रमाणें करार. उत्तम आहे. करार.

८ आपले जवळचे शागीर्दपेशांत वगैरे गैरचालीचें कोणी आढळल्यास विनंती करीत जाऊं. त्याचा बंदोबस्त होत असावा.

तुमचे दौलतीस व तुह्मांस विरुद्धतेची कोणी वर्तणूक करील त्याचा छडा काढून वाजवी समजावीत जावा. त्याचें पारपत्य उचित रीतीनें केलें जाईल. येणेंप्रमाणें करार.

९ चांगले गोष्टीची विनंती करीत जाऊं ती मान्य होत असावी. उत्तम आहे. करार.

१० इंग्रजांचे तहांत सालीना तीन लक्ष रुपये करार आहे. त्याखेरीज जाजती वडिलांचे मर्जीप्रमाणें गोदातीरीं राहणार, सबब एक लक्ष एकूण चार लक्ष रुपये सालीना, पैकीं महाल लाख रुपयांचा व इतलाखी तीन लक्ष रुपये याप्रमाणें पावतील. दौलतीस विरुद्ध तो खर्च करूं नये.

एक लक्षाचे महाल तुमचे आमचे विचारें चांगले द्यावे. बाकी तीन लक्ष रुपये राहिले ते दरमहाचे दरमहा २५००० पंचवीस हजार रुपये देत जावें. ओढीचा मजकूर करूं नये. तुमचे दौलतीस व तुह्मांस विरुद्ध तो खर्च करणार नाहीं. येणेंप्रमाणें करार.

११ आम्हांकडील लोक व शागीर्दपेशा कोणासहि तसदी नसावी. स्वस्थ आह्मांजवळ राहात असें करावें. घरास जातील येतील त्यास प्रतिबंध नसावा म्हणून आज्ञा, त्यास गैरराहा वर्तणूक कोणी करूं नये, म्हणजे उपद्रव लागणार नाहीं. उत्तम आहे. येणेंप्रमाणें करार.

१२ मुलींचे मजकुराविशीं आज्ञा. हें ईश्वरी तंत्र आहे, मर्जीशिवाय नाहीं. घडेल. बहुत उत्तम आहे.

१३ वाटखर्च व कर्जदार वारावयास ऐवजाविशीं आज्ञा, त्यास पन्नास हजार रुपये सुरतेचें कर्ज वारावयास व वाटखर्चास तीस हजार, एकूण ऐशी हजार रुपये देऊं. येणेंप्रमाणें करार.

१४ आह्मांस न्यावयास निदान दोघांनीं यावें म्हणून आज्ञा, त्यास आपली स्वारी कोंडाईबारी चढली म्हणजे राजश्री हरि बल्लाळ व तुकोजी होळकर येऊन भेटतील. येणेंप्रमाणें करार.

येणेंप्रमाणें चौदा कलमें वडिलीं करार करून याद पाठवून द्यावी. यापूर्वीं आणाशपथा बहुत वेळ झाल्या, विरुद्धें वाढलीं, दौलतीस पेंच पडले; या गोष्टी ध्यानांत नाहींत असें नाहीं. सांप्रतकाळीं कृपा करून गंगातीरीं स्नानसंध्या करून राहणार, त्यापक्षीं फिरून संशयास कारण व लौकिकास विरुद्ध ती गोष्ट सर्वथैव होऊं नये. स्वस्थ चित्तेंकरून गंगातीरीं स्नान-संध्या करून आह्मांस व दौलतीस कल्याण ती गोष्ट घडत असावी. कोणी काहीं सांगितलें असतां ( फाटलें आहे. ) वरचेवर सांगत जावें. दिवसेंदिवस परस्पर संशय न येत असें होत असावें. सदरहू इकडील व आपणाकडील यादीप्रमाणें वर्तणूक होईल, यांत अंतर होणार नाहीं म्हणून श्रीसांबाचे शपथपूर्वक करार व्हावा. आजतागाईत मागें जाहलें तें जाहलें. पुढें परस्पर निखालस चालावें. आह्मांकडून तुम्हांस व तुमचे दौलतीस अपाय होईल असें घडणार नाहीं. उभयपक्षीं सरळ चालावें हीच इच्छा धरून गंगातीरास येतों. याउपरीं तुम्हांकडून सरळतेस अंतर नसावें आह्मांकडून सरळतेस अंतर होणार नाहीं. येविशीं श्रीसांबाची शफथ असे. येणेंप्रमाणें करार.

---

श्री

२१९
( भा. व. २-४१ )

श. १७०५ आषाढ शुद्ध ३
ता. २-७-१७८३ ( अंदाजी )

पौ छ ६ रमजान अर्बा समानीन बराबर डाक

विज्ञापना ऐसी जे, छ ९ जमादिलाखरचें आज्ञापत्र सादर झालें जे. ग्वालेर तालुक्यांत राजश्री शिवाजी विठ्ठल यांचा सरंजाम आहे. त्याप्रमाणें त्यांचा त्याकडे दिल्हा असल्यास बरेंच झालें. नाहीं तर द्यावा ह्मणून आज्ञा. ऐसियास राजश्री शिवाजीपंत बापू याजकडील उचाड महाल गुदस्तां राजश्री पाटीलबावानीं दतियेकरापासून सोडवून त्यांचे स्वाधीन केला. त्यापैकीं सात आठ गढ्या दतियेकरानीं आपलेकडे ठेविल्या होत्या. त्या सोडवावयास ते समयीं काबू चालली नाहीं. हल्लीं अनुपगिरी गोसावी याचे विद्यमानें दतियेकर राजा येऊन पाटीलबावाशीं बोलून गुदस्ताचे खंडणीपैकीं ऐवज बाकी येणें राहिला होता त्याचा फडशा करून देतेसमयीं पाटीलबावानीं बापूकडील गढ्या सोडून द्यावयाविशींचें नेट धरून त्याच्या गढ्याहि दरोबस्त सोडवून त्यांच्या त्याकडे दिल्ह्या. उपरांतिक आपले पैक्याचा निकाल पाडून घेऊन दतिये-करांस निरोप दिल्हा. उचाडबाबत चार रुपये ध्यावे असें गुदस्तां ठराविलें होतें. परंतु त्याची सरदारी ओढगस्त व ते चाकरी चाकरीस धडधूत या संकोचानें पैका माफ केला. परंतु श्रम बहुत लागले. याउपर त्याजकडील पंचमहालची वांटणी तेही मर्जीस आल्यावर सोडून देतील. येविशी आम्ही बावाशीं बोललों. उत्तर झालें जे, त्यांचा उरपाड महाल तेवढा सोडून द्यावा. बापूचे सरदारीचा गळाठा फार. यास्तव श्रीमंतानीं अगत्यवादानें

लिहिलें आहे. त्यापक्षीं त्यांची उरपाड सोडून दिल्ही म्हणजे मग आमचाच बोभाट पंच-महालचे वांटणीविशींचा सरकारांत आल्यास आह्मांस ल्याहावें, असें उत्तर झालें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

श्री

२२० श. १७०५ श्रा. शुद्ध ७

( भा. व. २-४२ ) पो ता. ५-८-१७८३

पौ छ ६ रमाजान अर्बा

विज्ञापना ऐसी जे राजश्री आबाजी नाईक बानवळे यांचे कामाविशीं राजश्री पाटीलबावा यांणीं सांगितलें.

राजश्री भवानी शिवराम नाइकाचा पैका वाजवी कर्ज येणें. त्यांचे तगाद्यास यांचा गुमास्ता त्यांचे घरीं नित्य एका दोहो दिवसाआड जात होता. परंतु पैका देईनात. यामुळें त्याणें एके दिवशीं निकड केली. धरणें देऊन बसला. तेव्हां त्यांनीं माणसें लावून गुमास्त्यास काढून देऊन मनस्वी नाइकाच्या वलगना व त्यास वेडेवांकडे बोलले. त्यास ज्याचा पैका येणें तो तगादा करीलच. सावकाराचा पैकाही देऊं नये आणि गैर रीत करावी ही चाल विहित नाहीं. अस्तु; हल्लीं भवानी शिवराम यास सरकारांतून ताकीद करून नाइकाचा पैका व्याजसुद्धां यांचे गुमास्त्याचे पदरीं घालवावा.

नाइकाच्या बंधूची कन्या राजश्री माधवराव तुकदेव यांचे पुत्रास द्यावी असा निश्चय होता. परंतु कैदेंत होते याकरितां येथून लिहिलें होतें जे, माधवराव तुकदेव यांचे ज्येष्ठ व कनिष्ठ पुत्र व त्याची मातुश्री या तिघांस मोकळिकेची परवानगी व्हावी. लग्नविधि झाल्यावर नाईक मागती त्यास आणून सरकारांत स्वाधीन करितील. त्यावरून आपण परवानगी देऊन त्यांस लग्नाला पाठविलें. त्यांस निश्चयाप्रमाणें लग्नप्रसंग संपादून मागती नाइकानीं त्यास पुण्यास रवाना केलें आहे. सरकारांत आणून पोहचवितील मग मर्जीस आलें तर मोकळें ठेवावें, अथवा विचारास येईल तसें करावें. सरकारांत आणून पोहचवलें त्यापक्षीं नाइकाचा जिमा मोकळा झाला.

परगणे शेवगांवपैकीं नाइकास सरकारांतून गांव इनाम दिल्हे त्यांचीं इनामपत्रें त्यांस करून दिल्हींच आहेत. असें असतां राजश्री खंडेराव नरहर तीन सालाचा पैका दाबून बसले आहेत. सरकारची परवानगी मागतात. त्यावर अलीकडे राजश्री मल्हार जगन्नाथ यांणीं सालमजकुरीं मामलत केली. त्यांणींहि पैक्यास अडथळा केला. सरकारची परवानगी मागतात. त्यास इनामी गांवच्या पैक्यास दिकत पडावी हें युक्त नाहीं. त्यांतहि अलीकडे नाईक इकडे स्वारीबरोबर मसलतीच्या उपयोगी कसे पडले व पडतात, यांचा हरएकविशीं अगत्यवाद धरून कामें होत जावीं म्हणोन आम्ही लिहितां दमलों. परंतु विचारास येऊन

एकहि काम नाइकाचें झालें नाहीं हें अपूर्व आहे. फराशिसाबाबतचा पैका यांचा सरकारांत अटकावला तो मिळत नाहीं. त्याकरितां किती वेळ लिहिलें, परंतु विचारास येत नाहीं. असें असतां उलटा जकातदार जकातीकरितां यांचे गुमास्त्यास तगादा करितो. त्यास येविशीं जकातदारास ताकीद होऊन जकातीचा तगादा मना व्हावा. फरासिसाबाबतचा पैकाच सरकारांत अमानत आहे. त्याचा फैसला झाल्यावर जकातीचा फडशा होईल, व खंडोजी व नरहर व मल्हार जगन्नाथ यांस सरकारची निक्षून ताकीद होऊन इनामी गांवचा पैका त्याकडून देवावा. नाइकांनीं या स्वारीस सरकारचाकरी बहुत केली, हें परस्परें तेथेंहि वर्तमान कळलेंच असेल. असें असतां यांच्या कामास हिसके बसतात तस्मात् आमच्याबराबर आहेत, त्यामुळें असें होत असेलसें वाटतें. याउपर तरी नाइकाकडील कामें काजें सरकारांतून उपराळा होऊन घडत जावीं. त्यांजकडील गुमास्ते मेघःश्यामपंत पुण्यांत आहेत, त्यांचे हरएकविशीं साहित्य होत जावें. येणेंकरून त्यांचा संतोष होऊन सरकारउपयोगावर दिवसेंदिवस अधिक घडतील. मसलतीचा प्रसंग कसा आहे हें श्रीमंताचे ध्यानांत नसल्यास उपाय नाहीं. परंतु यासमयीं याणीं चाकर चाकरी बरीच केली. यास्तव सदरहू लिहिल्याअन्वयें जरूर घडावें. याप्रमाणें बावानीं मुजरद बोलावून सांगितलें, त्यावरून विनंती लिहिली आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

श्री

२२१ श. १७०६ ज्येष्ठ वद्य ३०

( भा. व. २ अखबार व दिनचर्या ८ ) ता. १७-६-१७८४

पौ छ १२ रमजान खमस समानीन

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

आज्ञाधारक चरणरज गोपाळ बल्लाळ साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ता। ज्येष्ठ वद्य ३० स्वामीचे कृपादृष्टीनें यथास्थित असे विशेष. आज्ञापत्र छ २७ राखरचें सादर झालें, तें छ ३ रजबीं मुा फुलचरी पावलें. त्यांत आज्ञा कीं, येथून निघाल्यादारभ्य एक पत्र पावलें. त्यास येथें पावल्यानंतर माघ शुद्ध नवमीचें, दुसरें सरकारची जासूदजोडी चंदावरकर राजाकडे गेली होती त्याजसमागमें, तिसरें पत्र मुसा मुतीन यांचीं माणसें मुस मलबा याजसमागमें आलीं होतीं त्यांजबराबर, चौथें पत्र त्यांचीच जासूदजोडी राहिला होती त्याजबराबर, एकूण चार पत्रें पैंदरपै सविस्तर वृत्त लिहून पाठविलें. पावलीं किंवा न पावलीं हें काय कळे? यांत सेवकाचा अपराध कोणता? दुसरे पत्रीं आज्ञा कीं, राजकारण भारी कोणाकडील, त्याची जात काय, तेथील तेथेंच विचारून लिहून पाठवावयाचें होतें. त्यास बहुता प्रकारें पुशिलें. परंतु त्याचें उत्तर हेंच कीं तेथें मोघम लिहिलें त्याची काय आज्ञा येते त्याप्रमाणें तुम्हास सांगूं. हल्लीं कृपाळु होऊन पत्राचें उत्तर व दोन थैल्या

जनराल मुसाभुसीचे नांवें सादर झाल्या, त्या मशारनिल्हेस प्रविष्ट केल्या. सन्मानें घेऊन बहुत संतोष झाले. राजकारणाचा मजकूर आज्ञापिला त्याप्रमाणें फिरोन त्यासी विचारिलें कीं, तुम्ही मोघम बोलिले त्याप्रमाणें धन्यास लिहिलें. धन्यांनीं शब्द लावून लिहिलें कीं, तुम्ही तेथील तेथेंच विचारून लिहावयाचें होतें, मोघम काय समजून लिहिलें. त्याचें उत्तर फिरोन हेंच केलें. राजकारण भारी खरें, परंतु ज्या भरंवशावर आम्ही तुम्हासी बोलिलों तो अर्थ अद्यापि कांहीं झाला नाहीं. अर्थ तो कोणता ? मुख्य जहाजें आमचीं विलायतेहून आलीं नाहींत. इकडील झाडून वर्तमान आपले यजमानास लिहिलें आहे. त्याच्या परवान्याची मार्गप्रतीक्षा सा महिने करितों. अद्यापि येत नाहीं. याजमुळें गोष्ट फोडतां येत नाहीं. षट्कर्ण झाले म्हणजे गोष्ट नासते, याजमुळें तुम्हाशीं बोलत नाहीं. या महिन्यांत जहाजें यावीं ऐसें आहे. सा महिने झाले कीं, तेथून रवानगी झाली आहे. जहाजें आलीं म्हणजे झाडून मजकूर तुम्हास कळेल आणि जासूदजोडी येतांच रवानगी करणें म्हणजे शब्द तुम्हास लागणार नाहीं. आम्हीहि याअन्वयें तुमचे धन्यास पत्रें लिहितों. त्याजवरून पत्राचीं उत्तरें पाठविलीं आहेत, पावून वर्तमान ध्यानास येईल. पत्रें रवानगीचे वेळेस बहुतप्रकारें खुलासा निघावा म्हणून बोलिलों, तेव्हां मात्र बोलण्याचा उद्गार निघाला कीं, तुम्ही आपले चित्तांतच गोष्ट असों देणें, कोणास श्रुत न करणें, म्हणून बोलिले जें, इंग्रेजाचा भरंवसा नाहीं. सरंजाम भारी विलायतेंत होतो. इंग्रेजाचे चित्तांत वर्षा दो वर्षांत आपला जमाव भारी करून मग जें करणें तें करावें. याजसाठीं त्याचा कोम वाढला नाहीं, तों निजामअलीखानाशीं तुमचा सलुख आहे, त्याची फौज व तुमचे धन्याची फौज छावणी कृष्णातीरीं ऐकतों. बादबरसात टिपूवर येणार, त्यास उत्तम आहे. टिपूस जरब दाखवून आपला मुलूख घेतला आहे तो माघारें घ्यावा. आपला पैसा वाजवी असेल तो घेऊन टिपूसच पुढाईत करून त्याची फौज पुढें करून इंग्रेजाचें पारपत्य करावें. आपली फौज त्याचे पुस्तपन्द्यास असूं द्यावी. नवाबाची फौज समागमें आहेच. याप्रकारें केलें म्हणजे इंग्रेजाचें बळ तुटतें. आह्मास जे चाकरी सांगाल त्याप्रमाणें जलमार्गें आम्ही व खुषकीनें तुमची फौज याप्रकारें बंदोबस्त झाला म्हणजे उत्तम आहे. परभारें टिपूची फौज इंग्रेजावर घालावी. त्याची सलाबत इंग्रेजास अधिक आहे. टिपूस मोडूं नये. याप्रमाणें भाषण केलें. इतका भाव मात्र दर्शविला. दुसरे विलायतेहून उत्तरें काय येतात, जहाजें आलीं म्हणजे याचा खातरजमा होऊन कोणतें राजकारण सांगतात, तें ध्यानास आणून सविस्तर वर्तमान सेवेसी लिहून पाठवितो. अद्यापि फुलचरींत झेंडा याचा नाहीं. चार महिने झाले कीं जनराल फुलचरीहून दो कोसावर बागांत आहे. चिनापट्टणाहून इंग्रेजाचे तीन सरदार येथें आले कीं तुम्ही आपले झेंडे फुलचरींत घालावे. आमचें गंट्टर आमचें आम्हास द्यावें. दुसरे त्रिनामल किल्ला भारी आम्हाजवळून तुम्हीं घेतला, तो आमचा आम्हास द्यावा. याप्रकारें भाषणें करीत एक मास बसले. परंतु जनराल याचें उत्तर हेंच कीं, आमची विलायतेहून आज्ञा येईल त्याप्रमाणें करूं. इंग्रेजांनीं याजकडे याप्रमाणें भानगड लावून त्रिनामल याजकडे सात जहाजें सरंजामसुद्धां

रवाना केलीं कीं दंगा करून किल्ला घ्यावा. या गोष्टीची बातमी याची होती. यांणीं एक जहाज बातमीचें त्याचे अगोदर रवाना केलें. त्रिनामलकर खबरदार होतेच. याची बातमी पोहचतांच सिद्धच होऊन तयार झाले. इंग्रेजाचीं जहाजें पोहचतांच गोळे टाकिले. इंग्रेजाचीं जहाजें निरुपाय जाणून माघारे आलीं. त्रिनामल किल्ला दर्यांत दोन पहाड दोहीकडे मध्यें रस्ता जहाजें यावयाचा मार्ग याप्रमाणें आहे. दुसरी वाट जहाजें यावयाचीं नाहीं. पहिलें तो किल्ला वलंदेजाचा होता त्याजपासून इंग्रेजांनीं घेतला. इंग्रेजापासून फरासिसांनीं घेतला. त्या किल्ल्यासाठीं रदबदली इंग्रेजांनीं जनराल याजपाशीं फार केली. परंतु तो किल्ला जनराल देत नाहीं याजमुळें याची त्याची नाखुषी होऊन चिनापट्टणास इंग्रेज गेले. कांहीं लोक येथें ठेविले आहेत. फरासिसाचा जमाव येथें भारी, गोरे तीन हजार, दोन हजार पगडीवाले, एकूण पांच हजार फौज व तोफा दोनशें, दारूगोळा सरंजाम भारी देऊन उगेच उठोन इंग्रेज गेले. टिपूकडील वकील दोघे येथें होते, ते टिपूनीं बोलावून घेतले. जनराल याजकडून एक फरासीस व रामराव ब्राह्मण याजकडून टिपूकडे होते तेहि उठोन येथें आले. उभयतां वकील येथें येण्याचे वेळेस टिपूनीं फरासिसाचे वकिलापासून लिहिलें घेतलें कीं, आमचे बापाजवळून इतका पैसा तुम्हीं घेतला, आमचें कार्य काय केलें? आमचें हिशेबवार दसखत करून देणें. हिशेब काढन दसखत करून घेऊन बिदा केलें, याप्रमाणें वर्तमान वकील सांगतात. इंग्रेजांचीं ठाणीं अर्काटेंत वगैरे बसलीं. मुलुखास कौल देत फिरतात. तीन किल्ले सातगड वगैरे दिले नाहीं. अलकाब भारी लिहिले. त्याजवरून जनराल मुसाभुसी बहुत खुष झाले, म्हणों लागले आम्ही बिनमुशारे, बिनजाहागीर चाकर आहों. जे चाकरी सांगाल त्यांस हजर आहों; आणि बहुतच खुषीच्या गोष्टी सांगून बोलिले जे आमचीं जहाजें आलीं म्हणजे तुमचे धन्यायोग्य हवा तो जिन्नस आमचे विलायतेहून आलों म्हणजे आधीं रवाना करूं. सर्व प्रकारें भरंवसा तुमचे धन्याचा आम्हांस आहे. आपल्याकडील दम स्नेहाचा फार राखितात. जहाजाचे येण्याचे मार्गप्रतीक्षेस एक मास प्रतीक्षा केली, परंतु येणें न दिसे. सबब जलदीनें जासूद रवाना केले. कृपाळु होऊन दोनशें रुपये देविले, ते येथें मुसामुतीन यांणीं मुसा मनरो याजवर हुंडी लिहून त्याप्रमाणें घेतले. परंतु खर्च भारी. येथें कर्जवाम कोण देतो? आठ महिने तेथून निघाल्यास झाले. दोनशें रुपये दरमहा पाहिजे, तेव्हां कालक्षेप चालेल. कृपाळु होऊन परामृश करणार स्वामी समर्थ आहेत. पुरवणींत अलाहिदा लिहिलें आहे त्याजवरून ध्यानास येईल. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

---

श्री

**२२२** श. १७०६ माघ शुद्ध १३

( भा. व. २-३० ) ता. २३-१-१७८५

सेवेसी माधवराव वासुदेव कृतानेक साष्टांग दडंवत विज्ञापना ऐसी जे. येथील कुशल तागाईत माघ शुद्ध त्रयोदशीपावेतों स्वामीचे कृपावलोकनें करून यथास्थित

आहे विशेष. सर्व शाईदेखील चिटणीस याजकडील कारकुनाचे रोजमरे चालतात, आणि सेवकास सात आठ वर्षे रोजमरा पावत नाहीं, यामुळें मोठे तवाईंत आहें. अन्नवस्त्राचें संकट व देणेदाराचे तगादे. रोजमरा बंद व्हावयाचें कारण काय न कळे? एक श्रीमंत राजश्री मोरोबादादाकडे गेल्याचें निमित्य म्हणावें तरी तिकडे सर्व दरकदाराचे कारकून गेले होते. मजमदाराचे महादाजीपंत व मुनसीचे गोपाळराव तसे चिटणीस व त्याचे कारभारी यांणीं मजला व आणखी दोघे कारकून एकूण तिघांस नेऊन ठेविलें म्हणून राहणें प्राप्त. मी होऊन सरदारास न पुसतां जातों तर अपराधी. दुसरे पुरंधरास प्रथम वर्ष सवा वर्ष स्वामीनीं कृपा करून चाकरी दरकाचें कामकाज घेऊन चालविलें. पुढें राजश्री जिवाजी बल्लाळ हे चिटणीस याजकडून येथें स्वामीजवळ राहावयास आले तेव्हां मजला पुण्यास सरदाराकडे येणें लागलें. ते समयीं राजश्री बाबूराव केशव याजकडून स्वामीस येविशीं दोन तीन वेळां विनंती करविली. ते वक्तीं आज्ञा जाहली कीं, चिटणीस सांगतील तसी वर्तणूक करणें. त्यावरून चिटणीस याजपाशीं राहून सांगत तें लिहिणें करीं. पुढें जिकडे वरकडाप्रमाणें दरक संभाळावयास पाठविलें. याचा जाबसाल पुसावयाचा असिल्यास चिटणीस याजला पुसोन घेतला पाहिजे. ते जाबसाल करतील. सेवकाकडे दोष नाहीं. असें असोन मजमदार व मुनसी यांचे कारकून ते माझे सोबती. त्यांजवर स्वामींची कृपा आणि मजवर अवकृपा. तस्मात् माझाच दैवयोग. पुरंधरावर बहुतांनीं स्वामीजवळ सेवा चाकरी केली. त्यांत सेवकही यथाशक्ति यथाज्ञानें मामले थोडी-बहुत सेवाचाकरी करून होतों. त्यास बहुतांस स्वामीनीं हुद्दे, गांव, जमिनी, आसाम्या वगैरे देऊन उर्जित केलें. सेवक फक्त कोरा राहिलों. माझेविशीं रदबदल कोण करितो? व मर्जीस पडेल न पडेल न कळे या अर्थे सेवकानें भिऊन विनंती करविलीहि नाहीं. परंतु स्वामी कृपाळु होऊन सांगून शिकवून पर्वदा करून गरिबी व खालसीची वगैरे स्तुति होत गेली. यावरून लाखो बक्षिस एकीकडे आणि धन्यापासून ज्याचें नांव तारीफ तें होतें हें एकीकडे, ऐसें समजोन स्वामीच्या पायाचे असरियास आनंदांत होतों. चिटणीस याजकडील सर्व कारकुनांस अब्दागिरें आणि कृपेंत मी असतां मजला नाहीं. येविशीं अश्वासन असोन बऱ्हाणपुरचे स्वारीस विनंती स्वामीस केली, परंतु मर्जीस न पडली. व पुरंधराहून निघून पुण्यास राहूं लागल्या-वर दिवटीचें तेलहि बंद झालें. त्याचेंहि कांहीं वाटलें नाहीं. रावेतचे मुक्काम इहिदेंत स्वामीस करुणा येऊन स्मरण झालें, तेव्हां पायाजवळ हजीर झालों. कृपाकरून दरकाचें कामकाज यथास्थित मजपासून घेऊन वर्षभर रोजमरा चालला. पुढें कोणी काय स्वामीस समजावून चित्तांत विपर्यास आणून माझे अन्नांत मृत्तिका घालोन अन्नान्नगत केली आहे. अर्बांत गारपीरचे मुक्कामीं स्वामीनीं कृपाकरून दोन रोजमरे दिल्हे. तेथून स्वारी निघून यादगिरीस गेली. समागमें सेवक होतों. शें पन्नास रुपये कर्ज स्वारींत झालें, परंतु रोजमरा पावला नाहीं त्यापासून बंद आहे. राजश्री कुशाबा साठे व विसाजीपंत बापू यांस चिटणीस यांणीं सांगून विनंती करविली. परंतु मर्जीस न पडली. मग केली न केली किंवा माझे वाद्याची त्यांस भीड

पडली न कळे. यास्तव चिटणीस व जिवबा यांनीं समक्ष विनंती करावी तर गांठ पडत नाहीं. आणि मी गरीब जाहलों. विनाकारण अन्नावांचून फुकट मारला जातों. दाद लागत नाहीं. वस्त्रप्रावर्णाचे हाल यामुळें अहिर्निशीं दर्शनाचाहि योग घडत नाहीं. कदाचित् मजपासून अंतरहि पडिलें असेंच ध्यानांत आलें असिल्यास मजवर पहिली पूर्ण कृपा होती त्या अर्थे एक वेळ तर अन्याय बक्षीस करावयाचाच होता. अथवा समक्ष नेऊन कानास खडा लावणें अगर कान उपटणें हें स्वामीकडूनच होऊन शिक्षा शिकवावयाची होती. असे तऱ्हेचा मी शागीर्दांतील अल्प बुद्धीचा हलके वयाचा व पदरीचा. पहिलेपासून अशा क्षुल्लकावर इतका रोष नसावा. मोठयावर असावा त्यांतील मी नव्हें. कृपा करणार स्वामी समर्थ आहेत. यंदा दोन मुंजी मुलांच्या कर्तव्य. मुलें थोर आठ नऊ नऊ वर्षांचीं झालीं. अनुकूल तर पैशाचें नाहीं. लष्करांत स्वामीचे समागमें यावें तर घोडे माणूस, खर्चास नाहीं. यास्तव अंतर पडिलें. यजमानानीं पुण्यांत दरबारीं ठेविलें. स्वामीनीं कृपाळु होऊन मुंजीची बेगमी व रोजमरा चालता करणार स्वामी समर्थ आहेत. चाकरीस नाबर नाहीं. खास पथकांत ठेवावें. घोड्यावर विशेष बसतां नये. परंतु भले लोकांचे मागें हळू हळू चालून हजीरीस लागेन. अथवा महादाजीपंत कुंटे दिवाणजी यांचे हाताखालीं नेमावें. अगर एकबेर्जाकडे लावावें; अथवा शिलेदार कारकुनांत घालावें. चाकरीस उजूर नाहीं, परंतु अन्नवस्त्र देऊन चालविलें पाहिजे. पोटावर मारूं नये. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.[1]

---

श्री

२२३ (भा. व. २ अ. दि ९)

श. १७०७ ज्येष्ठ शुद्ध २
ता. ९-६-१७८५

पौ छ ५ रमजान सन सीत समानीन आषाढमास

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

आज्ञाधारक गोपाळ बल्लाळ साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ताा ज्येष्ठ शुद्ध २ मुा फुलचरी स्वामीचे कृपादृष्टीनें यथास्थित असे विशेष. आज्ञापत्र सादर जाहलें, त्यांत आज्ञा कीं, पत्र पावतांच नवे जनराल याचा निरोप घेऊन निघोन येणें. त्यास आज्ञापत्राप्रमाणें नवे जनराल कुतानशा याजपाशीं निरोपास गेलों. त्यांनीं उत्तर केलें कीं, मोरसाहून नवे जनरल मुसा सुली याला आमचे पातशापासून सरसुभेदार मोरसापासून बंगाल्यापावेतों त्याचा एख्तीयार होऊन येतात त्यांची भेट घेऊन त्याचा निरोप झाल्यास जावें. आठ रोज मार्ग लक्षिला तों जनरालही येऊन पावले. फुलचरींत येतांच कुतानशा याशीं तगीर करून आपल्या समागमें मुसा कुसनी आणिले. त्यास जनराली फुलचरीची देऊन

---

1 हा पत्रलेखक कोणी प्रभु गृहस्थ आहे. पत्र यादगीरच्या स्वारीनंतरचें.

कुतानशा यासी विलायतेस जायाची रजा दिली. त्याजवरून मशारनिल्हे छमजकुरीं रवाना झाले. उपरांतीक सेवकास भेटीसाठीं वेंकटराऊ मुनसी यास पाठवून घेऊन गेले. भेटी झाली. शिष्टाचार बोलणें केलें. उपरांतिक म्हणों लागले तुमचे यजमानांहीं तुम्हांस पाचारिलें त्याजवरून तुम्ही जाणार, त्यास तूर्त जायाची जलदी न करणें. जनरल मुसाभुसी यांनीं कित्येक मजकूर जरूरी मतलबाचे विलायतेस लिहिले, त्याचे दरजवाब कांहीं आले आहेत, कांहीं मागाहून जहाज येतें त्याजबरोबर येतात. याजसाठीं चार रोज सबुरी करून राहणें. अनकरीबा जहाजही येथें आलें म्हणजे त्यांतील खुलासे तुम्हांशी बोलूं. तुमचे श्रीमंतांचें उपयोगी असलिया राहणें, नाहीं तर तुमची रवानगी करूं व ऐशा कित्येक गोष्टी समाधानाच्या बोलून बिदा केलें. घरास आलों. दुसरे रोजीं फिरोन पाचारिलें. म्हणों लागलें कीं आम्हीं येथें आलों. तुमचे यजमानांस श्रुत व्हावें. त्यांची आमची दोस्ती. त्यांस लिहून दिवसेंदिवस अधिकोत्तर स्नेहवृद्धि होय तें करणें. त्याजवरून मशारनिल्हेनीं स्वामीस पत्रें पाठविलीं आहेत, त्याजवरून अर्थ ध्यानास येईल. जनरल नवे आले हे बहुत थोर माणूस मातबर सरदार आहेत. यांचें लक्ष श्रीमंतांचे पायाकडे फार आहे व त्याचे पातशाहाचा हुकूम आहे. ज्याप्रमाणें जनराल मुसाभुसी श्रीमंताचे पायाशीं लक्ष राखीत होते त्याप्रमाणें तुम्ही चालणें. यास पत्राचें उत्तर बहुमानें लिहावयाची आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत. यांनीं येथें आलियावर नवाब निजामअलीखान यास व टिपूस पत्रें पाठविलीं. हेहि राजकारणी जहाज........आठा पंधरा रोजांत आलें तर उत्तम...[ फाटलें. ] कितेक बोलण्याचा भाव ध्यानास आणून निरोप घेऊन येतों. इंग्रेजाचा फरासिसाचा विलायतेंत सल्ला जाहली म्हणोन जनरल बोलतात. महंमद अलीखान यास इंग्रेजानीं विलायतेहून पत्रें पाठविलीं कीं, तुम्ही आपला बंदोबस्त करणें. इंग्रेजाकडील लाट म्हणोन सरदार चिनापट्टणास होते, त्यांस पत्रें आलीं कीं तुम्ही महमद अलीखानाचे स्वाधीन मुलूख करून त्याचा कबज घेऊन येणें. त्याजवरून मशारनिल्हेनीं विलायतेस आपली जायाची तजवीज केली. आठा चौ दिवसां निघोन विलायतेस जाणार. इंग्रेजाचें कर्ज महमद अलीखानाकडे त्याची किस्तबंदी दरसाल बारा लक्ष होन महमद अलीखानानीं द्यावे, येणेंप्रमाणें निश्चय ठरला. सोडचिठ्या मुलखाच्या झाल्या नाहींत. होणार आहे. इंग्रेजांनीं चाकरी करून रोजमरा द्यावा. मुलखासी दरकार नाहीं. येणेंप्रमाणें करार झाले. सेवेसी श्रुत व्हावें. बहुत काय लिहिणें हे विज्ञापि.

विज्ञप्ति कीं जनराल यानीं काल पत्रें लिहितेवेळेस बोलण्याचा भाव दर्शविला कीं, आमचे पातशाची मर्जी कीं टिपूशीं बिघाड न करावा. त्याशीं सोरस्यें असावें. त्याजकडे फौज आणखी रवाना होणार म्हणोन मुसामुतीन[1] यांनीं लिहिलें होतें. ते फौज न पाठवावी ऐसा बोलण्याचा भाव दिसोन आला. त्याचें उत्तर सेवकांनीं त्यासी केलें कीं श्रीमंताचे

१. फ्रेंच वकील. हा पुण्यास आला होता.

पायाशीं एकनिष्ठेनें टिपूनें असलिया, झाडून पैका दिलिया, मुलूख घेतला आहे तो सोडलिया फौजा कशास येतील? मग उगेच राहिले. फरासिसानीं बाहादरापासून पैका क्रोडोशा घेतले सबब हें बोलणीं. सेवेसी श्रुत व्हावें हे विज्ञापना.

---

२२४ श्री
( भा. व. २ अ. दि. १० )

२०-६-१७८५

पौा छ १५ रजनाम सन सीत आशाढ

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

आज्ञांकित गोपाळ बल्लाळ साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना. येथील वर्तमान ताा ज्येष्ठ शुद्ध १३ स्वामीचे कृपाकटाक्षें यथास्थित असे विशेष. आज्ञापत्र सादर झालें त्यांत आज्ञा कीं नवे जनराल मुसा कुतानशा यांस पत्र पाठविलें आहे. त्याचा निरोप घेऊन निघोन येणें. त्यास आज्ञेप्रमाणें जनराल याजवळ निरोपास गेलों. त्यांनीं उत्तर केलें कीं, मोरसाहून नवे जनराल आठा पंधरा रोजांत येतात. त्याची आज्ञा घेऊन जाणें. त्याजवरून त्याचा मार्ग लक्षीत राहिलों; तेहि येऊन पावले. फुलचरींत दाखल होतांच कुतानशा यासी तगीर करून मुसा कुसनी नामें मो केले. कुतानशा यास आज्ञा केली कीं तुम्हीं विलायतेस जाणें. त्याजवरून मशारनिल्हे स्वार होऊन विलायतेस गेले. आपण फुलचरींत येऊन बंदोबस्त केला. जागा जागा कोठ्यास आपले निाचे लोक पाठविले. तदनंतर आठवे रोजीं सेवकास बोलाविलें कीं भेटीस येणें, त्याजवरून भेटीस गेलों. पुसों लागले कीं तुमचे यजमानानीं तुम्हांस बोलाविलें आहे म्हणोन ऐकिलें, त्यास तुम्ही जलदी जाण्याची न करणें. कितेक मजकूर तुम्हाशीं राजकारणें बोलावयाचीं आहेत. जोंपरियंत जहाजें विलायतेचीं येत तोंपावेतों न जाणें. त्याजवरून नाइलाज होऊन राहिलों. त्याचे जहाजें यावयाची मार्गप्रतीक्षा करितां एक जहाज येऊन पावलें. त्यांत कांहीं पैका दहा पांच लक्ष रुपये व पांचशें लोक सोलदाद फिरंगी कांहीं सरंजाम येऊन पावला. त्यांत पत्रें विलायतेचीं भुसीनीं मजकूर कितेक लिहिले होते, त्याचा दरजबाब आले नाहीं. मागें आणखीं जहाजें येतात त्यांत झाडून जाबसाल येणार त्याची मार्गप्रतीक्षा करितात. आम्हांस म्हणों लागले, कीं तुमचे धन्यास आम्ही लिहून पाठवितों. तुम्हांवर इतराजी होणार नाहीं. त्याजवरून सेवेसी त्यानीं मजकूर लिहिला आहे त्याजवरून ध्यानास येईल. मुसाजिले यास पत्रें देऊन कितेक मजकूर येथील मुसामुतीन यास[1] लिहिला आहे, ते सेवेसी निवेदन करतील. दुसरें वर्तमान मुसामुला याला नवे जनराल म्हणत होते कीं आमचे पातशाहाचा हुकूम आहे कीं श्रीमंताचे पायाशीं दुसरी गोष्ट न करणें. त्यांची आमची दोस्ती पूर्वीपासून आहे, त्याची वृद्धिंगत होय तें करणें.

---

१. पुण्यास होता त्यास.

आणखी जहाजें येतात त्यांत पांच सा हजार फिरंगी सोलदाद येतात. त्यांतून फुलचरींत निमे ठेवावे, निमे मोरसांत ठेवावे, येणेंप्रमाणें पातशाहाची आज्ञा आहे. फुलचरीचे किल्ला बांधावयाची आज्ञा आहे. दुसरें नाजूक बोलणें हेंच कीं तूर्त सा हजार पावेतों फिरंगी येथें ठेवावे. याचप्रमाणें मुंबई प्रांतीं दहा वीस कोसीं आमची जागा दर्याकिनारे आहे तेथें सदरहूप्रमाणें फिरंगी उतरावे. तेथें उतरलियानंतर तुम्हास सूचना लिहून पाठवूं. तुमचे आमचे सलाहनंतर जो विचार करणें तो करूं. ऐसें मजजवळ बोलिले. त्यावरून सेवेसी लिहिलें असे. याचें उत्तर सत्वर आणवणें म्हणोन बोलिले. पुढें काय मनसुबा करितात हें कळत नाहीं. इंग्रेजाशीं सांप्रतकाळीं तों सलूख आहे, परंतु अंतर्यामीं शुद्धता नाहीं. फरासिसाचें बळ विलायतेंत अधिक आहे. विलायतेचे पातशाहाची मर्जी कीं तूर्त कोणाशीं कलह होऊं न द्यावा. टिपूकडेहि याचा वकील रामराव नामें पूर्वी त्यांजकडेच होता त्यासहि रवाना केलें. त्याचें उत्तर आलियानंतर मुसा पेमरो यासी रवाना करणार. मुसा सुली याला राजकारणी दिसतात. चहूंकडे संधान लाविलें आहे. कोणते मनसुबियांत हें कळत नाहीं. बंगाल्याचे बंदोबस्तास यासच नेमिलें आहे. तिकडेहि जायाचा निश्चय बोलतात. येतेसमयीं आपण भुसीशीं बोलावयाचे नाजूक कामाचे बोलले होते. त्या डौलाचा रंग दिसतो. जहाजें आलियानंतर काय विचार ठरतो तो पाहून लिहून पाठवितों. माआलीखान यासी इंग्रेजाचे पातशानें लिहून पाठविलें, कीं, तुम्ही आपले मुलूखाचा बंदोबस्त करणें. त्याजवरून इंग्रेजाकडील लाट म्हणोन सरदार चिनापट्टणास होता तो हें वर्तमान ऐकतांच चिनापट्टणाहून निघोन विलायतेस गेला. माआलीखानाकडे कर्ज येणें इंग्रेजाचें त्याची हप्तेबंदी दरसाल बारा लक्ष होन द्यावे, आपला सुभियाचा बंदोबस्त करावा, येणेंप्रमाणें ठराव होऊन आला. एका मासानंतर बंदोबस्त करणार. आषाढमासपावेतों इंग्रेजांनीं अंमल करावा. पुढें माआलीखानानीं करावा. वर्ष सा महिन्या इंग्रेजांशीं फारसिसासीं बिघाड होतो, ऐसें जंनराल बोलतात. मुसा सुली याला याचा भावार्थ दिसोन आला कीं, टिपूकडीलहि जाबसाल करून त्याची आपल्या सरकारची तोडजोड करून सलूख करून द्यावा. हा बोलण्याचा भावार्थ दर्शविला. आज्ञा आलिया तोहि प्रकार घडेलसें दिसतें. मुसासुली याला म्हणों लागले, आमचे चित्तांत कितेक गोष्टी तुम्हाशीं बोलण्याचा हेत आहे. परंतु तुमची भाषा आम्हांस समजत नाहीं. आमची बोली तुम्हांस कळत नाहीं. याज( मुळें ) कित्येक बोलणें घडत नाहीं. हरवख्त मौकुफ आहे. मध्यस्ताकडून बोलवावें तर गोष्ट बाहेर फुटते. याजमुळें न बोलिलों. समयानुसार सर्व तुह्मांस विदित करूं. तुह्मीं आपले धन्यास लिहून आम्हांवर कृपा करीत ऐसें केलें पाहिजे. श्रीमंताचे लक्षाशिवाय दुसरी गोष्ट जाणत नाहीं, याप्रमाणें बोलतात. सेवेसी श्रुत होय. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

---

२२५ श्री

( भा. व. २–८४ ) श. १७०७ आषाढ वद्य ९

ता. ३०–७–१७८५

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

पोष्य भवानी शिवराम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसी जे. तागाईत आषाढ वा ९ पावेतों मुक्काम शहर स्वामीचे कृपावलोकनें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. छ २५ साबानचें आज्ञापत्र सादर जाहलें, तें छ १६ रमजानीं प्रविष्ट समयीं शिरसा वंदून सनाथ जाहलों. कृपालुत्वें सकल मसलतीचें भावलेखन हातून गौरविलें ते सर्व समजलों. स्वामी पुण्यवान आहेत. श्रीमंत साहेबांचे प्रतापाखालें शत्रुपराभवानें योजिली मसलत सिद्धीस जातच आहे. रसद भरणियाविशीं निकडीची आज्ञा, त्यास आज्ञाधारकास उजूर नाहीं. पांच लक्ष पाठवावे त्यांपैकीं प्रस्तुत दोन लक्षांच्या हुंड्या पाठविल्या आहेत. प्रविष्ट होतील. राहिले तीन लक्ष तरतूद करून मागाहून रवाना करितों. दिनावधि लावीत नाहीं. हुकुमाचें उल्लंघन सेवकापासोन सहसा नच घडेल. सर्व प्रकारें खावंदाची कृपा तारक. माझे निष्टेस फळें येतील. धनी सर्वज्ञ आहेत. येथील सविस्तर ओढीचा वगैरे मजकूर तीर्थरूप राजश्री खंडोपंत विनंती करतील. जोडीसमागमें सविस्तर वृत्त लिहिलें आहे. मागून येऊन पोहचेल. मार्गांत पर्जन्या-मुळें चार दिवस अवधि लागेल. या अर्थी खेप्याबरोबर हुंड्या पुढें रवाना केल्या आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

२२६ श्री

( ना. भो. ६६ ) श. १७०८ भाद्रपद शुद्ध २

ता. ५–९–१७८५

यादी–करनाटकची मसलत फत्तेअलीखान याजवर करण्याची सरकार व नवाब निजाम अलीखान बहादर मिळोन ठरविली आहे, येविषयींची राजश्री रघोजी भोसले सेनासाहेब-सुभा व राजश्री मुधोजी भोसले सेनाधुरंधर यांजकडील करारः—

१ फौज चाकरीस दहा हजार येईल, त्यांपैकीं राजश्री सेनासाहेबसुभा यांजकडील फौज खेरीज करून बाकी पांच हजार फौज राहिली, त्यास फौज लष्करांत दाखल झाल्यावरी आम्हास पोटास दरमहा साठ हजार रुपये दिले जातील. येणेंप्रमाणें करार करावे.

१ नवाबाचा व आमचा पेशजीं वराडांत आलजपूरचे मुक्कामीं तह जाला आहे त्याप्रमाणें चालवें. त्यांत लढे राहिले आहेत ते नवाबास आपण सांगून तहाप्रमाणें चाल त्यांची राहे याप्रमाणें करून घ्यावें. याप्रमाणें करार करावे.

छ ३० सवाल सन सीत समानीन भाद्रपद शुद्ध

---

२२७ श्री श. १७०७ भाद्रपद वद्य ३

(ना. भो. २६) ता. ६-९-१७८५

[अकरा कलमें फारसीचीं हिंदवी]

सवाल. १—एदलाबाद व तुरकचांद व चिराचिलम व साखरवेल व पोहन[1] या माहालांमध्यें जफरुद्दवलाचा[2] हिस्सा कायम; आणि परगणे कायरे व पाठबोरी चांदा यांच्या सरहद्दीचे दरोबस्त सेनासाहेबांकडे होते; त्यांजकडून मुबारज मुलक बाहादूर मरहुमाचे जिमेस वतरीख आमानी[3] होते. या माहालांत राजे सेनासाहेबांनीं दोनशें स्वारांची तनखा जफरुद्दवलाचे नांवें या शरतीनें तनखा करून दिल्ही जे, तेथें कमाविसदार व कारकून कागदाचा सिरस्ता राहील, त्याची नेमणूक सालियान्याची[4] त्यास पावती व्हावी आणि धर्मादाय अग्रहार ब्राह्मणाचे व मोकासे गांव वगैरे वजा होऊन, बाकीचा ऐवज माहालांत मजकुराचा सवाराचे ऐवजामध्यें दिल्हे; परंतु ईश्वर न करो. हे माहाल हुजुरांतून म्हणजे निजामलीखानांनीं अंमल दिल्यास ते माहाल सेनासाहेबांचे कमाविसदाराचे स्वाधीन करावे; उभय गोष्टीच्या ज्या गोष्टी ठरल्या त्यांत अंतर न करावें.

सवाल २—ठाण मौजे सांवगें लेहारें व तारासांवगें प्रगणे आमेनर[5] यांमध्यें कदीमपासून मामूल ठाणें तेंच आहे. त्या ठाण्यांत कमाविसदार सेनासाहेबाकडील राहील. मामुलाप्रमाणें दोघांनीं पैसा द्यावा.

सवाल ३—सुभे वराडामध्यें ज्या जाहागीरा जफरुद्दवलाच्या आहेत, त्याचा माहालाचा जैसा शिरस्ता चालत आला आहे त्या मामुलाप्रमाणें द्यावा. ज्या माहालांत सेनासाहेबसुभ्याची खाजगी आहे त्यांत मोगलाईचा हिस्सा मामूल माफक द्यावा. ज्यादा तलबी न व्हावी.

---

१. हा गांव सांप्रत वर्धा जिल्ह्यांतील हिंगणघांट तहसिलींत वर्धा शहरापासून दक्षिणेस सुमारें १६ कोसांवर आहे.

२. हा 'निर्मळ' तालुक्याचा सुभेदार होता. यास धौशा असें म्हणत. याचें व बाळापूरचा सुभेदार इस्मायलखान याचें वांकडे होतें.

३. अधिकाराखालीं, अमलांत.

४. सालीना.

५. आमनेर—हा गांव सांप्रत वऱ्हाड प्रांतांत मोर्शी तालुक्यांत जाम व वर्धा या नद्यांच्या संगमावर आहे.

सवाल. ४—कर्यात नरखेडची[1] जमीदारी व मोकद्दमी अंमल दरोबस्त सेनासाहेबसुभ्याचा आहे तैसाच त्याजकडे असावा.

सवाल. ५—सेनासाहेबाचें म्हणणें जेव्हां आळजपुराकडे[2] येणें झालें होतें तेव्हां धामोनीच्या[3] ठाण्यावरून व गावेलावरून तुमचे चित्तांत कांहीं खलश गेला होता ते त्याणें उत्तर केलें, कीं ठाणें व किल्ले त्याचे मुतर्शील आहेत त्यास कोणाच्या बोलण्यावरून खलश चित्तावर ते आणणार नाहींत.

सवाल. ६—त्यांचें बोलणें जे, जे किल्लेजात व ठाणेजात आमचे तालुके आहेत, त्यांजमध्यें जमीदार पाहाडवाले राजे गोंड मिसलनभुमानी (?) वगैरे तुमच्या पाशीं न यावे. जर कोणी याचीं शिफारस करील, त्यांत तुमचे चाकर या इलाकेदार याजला जागा न द्यावी, व चाकर न ठेवावे.

सवाल. ७—तुमचा चाकर आह्मांपासीं न यावा व आमचा चाकर तुह्मांपासीं न यावा, शिवाय मर्जीच्या ठेवूं नये.

सवाल. ८—कामेश्वर भारतीमहंत माहोरकार याचे साडे आठरा हजार टके सिवाय याचा अजबाब याचे तपसीलवार यादा आहेतच. तुमचे शाहा मीरजाखानें घेतला आहे तो महंत मजकुरास परतून द्यावा.

सवाल. ९—ऐवज बाकी प्रगणे आमनेर वगैरेची आळजपूरचे मुक्कामीं मीर ताऊदआली कारपरदाज जफरुद्दवला बाहादुराचा व शिवरामपंत कमाविसदार सेनासाहेबबाहादुराकडील यांचे रुजूनें उभय पक्षींची बाकी ते आमलास ताकीद करून द्यावी.

सवाल. १०—प्रगणे आंदोरी सुभे वराड वर्धेचे त्या पार आहे. कदीमपासून सेनासाहेबसुभ्याचा आहे. त्या ठिकाणीं हिस्से मोगलाईचा इसमाइलखान मेल्याच्या पूर्वीपासून बुऱ्हानद्दवले नाजम वराडचा आमल मुकरर आहे त्याप्रमाणें हिस्सा मोगलाईचा घ्यावा.

---

१. नरखेड–हा गांव नागपूर जिल्ह्यांतील काटवल तहशीलींत असून नागपुराहून २६ कोसांवर आहे.

२. वऱ्हाड प्रांतांतील प्रख्यात शहर एलिचपूर.

३. धामोनी हा गांव सागर जिल्ह्यांत असून सागर शहराच्या उत्तरेस सुमारें १५ कोसांवर आहे. हा गांव मंडला येथील गोंड राजा सूरतसा यानें चारशें वर्षीपूर्वी बसविला. छत्रसाल राजानें हा नबाब खैरातखान याजवर स्वारी करून घेतला. पुढें छत्रसाल मरण पावल्यावर सन १८०३ पर्यंत त्याच्या वंशजांकडे असून उमरावसिंग नांवाच्या सरदारानें काबीज केला. ह्याच वर्षी नागपुरकर भोसल्यांनीं उमरावसिंगाशीं लढाई केली त्या युद्धांत त्यांस जय प्राप्त झाला. पुढें नागपुरकर भोसले आपासाहेब पळून गेल्यावर धामोनीच्या किल्यावर इंग्लिश सरकारच्या फौजेनें आपलें ठाणें बसविलें.

सवाल. ११—प्रगणे कवल कदीम अमलापासून दरोबस्त सेनासाहेबसुभ्याचा तालुका आहे तो माहाल नबाब मुबारज मुलकबाहादूर मरहूमच्या दोनशें स्वाराच्या चाकरींत होता तो आतां सोडून द्यावा.

---

२२८ श्री

( ना. भो. २९ ) श. १७०८ भाद्रपद शुद्ध ३

६-९-१७८५

माहे जिल्काद सुा सीत समानीन मया आलफ. खंडोजी[1] भोसले सेनाबहादर यांचे नांवें, माधवराव नारायण पंतप्रधान यांणीं सनद लिहून दिली कीं, स्वस्थान गढेमंडलेपैकीं रेवा दक्षिणतीरचे महाल राजश्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा यांजकडेस द्यावयाचा करार जाहला आहे, ते खेरीजकरून, उत्तरतीर स्वस्थान मजकूर आलिकडेस सरकारांत घेतलें आहे, ते तुम्हांकडे फौजेचे सरंजामास सालमजकुरापासून दिल्हें असे येविशीं कलमें—

१ स्वस्थान मजकूर तुमचे हवाली जाल्यानंतर तेथील कमाल जमा आसेल ती मनास आणून फौजेचा करार करून देऊं त्या प्रमाणें फौज चांगली बाळगावी. एकनिष्ठपणें दुसरें लक्ष न धरितां चाकरी करावी. कलम १

२ खाशांनीं फौजेसुद्धां चाकरीस यावें; वरकड सरदारांप्रमाणें फौजेची गणती द्यावी. कलम १

३ पडले घोडे व दारूगोळी सरकारांतून देऊं नये.

४ सालमजकुरीं उत्तरतीर दक्षिणतीर यांत जमीदार, पाटीलकुळकर्णी वगैरे हकदार यांजकडेस हकटक, मानपान, गांवइनाम, जमिनी, ब्राह्मणांस वगैरे इनाम गांव, धर्मादाय पेशजीपासून चालत आले आहेत, व सरकारांत आमल आल्यावर दिल्हे असतील ते चालवावे, बोभाट येऊं नये. कलम १

५ मंडलेखेरीज दुसऱ्याचे महाल बुंदेल्यानीं सरकारांत घेतले असल्यास ते सरकारांत राहतील. कलम १

एकूण पांच कलमें करून दिल्हीं असेत; तरी सदर्हूप्रमाणें महालाचा बंदोबस्त करून सरकारसेवा एकनिष्ठपणें करीत जावी. रवाना छ० १ जिलकाद; बहुत काय लिहिणें हें विनंती. [ शिक्का ]

---

१ खंडोजी चिमणाबापू हा मुधोजीचा मुलगा, पहा राज० खं. १०. २८०

२२९ श्री

( ना. भो. २५ ) श. १७०८ भाद्रपद शु. ३

६-९-१७८५

कलमबंदी याद, राजश्री पंतप्रधान यांसी व राजश्री मुधोजी सेनाधुरंधर यासीं करारमदार, राजश्री सेनासाहेबसुभा यांजकडील ठरण्यांत आले. छ० १ माहे जिलकाद सुा सीत समानीन मया व आलफ सन ११९५ फसली मुक्काम पुणें.

सवाल १— पूर्वी चिरंजीव राजश्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा पुरंधरास आपले भेटीस आले, त्या प्रसंगीं कितिएक प्रकारें स्नेहाचें व ऐक्यतेचें बोलणें झालें, व परस्परें स्नेहसंबंध दृढतर होऊन त्यांचे येणें पुन्हा नागपुरास घडलें. त्यानंतर दिवाकर पुरुषोत्तम यांचें येणें पुण्यास जाहलें, त्या प्रसंगीं आंग्रेज आदिकरून [ परशत्रूं विषयीं ] संशय निर्माण जाहले होते ते निरसन होऊन करारमदाराचे प्रकार परस्परें ठहरण्यांत आले. सांप्रत आमचें येणें आपले भेटीकरितां जाहलें. तेव्हां या प्रसंगीं परस्परें सर्वोत्कर्षे निश्चयात्मक बोलणीं करारमदार ऐसा ठहरावा, कीं याची बुनियाद बहुत दिवस कायम राहे व कोणेही प्रसंगीं परस्परें दुसरा प्रकार नमुदीस न ये; वंशपरंपरा उपयोगा येई ऐसें जालें पाहिजे. कलम १

जबाब—पूर्वी राजश्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा व दिवाकर पुरुषोत्तम भेटीस आले, ते प्रसंगीं बोलणीं जालीं. प्रस्तुत तुमचें येणें जालें, स्वच्छतेचीं बोलणीं जालीं; संशय राहिला नाहीं. तुम्हांकडून लिहिल्याप्रमाणें वर्तणूक घडावी, इकडूनही दुसरा प्रकार होणार नाहीं, खातरजमा असावी. येणेंप्रमाणें करार करावे.

सवाल २.—चिरंजीव सेनासाहेबसुभा यांचे नांवें सनदा ऐश्या कीं मकसुदाबाद व सुभे पटण व कटक प्रांत उडीसा बमये संबलपूर व प्रांत छत्तीसगड व छोटानागपूर व प्रांत बस्तर वगैरे व प्रांत वराड व संस्थान देवगड व संस्थान चंद्रपूर बमये उठणूर सुद्धां व प्रांत वरघांट मुलतापी वगैरे व प्रांत गढेमंडले येथील रेवा दक्षिणतीर दरोबस्त तालुका हे कैलासवासी महाराजांपासून चालत आहे त्याप्रमाणें हल्लीं दरोबस्त सनदा जाल्या पाहिजेत. कलम १

जबाब—पेशजींपासून आहे त्याप्रमाणें करार करून सदरहू प्रमाणें सनदा येणें प्रमाणें करार करावे.

सवाल ३.—चिरंजीव खंडोजी भोसले सेनाबहादर यांस सरंजाम प्रांत गढेमंडले रेवा उत्तरतीरचा दरोबस्त प्रांत व ठाणेजात व गडजात सुद्धां देण्याचा करार कैलासवासी दिवाकर पुरुषोत्तम यांचे विद्यमानें ठरला आहे त्याजप्रमाणें चिरंजीवाकडेस संस्थान बहाल करून सनदा देविल्या पाहिजेत. कलम १

जबाब—येविषयींचें बोलणें होऊन आलाहिदा यादी ठरली आहे त्याप्रमाणें सनदा देवविल्या जातील; येणेंप्रमाणें करार करावे.

सवाल ४—जाहागीरदारांचे हर्षामर्षामुळें वऱ्हाडांत व गंगथडींत कमती झाली. दिवसेन-दिवस जागीरदार भारी होत चाललेत; नबाबाचा स्नेह व इकडील आळजपूरचे तहा-प्रमाणें जागीरदारांनीं वर्तणूक करावी ऐसी नबाबकडून निक्षून ताकीद असतां ते मानीत नाहींत, जमाव येऊन हिस्याचे कामांत खलेल करितात. येणेंकरून लाखों रुपयांची नुकसानी दिवसेन दिवस होत चालली; कथंचित जागीरदारासी एखादा हर्षामर्ष झाला, तेव्हां नबाबाचे मर्जीत अंतर पडेल. जागीरदार तो आपलेकडून उपाधीस चुकत नाहींत; हें इकडून मात्र बरदास्त करण्यांत येती; याची सल्ला कैसी करावी हें सांगितलें पाहिजे. कलम १

जबाब—आलजपूरचे मुक्कामीं नबाबाचा व तुमचा तह झाला आहे त्याप्रमाणें परस्परें वर्तणूक असावी; कांहीं नबाबाकडून व त्यांजकडील जागीरदाराकडून जास्ती जाली असल्यास त्यासीं बोलून बंदोबस्त करून देविला जाईल; येणेंप्रमाणें करार करावे.

सवाल ५— प्रांत केडवळीत येथील वतन देशमुखी आमची पूर्वीपासून आहे ती आपण चालवितच आहांत, परंतु कसबेमजकूरचे ठाणीं यामुळें व सरकारांत चार गृहस्थ मुत्सदी आहेत याजमुळें कडेकराची हिमायत होऊन ठाणें आमचे स्वाधीन होत नाहीं; त्यास ज्यापक्षीं आमचे तर्फेची आपणास खातरजमा आहे त्यापक्षीं ठाण्याचा रखणा दरम्यान नसावा; ठाणे देवावेत व वतनसंबंधी जाबसाल किरकोळ आहेत ते उरकोन देवावेत व नगर हवेली येथील आठरा गांवचा वसूल हुंडा[1] देतात त्यास ताकीद होऊन शेंकडा दोन रुपये प्रमाणें वसूल प्रगण्याचे वहिवाटीप्रमाणें कीजे; येविशीं ताकीद जाली पाहिजे. कलम १

जबाब—सुदामत चालत आलें आहे त्याप्रमाणें चालेल; त्यांत दिकत पडल्यास ताकीद करून चालविलें जाईल; येणेंप्रमाणें करार करावें.

सवाल ६-- मौजे पळसी संमत वाघोली प्रांत वाई येथील सिंवेवर डोंगर आहेत, तो निमे किल्ले चांदगिरीकडील हद्देच्या तिकडे चालत होता व मौजेमजकूरचे तर्फेचा मौजे मजकुराकडेस चालत होता; आलीकडे किल्लेवाले जबरदस्ती करून दरोबस्त राखि-तात त्यास किल्लेवाले यांस निक्षून ताकीद होऊन पूर्ववतप्रमाणें गांवचा डोंगर गांवा-कडेस चालविला पाहिजे. कलम १

जबाब--मौजे मजकूरचे हद्देचा डोंगर मौजे मजकुराकडेस चालत होता; हल्लीं तुम्ही चालू देत नाहीं, साराच किल्याकडेस राखितां; त्यास सालमजकुरापासून पूर्ववत्प्रमाणें गांवचे हद्देचा गांवाकडे करार करून दिला असे; चालवणें म्हणून मामलतदारास सनद देवावी.

सवाल ७-- ब्रह्मेश्वराचे स्थलीं कैलासवासी तीर्थरूप जानोजी बाबा यांचा व आपला तह

---

१. मक्ता.

जाला तेव्हां पांच लाख रुपये द्यावे असा करार जाला होता, त्यापैकीं पेशजी वसूल जाऊन बाकी राहिली असेल ती माफ करावी. कलम १

जबाब--दोन लक्ष सत्तर हजार रुपये नजरेपैकीं बाकी येणें ती माफ केली असेत; येणें-प्रमाणें करार करावे.

सवाल ८--प्रगणे येरल प्रा नळदुर्ग येथें तीर्थरूप कैलासवासी जानोजीबावा यांचा काळ जाहला, तेथें देऊळ बांधणें, अन्नछत्र घालावयाचें आहे, लांकूड फाटे वगैरे तेथील साहित्यास मौजे मजकूर स्वराज्याचा अमल सरदेशमुखी बाबती व चवथाई वगैरे सुद्धां दरोबस्त इनाम करून देविला पाहिजे. कलम १

जबाब--आलाहिदा यादीवर मकलासी झाली आहे त्याप्रमाणें चालेल; येणेंप्रमाणें करार करावे.

सवाल ९--दरसाल पांच हजार रुपयांचें कापड बाळापूरचें व वासीमचें द्यावें हें ब्रह्मेश्वरचे तहांत आहे तें माफ करावें. कलम १

जबाब--या गोष्टीची रदबदल करूं नये. कराराप्रमाणें पांच हजार रुपयांचें कापड सर-कारांत देत जावें; मागील कापड सरकारांत आलें नाहीं, तें सन खमस समानीन-पर्यंत माफ केलें असें; पुढें दरसाल देत जावें. येणेंप्रमाणें करार करावे.

सवाल १०--मौजे दहिगांव व मौजे पळसी संमत वाघोली प्रांत वाई हे गांव पूर्वींपासून आम्हांकडे चालत आहे त्यास जिल्हेबाब प्रतिनिधींकडील व मोकासबाबैपेकीं व कसर पांचोत्रा आदिकरून उपद्रव आहे तो कुलबाब व कुलकानू दरोबस्त इनामपात्रें करून देऊन निर्वेध जालें पाहिजे. कलम १

जबाब--दोहीं गांवांकडे सरकारचा व प्रतिनिधीकडील अमल आहे त्याचा मखता ठहरा-वून द्यावा. त्याप्रमाणें दरसाल ऐवज घेत जावा. ज्यास्ती फरफर्मावीस वगैरे कोणेविशीं उपद्रव न लावणें; रोखापत्र गांवावर न करणें म्हणून सरकारचे मामलेदार व प्रतिनिधि यांसी सनदा एविशींच्या मकलासीच्या यादी आलाहिदा जाल्या आहेत त्याप्रमाणें सनदा दिल्या जातील; येणेंप्रमाणें करार करावे.

सवाल ११.--वरकड कलमें कैलासवासी दिवाकर पुरुषोत्तम याचे वेळेस ठरले आहेत त्या प्रमाणें वर्तणुकींत असावें. कलम १

जबाब--येणेंप्रमाणें करार करावे.

सवाल १२--पूर्वील करार व तह असा आहे कीं, प्रांत उडिसा व कटक दरोबस्त इकडे जे चालत आहे ते चालऊन त्याशिवाय बाबत सुभे मकसुदाबाद व पट्टण बारा लक्ष रुपये ऐन शिवाय कारकुनी दोन लक्ष रुपये एकून चवदा लक्ष रुपये प्रतिवर्षीं देत जावे, हा ऐवज तहाप्रमाणें पूर्वीं पोहचत गेला. सांप्रत इंग्रेजाकडील या हिसेबाचीं करोडो रुपये बाकी निघती त्यास आंग्रेजाकडील जबाबसाल सलुखाचा आपणा-

कडील ठरला, आमचा तैसाच राहिला आहे, त्यास आपले सलुखांत सर्वत्रांचा सलूख याकरितां आंग्रेजाकडील आमचे तह्याचा ऐवज ताकीद होऊन त्याचा मार्ग घडावा. त्याणें मार्ग न केल्यास आम्हांकडील फौज जाऊन ज्याप्रमाणें ऐवज मिळेल त्याप्रमाणें घेण्यांत येईल, त्या प्रांताचा व त्या सुभ्याचा जिमा पूर्वीपासून आमचा आहे. जें साहस व जो प्रकार घडला आहे तो विदितच आहे. तेव्हां दुसऱ्यांनीं उद्योग करावा ऐसे तों नाहींच, याजकरितां येथून पुर्त्या निश्चयाविशीं करारांत यावें.

कलम १

जबाब--प्रांत उडिसा व कटक दरोबस्त तुम्हांकडे चालत आहे. सुभे मकसुदाबाद व पट्टण येथील करार ऐवजाचा तुमचा आहे त्यास एविशीं इंग्रेजासीं बोलन स्नेहाचे वाटेनें जैसे होईल तैसें केले जाईल. करार करावे.

सवाल १३--प्रांत गढेमंडले येथील नर्मदा दक्षणतीरचा दरोबस्त तालुका बमये चौरागड हा पूर्वी कैलासवासी नानासाहेब यांणी तर्थिरूप कैलासवासी बाबासाहेब यांसी दिला होता, त्याप्रमाणें तिगस्तां राजश्री बळवंतराव विष्णु यांचे विद्यमानें दरोबस्त तालुकेयांच्या सनदा करून दिल्या. त्याप्रमाणें हल्लीं सनदा चिरंजीव सेनासाहेबसुभा यांचे नांवें करून द्याव्यात.

कलम १

जबाब--पेशजी करार जाला आहे, त्याप्रमाणें सनदा देविल्या जातील. येणेंप्रमाणें करार करावे.

सवाल १४--प्रगणे सिवनी हुशंगाबाद बमये किल्ला व मुनोर चालसा व बाडी वगैरे हे माहाल कदीमपासून स्वस्थान देवगडचे तालुक्यांतील तेथील अमल भूपाळकरांनीं दाबिला आहे, करारबाकी मिळत नाहीं. याविशीं ताकीदपत्रें संस्थानिकांस देऊन व सनदा पूर्ववतप्रमाणें चिरंजीव सेनासाहेबसुभा यांचे नांवें करून देवाव्या, म्हणजे तेथील बंदोबस्त करण्यांत येईल.

कलम १

जबाब--पूर्वापीसून चालत आहे, त्याप्रमाणें चालवावें व माहाल दाबिले असतील ते सोडून द्यावे. एविशीं भूपाळकरांस पत्रें देवावीं. येणेंप्रमाणें करार करावे.

सवाल १५--जेथें दवलत तेथें दायादसंबंधीं द्वेष व संचार नानाप्रकारचे त्याणें कोणेहि प्रकारें स्थिर चित्त राहूं नये, ऐसी त्याजकडील चाल संधि पाहून फंद करावेकाबू वेळप्रसंग त्याणीं पाहात असावा, त्यास कोणेही द्वेषबुद्धीनें अथवा वैरसंबंधी या दवलतीचे अपायविशीं चालना करील व अनुसंधान लावील तें लागूं देऊं नये, एविशीं त्यास निषेध व शिक्षा आपणाकडून पुरती असावी व मातबर सरदार इकडील आपलेकडे आला तरी त्यास आमचे इतल्याशिवाय व मर्जीशिवाय आपणापाशीं ठेऊं नये. कथंचित त्याजकडून अनुसंधान आलें, तरी त्याचा इतल्ला आम्हांस करावा, दायाद अथवा सरदार यांसीं जागा मिळूं नये, आमचे स्वाधीन करून द्यावे; त्याचें येथून चालविण्यांत येईल.

कलम १

जबाब—तुह्मीं स्वरूपाप्रमाणें चालवावें; ऐसें करितां कोणी सरकारांत आला तरी त्यास आसरा देणार नाहीं व सरकारचे सरदार वगैरे तुह्मांकडेस कोणी आला तरी तुम्हीं ठेऊं नये, आसरा देऊं नये, येणेंप्रमाणें करार करावे.

सवाल १६--देऊर संमत वाघोली प्रांत वाई हा गांव दरोबस्त इनाम राजपत्रीं आम्हांकडे आहे. तेथील सरदेशमुखी व कसर पंचोत्रा एकून तीनशें रुपये सरकारांत घेतात; त्यास मौजे मजकूर येथील सरदेशमुखी व कसर पंचोत्रासुद्धां अंमल कुलबाब कुलकाणू दरोबस्त इनामपत्र करून देऊन निर्वेध जालें पाहिजे. कलम १

जबाब--त्याची मकलासी आलाहिदा जाहली आहे, त्याचप्रमाणें चालेल. येणेंप्रमाणें करार करावे.

सवाल १७--मातबर मसलतीस इकडून सामील व्हावें व तिकडून बोलावणें हेच सल्ला, यांतील तीन प्रकार-प्रथमतः स्वतां मातबर फौजेसुद्धां यावें, अथवा चिरंजीवास विदा करावे; अगर कोणी मातबर सरदाराबरोबर फौज देऊन बिदा करणें. या तिहीं प्रकारांतून भलता एक प्रकार यथाशक्ति जैसा प्रसंग पडल्याप्रमाणें घडेल. परंतु फत्ते आलीखान अथवा दुसरी मोहीम येऊन नमुद झाली त्या प्रसंगास आपले स्वरूपानुरूप यावें व घडावें ऐसीं पत्रें जेव्हां येतील, तेव्हां त्या प्रसंगास येऊन घडविलें पाहिजे. याचें घडणें व आम्हांकडून घडविणें हे सर्वस्वीं आपणांकडेस आहे. श्रीमंत महाराज कैलासवासीचे वेळेस तीर्थस्वरूप बाबासाहेब यांचें जाणें करनाटकास झालें होतें ते वेळेस वांटणी नेमून दिल्ही होती हें आपले ध्यानांतच आहे. करनाटकाचा नागपुराहून पल्ला लांब व त्या मुलकांत वरकडां सारखी सोय इकडील नाहीं, याजकरितां सूचनार्थ लिहिलें असे. त्यास फौजेचे पोटाचा बंदोबस्त व्हावा. गळाटा झाला न पाहिजे. कलम १

जबाब—खर्चास द्यावयाचा आलाहिदा यादीवर करार झाला आहे त्या प्रमाणें पावेल. येणेंप्रमाणें करार करावे.

सवाल १८—मौजे आसनगांव व प्रांत वाई येथील कुरंदभीकाडोंगराचे व चंदावांदाचे पहिलेपासून आम्हांकडे देऊरी असतां दाबिले, चालत होते. अलीकडे किल्ले चंदनवली याणीं दाबिले आहेत, ते हल्लीं पूर्ववत्प्रमाणें आमचे आम्हांकडेस बाहाल करून देऊन एविशीं ताकीदपत्रें चंदनवली यांस जाली पाहिजे. कलम १

जबाब—आसनगांवचे भीकाडोंगराचे कुरंद व चांदावांदा येथील कुरंद चालत होते. अलीकडे चालत नाहा. ते पूर्ववत्प्रमाणें करार करून दिल्हे असेत. यांजकडे चालवणें म्हणून मामलतदारास सनद देवावी.

सवाल १९—मौजे सीरपूर तालुका पाटस प्रांत पुणें हा गांव वतनी पाटीलकीचा मौजे मजकुरीं इनाम एक चाहूरगुमठ पट्ट्या दोन आहेत, ते भाऊपणाचे वादामुळें पडला.

गांवांत रयत वाहतात त्याचा आकार सरकार जमेंत ठरला आहे. त्याजविशीं ताकीद पत्रें देवावीं आणि इनामाची सनद दरोबस्तीचा करून भोगवट्यास यावी.

कलम १

जबाब.--एक चाहूर जमिनीचा भोगवटा नाहीं; परंतु पाटीलकीचें वतन याजकरितां मौजे मजकूरपैकीं एक चाहूर जमीन सालमजकुरापासून नूतन इनाम करून दिल्ही असे, यापैकीं निमे पाटीलकीश्रीमंत महाराज छत्रपति स्वामी यांची आहे, याजकडे निमे चाहूर चालेल व निमे तुमची पाटीलकी आहे, तुह्मांकडेस निमे चाहूर चालेल. याप्रमाणें करार करून निमे चाहुरांची इनामपत्रें दरोबस्त अमलाचे शिरस्तेप्रमाणें करून देवावीं. येणेंप्रमाणें करार करावे.

सवाल. २०--मातबर मसलहत उपस्थित झाल्यास आह्मास बोलवावें, आणि आह्मी यावें, याविषयींची सूचना आगाऊ दोन महिने व्हावी. सामान्य कामें असल्यास बोलावूं नये.

कलम १

जबाब-येणेंप्रमाणें करार करावे.

---

२३०　　　　　　　　　श्री

( भा. व. २.२२ ) पौ छ१० मोहरम　　　　　　　श. १७०७ आश्विन व. १४

ता. ३१-१०-१७८५

सेवेसी आपाजी बाबाजी[1] कृतानक साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना. येथील कुशल तागाईत छ २७ जिल्हेजपावेतों मुक्काम बडोदें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामीची आज्ञा घेऊन निघोन आलों ते येथें सोळावे रोजीं आश्विनी पौर्णिमेस दोन प्रहरीं दाखल झालों. ते शहराचे बाहेर दरवाजाजवळ दोनप्रहरापासून अस्तमानपावेतों उभे होतो. शहरांत यावयाची परवानगी येईना, व जासूद अगर कोणी माणूसही जाऊं देईनात. मग सूर्यास्तीं एक जासूद आला. त्याणें शहराचे बाहेर धर्मशाळा होती तेथें उतरावयास सांगितलें. त्यावरून तेथें जाऊन उतरलों. दुसरे दिवशीं जासूद पाठविला. त्याजबरोबर चिठी पाठविली कीं, भेटावयास येणार, परवानगी पाठवावी. तेव्हां सांगोन पाठविलें कीं, आज प्रकृत ठीक नाहीं. त्याजवरून तिसरे रोजीं चिठी पाठविली त्याचें उत्तरही नाहीं. मग चवथे रोजीं राजश्री त्रिंबक आपाजीस चिठी पाठविली. त्याचें उत्तर आलें तें व दुसरे रोजीं चिठी पाठविली तिचें उत्तर आलें तें सेवेसी पाठविलें आहे. त्याजवर दररोज चिठ्या पाठविल्या त्यांचें उत्तरच आलें नाहीं; मग राजश्री फत्तेसिंगराव सेनाखासखेल यांसच चिठी पाठविली. उत्तर तों आलें नाहीं. परंतु शहराचे बाहेर देव आहे तेथें पागा रिकामी होती,

---

१. उपनांव दामले पेशव्यांचा व नानांचे भरंवशाचा सरदार.

तेथें जागा दाखवून रहावयास सांगितलें. मग पागेंत येऊन राहिलों, आणि चिठी भेटीविशीं पाठविली. तेव्हां भेटावयास यावयाची परवानगी जासूद तिसरे रोजीं पागेंत आल्यावर आली. त्याजवरून जाऊन भेट घेतली. श्रीमंतांचे व स्वामीचे स्वस्तिक्षेमपणाचें वृत्त मात्र पुसिलें तें सांगितलें. पत्रें द्यावयास काढिलीं तेव्हां बोलिले कीं, आज सायंकाळ झाला. दोहों चहूं रोजांनीं पत्रें पाहूं, बोलणें बोलों ऐसें बोलिले. त्याजवरून बिराडीं आलों. येते-समयीं बोलिलों कीं, आज मर्जी नसिल्यास उदईक सुदिन आहे, पत्रें वाचून पहावीं. श्रीमंत राजश्री रावसाहेबांनीं आज्ञा केली आहे, ते व श्रीमंत राजश्री नाना व तात्यांनीं बोलणें बोलावयास सांगितलें आहे तें ऐकावें. कार्याचे कलमांची याद आहे ती पहावीं. त्याप्रमाणें बोलण्यांत ठरावाचे जाबसाल आणावे. त्याप्रमाणें श्रीमंतास विनंतीपत्रें सरकारांत पाठवूं ऐसें बोलिलों. तेव्हां ते बोलिले कीं, उत्तम आहे. ऐसें बोलून आलों. दुसरे रोजीं चिठी पाठविली ते टाळाटाळ केली. मग तिसरे रोजीं चिठी पाठविली तो दिवसही टाळिला. मग चवथे रोजीं चिठी पाठविली. मग यावयास परवानगीचा जासूद पाठविला. मग जाऊन पत्रें दाखविलीं. बहुता प्रकारें घरोब्याचीं बोलणीं आपलीं व श्रीमंत तात्यांचीं सांगितलीं, व श्रीमंतांची भेट घ्यावी येविशींचें बोलणें भोसले, नबाब वगैरे यांचे दाखले देऊन आमची कारवाई होती तितकें करून बोलिलों. श्रीमंतांनींही दोन चार वेळ तुमचें तारण केलें. भेटीस बोलाविलें हेंही सांगितलें. ऐकोन घेतलें, व कलमांची याद पहावयास मागितली. तेही दाखविली. वाचून पाहिली. मग यादीप्रमाणें फडशे करावे, ठरावांत आणावे, म्हणजे सरकारांत विनंतीपत्रें पाठवूं ह्मणोन बोलिलों. त्याजवरून बोलिले कीं, आज सायंकाळ झाला. याचा विचार उदईक करून परवां कलमांचे जाबसाल सांगों ऐसें बोलिले. तदनंतर उत्तम आहे ऐसें बोलोन बिराडीं आलों. दुसरा दिवस जाऊं देऊन तिसरे रोजीं सांगोन पाठविलें. उत्तर लौकर येईना ह्मणोन चिठी पाठविली तरी गांठ पडों न देत. याप्रमाणें आह्मी दररोज चिठ्या पाठवीत गेलों. त्यास आज पांच रोज झाले. चिठ्या पाठवीत गेलों कीं, येतों, जाबसाल व्हावे ऐसें लिहीत गेलों. परंतु उत्तरेंही नाहीं, व परवानगीही येईना. जासूद नाईक कारभारी आहेत. त्यांणीं मात्र आमचे जासुदाजवळ सांगावें कीं, निजले आहेत, उठले नाहींत इतकें मात्र सांगत. परंतु अंतस्थ दिवाण, आपण व जासूद नाईक यांणीं बसोन आपला कारभार मात्र करीत बसत व कोठें बाहेर देवास व गृहस्थाचे घरीं जात. आह्माशीं मात्र टाळाटाळी करितात. आमचा प्रयत्न होता तो केला, परंतु गांठ पडों देत नाहीं. आह्मीं चिठ्या पाठविल्या त्याच्या नकला करून ठेविल्या. त्याच सेवेसी पहावयास पाठविल्या आहेत. दहा बारा रोज माणसास किंवा कारकुनास शहरांत जावयाची देखील परवानगी नव्हती. मग जिन्नसपान्नस आणावयास येतील तर कारकून व चार जासूद व हुजरे यांस मात्र परवानगी झाली. खाशाजवळ जासुदाखेरीज कोणासही परवानगी नाहीं. परवानगी असती तर कारकुनाबरोबर सांगोन पाठवितों. परंतु परवानगी नाहीं यास्तव चिठ्या पाठवीत गेलों. त्याजवरून काल सायंकालीं दिवेलावणीं येणें ह्मणून परवानगीचा

जासूद आला त्याजवरून गेलों, आणि बोलिलों कीं, श्रीमंतांनीं पत्रें लिहिलीं आहेत व कलमबंदीची याद दिली आहे, त्याप्रमाणें जाबसाल उलगडून द्यावे व आपणही श्रीमंताचे भेटीस चलावें. भेटीविषयीं चलावें ह्मणोन बहुतां प्रकारें सांगितलें तेव्हां बोलिलें कीं, आमचेहि चित्तांत भेट घ्यावयाची बहुत वर्षे आहे. परंतु गुत्यामुळें येणें न झालें. हल्लीं प्रकृत ठीक नाहीं व शिबंदीचा गवगवा आहे. याचा बंदोबस्त करून येऊं ऐसें बोलिलें. परंतु धातुपोषणार्थ बोलिले. त्याजवर कलमांचे जाबसाल पुसत चालिलों त्याचीं उत्तरें.

सन अर्बाची बाकी तीन लक्ष यादीवर आहे. त्याचें उत्तर केलें कीं, आमचे मतें बाकी नाहीं. गमाजी पाटील यांचें पत्र आणावें कीं, इतकी बाकी सरकारची देणें आहे. ऐसें पत्र आणवणें म्हणजे कधीं देतों हें सांगों, याप्रमाणें बोलिले. कलम १

सन खमसांत फौज चाकरीस यावी ते न आली. त्याचा पैकाच द्यावा. ते बोलिले कीं, फौज आह्मी पाठवीत होतों. परंतु मना केली येविशीं पत्रें आहेत. पैका काय ह्मणून मागतां. याप्रमाणें. कलम १

सत्रा गांवें देशकीबाबत ऐवज घेतला तो माघारा द्यावा ऐसें बोलिलों. उत्तर केलें कीं, सरकारचे ऐवजपैकीं घेतला नाहीं. जमीदाराकडे येणें तो जमीदारापासून घेतला. कलम १

सालमजकुरीं फौजेचे स्वारीमुळें जरूर आहे तरी सालाबादी तीन हजार व जाजती एक हजार एकूण चार हजार पाठवावी. त्यांत चार पांचशें काय स्वार गेले असतील ते वजा करून बाकीची फौज लौकर रवाना करावी. एक मातबर सरदार द्यावा तो कोण देतां, त्याचें नांव काय तें सांगावें. त्याप्रमाणें लिहून पाठवूं. याचें उत्तर केलें कीं, फार करून फौज गेली. बाकी राहिली त्यास ताकीद केली. डेरे दिले. लौकरच रवाना करितों. कार्तिक शुा तृतीयेस सरदार योजून त्याचें नांव सांगों. याप्रमाणें. कलम १

सालाबादीचे ऐवजाचे सन खमस व सन सीतचे पुसिलें. त्यांना उत्तर केलें कीं, सालाबादीची बेरीज इतकी नाहीं. तेव्हां आम्ही बोलिलों कीं, किती आहे तेच तुह्मीं सांगावी. तेव्हां बोलिले कीं, आह्मीं कागदपत्र पाहून सांगों. तुह्मींच लिहून आणवणें याप्रमाणें बोलिले. कलम १

सावळी महालचें पुसिलें. उत्तर झालें कीं, राजश्री हरिपंततात्यांनीं शफत करून संतोषानें दिला. त्यास हल्लीं त्यांनीं पत्र ल्याहावें कीं, आह्मीं वचनेंकरून दिला. परंतु तें वचन राहिलें. महाल माघारा द्यावा ऐसें पत्र आणावें. देऊं. कलम १

अमदाबाजेचे बोभाट येतात. त्याचे काय फडशे आहेत ते याद आणवितों त्याप्रमाणें उरकून टाकावे. उत्तर केलें कीं, कांहीं फडशे राहिले नाहीं. झाडून करून दिले. किरकोळ कांहीं असल्यास होतील. फडशे फार करून झाले. याप्रमाणें झालें. परंतु राजश्री भवानी

शिवराम याजकडील कारकून आहेत. त्यांच्या बोलण्यांत कांहींएक फडशे झाले नाहीं. लढे झाडून तैसेच आहेत. कलमांची यादच दाखविली. फडशे होणें फारच आहेत.

कलम १

यादीवरील कलमें दोन एक साहुकारी व कर्जांतील महाल हे दोन जाबसाल. याचें उत्तर उदईक सांगों म्हणोन टाळा देऊन उठून गेले. कलम १

सदरहूप्रमाणें गोविंदराव यांचाही जाबसाल.

येणेंप्रमाणें यादींतील जाबसालांचीं उत्तरें झालीं तीं सेवेसीं लिहिलीं व दिनचर्येचें आम्हीं आल्यापासून झालें तें सेवेसीं वृत्त लिहिलें आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

२३१ श्री

( भा. व. २-१९ ) श. १७०७ आश्वि. व. ३०

ता. २-११-१७८५

पुरवणी सेवेसी आपाजी बाबाजी साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथें दाखल झाल्यापासून दिनचर्येचें वृत्त व कलमाकलमांचीं उत्तरें झालीं, तीं अलाहिदा पत्रीं लिहिलें आहेत त्यावरून श्रुत होईल. घरोब्यानें बोलावयास ज्याप्रमाणें श्रीमंत राजश्री तात्यांनीं सांगितलें त्याप्रमाणें बोललों. भेटीस यावें. श्रीमंत राजश्री रावसाहेबांनीं दोनचार वेळ तारण केलें व हल्लीं भेटीस यावें म्हणोन आज्ञा केली आहे. श्रीमंत तात्याही लौकर स्वारीस दरमजल शत्रूचे पारपत्यास जाणार. यास्तव ते पुण्याजवळ आहेत तों चलावें, भेट ध्यावी. नबाबासारिखे भेटीस यावयाची इच्छा करितात परंतु तूर्त येऊं नये म्हणोन लिहून पाठवितात. भोसले यांनीं आज पांच वर्षें भेटीस यावयाकरितां यत्न केला तेव्हां यंदा बहुत बजीनें रदबदल केली तेव्हां यावयाची परवानगी होऊन भेटीस येऊन भेट घेऊन गेले. तुम्ही तो परके नाहीं. घरोबा राखितां व तुमचे ठायीं दुसरा विचार नाहीं हें ध्यानांत आणावें. तरी लौकर चलावें येविशीं विस्तारें आमची कारवाई होती, तितकी बोलावयाची केली, परंतु त्यांचे गांवींच नाहीं, धातुपोषणाचें उत्तर केलें कीं, आमचे चित्तांत भेट ध्यावी हें बहुत वर्षें आहे. यंदा येणार परंतु प्रकृत ठीक नाहीं व फौजेचा गवगवा यास्तव तूर्त येणें होत नाहीं, गवगवा उलगडला म्हणजे येऊं. इतकें मात्र बोलले. सारांश सरकारचा दाब नाहीं. दाब असता तर आज पंधरा रोज झाले, कलमाकलमांचे जाबसाल होऊन कांहीं ठरावांत आले असते. यास्तव जाबसालाचे फडशे करीत नाहीं. इंग्रजांचा तह झाला तेसमयीं सरकारचा दाब होता कीं, जीव कैसा वांचेल ऐसा होता. त्यास स्वामींनीं कृपा करून थोडक्यावर सांभाळून घेतलें. त्याजवरून मागती भयापासून दूर होऊन सरकारलक्ष सोडून जाबसालाची

पायमल्ली करितात. विना जरब बसल्याशिवाय कलमाकलमांचे फडशे होत नाहीं. उगीच कागदोंपत्रीं जरब दिल्यानेंही देहावर यावयाचें नाहीं. जरब चांगली तेथून निदर्शनास आली पाहिजे. मग समज पडोन कलमाकलमांचे फडशे लौकर करितील. जरबेखेरीज फडशे होत नाहीं ऐसें सेवकास दिसतें. मग स्वामीची आज्ञा येईल त्याप्रमाणें वर्तणूक करूं. कार्तिक शुा तृतीयेस राहिले जाबसाल बोलूं म्हणून करार केला. परंतु पंचमीसप्तमीस गांठ पडली तर पडेल. आजपावेतों आम्हीं याजवळ विटविलें नाहीं. कांहीं नरम कांहीं गरम मात्र बोलत गेलों. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

२३२

श्री

( भा. व. २-२० )

शके १७०७ कार्तिक शुद्ध १
ता. ३-११-१७८५

पुरवणी सेवेसी आपाजी बाबाजी साष्टांग नमस्कार विज्ञापना. सरकारचे पत्राचा जाब व आपले पत्राचा जाब मागितले तेव्हां बोलिले कीं, कार्तिक शुद्ध तृतीयेस देऊं, ऐसा करार केला; परंतु देतील तेव्हां घेऊन पाठवूं. जरबखेरीज सुरळीतपणें घरोबा राहून जाबसाल निर्गमांत यावयाचे नाहीं. येथून बाहेर जासूद याचे परवानगीशिवाय जाता येत नाहीं. दोन रोज जासूद जावयाची परवानगी आणवितां आज परवानगी झाली. तेव्हां सेवेसीं पत्रें लिहून जासूदजोडी रवाना केली आहे. तृतीयेस उत्तरें देऊं व राहिले जाबसाल करूं म्हणून करार केला आहे. गांठ पडोन जाबसाल करतील ते, व उत्तरें देतील तीं सेवेसीं पाठवूं. गमाजी पाटील आपले तर्फेनें सरकारचे जाबसाल होऊन फडशे लौकर करावे ऐसें लिहीत गेले. परंतु तेंहि त्यांचे गांवीं नाहीं. येथील यांची वर्तणूक कैसी आहे ही समक्ष सेवेसीं येईन, तेव्हां निवेदन होतील. पत्रें रवाना करितों. परवानगी जासूद जावयाची द्यावी म्हणून बोलिलों. तेव्हां बोलत कीं, उगीच पत्रें काय म्हणून पाठवितां? तृतीयेस तुम्ही आम्ही बसून पत्रें लिहिणें तें लिहून पाठवूं ऐसें बोलत. मग मोठ्या बलात्कारें परवानगी घेऊन जासूद जोडी रवानगी केली; परंतु जासूदजोडीजवळील कागद सेवेसी दाखल होतील न होतील. यास्तव येथें हैबतराव अदमणे सोनई बबणीचा रहाणार, हा आमचा ओळखी, याचा गुता कर्जावामाचा या प्रांतीं आहे, म्हणोन आला होता त्यास सांगोन हीं पत्रें त्याजवळ देऊन सेवेसीं पाठविलीं आहेत. पत्रांचीं उत्तरें लौकर येत तें झालें पाहिजे. अदमणे यांचीं कुळें आहेत तीं द्यावयास खलेल करितात व कमाविसदार हिमायत करितात. यास्तव ताकीदपत्राविशीं विनंती राजश्री बाबा फडके करतील, त्याप्रमाणें दोन पत्रें द्यावयाची आज्ञा झाली पाहिजे. सरकारचे कार्याचें ठायीं आस्था यांची किमपि नाहीं. अमर्यादाच करितात. सेवेसीं विस्तारें लिहिलें म्हणोन क्षमा असावी. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना. जाबसाल करीत नाहीं म्हणोन

आम्ही रागें भरून उपोषणें केलीं; आणि हुजरेयांणीं पांघुरणें जाळलीं तरी देहावर येऊन निर्गम करावयाचे नाहींत. यास्तव नरमगरम बोलोन आजपावेतों रंगानेंच चालिलों. आतां आज्ञा येईल त्याप्रमाणें करूं. उत्तरें मात्र लौकर येत तें झालें पाहिजे. येथें महर्गता फार आहे हे विज्ञापना.

---

२३३ श्री

( भा. व. २–२५ ) शके १७०७ कार्तिक शुद्ध १

ता. ३–११–१७८५

सेवेसी आपाजी बाबाजी साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसी जे. विनंतीपत्रीं हैबतराव अदमणे यास पाठविलें म्हणोन लिहिलें. परंतु तजविजेनें जासूदजोडीच सेवेसी पाठविली आहे व अदमणेही वाटेकरितां बरोबर दिला आहे. श्रुत होय हे विज्ञापना.

---

२३४ श्री

( भा. व. २– ३२ ) शके १७०७ कार्तिक शुद्ध १५

पो छ १९ मोहरम सीत कार्तिकमास ता. १६–११–१७८५

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेशीं

पोष्य बळवंतराव विष्णु व भवानी नागनाथ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील तागाईत छ १३ माहे मोहरमपर्यंत यथास्थित असे विशेष. स्वामींनीं पत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनार्थ अवगत जाहला. राजश्री मोरोपंत[1] व हुजरे येथून गेल्यास दहा पंधरा दिवस जाहले. लौकरच येऊन पोहचतील. वरकडविशी खातरजमा करावी नलगे. पूर्वी बोलणें जाहलेंच आहे म्हणोन लिहिलें, ऐसियास स्वामीकडून मोरोपंत तिखे व हुजरे आलियावरी त्याची रवानगी इकडून त्याजसमागमें राजश्री बापूजी मोरेश्वर देऊन राजश्री बाळाजीपंत बुंदेले याजकडे करण्यांत आली. अद्याप त्याजकडून कांहीं वर्तमान आलें नाहीं. महमद अमीरखान वरखजई याचा तालुका छपरा व मंडळया समीपता व अखंड माणसें परस्पर येतात जातात त्याजकडील नायब त्यांनीं खानमशारनिल्हेस पत्र लिहिलें. त्याची नकल बजिन्नस पाठविली आहे त्याजवरून ध्यानास येईल व मोरोपंत तिखे कडील पत्र आलियावरी याचीहि विनंती लिहिण्यांत येईल. गडचा प्रकार परम संकटाचा होता. तो श्रीमंत यजमानसाहेबांचे जातीचे जुरतीनेंच वारला, व तेथील बंदोबस्त नव्या शिरानें जाहला. किल्ले नरनाळा येथील होणें बाकीस राहिला. येविशीं गुंतावें तरी विलंब होतील याजकरितां कांहीं लोक तिकडे पाठविले असेत. पर्यायेंकडून घडतां घडेल तें घडो.

---

१ मोरो गोविंद.

सारांश, लक्ष श्रीमंत यजमानसाहेबाचें तेथें जे बोलणीं झालीत त्याजवरी असे; व रवानगी व शिपाई लोकांचा बंदोबस्त होऊन सत्वरच येणें घडत असे. सविस्तर मजकूर यजमान-साहेबीं लिहिला आहे, त्याजवरून विदित होईल. अलीकडे माझे शरीरीं क्षीणता विशेष झाली असे, यास्तव निरोप घेऊन जात असों. वर्तमान सेवेसीं येत जाईल. कृपापत्र येऊन परामृष होत असावा. विशेष काय लिहावें. कृपालोभ असों द्यावा. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.[1]

---

श्री

२३५ शुद्ध १७०८

( भा. व. २. ६ ) सन १७८५

यादी चिमणाजी माणकेश्वर[2] व शिंवराम नाईक.

१ जोंपर्यंत दौलत तोंपर्यंत × × कारभार अक्षय असावा. आमच्या तैनात खर्च बमोजीब करून खेडीं लावून द्यावीं. ७५०० शिवराम नाईक, ७५०० चिमणाजी माणके-श्वर एकूण १५०००.

त्रिंबकराव नारायण यांचे सरंजामपैकीं पंधरा हजारांचे गांव लावून द्यावे. येणेंप्रमाणें [ करार ]

१ हरिपंत तात्या यांची अवकृपा आम्हांवर आहे. ते स्वारीहून आल्यावर पुन्हा अंग घालून घालमेल करितील. आमच्या वाईटपणाच्या गोष्टी सांगतील त्या न ऐकाव्या. येणें-प्रमाणें अभयवचन पुरतेपणें असावें.

सरदारीची घालमेल होणार नाहीं. हरिपंत आल्यावर त्यांचा संतोष तुम्हांवर ऐसें केलें जाईल. येणेंप्रमाणें [ करार ]

---

१ पहा स. मा. रो. भाग १ ले. २४२ व २४५.

२ उपनांव घोटके धायगुडे ऋ. दे. ब्रा.

वंशावळ

माणकेश्वर

- [1]त्रिंबकराव
  - माधवराव द.
- [2]चिमणाजी
  - [3]माणिकराव
  - [4]माधवराव द. दि.
  - [5]रामराव

हे अकलकोटकर भोंसल्यांचे पदरीं नेमलेले होते पहा इ. सं. पे. द. मा. पृ. २० व ११५

१ दोन हजार रुपयांचा गांव शिवराम नाईक यास गंगातीरीं इनाम करून द्यावा.

पैकीं हजार रुपयांचा गांव त्रिंबकराव यांचे सरंजामपैकीं द्यावा येणेंप्रमाणें [ करार ]

१ दौलतींत पूर्वील चार सुष्ट दुष्ट आहेत, त्यास उपयोगास पडेल त्यास ठेवूं. उपयोगी न पडेल त्यास दूर करूं. याविशीं सरकारांत कोणी आल्यास मनांस आणूं नये.

पूर्वील कारभारसंबंधीं कोणाशीं द्वेष असेल तो मनांत आणून गैरवाजवी करूं नये. येणेंप्रमाणें [ करार ]

१ शहाजी भोसले यांजकडे आमचें कर्ज आहे त्यास चार पांच वर्षें झालीं. सावकारीचे रुपये फेर व्याज करून सावकारास द्यावे लागतात. त्यास स्वामींनीं वाजवी कर्जाचा ऐवज पुण्याची जकात जप्त करून ऐवज उगवून सरकारचे नजरेचे ऐवजीं घ्यावा. आम्हांस सावकारापासून मुक्त करावें.

कर्जाविशीं शहाजी भोसले यांस ताकीद होईल. येणेंप्रमाणें [ करार ]

१ अक्कलकोट परगणियांत जमीदारांकडे वगैरे कर्ज आहे, त्यास शहाजी भोसले मागूं देत नाहीं, माणसें उठवून देतात त्यास सरकारांतून कारकून व ढालाईत देऊन जमीदारांचा रुसूम जप्त करून ऐवज देववावा.

खताप्रमाणें ताकीद करून ऐवज देविला जाईल. येणेंप्रमाणें हल्लीं पत्रें व ढालाईत.

१ शिवराम नाईक* यास पुण्यास आणावयाविषयीं उभयतां श्रीमंतांचीं पत्रें रुजू. बापू नानाचीं पत्रें. उत्तम.

१ सोलापूर प्रांतीं आमचें घर आहे, त्यास तेथील फडणिशीची असामी पूर्वीं दिल्ही होती, तिची मध्यें घालमेल होऊन चालत नाहीं. सांप्रत कृपा करून पूर्ववतप्रमाणें असामी द्यावी.

सोलापुरची असामी गुंतली. सदरहूचे मोबदला योजून काढावी. दिल्ही जाईल. येणेंप्रमाणें [ करार ]

१ नासिकांत सरकारचे तोफखानियाची जागा आहे, त्यापैकीं शंभर हात रुंद दोनशें हात लांब घर बांधावयास जागा देववावी.

शंभर हात लांबी रुंदी जागा द्यावी. येणेंप्रमाणें [ करार ]

१ पूर्वीं या दौलतीसंबंधें नजर घेतली आहे. सांप्रत जीवन पाहून ठराव नजर करून द्यावा. त्याप्रमाणें हप्तेबंदी ऐवज घ्यावा, दुसरा हरएक उपद्रव नसावा.

पांच लाख रुपये नजर, यास हप्तेबंदी २५०००० अश्विन शुद्ध १, २५०००० कार्तिक शुद्ध १, एकुण ५००००० पांच लाख येणेंप्रमाणें.

---

* उपनाम भिडे, सावकार.

१ गुदस्तां कारभार झाला ते समयीं दोन हजार रुपये यांचा चौकडा बक्षीस द्याव-याची आज्ञा होती त्यास पावला नाहीं. सांप्रत कारभार होत आहे त्यास दहा हजार रुप-यांचें बक्षीस द्यावें.

चार हजारांचें बक्षीस द्यावें. येणेंप्रमाणें [ करार ]

१ आम्हांस शत्रू बहुत. नानाप्रकारच्या तुफानाच्या गोष्टी सांगतील, आशा दाख-वितील तें ऐकों नये.

गैरवाजवी ऐकणार नाहीं. येणेंप्रमाणें [ करार ]

जंबुसर महालावर सर्व सरदारीची भिस्त. कृपा करून सोडून देवावा.

इंग्रजाकडून सुटल्यानंतर दिल्हा जाईल. किरकोळ सरंजामी आहेत त्याप्रमाणें तुह्मीं सरकारांत वर्तणूक करावी. येणेंप्रमाणें [ करार ]

१ रघुपतराव यांचे कारकीर्दीचा +सरकारचा वगैरे हरएक कोणाचा + + निघा-ल्यास त्याचा गुंता आम्हांकडेस किमपि नाहीं.

सरदारीसंबंधें सावकारी कर्ज वाजवी असेल तें द्यावें; व सरकारचे जाबसाल सरदारी-संबंधें असतील ते त्याचा फडच्या करावा येणेंप्रमाणें.

---

२३६ श्री

( भा. व. २-१७ ) श. १७०७ माघ व. ६

ता. १९-२-१७८६

पुरवणी सेवेसी आपाजी बाबाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. मलोजी गायकवाड याजकडे चाकर आहेत त्यांचे कबिले डबईंत आहेत, ते आमचे हवालीं करवावे, डबई परगण्यांत उपद्रव होईल तो आम्ही भरून देऊं व तोटा येईल तोही देऊं, ऐसें पत्र राजश्री सेनाखासखेल यांचे हुजूरसेवेसीं येईल त्याचें उत्तर देणें; त्यांत आपाजी बाबाजी हुजूर आल्यावर समजोन घेऊन मग करणें तें केलें जाईल ऐसें उत्तर देवावयाची आज्ञा झाली पाहिजे. सालमजकुरीं तों महालांत उपद्रव होऊन नाश होणें तो जाहला. यापुढें हे बंदो-बस्त करून देणार यास्तव विनंती लिहिली आहे. याअन्वयें स्वामीच्या मर्जीस आल्यास उत्तर देवावें. मलोजीकडे किमपि अपराध नसतां त्याचें स्थळ घेतलें. येविशींचें कितेक सविस्तर वृत्त सरकार उपयोगीं या प्रांतीं बहुत आहे तें समक्ष विनंति श्रुत करीन. त्यावरून स्वामीच्याही ध्यानांत येऊन सरकारकाम होईल. त्यावर आज्ञापत्र येईल त्याप्रमाणें वर्तणूक करीन. सेवसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

२३७ श्री श. १७०७ माघ व. ६

( भा. व. २-१६ ) ता. १९-२-१७८६

पौ छ १२ जमादिलावल सन सीत

सेवेसी आपाजी बाबाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति विज्ञापना. तागाईत छ १९ रविलाखर मुकाम लष्कर नजीक डबई येथें गाइकवाडाबरोबर क्षेम असों विशेष. राजश्री फत्तेसिंगराव गाइकवाड सेनाखासखेल सूर्यग्रहणाकरितां रेवास्नान करावयाकरितां बाहेर आले. ते फिरत फिरत मुकाम मजकूरपावेतों आले, त्यांजबरोबर आहों. दोहों चहूं रोजांनीं बडोद्यास जातील. सरकारकामाचा मजकूर तर पेशजीं सेवेसी विनंतीपत्रें लिहिलीं त्याअन्वयें आजपावेतों आहे. निळो कोंडदेव व गमाजी पाटील अद्याप आले नाहीं. नारायण-टेंभीसच आहेत. लौकर कां येत नाहीं हें न कळे. सरकार महालांत गाइकवाड यांचे महालांत मवासी राहून उपद्रव बहुत देत आहेत. येविशीं बहुत वेळां खाशांकडे चिठ्या लिहीत गेलों व सरसुभ्याकडील कारकून नित्य खाशांजवळ सांगतात. परंतु बंदोबस्त करीत नाहीं. याप्रमाणें तीन महिने बोलत गेले व चिठ्याही पाठवीत गेलों. हल्लीं मलोजी[1] गाइकवाड याचें प्राचीन स्थळ सावखेडें आहे तें सेनाखासखेल यांणीं घेऊन त्यास परागंदा केला. तो डोंगरांत जाऊन गाइकवाडाचे अमलांत उपद्रव करितो. सरकारचे महालांत किमपि उपद्रव करीत नाहीं. त्याजकडे डबईंत राहणार तीन चार चाकर बहुत वर्षे आहेत. त्याचे कबिले आमचे हातीं द्यावे येविशीं गाइकवाडाचा बहुत आग्रह आहे. तुम्ही देवीत नाहीं तर आम्ही हुजूर लिहून तुम्हांस पत्र आणवूं ऐसेंही बोलणें आहे. त्यास मवासियांचा उपद्रव सरकार महालांत बहुत होतो. त्यांत किल्ल्यांतून मुलेंमाणसें त्यांचे हवालीं केलीं म्हणजे किल्ल्याचा आब जाऊन सरकारचा केवळ निर्बल पक्ष पडतो. आज आपल्या कामाकरितां डबईपरगण्याचा बंदोबस्त करून देतों ऐसें बोलणें आहे. परंतु पुढें यांत नाश बहुत आहे. यास्तव मुलेंमाणसें आपले हातें हवालीं करावीं हें किल्ल्याचे जाग्यास ठीक नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ या गायकवाडी शाखेस सावखेडेकर म्हणतात. पुढील वंशावळ पहा.—



२३८ श्री श. १७०७ फाल्गुन शु. २
२-३-१७८६ ?

( भा. व. २-१५८ )

सेवेसी आबाजी महादेव मोडक मुक्काम त्रिंबक चरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ १ माहे जमादिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विज्ञापना ऐसी जे. स्वामींनीं दाहावें दिवशीं रविलाखरचें पत्र पाठविलें तेथें आज्ञा कीं, शिवरामनाईक यांची स्त्री व नाइकाकडील कारकून व माणसें व कागदपत्र व कतबेकरीनें जे घेतले असतील ते राजश्री रघुपतराव नारायण राजेबहादर यांजकडील कारकून गोविंद रघुनाथ व आनंदराव कृष्ण यांचे स्वाधीन करावे. त्याजवरून आज्ञेप्रमाणें मशारनिल्हेयांचे स्वाधीन केले. जप्तीस सनगें आलीं होतीं तीं फिरोन देतेसमयीं नाइकांची स्त्री गाठोडेयांत अधिकउणी वस्तवानी कापड वगैरे होती ऐसें नानाप्रकारें कुभांडपणाच्या गोष्टी करित्ये. आम्ही तों जें करणें तें चौकशीनेंच केलें आहे. सुतळीचे तोड्यापर्यंत खातरजमा आहे. चौकशीमुळें सोईरेधाइरे याचे कागदकतबे घेतले व तिजला चौकी बसविली. प्रस्तुत तिचें म्हणणें शेवटास जाऊन ते सर्व एक होऊन तुफानें घेतात. कोणी तिचे निसवतीनें गैरवाका स्वामीस समजावील याकरितां विनंति लिहिली आहे. दुसरा अर्थ दहा पांच हजार पडले तरी खर्च करूं. चौकशीस कारकून आले यांचें पारिपत्य यथासांग करावें, ऐसेंही तिचें बोलणें ऐकण्यांत येतें. राजेबहादर यांजकडील कारकून गोविंद रघुनाथ व आनंदराव कृष्ण यांस ताकीद करून स्वामीचें पत्र आणून कारकून जनस्थानीं होते त्यांजवळ देऊन तेच क्षणीं कारकुनावर व हुजरे यांजवर चौक्या बसवून आटा बंद केला, त्याचा परियाय कोठवर ल्याहावा? कारकुनाची व सरकारचे हुजरे ढालाईत यांची फजिती झाली म्हणोन श्रमी व्हावें तर सेवकपणाचें नातें. कदाचित् जबरदस्ती करून चौकी उठवून लावावी तर त्यांजवळ राउतांचा व गाडदियांचा भरणा. तेव्हां कज्जा होऊन एकादा नाश होणार याकरितां त्यांनीं जसें केलें तसें सोसून स्वामींचे आज्ञेचें लक्ष धरून सर्व त्यांचे जिमेस लावून दिले. पावती-करितां बहुत प्रकारें सांगितलें परंतु त्यांणीं दिली नाहीं. माझे शरिरीं समाधान नव्हतें, याकरितां श्री त्र्यंबकेश्वरीं आलों. त्याचे दुसरे दिवशीं स्वामींचें पत्र आणून देऊन धुंदाई केली. त्याजवर मजला हें वर्तमान कळल्यावर येथून दहापांच माणूस पाठवून कारकून व हुजरे ढालाईत व राजश्री त्रिंबकराव नारायण यांजकडील चौकशीस कारकून मजबराबर होते त्यांसुद्धां घेऊन आलों. याप्रमाणें वर्तमान झालें. राजश्री त्रिंबकराव याजकडील कार-कून चौकशीस मजबराबर आहेत, त्यांस युक्तीनें समागमें घेऊन येणें म्हणोन आज्ञापत्र अलाहिदा आलें. त्याजवरून हुजरे व ढालाईत यांसमागमें राजश्री चिटको जनार्दन यांस सेवेसी रवाना केले आहेत. हे चांगले चौकस लिहिणार सरकारकामाचे उपयोगी ऐसें मजला वाटतें. यास्तव यांचें संरक्षण करून आपले आज्ञेप्रमाणें पाठविले आहेत. राजश्री त्रिंबकराव यांजकडील चाकर नव्हत. राजश्री नारोपंत परांडे यांचे निसबतीचे माहीत,

यास्तव याच कामाचा करार करून पाठविले. दुसरा संबंध नाहीं. सविस्तर वृत्त या कामगिरीचें चिटको जनार्दन व सखोजी भोसले व शिवजी अकगन व ढलाईत सांगतां निवेदन होईल. गुजराथी ब्राह्मण व वाणी यांस हुजूर पाठवणें येविशीचें पत्र राजश्री धोंडो महादेव यांस पाठविलें तें पत्र मशारनिल्हेकडे रवाना करितों. राजेबहादर यांजकडील किल्ले जहागीरसुद्धां सरकारांत घेतले, त्यांचा बंदोबस्त तूर्त हुजुरून केला याप्रमाणें पत्रीं आज्ञा आली. ऐसियास श्री त्रिंबकेश्वरचे खर्चाबद्दल इतलाख ऐवजाची नेमणूक मात्र आहे. ऐन जिन्नस, गल्ला, शाकभाजी व लांकूडफांटे वगैरे जिन्नस खरीदी करावा लागतो. तो बाजार निरखोन ध्यावा लागतो यामुळें नुकसानी होते. किल्ल्याचें काम जहागिरीसुद्धां मजकडे सांगितल्यास खरीदींत वगैरे किफायत करीन. मी पदरचा कुटुंबसुद्धां येथें राहून नेमणुकेप्रमाणें चालावें लागतें. श्रीसांबाचे कामांत अंतर करतां न ये. कुटुंबाचा योगक्षेम चालला पाहिजे, याकरितां कृपाळु होऊन येथील सोईचें हरएखादें काम सांगितलें पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. मी नाशकास चौकशीस येथून गेलों, ते समयीं श्रीत्रिंबकेश्वराचे नेमणुकेपैकीं पांच चार असाम्या नेल्या होत्या त्यांपैकीं बाळोजी कुरोड याचें घर जनस्थानीं आहे, तें आनंदराव कृष्ण व गोविंद रघुनाथ निसबत राजश्री रघुपतराव नारायण यांणीं घर लुटून नेलें. प्यायानें सांगितली चाकरी केली, यांत त्याजकडे अपराध नसतां लुटला गेला याचें काय करावें ? हे विज्ञापना.

---

२३९ श्री

(भा. व. २–२१) श. १७०८. चैत्र शु. १

पौा छ १७ जमादिलाखर सन सीत ता. ३०. ३. १७८६

सेवेसी आपाजी बाबाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना.

तागाईत छ २९ जमादिलावलपावेतों मुकाम बडोदे स्वामीचे कृपेंकरून क्षेम असो विशेष. पेशजी बहादरपुरेयाचे मुकामाहून डबईचे कमाविसदाराचें जासुदाबरोबर पत्र पाठविलें, त्यांत सविस्तर वृत्त सेवेसी श्रुत व्हावें ह्मणोन लिहिलें तें पत्र पावलेंच असेल. त्याअलीकडे राजश्री गमाजी पाटील नारायणटेंभीस कांहीं गुंत्यामुळे राहिलें होते. ते सावखेडेयाचे मुकामीं येऊन राजश्री सेनाखासखेल फत्तेसिंग गायकवाड यांस भेटले. सेवकाचीही भेट जाहली. त्याजवर त्यांचें व खाशांचें तीन चार रोज बोलणें जाहलें. त्याजवर माझी व खासे यांची भेट पाटीलमजकूर यांणीं केली. बोलणें उद्यां बोलूं. त्याजवरून दुसरे रोजीं गेलों. भेट जाहली. त्यांत निश्चय केला कीं, दोहों चहूं रोजांनीं बडोद्यास गेल्यावर तुमचे फडशे करून तुह्मांस मार्गस्थ पाटीलसुद्धां करितों ह्मणोन जाहला. त्याजवरून बडोद्यास दाखल झाल्यास आज पंधरा रोज जाहले. त्यास मुकाममजकुरीं दाखल झाल्यावर चवथे रोजीं भेट जाहली. बोलिले कीं हुताशनी जवळ आली. त्यास हुताशनी करून पंचमी जाहली

ह्मणजे तुमचे कामाचे फडशे करून लौकरच मार्गस्थ करितों. त्यास पंचमीही गेली. परंतु एका दोहों रोजांत बोलणें लागलें. परंतु यादीप्रमाणें फडशे होतां दिसत नाहीं. फौज कांहीं ऐवज देऊन व अमदाबादेबाबत मात्र फडशा करून देतील आणि रवानगी करतील. पाटील मशारनिल्हे यांणीं सांगावयास कमी केली नाहीं, परंतु पूर्वीच विनंतीपत्र पहिलें पाठविलें त्याचप्रमाणें मर्जी आहे. असो; आतां फडशा जितका करून देतील तितका करून घेऊन पाटलास घेऊन येईन. सविस्तर निवेदन करीन. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

२४० श्री

( भा. व. २. १८ ) श. १७०८ चै. शु. १

३०. ३. १७८६

पुरवणी सेवेसी आपाजी बाबाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापणा. गमाजी पाटील आल्यावर झाला मजकूर अलाहिदा पत्रीं लिहिलाच आहे. गमाजी पाटील यांनीं सरकारकामें यादीप्रमाणें करुन देणें याविशीं सांगावयास बाकी ठेविली नाहीं. परंतु खाशांस भय कोणेवेशीं नाहीं. पाटील आल्यावर अलाहिदा पत्रीं लिहिलें आहे त्याअन्वयें बाकी अर्बाची व खमसाचा सालाबादी इतका ऐवज व फौज देऊन रवाना करतील व अमदाबाजेचाही फडशा करून देतील ऐसें वाटतें. वरकड सावळी महाल वगैरे कलमांचा फडशा होतां दिसत नाहीं. कां कीं भय किमपि नाहीं. त्यांत स्वामीस मसलत टिपूची भारी पडली. अलबत एक दोन वर्षें याच मसलतीस लागतील. पुढें शत्रूचें पारपत्य झालें तर बरेंच झालें. मग सर्व कलमांचा फडशा करून देतील, नाहीं तर हैगय हे तो चालतच आहे. आम्हीं युक्तीप्रयुक्तीनें सांगितलें कीं आम्हीं आलों असतां सरकारकामाचे फडशे न करावे, उपेक्षा करावी हें चांगलें नाहीं. शत्रूचें पारपत्य करून स्वारी देशीं लौकरच येईल. तुम्हास शब्द लावितील ऐसें कित्येक प्रकारें सांगणें तें सांगितलें. ऐकोन घेतात, तोंडावर गोडगोड बोलतात. परंतु आचरणांत येत नाहीं. पाटील मजकूर रगडून बोलले म्हणोन चार रोज त्याजवरही रागें होते. सरकारमहालांत मवासी याचे उपद्रव भारी होतात त्यांचा बंदोबस्त अद्याप झाला नाहीं. मजजवळून पत्र मात्र सावखेडेयाचे मुकामीं लिहून मागितलें तें त्यांचे मर्जीस्तव दिलें आहे. परंतु बंदोबस्त अद्याप नाहीं. स्वामीचे मर्जीस आलें तर सेवकास पुरवणीपत्र एक ल्याहावें. त्यांत आज्ञा करावी कीं तुम्हांस जाऊन सा महिने जाहले व गमाजी पाटलास जाऊन चार महिने झाले असता यादीप्रमाणें फडशे करून देत नाहीं, तरी तुम्हीं पत्रदर्शनीं निघोन येणें. स्वारीही श्रीमंतांचे प्रतापें शत्रूचें पारपत्य करून देशीं लौकरच येईल. मग सर्व गोष्टी घडोन येतील. ऐसें दाबाचें पत्र इतक्याच मजकुराचें निराळे आल्यास कांहीं अधिक फडशा पडेल, यास्तव विनंती लिहिली आहे. अज्ञानपणें लिहिलें आहे. रागें न भरावें. मर्जीस येईल तर ल्याहावें आणि सविस्तर भोसले नबाब होळकर अशा चार पांच

टोळ्या केल्या, पारपत्य होईल, ऐसें मजकुराचें निराळें पत्र व फडशे कसकसे करून देतील ते घ्यावे हें लिहिणें. हेंही निराळें पत्र ऐसीं तीन पत्रें तीन तऱ्हेचीं ल्याहावयास आज्ञा झाली पाहिजे. येथूनही आम्हांस निघावयास एक मास लागेल. यास्तव उत्तर लौकर आल्यास कांहीं कामीं पडेल. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

२४१ श्री

(भा. व. २–११६) श. १६९७ फा. व. ८

पो छ १ जमादिलाखर सीत चैत्र ता. २३–३–१७८६

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

पोष्य बाळाजी केशव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति. येथील कुशल तागाईत फाल्गुन वद्य ८ पावेतों स्वामीचे कृपेंकरून यथास्थित असो विशेष. यादागिरीचे स्वारीस तिर्थरूप राजश्री कृष्णाजीनाईक तात्या स्वामीजवळ होते ते समयीं प्रांत जाफराबाद येथील मजकुराविषयीं विज्ञप्ति केली. त्याजवरोन आपण समक्ष सोराबजंग यांस सांगितलें. ते वेळेस राजश्री कृष्णराव जवळच होते. तेव्हां निश्चय झाला कीं, जमीदारास अटकेंत ठेवून फडशा करून घ्यावा. त्याजवरोन अटकेंतच आम्हाजवळ होते. उपरांत महालीं जमीदारांनीं आटोळ्याचे विद्यमानें फडच्या करून आटोळ्याची जातखतें आमचे नांवें करून दिलीं. पुढें जागिरीकडील अमलदार नवा येईल त्याणें आपला अंमल करावा. मागील बाकी आमची आटोळे यांनीं वसूल करावी. बाकीचे वसुलास जागीरदाराचे अमलदारानें दिकत न करावी, याप्रमाणें करार ठरला. हा मजकूर सविस्तर राजश्री गोविंदराव कृष्ण व गोविंदराव पिंगळे यांस पुण्यांत सांगितला. उभयतांनीं मान्य करून जागीरदाराकडील वकील पुण्यास आला होता त्यास ताकीद केली. असें असतां मागती वकिलानें सरकारांत गैरवाका समजावून हल्ला सरकारचीं पत्रें आणलीं की जाफराबाद परगण्याशीं व जमीदाराशीं संबंध नाहीं. तुम्ही मिय्या गुलामहुसेन यासी समजोन घेणें. त्यास महाली जमीदारांनीं आटोळ्याची खातरजमा करून आमचा हवाला आटोळ्याकडोन घेविला. तेव्हां आटोळे याचीं जातखतें आम्हीं लिहून घेतलीं, तेव्हां मिय्याशीं जाबसाल राहिला नाहीं. यास्तव विनंतिपत्र लिहिलें आहे. येविषयीं राजश्री सदाशिव भालचंद्र विनंति करितील. याद आलाहिदा लिहिली आहे, याप्रमाणें ताकीदपत्रें देविणार स्वामी समर्थ आहेत. आम्हास सर्वस्वे स्वामीचरणांचा आश्रय आहे. बहुत काय लिहिणें कृपालोभ असो दीजे हे विज्ञापना.

---

२४२ श्री

( भा. व. २-१४९ ) श. १६९७ फा. व. ८

२४-३-१७८६ ?

सेवेसी विज्ञापना. राजश्री देवराव देशमुख कलबर्गेकर हे स्वामीचे दर्शनास स्वामीकडे आले आहेत. याकरितां विनंती लिहिली आहे. तरी दर्शन घेऊन मशारनिल्हेस निरोप द्यावयास आज्ञा झाली पाहिजे. मजला पंढरपुरास भेटले. त्यांणी आपलें तापत्रय सांगितलें. भावाबंदाचे पेचामुळें नबाबाकडे जात नाहीं. नबाबाची कृपा आहे. यांचें मत यावत्जीव श्रीमंतांचा आश्रय आणि पंढरीस राहावें. त्यास भेटीस येतील. भेट घेऊन निरोप तूर्त पंढरीस राहण्याचा द्यावा. स्वारी येथें आल्यानंतर यांजविशीं विनंती करीन. रवाना छ २३ जमादिलावल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

२४३ श्री

( भा. व. २-१२१ ) श. १६९७ फा. व १०

ता. २५-३-१७८६

पौ। छ २ जजादिलाखर सीत चैत्र

सेवेसी महादाजी नारायण कुंटे साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ २४ जमादिलावलपर्यंत वर्तमान यथास्थित असे विशेष. परगणे नसिराबाद प्रांत खानदेश येथें पुरंदर यांचे लोकांचा व मकाजी भोइटे याचा कजिया होऊन गोळागोळी जाहली. तेव्हां मकाजी भोइटे यांस गोळी लागोन ठार जाहले, येविशींचा बोभाट भोइटे यांणीं सरकारांत विदित केला. त्याजवरून सविस्तर मजकूर श्रीमंत राजश्री हरिपंत तात्यांनीं समजोन घेतला आहे. त्यास हल्लीं भोइटे स्वारींत विनंति करितात ह्मणोन ऐकिलें कीं, राजश्री रघुनाथ गंगाधर नसिराबादकर कमावीसदार यांस हुजूर बोलावून आणून आमचा फडशा करून देविला पाहिजे. त्यास रघुनाथ गंगाधर यांजकडे परगणे नसिराबाद येथील मामलत पुरंदरे यांजकडून आहे. परंतु भोइटे यासी कटकट पुरंदरे यांचे पागेचे लोकांशीं जाहली. त्यांत आगळिक कोणाकडून जाहली असेल तो सरकारचा अपराधी. त्याचा दोष रघुनाथ गंगाधर यांजकडे काय ? हल्लीं रघुनाथपंत परगणे चोपडे येथें जमाबंदी वगैरे कामकाजास आहेत. त्यांस महाली दोन तीन महिने लागतील. याजकरितां भोइटे विनंति करीत असल्यास त्यांस आज्ञा व्हावी कीं, अखेरसालीं रघुनाथ गंगाधर पुणियांत येतील. नंतर मनास-आणून फडशा केला जाईल. तूर्त बोलावूं पाठवावयाचें नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

२४४ श्री

( भा. व. २ अ. दि. १ ) श. १७०८ चै. व. ७

२०. ४. १७८६.

स्वामींचे सेविधानीं हरकार हेमाचल यानें विनंति. बदामीहून दोन कोसांवर आघाडीस सोडून निजामअल्लीखानाचें लष्कर व फडणिसाचें लष्कर पटपकळीजवळ बाचीगुंडाजवळ राहिले आहेत. बदामीस मोर्चे लावावयाचें दिसतें, परंतु गड हस्तगत व्हावयाचा प्रयास वाटतो म्हणून अनमान करतात. हें वर्तमान गजेंद्रगडाचे मागाहून पूर्वी लिहिलेंच आहे. अलीकडे वर्तमान बक्षी बेगमसाहेब निजामअल्लीशीं बोलली कीं मराठ्यांचा विश्वास धरून मोहिमेस निघू नये. आपल्यास गड किल्ले वगैरे राज्य उणें नाहीं. ऐसें पूर्वीच सांगितलें, व याप्रमाणें बोलली. सुराबजंगावर रागें भरली. याकरितां निजामअल्लीखान बोलला कीं, लष्करचा खर्च व विजापूर फडणिसांनीं दिलें नाहीं, व पोलादजंग यांचें लग्न करणें आहे असें फडणिसांस सांगून पाठवून आज सहा कोसाचें कूच करून गेले. निजामअल्लीखान यांनीं फडणिसांस एक हत्ती व घोडा वस्त्रासहित घेऊन पाठविले होते. त्यास फडणीस बोलले कीं आलों तें राजकारण टाकून जाणार, त्यांचीं वस्त्रें कशास पाहिजेत? म्हणून फडणिसांनीं माघारा पाठविलीं. फडणिस हरिपंत फडकेस व अप्पा बळवंतराव व परशराम भाऊस ऐसे अवघे फौजेस नेमून येथें ठेवून आपण पुण्यास जाणार. त्यास हे सरदार म्हणतात कीं, फौजेस नालबंदी नाहीं, फौज कशी राहील असें म्हणतात. फडणिसाबरोबर रास्तेही जाणार. मग आपले हुजरांत येथील वर्तमान कसें पोहोचते? नूरमहमद खान व गयाजमहमदखान म्हणतात कीं, रास्त्यांनीं आपल्यास बराबर चला म्हटल्यास जावें कीं न जावें ऐसें मजला व सदाशिव यास विचारलें. तेव्हां सरकारचाकरीवर असोन लष्करचें खबरी वर्तमान हुजुरांत न पोहचतां पुण्यांत बंदीखानियासारखें कोणत्या कामावर रहावें? हें वर्तमान हुजुरांत अर्जी लिहून हुकूमप्रकारें वर्तणूक करावी हें युक्त आहे असें बोललें. त्याप्रमाणेंच हुजुरांत अर्जी पाठवावी म्हणून गयाजमहंमद याजला सांगितलें. चैत्र वा। ६ चे दिवशीं मराठ्यांचे लष्करची कही गेली. तेथें बुऱ्हानुद्दीनसाहेब याजकडील सरकारची फौज येऊन कहीवाल्यांस घेरून फार लोकांस तोडून कहीची तट्टें व उंटें वगैरे सहाशें नेलीं. याकरितां लष्करांत भय प्राप्त झालें आहे. होळकरांस फडणिसांनीं बोलाविलें, तेही उद्यां परवा येथें येणार. पुढें हे अवघे मिळून येथें छावणी करणार. फडणीस पुण्यास जाणार. बदामीचे किल्ल्यांत जे लोक राहतात त्यांस बंदोबस्तीनें ठेवून सरकारचे कामावर जागृतीनें राहावें म्हणून किल्लेदारास महमदखान याचे नांवें दोन रोजां तीन रोजां कागदपत्र लिहून पाठवीत असतों. कनकगिरि प्रांतांतून बाजीपंत आण्णा माघारा परतून येतात म्हणून बोलतात. निजामअल्लीखान हैद्राबादेस सहा कोसांचें कूच करून गेले. त्यांचे समाजाविशीस हरिपंत फडके व कृष्णराव बल्लाळ गेले आहेत. पुढें जें वर्तमान होईल तें विनंति लिहीत जाईन. रा। चैत्र वा। ७ हे विनंति.

२४५ श्री

(भा. व २ अ. दि. २) श. १७०७ चै. व. ८

२१-४-१७८६

स्वामीचे संनिधानीं

हरकार सदाशिव यानें विनंति. नाना फडणीसाचें शरीर अस्वस्थ होऊन बदामीचे अलीकडे तीन कोसांवर पटपकळीजवळ लष्कर राहिलें आहे. किल्यास मोर्चे लावावयाचें संधान आहे, परंतु अनमान दिसतो. हें वर्तमान पूर्वी चैत्र वा। ७ चें सेवसीं लिहिलेंच आहे. गजेंद्रगडास जात होतों, तेव्हां अर्जी पाठविली ते पावून विदित झालें असेल. अलीकडे झालें तें वर्तमानः—मराठ्यांचें लष्कर नदीपासोन कोणीकडे गेलें हें ल्याहावें म्हणून आपण लिहिलें होतें. बक्षी बेगम निजामअलीखानासीं बोलली कीं, मराठे यांनीं तुम्हास समागमें आणून आपलें कार्य करून घेतात. तुम्हास कांहीं फल नाहीं. दौलत बुडावयाचा डौल आहे, व सोराबजंगास बेगम म्हणाली कीं, ब्राह्मणाचे संगतीस लागून आमचें वचन त्यांजला देऊन आम्हास येथें घेऊन आलेत हें वाईट केलें. याप्रमाणें बोलोन बेगम सोराबजंगावर फार रागें भरली. फडणिसांशीं वचन होतें म्हणून निजामअलीखान यांचे समागमें राहिले. बेगमनें सांगितलें त्यावरून निजामअलीखान याजला राहावयास अनुकूल पडेना. सबब दहा हजार फौज व मोगलअलीस ठेवून जातों असें बोलले. तेव्हां फडणीस म्हणाले कीं, तुम्ही आमचे हुकमांत चालावें. त्यावरून निजामअलीस राग येऊन अवघी फौज व मोगल अलीस ठेवून जातों असे बोलले. तेव्हां फडणीस म्हणाले कीं, तुम्ही आमचे हुकुमांत चालावें. यावरून निजामअलीस राग येऊन अवघी फौज घेऊन माघारा गेले. आज कूच चैत्र वा। ८ केलें. नाना फडणीस पुण्यास जाणार याकरतां डेरे माघारा केले. त्या डेऱ्यांत प्रस्तानास गेले. परंतु फौजेंतच डेरे केले. हरिपंत फडकेस ठेवून जाणार. एक हत्ती व एक घोडा सत्रासहित निजामअलीखान यानें फडणिसास पाठविल. निजामअलीखान माघारा जातात; मग आम्हास हत्ती व घोडा वगैरे नलगे, असें वकिलासीं बोलोन माघारा फिरविले. फडणीस येथें पंधरा दिवस राहून मोर्चे लावून पावसाळ्यांत पुण्यास जाणार, व छावणसि येथें हरिपंत वगैरे राहाणार असें बोलतात. अद्याप निश्चय नाहीं, घटकेस एक मनसुबा करतात. बदामीस मोर्चे लावावयास जागा पाहून आले. अद्याप मोर्चे लावले नाहींत. मोर्चे लावले तर त्याक्षणीं मी विनंति लिहीन. आज वा। ८ लष्करची कही गेली होती. लष्करचे अघाडीस सहा कोसांवर बुऱ्हानसाहेबाकडील स्वार येऊन कहीचे शेंपन्नास माणूस मारून उंटे व घोडीं वगैरे घेऊन गेले. याकरतां हें लष्कर अवघें बेजार झालें. याप्रमाणेंच आणखी दोन चार वेळां गडबड केली तर लष्कर कृष्णापलीकडे जाईल. आतां याचे राजकारण छंदभंग झाला. नूरमहमदखान याचे मनांत व्याकूळ होऊन गयाजमहमद याजला बोलावून विचार केला कीं, फडणिसांबराबर माघारा पुण्यास जावें. अतःपर येथें राहूं नये. एक वेळ

हुजूर जाऊन सर्व निवेदन करून आज्ञेप्रमाणें वर्तणूक करूं, याप्रमाणें गयाजमहमद बोलला. तुम्ही पुण्यास गेले तर लष्करचें वर्तमान हुजुरांत कळणार नाहीं, म्हणून गुलामानें व मुत्सद्दी यांनीं मिळून बोलले हें त्यांनीं मनांत ठेवलें. नूरमहमद व गजाजमहमदखान यांशीं एकचित आहे, म्हणून हा मनसुबा चालावयास प्रयास दिसतो. येथून कनकगिरीचे रोखास फौज गेली होती, त्याचेसमोर सरकारची फौज येऊन लढाई होऊन हे फौज माघारा फिरविली म्हणून लोक बोलतात. माघारा या म्हणून तुकोजी होळकरास फडणिसांनीं लिहून पाठविलें आहे. गयाजमहमद यांची चिटी मी घेऊन बदामीचे आंत घटके घटकेस वर्तमान पावतें करतों.

जालहाल येथें रास्त्यांनीं ठाणें घालून आहेत. त्यासाठीं किल्याचे शिवेचे लोक व इतर गांवचे लोक बागलकोटांत जाऊन राहतात. पटपकल देसाई, जालहालचे देसाई, होसूरकर देसाई इतके येऊन रास्त्यांसीं भेटून फार उमेदवारीनें राहिले आहेत व प्यादे जमा करतात. निजामअलीखान यांस समजाविसीकरतां हरिपंत फडके व कृष्णराव बल्लाळ हे गेले आहेत. पुढें होईल तें विस्तारें विनंति लिहीन. रा चैत्र वा ८.

---

२४६ श्री

( भा. व. २-१५ ) श. १७०८ ज्ये. शु. ५

ता. १-६-१७८६

पुरवणी राजश्री नाना स्वामीचे सेवेसीः

विनंति उपरी चिरंजीव राजश्री बापू नबाबाबरोबर गेले, त्यास एक महिना जाहला. अद्याप येत नाहीं. एकदां पत्रें आलीं होतीं त्याजवर पत्रही नाहीं. येतील. राजश्री हरिपंततात्या यांस फौजेसुद्धां छावणीस ठेवून आम्ही लौकरच येऊं म्हणोन लिहिलें, त्यास ज्यापक्षीं नवाब कूच करून गेले त्यापक्षीं विशेष कांहीं जाबसाल बोलावयाचेही नवाबाकडे राहिले नसतील. चिरंजीव बापू[1] व गोविंदराव यांणीं दोन चार मजली जाऊन तेथून माघारें यावें. आपलीं पत्रें उभयतांस येण्याविषयीं गेलींच असतील. परंतु लांबलें. त्यास उभयतां चिरंजीवांचा कारभार दीर्घसूत्री मोठा. असो. बदामीचा किल्ला फत्ते झाल्याचें वर्तमान नवाबाकडे व उभयतांस आपणांस लिहिलेंच असेल. आणखी उभयतां चिरंजीवांस येण्याविशीं ल्याहावें. राजश्री हरिपंततात्या यांस छावणीस ठेवून बंदोबस्त उत्तम करतीलच. हुजरांत होळकर हे आहेतच. भोसले आहेत, त्यांचें पहावें. परंतु भोसले राहिले तर उत्तमच. मोगलाची फौज रहावी असा करार करून आपण घेतलाच असेल. बरें. हें बदामीचें काम झाल्यानंतर आपणास देशीं येण्यास उजागरी जाहली. आपण ज्यापक्षीं देशास येतात त्यापक्षीं उभयतां

---

१ गोविंदराव बापू काळे व गोविंदराव पिंगळे. पत्र कृष्णराव काळ्याचें. एव्हांपासूनच त्याची प्रकृति क्षीण होऊन तो लवकरच. ता. १३-९-१७८६ रोजीं मृत्यु पावला.

चिरंजीवांस आपणाजवळच आणावा. आमची शरीरप्रकृत दिवसेंदिवस क्षीण होत चालली आहे. अन्न तुटत चाललें आहे. वृद्धापकाळ, उभयतां चिरंजीवांनीं या समयांत जवळ असावें हा हेतु. आपणही लौकरच येतात आहेत. भेट होईल तो दिवस सुदिन. ऋणानुबंध प्रमाण. रवाना छ ४ साबान हे विनंति.

---

२४६ श्री

( भा. व. २–१४ ) पौ छ ६ साबान सीत श. १७०८ ज्ये. शु. ५
ता. १-६-१७८६

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

पोष्य कृष्णराव बल्लाळ साष्टांग नमस्कार विनंति उपरी. येथील कुशल जाणून स्वकीयें कुशल लिहीत असिले पाहिजे विशेष. आपण छ २५ साबानचें पत्र पाठविलें तें पावलें. अक्षत्तृतीयेचे मुहूर्ते किल्ले बदामीस मोर्चेबंदी केली. त्यास किल्ला बहुत बाका व खंदक पंधरा वीस हात खोल व रुंद फार, रेवण भारी याजमुळें तोफांची मारगिरी लागू न होय. किल्लेकरी यांणी जवामर्दी करून पंधरा वीस दिवस किल्ला लढाविला. तोफांचे मारगिरीनें रणमंडळचा बुरूज व कंबरठ्याचा बुरूज पाडोन त्यांची मारगीर बंद केली. छ २१ रजबीं हल्ला केला. ते समयीं चार सहा घटिका किल्लेकरी चांगले लढले. परंतु सर्वांचा एक लगट होऊन पेठ व कंबरग्याचा बुरूज घेतला. उपरांत किल्ल्याचा दरवाजा जाळिला, ते वेळेस माणूस बहुत जखमी व ठार झालें. तेव्हां किल्लेकरी यांणीं कौल मागितला. त्यावरून कौल देऊन छ २२ रजबीं सरकारचें निशाण किल्ल्यावर चढविलें. किल्ल्यांत सरंजाम पोख्त व लोकांचा भरणा भारी व किल्ला मजबूद, परंतु श्रीमंतांचे पुण्येंकरून हस्तगत जाहला, म्हणोन विस्तारें लिहिलें. त्यास नबाब गेल्यानंतर आपण हिंमत बांधून हें काम केलें. त्याजवरून आपलें तेज चांगलेंच राहिलें. नबाबासही थोडेसें कळलें आणि शत्रूवरही दाब. परंतु एक्याच कामावर माणूस फार जायां जाहलें. पुढें कामें फार करणें, तेव्हां माणूस इतकें जाया होऊं नये. टिपूची मसलत तमाम होण्यास दों चहूं वर्षांचा बेत आहेच. त्यापक्षीं माणूस बहुत जायां न होतां काम होईल तसें करावें. दौलतींत माणूस असल्यानंतर तीच दौलत. हें सर्व आपणांस कळतच आहे. आपणही तसाच बंदोबस्त करतील. फौजांस पोट भरावयास जागा कर्नाटक खेरीजकरून कोठें राहिला नाहीं. रवाना छ ४ साबान. बहुत काय लिहिणें ? लोभ असों दीजे हे विनंति.

---

२४८ श्री

( भा. ब. २-८७ ) श. १७०८ ज्ये. व. ११

ता. २२-६-१७८६

सेवेसी विज्ञापना. बाकी विरूपाक्षाचे देवालयास टिपूनें उपसर्ग लाविला आहे व आदवनचा किल्लाही पाडून बरोबर जमीनदोस्त केला व कंचनगुड वगैरे ठाणी अगोदर घेतलीं होतीं तीं पाडून बरोबर केलीं. तुंगभद्रेपलीकडे अंमल त्याचा झाला आहे. तो बल्लारीस छावणीस गेला. आपल्याकडील लोकांस नवाब महाबतजंग[1] यांनीं दहा लाख रुपये कबूल केले. आपले सरदार यांची मर्जी होती कीं छावणी करावी. परंतु मोंगलाकडील सरदार मुशरलमुल्क व तेगजंग व शर्फदौला वगैरे पहिलेंही लढाईस आले नाहीं, व छावणीचा मजकूर यांचे ध्यानास न येतां नबाब महाबतजंग बसालतजंगाचा मुलगा यास कबिलसुद्धां पुढें घालून आणिलें ते रायचूरच्या किल्ल्यांत राहिले आहेत. तेथें लोकांस दंड लाविले आहेत. सेवक लष्करांत राजश्री तात्यापाशीं आहे. महर्गता सात शेर आठ शेर धान्य झालें आहे. आज्ञा येईल त्याप्रमाणें वर्तणूक करीन. चार जासूदजोडी तैनातीपैकीं एक जोडी वाटेंत मारली गेली. एक मात्र आहे. शिवजी जासूदजोडी पाठविला आहे. त्यांचे रोजमरे देऊन आज्ञापत्रें सेवकास लवकर पाठवून यावीं. सेवकास रोजमरा मर्जीस येईल तो नेमून पाठवावा व खर्चाची अडचण फार आहे. समागमें कुटुंब आहे. सर्व बापूजी नारायण विनंति करितां विदित होईल. सेवेसी श्रुत होय हें विज्ञापि.

---

२४९ श्री

( भा. व. २-७ ) श. १७०८ आषाढ ब. १४

ता. २४-७-१७८६

श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामीचे सेवेसी

विनंति सेवक केसो भिकाजी दातार* कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २७ रमजानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. छ ७ रमजानचें आज्ञापत्र सादर झालें तें छ १३ गुरुवारीं मिनहूस पावलें. पत्रीं आज्ञा कीं, बदामी किल्ला घेतल्याचें वर्तमान पेशजीं लिहून पत्र अहिल्याबाई होळकर यांस पाठविलें, त्याचें उत्तर आलें नाहीं. याउपरीं आम्ही तेथील बंदोबस्त करून राजश्री हरिपंततात्यासमागमें फौज

---

[1] बसालतजंगाचा मुलगा, पहा राजवाडे खं. १० २८४; पारसनीसकृत ग्वा. प.२. १८६.

*अहल्याबाईजवळ पेशव्यांचा वकील. पहा इ. सं. मं. द. बातमीपत्रें.

व तोफखाना वगैरे सरंजाम देऊन कर्नाटक प्रांतीं छावणीस ठेविलें. त्यांणीं गजेंद्रगड घ्यावयास किलयाजवळ जाऊन मुकाम केला. तेव्हां किलेकरी यांणीं दहशद खाली. लढल्यानें परिणाम नाहीं, मारले जातों, असें जाणून मोठे आजिजीनीं कौल मागितला. त्याजवरून कौल देऊन किलेकरी खालीं उतरून छ २२ साबानीं सरकारचें निशाण चढविलें. किल्ला फत्ते झाला. येविशीचें वर्तमान व राजश्री तुकोजी होळकर सुभेदार यांस छावणीस ठेविलें, त्यांच्या खर्चाची सरबरा व्हावी, म्हणोन अहिल्याबाईस पत्र पाठविलें आहे. तें प्रविष्ट करून सुभेदार यांस खर्चाचे बेगमीविशीं वारंवार टवचण लावून सरबराई होय तें करणें म्हणोन आज्ञा. त्यास गजेंद्रगड किल्ला फत्ते झालियाचें वर्तमान ऐकोन बहुत बहुत संतोष झाला. श्रीमंतांच्या प्रतापेंकरून दिवसेंदिवस शत्रूचें पारिपत्यच होईल, हें संतोषयुक्त पत्रें घेऊन बाईकडे गेलों. पत्रें आलीं म्हणोन सांगितलें. गुरुवारीं एकादशी, ते दिवशीं पत्रें आलीं. ते दिवशीं त्यास मौन, परंतु वर्तमान जाऊन सांगितलें. संतोष पावली. मग रात्रीं मौन विसर्जन झालें, ते समयीं लखोटा व जिन्नस नेऊन दिल्हा. पत्रें अक्षरशा वाचून मुत्सद्दी यांणी दाखविलीं. त्याउपरी श्रीमंतांच्या प्रतापाचें वर्णन व स्वामीकडील सावधतेचा व मेहनतीचा स्तुतिवाद बहुत केला. दुसरे दिवशीं राजश्री सुभेदार यांजकडील खर्चाची सरबरा व्हावी म्हणोन विचारिलें. त्यास ऐवज येथून रवाना करितात येविषयीं राजश्री सुभेदारांस पत्रें बाईनीं पाठविलीं कीं, हुंडणावळ पुण्याची दरसदे १२ प्रमाणें झालीं आहे. पुण्याहून लष्करची हुंडी करावी तर हुंडणावळ जास्त पडती. येथून लष्करची हुंडी होत नाहीं. यास्तव स्वार व उंटें पुण्यास पाठवावीं. इकडे उत्तर पाठवावें म्हणजे ऐवज पुण्यास रवाना करूं, अशीं पत्रें गेलीं आहेत. त्यांची प्रतीक्षा उत्तर आलें म्हणजे ऐवज रवाना होईल. तूर्त तीन लक्ष रुपयेपावेतों भरणा करितात. अधिक ऐवज जाऊं द्यावा, छावणीचा विचार, तीन लक्ष किती दिवस पुरवील, पुढें तजवीज असावी म्हणून बोलणें झालें. उत्तर दिल्हे कीं या प्रसंगीं सलामी पडणार नाहीं असें बोलली. तेव्हां या ऐवजाची रवानगी झालियावर मागती स्मरण देत जाऊं. येविशींचें पत्र बाईनीं सेवेसीं लिहिलें असे. बदामी किल्ला घेतल्याचीं पत्रें व खर्चाविशीं पत्रें आलीं, त्यांचीं उत्तरें बाईची घेऊन छ ३ रमजानी कासदजोडी रवाना केली ती पोहचली असेल. फत्तेअलीखां टिपूचें नांव हें इकडे ठाऊक नाहीं. पत्रीं लिहिलें होतें कीं, टिपूनें तीन हल्ला केल्या त्या महाबतजंगांनी मारून काढल्या. नंतर सरकारचे फौजेशीं लढाई झाली, बक्षी पाडाव आला व घोडे पाडाव आले, व माणसें जखमी व जायां झालीं. टिपूनें सरकारचे फौजेची दहशत खाऊन झाडीचे आश्रयानें गेला. मोर्चे आदवानीचे उठवून गेला. हें खरें वर्तमान. यांत गुंता नाहीं. परंतु अल्प मतीचे बोलणारे कितेकांशीं बोलणें झालें. शेवटीं खासा टिपू आला हेंच खरें केलें. श्रीमंतांचा प्रताप श्रीमारुतीकृपें अपार आहे. चांगलें शत्रूचें पारपत्य झालें म्हणजे मारुतीचा नवस फेडणार महाराज समर्थ आहेत. मी शुभचिंतनी अहर्निशी आहे. राजश्री

कृष्णाजी पवार यांजकडील कमाविसदार देवासेकर यांणीं सेवेसी पत्र लिहिलें तें बजिन्नस पाठविलें आहे. त्यांकडील उत्तराची आज्ञा व्हावी. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

२५०                                   श्री

( भा. व. २-८९ )                                          श. १७०८ श्रा. शु. २

ता. २७-७-१७८६

पुरवणी श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींस विज्ञापना. सावनुराहून कूच करून पाराजीपंत इकडे आल्यावर दादा तेथेंच होतें. बुराणुद्दीन कलघटगीवर छावणीचा बेत करून राहिला. बतेऱ्या केल्या आहेत. बंदोबस्तानें फार सावध रहातो. नित्य अस्तमानसमयीं एक तोफ होत असते. तलाव्यास त्याजकडील स्वार फिरत असतात. अलीकडे दादा सावनुराहून कूच करून हुबळीपासून तीन कोसांवर आले. दोन्ही फौजा एकत्र होऊन शत्रुचें पारपत्य करावें हें चांगले जाणून पाराजीपंत हुबळीहून सडे महादाजीपंतास बरोबर घेऊन दादाकडे चार कोस जाऊन एक रात्र त्यांजजवळ राहून हुबळीस त्यांचा मुक्काम आणिला. बेहटीवर सुभेदारांचा मुक्काम होता, त्यांसही हुबळीस आणिलें. दोन्ही फौजा एकत्र झाल्या. इतक्यावर लवकरच कूच करून बुणगें मागें टाकून सड्या फौजा मिश्रीकोटथावर मुक्कामास जाणार. तूर्त दादांचे शरीरास समाधान नाहीं. उरांत वायूची कळ निघाली आहे व खोकला लागला आहे. बापू होळकर कस्त करून शत्रूचें पारपत्य करीन म्हणतात. त्यांस दोन नारू झाले आहेत. लवकरच आराम उभयतांस होईल. कमडोलीचें मुक्कामीं छ २३ रमजानी बुराणुद्दीनाकडील पेंढारी यांनीं रानांतून तोफांचे बैल नेले. तेच दिवशीं मुद्दलचे वगैरे बैल आणवून तोफखान्याकडे दिले. दुसरे दिवशीं होळकराकडील पेंढारियाची व शत्रूकडील स्वारांची मिश्रीकोटथाजवळ गांठ पडली, तेव्हां तीस घोडीं त्याजकडील पाडाव आणिली. त्याजवर काल छ २९ रमजानी आणखी सात घोडीं आपले पेंढारी यांनीं आणिलीं. सोंद्यांकडून दोन हजार बार व दोन हजार कानडे प्यादे व पांचशें स्वार घेऊन झाडीच आश्रयानें सोंदेकर किल्लेदार येऊन कितूरचे मार्गें हल्याळ सांबराणी सावनूरचे गांव घेऊन ठाणें घातलें. सांप्रत तेगुरास तोफा लाविल्या आहेत. बुराणुद्दीन कलघटगीवर आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.[1]

---

[1] पत्र १ सवालचें परशुरामभाऊचें असावें. दादा म्हणजे रघुनाथराव पटवर्धन. पाराजीपंत हा होळकराचा सरदार. पहा खरे ले. २९९०

श्री

२५१

(भा. व २-९३)

श. १७०८ श्रा. शु. ४

ता. २९-७-१७८६

पौ छ २१ सवाल सबा समानीन

सेवेसी गोमाजी अनंत चरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विनंति विज्ञापना. तागाईत छ ३ सवाल मुक्काम लष्करनजीक हुबळी स्वामीचे कृपाकटाक्षें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. चार पत्रें पुण्यास पाठविलीं तीं प्रविष्ट जाहलींच असतील. इकडील वर्तमान रायर हुबळी येथील ठाणें हसनखान तरीन व होळकर याचें आहे. तीनशें कानडे प्यादे हसनखान याचे आहेत. त्यांपैकीं शंभर दूर करून दोनशें ठेवावे असें सांगितलें आहे. व होळकर याजकडील पलटणचीं माणसें तीनशें आहेत. त्यांपैकीं शंभर काढून दोनशें ठेव-णार. ठाणेंमजकूरचीं खेडीं लुटलीं गेलीं. कसबा मात्र जगला आहे. घासदाणा बारा हजार-परियंत करावा असें सर्वांचें विचारें होतें. परंतु हसनखान याचे विद्यमानें पाराजीपंत बाबांनीं दरबारखर्चसुद्धां तीस हजार रुपये ठरले. वसूल चालविला. हसनखान याची दस्तगिरी होऊन स्थापना केली. मुसलमान होऊन नेला आहे. रयत रजावंद त्यास आहे म्हणोन त्याणें कबूल केलें. तीस हजार रुपये रयत व जमीदार यांनीं कबूल करून वसूल देत आहेत. नवी हुबळी पेठेचा गांव उदमी फार आहेत. ठाणें परशराम रामचंद्र परांजपे यांजकडे आहे. घांसदाणा जीवनमाफक करावा असें सर्वांचें मानस. परंतु जुने हुबळीचे दुप्पट नवे हुबळीचें करावें असें बोलणें पाराजीपंतबाबांचें होतें. अद्याप ठरलें नाहीं. चाळीस हजारपरियंत होईल. द्याही महालचीं गांवखेडीं लुटलीं आहेत. एक दोन गांव व कसबा जगला आहे. परगणे कुंदगोळ येथें ठाणें होळकराकडील आहे. शंभर माणूस पलटणचें आहे. घांसदाणा पाराजीपंत यांनीं चोवीस हजार रुपये केला होता. मागतीं आठ दिवशीं चढ सहा हजार करून तीस हजार शिवाय शिबंदी केले. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

श्री

२५२

(भा. व. २-९०)

श. १७०८ आषाढ

माहे जुलई स. १७८६*

पुरवणी श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामीस विज्ञापना. परगणे मुलगुंद येथील सात हजार घांसदाणा चुकोती झाली होती. त्याजवर दहा हजार रुपये दुसरा गृहस्थ बोलत आहे. लक्ष्मेश्वर पंधरा हजार चुकोती झाली आहे. त्याजवरही पंधरा वीस हजारपरियंत चढ बोलत आहे. शिरहट्टीकर संस्थानिक कृष्णाजी नाईक कलकीरी याजपाशीं बोलीस तास-गांवाकडे आहे. त्याजकडील बोलणार फकीर, स्वामी, जंगम व धोंडर्जी वाघ व चेनवीर-

* पहा खरे ले. ३००८ व ३०१३.

अप्पा व रामराव रघुपतराव हे एकत्र होऊन बोलतात कीं, पूर्ववत् संस्थानिकाची स्थापना सरकारांतून करार करून यावयाचें करावें. शिरहट्टी ठाणें घेतों. सरकारची नजर देऊं. तालुके सुद्धां संस्थान चालवावें म्हणोन बोलतात. उभयतां सरदारांसही विदित केलें. स्वामीची आज्ञा येईल त्याप्रमाणें उभयतां सरदार करतील. उत्तर यावयाची आज्ञा व्हावी. हे विज्ञापना. हरपणहल्लीकर संस्थानिक यांजकडून पत्र आलें. गलगनाथावर तुंगभद्रेस दोनशें टोकरे जमा केले. आणखी करवीत आहे. हरपणहल्ली गलगनाथापासून तुंगभद्रापार आठ कोस आहे. तेथें टिपू येणार. सावनुरावर शह दाखवून दाब घालून टोकरे जमा करीत आहे. सोंदे येथील किल्लेदार हजार बार व कानडे प्यादे मिळोन तीन हजार जमाव घेऊन कितुराजवळ झाडीचे आश्रयानें आले. हल्याळ व सांबराणी दोन्हीं ठाणीं घातलीं. तेगुरास तोफा लावल्या आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

२५३ श्री

( भा. व. २–८८ ) श. १७०८ श्रा. शु. १५

ता. ९-८-१७८६

पौ छ २१ सवाल सबा समानीन

श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसी

विनंति सेवक रामचंद्र कृष्ण रिसबूड कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरी. येथील कुशल तागाईत छ १४ माहे सवाल मुक्काम भोगापूरनजीक मुदगल तीन कोस दरलष्कर श्रीमंत पंतप्रधान जाणोन स्वामींनीं निजानंदवैभवलेखन आज्ञा केली पाहिजे विशेष. सेवकाचें वर्तमान तरी स्वामीचे प्रतापें सेवक कुटुंबसाहित आदवानीचे किल्ल्यांतून नबाब महाबतजंग मेलाबायेल (?) निघून तुंगभद्रा उतरली. यानंतर विनंति केली होती. नबाब महाबतजंग रायचुरास गेले. सेवक राजश्री हरिपंततात्याजवळ कुटुंबसहित लष्करांत आलों आहे. राजश्री तात्यांनीं आज्ञा केली आहे कीं, माणसें कोलारास तूर्त ठेवून तुम्ही येथें राहणें. सेवक लष्करांत आहे. यास आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक करीन. प्रसंगानुसार तूर्त रोजमरियाची आज्ञा जे मर्जीस येईल ते झाली पाहिजे. नबाब महाबतजंग अद्यापि रायचुरीं आहेत. रायचुरांत हल्लीं रयतेस व खेमकर्ण कारभारी आहेत त्यांस दंड बांधला आहे. एक जोडी व कारकून तेथें ठेवला आहे. सेवकाचें कर्ज आनागोंदीकराकडे येणें आहे व एक गांव इनाम मागें दिला असतां शत्रूचें प्रबल झालें असतां तेंही घेतलें आहे. त्यास एक पत्र राजश्री हरिपंततात्यास सादर झालें पाहिजे व सेवकानें विनंति केली आहे. पुढें सेवकास काय आज्ञा येईल त्याप्रमाणें वर्तणूक करीन. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

२५४ श्री

( भा. व. २-९१ ) श. १७०८

पावसाळा स. १७८६

पुरवणी श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामीस विज्ञापना. धारवाड येथें ब्राह्मण आजपर्यंत सूत्राचे कामास आहेत. सांप्रत शंकरभट यांस आंत रवाना केलें. जाऊन किल्लेदारास भेटून कामाचा मजकूर बोलले. त्यांनीं आपल्याकडील नाईक यांस लष्करांत पाठविलें व श्रीमंत राजश्री गणेशपंतदादास व सेवकास पत्र पाठविलें. दादांचें पत्र दादांस प्रविष्ट करून नाइकाची भेट केली व सुभेदारासही भेटविलें. गृहस्थांस सुभेदारांनीं वस्त्रें देऊन बहुमान करून खातरजमा केली. सेवकास पत्र आलें त्याची नक्कल पाठविली आहे. किल्लेदार मनःपूर्वक सरकार लक्षांत आहे. सांप्रत वोली न्यावयाच्या त्याकरतां नऊ माणसें येऊन बाहेर चवक्या बंदोबस्त झाला आहे. त्यामुळें सध्यानेंच काम आठ पंधरा दिवस लांबणीवर पडिलें. परंतु नऊ माणसें लवकरच काढून देऊन किल्ल्यांतील माणसें बाहेर ठेवणार. बंदोबस्त पदरचे रुपये खर्चून कार्यसिद्धि करितों म्हणोन आंतील गृहस्थाचें बोलणें आहे. त्याचा इतबारी रामसिंग कुमंदान आठ दिवसांत तेथील काम ठीक करून येथील वचनें घेऊन संकेत करून ध्यावयास येणार. या प्रांतांतील तमाम जमीनदार वोली आहेत त्या काढून नेणार. यास्तव जमीनदारांनीं आपलाले जमाव प्यादे धारवाडाभोंवताले कोसाचे अंतरानें चवक्या दिल्या आहेत, व सरकारच्या फौजा वोलीचे उपराळ्यास तलाव्यास जात असतात. पाऊसझड रात्रंदिवस लागली आहे. वैरण मिळत नाहीं. ओली गवतें खुरपाव आणून चारितात. वोली जाऊं देऊं नयेत. धारवाडापासून कोसावर नेहमीं फौज ठेवावी. वोली जाऊं लागल्यास जाऊं देऊं नयेत. सोडवून आणावे. पंचवीस हजार रुपये फौजेचे खर्चास समस्त जमीनदार मिळून देऊं. बेशर्थ कामनिशा जमीदार देतात. अद्याप ठरलें नाहीं. मिश्रीकोटयाचें सूत्र धारवाडकराकडून ठाणें सरकारांत आयास न पडूं देतां द्यावें असें बोलणें झालें आहे. एका दो दिवसांत हेंही होईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

२५५ श्री

( भा. व. २-११५ ) श. १७०८ भाद्र. व. १४

ता. २१-९-१७८६

राजश्री बाळाजीपंत नाना गोसावी यांस

सकलगुणालंकरण अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित दौलतराव हिंदुराव घोरपडे दंडवत विनंति उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे विशेष. चिरंजीव राजश्री बहिरजीबाबा यांस आपणाजवळ पाठविलें. भेटी जाहल्या. आज सहा महिने गुदरले. सेवा करावी ही इच्छा धरून आज्ञेची प्रतीक्षा करीत आहेत. आमचें

सारें वृत्त पूर्वापर्य आपणास विदित, घरोबेंतील प्रकार, असे असतां हा कालवर खर्चवेचांचा बंदोबस्त करून देऊन सेवा घेत नाहीं हेंच अपूर्व. पहिलेपासून आमचा प्रवर्त एक-निष्ठतेचा. तसीच आपलीही ममता. त्यांत भविष्यानुसार सुखदुःख अनुभवणें प्राप्त. कोठवर श्रम सोसावे. याअर्थे आपले चिरंजीव आपणास पावले. नांवलौकिक आपला, आमचा अभिमान पुर्तेपणें असावा. एक मानाची इच्छा आहे तो मान आपला असें जाणोन कृपा करावी. रवाना छ २७ माहे जिल्काद. बहुत काय लिहिणें? लोभ करावा हे विनंति.

---

२५६ श्री

(भा. व. २-११) श. १७०८ आश्विन व. १४
ता. २०-१०-१७८६

पौ छ १० मोहरम

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी. पोष्य बळवंतराव विष्णु व भवानी नागनाथ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागाईत छ २७ माहे जिल्हेज मुक्काम किल्ले गावलगड येथें स्वामीचे कृपेंकडून वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामींनीं पत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. लिहिला अभिप्राय कळों आला. राजश्री मोरोपंत व खिजमतगार पत्रें देऊन रवाना केले आहेत, येऊन पोहचतील. राजश्री विसाजीपंत यांशीं बोलणें जाहलें आहे. सांगतां कळेल. सर्व काळजी धुरंधर बाळगितात तेव्हां विशेष काय त्याहावयाचें आहे म्हणोन लिहिलें. ऐशियास स्वामीचें लिहिणें यथार्थ व सर्वस्वें काळजी श्रीमंत यजमान-साहेबांस तिकडील प्रकरणीं आहे, दुसरा अर्थ नाहीं. आपणापासून बिदा झालियावरी लांब लांब मजलीनें वराडांत सरकारचें येणें जाहलें. सामोपचारें यावयाविशीं किल्लेवाल्यास बोला-विलें. त्याची नियत बदली, कोणे प्रकारें न येई. त्याचा आक्षेप कीं, श्रीमंत साहेबींच जुजबी लोकांनिशीं किल्ल्यावरच यावें, याजवेगळा दुसरा आग्रहच नाहीं. जर विलंबावर टाकावें तरी पुढील मसलतीस पायबंद बसतील. याजकरितां खुद्द जातीनेंच साहेबांनीं जुरत करून जुजबी लोकांनिशीं किल्ल्याजवळ गेले. किल्लेदार व संतोखसिंग आपले जमावानिशीं आला. भेटीचे प्रसंगीं खुद्द जातीनेंच त्याचें मनगट धरून आपलेजवळ बसविलें. श्रीमंत राजश्री बापूसाहेब व श्रीमंत चिमणाबापूसाहेब अनुक्रमें पूर्वील संकेताप्रमाणें आले व लोकांचाहि जमाव आला. त्या उपरी दुसरे दरवाजाचा व आलंगीचा वगैरे कुल बंदोबस्त केला. याविषयीं श्रीमंत साहेबीं संक्षेपें स्वामीस व विस्तारें श्रीमंत मनाबापूसाहेब यांसी लिहिला आहे, त्याजवरून ध्यानास येईल. या प्रसंगीं या किल्ल्याची फत्ते नवे शिरानें खुद्द जातीचेच जुरतीनें झाली. याची मुबारकवादी तिकडून व्हावी. मोरोपंत तिखे व खिजमतगार व इकडून राजश्री बापूजी मोरे स्वार समागमें देऊन राजश्री बाळाजीपंत यांजकडे पाठविले आहेत. परंतु पल्ला लांब कदाचित् भवति न भवति त्यांजकडून जाहल्यास प्रांताचा वसूल बिलकूल

त्यांजकडे जाईल, येविशीं विनंति ल्याहावी ऐसें नाहीं. सर्व अर्थ स्वामीचे ध्यानांत आहेत. तिकडून जे प्रकार अंमल दखल बसवावयाविशीं घडावयाचे ते घडतील. मुख्य किल्याचे कामाच्या बखेडा होऊन हे मसलत सख्त पडली होती. सांप्रत श्रीकृपेनें बंदोबस्त झाला व कांहीं जूंज आहे तोही होईल. याउपर संस्थान व फौजेचा बंदोबस्त होऊन श्रीमंत यजमानसाहेब लवकरीच तिकडे येत आहेत. यजमानसाहेबांचें सर्व लक्ष स्वामीकडे व मसलतीवर असे. विशेष काय लिहिणें कृपा लोभ असों द्यावा हे विज्ञापना.

---

२५७ श्री

( भा. व. २-१०५ )

श. १७०८ का. व. ५
ता. १०-११-१७८६

पौ छ. ३० मोहरम सन सबा समानीन मार्गशीर्षमास.

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीः—

विनंति सेवक आनंदराव भिकाजी फडके कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ १८ मोहरमपावेतों स्वामीकृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. पूर्वी पत्र सेवेसी लिहिलें त्याचें उत्तर द्यावयाची आज्ञा असावी. परगणे बलसाड येथील बंदोबस्ताविशीं गायकवाड यांस सरकारची पत्रें पाठविलीं तीं पावलीं. बलसाडेस कारकुनाकडे रवाना केलीं. तेथून गायकवाड यांजकडे रवाना होऊन बंदोबस्तांत येईल तें सेवेसी लिहीन. अलीकडे परस्परें ऐकितों कीं, वसई प्रांताची घालमेल स्वामी करणार. ऐशास सेवकाचा हेत आहे हें स्वामीस समजलेंच आहे. मी समक्ष विनंति करावी तर संकोच वाटतो. सन सलासांत गेरीचे (= बंडाव्याचे) दिवसांत राजश्री भिकाजीपंत सुभेदार यांस व सेवकास काम सांगितलें, ते समयीं पुढें उर्जित व्हावें म्हणोन आशेनेंच सुभेदारांनीं केलें. पुढें प्रांत सरकारांत आला ते समयीं आमचा दैवयोग न पडला. अस्तु. परंतु प्रांत सरकारांत आल्यावर काम धणी मजकडेच सांगतील ही सर्वांस आशा. म्हणोन मुंबईकर रयत व सावकार भेटून कौल घेतले कीं, आम्ही उठोन वसईस येतों. नंतर काम मजकडून दूर झालें तेव्हां तो विचार अवघाच राहिला. हल्लीं गुजराथ प्रांतांतील महाल सेवकाकडे आहे. तेथील आबादी धन्याचे पुण्यें कशी आहे, बाहेरील घेणें वगैरे येथील रयत नवी येऊन आबाद झाली न झाली हें सर्व विदितच असेल. मीं ल्याहावेंसें नाहीं. वसई प्रांताची देशमुखी सेवकाकडे आहे. त्याचे बंदोबस्तास कारकून ठेविला आहे. कालानरूप बंदोबस्त घडेल तितका करितों. त्याची हळहळ ती काय? मी प्रतिवर्षी पुणियास येतों ते समयीं मनांतील विचार करितों कीं, धन्याशीं भांडावें. परंतु भेट झाल्यावर संकोच बहुत पडतो. स्वामीचे ध्यानांतच असेल. मजसारखे सेवक स्वामीचे पदरीं बहुतच आहेत. हेत हाच कीं, स्वामीजवळ सेवा आयुर्दा आहे तोंपर्यंत एकनिष्ठपणेंच करावी. पतिव्रताधर्म तर जन्म अन्य-

गृहीं होतो, परंतु कुलीण जी असते ती भ्रताराबरोबरच गत घेते. स्वामीविना दैवत मला दुसरें नाहीं. आपण बाहे धरिली आहे तों सर्व यथास्थित आहे. या समयीं अमर्यादा करून विनंति लिहिली कीं, स्वामींनीं रोषयुक्त व्हावें आणि सेवकाचें शासन करावें. मी शासनायोग्यच आहें. विस्तारें काय लिहूं. वसई प्रांताची घालमेल करावी ऐसेंच असल्यास पूर्वीप्रमाणें उभयतां सेवकाकडे मर्जी असल्यास काम सांगावें. पैक्याची अडचण स्वामीचे प्रतापें पडणार नाहीं. राजश्री भिकाजीपंत सुभेदार पुणियास आलेच असतील. नसले आले तर येतील. विनंतीचें अवलोकन यथास्थित होऊन स्वामीचे हातचें पत्र सेवकास येईल तेव्हां सेवकाचे चित्ताची स्थिरता घडेल. हेत हाच कीं, स्वामींनीं कामकाज सांगावें आणि मजपासून एकनिष्ठपणें घडावें. हा हेतु पूर्ण करणार स्वामी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

२५८ श्री

श. १७०८ पौष व. ५

(भा. व २-१० ) ता. ८-१-१७८७

पौ छ २ रबिलाखर सबा समानीन माघमास.

श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामीचे सेवेसी:—

विनंति सेवक नरसिंगराव नारायणें दोनी कर जोडून साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसी जे, येथील क्षेम तागाईत छ १७ रबिलावल मुक्काम लष्करनजीक बहादरबांडा चार कोस येथें धन्याच्या कृपेंकरून श्रीमंत राजश्री तात्या यांपाशीं सडे स्वारींत सुखरूप आहें. बिशेष. बदामीच्या मुक्कामाहून गणेशपंत बेहरे यांजकडे आज्ञा देऊन पाठविलें, ते समयीं राजश्री पाराजीपंत आणखी कितेक पुढें न जावें याअर्थें बळ करीत होते. तेसमयीं उभयतांसही सरकारी दाब कोणत्या रीतीनें घालून नेहलें, साहेबचाकरी केली, तें शत्रुत्व अद्याप स्मरणांत आणोन जें जें साहित्य होईल तें करीतच जातात. राघवेंद्र नाईक कसा पळाला व सावनूर गेलें ऐसें कितीएक वर्तमानें परस्पर स्वामीस विदितच असतील. सावनुरांत राहून साहेबचाकरी कोणते रीतीनें केली व दवाब कोणते प्रकारचा व बंदोबस्त स्वारी येई तावत्कालपर्यंत कैसा होता तो सेवेंत विदित असेल. कच्चें वर्तमान लिहित जावें, त्यास " बहुत मिळती पिपीलिका, प्राण घेती सर्पा एका. " कां म्हणून आलोचना होईल त्यास प्रसंग तैसेच आहेत. पुरातन पदरचे पिढीजादे लोक असोन ज्या रीती घडतात त्या पाहत असतां, मी नूतन चरणाचे कडेस अधिकारी व्हावयाची इच्छा, परंतु येथील अर्थावरून तृप्त जाहलों. सेवकाविशीं श्रीमंत तात्यांस आज्ञापत्र आलें होतें त्यावरून कितेक राजकारणविषय समजाविले. परंतु आमच्या हातून घेतील किंवा कसें घडेल न कळे. आम्हीं सर्वत्रांची इच्छा मोडून साडेपांच लाख पावेतों ऐवज केला. कांहीं वसूल पडला व सावनूर

जातां जलदी करून कराराचीं कुळें असाम्या धरून आणिल्या. त्यापक्षीं आम्हांकडे दोषास ठाव आमच्या बुद्धीस दिसत नाहीं. परंतु आम्ही निस्पृह वृत्तीनें खरेपणीं राहाट करितों; हे पुढें स्वामीपाशीं काय मुद्देपणा करील ऐसें कोण कोणास भास राहून नानाप्रकारचीं कुभांडें योजोन जें घडतें तें परस्पर समजल्यांत येतें. सरकार–चाकरी एकनिष्ठपणें करीत असतां कांहीं स्वरूप वाढावें ते एकीकडेच राहून माझे जागा मीच दिक आहें. तेव्हां येथें राहणें ठीकही दिसत नाहीं. याजकरितां जलदी स्वामीचें आज्ञापत्र येथील मुख्यास यावें कीं, नरसिंगरायास पुण्यास पाठविणें. त्या पत्रांत मी येथून लिहिल्याचा भाव न येतां पत्र अगत्यवादाचें यावें म्हणजे येथें मीं सांगितले मजकुरीं सरकार उपयोगींत माझ्या हातीं चाकरी घेतल्यास येथें राहीन; नाहीं तरी पायापाशीं येईन. तेथें आल्यानंतर स्वामीची चाकरी केली त्यांत काय काय प्रकार बारीक मोठे धन्याचे धन्यास समजावून पुढें आज्ञा होईल त्याप्रमाणें करीन. वरकड सेवकाविशींचा खातरजमा पायापाशीं आल्यावांचून कैशी होईल? मी सेवेच्या उपयोगीं ऐसें स्वामीच्या ध्यानांत आल्यास चरणापाशीं राहीन. नाहीं तरी अनोपयोगीं ऐसें दिसेल तरी मजकडील सर्व गुंता फेडून देऊन चरणावर मस्तक ठेवून आज्ञा घेऊन हरकोठेंही स्नानसंध्या करावयास जातां येईल. पुन्हां कांहीं लटिकेपणाचा आळ आल्यास उपाय नाहीं. परंतु खरेपणाविशीं सेवक निखालस आहे. येथें रहावें ऐसें स्वामीचे विचारास आल्यास माझा लखोटा स्वामींनींच पाहून जाब यावा अशी आज्ञा जाहली तरी कच्चें वर्तमान लिहितां येईल. व पांच चार जोड्याही हरकारे ठेवून वरच्यावरी बातमी लिहीत जाईन. मजपाशीं खर्च आहे तो कामामुळें वाढला तो कांहीं दूर करून कांहीं ठेवला आहे. पूर्वींही पुण्यांत सागराहून आल्यानंतर खर्च बाळगून दोन वर्षां सेवेंत स्वारींत वगैरे होतोंच. स्वामीस सेवकाचें वर्तमान विदितच आहे. द्वेषरीत्या कोणी कांहीं सेवकाविशीं परात्पर संबंधे करून समजावितील व लिहितील, त्यास सरकार किफायत करणारास स्वामी बक्षीस देतात, त्यास सेवकास बक्षीस हेंच कीं पुर्तेपणीं माझा वांका समक्ष समजून घेतल्यावांचून दुसरे अर्थ ध्यानांत येणारच नाहींत हा स्वामीचा प्रताप आहे. तथापि सेवकाची अर्जी ध्यानांत असावी. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

२५९ श्री

शा. १७०८ माघ शु. १

२०-१-१७८७

( भा. व. २-३१ )

पौ छ २९ रविलावल सबा.

सेवेसी विज्ञापना. महमदअलीखानाचे बोलण्यांतील मजकूर,—

कडप्प्याचा मुलूख चोवीस लक्षांचा आहे तो आम्हास यावा ऐसें म्हणे. त्यास कडपे-कराचा आमचा तह जाहला तेव्हां बेवीस लक्षांची वांटणी जाहली. सरकार जगदेव

घाटाखालीं ते पुढें वांटणी व्हावयाची राहिली. त्यास प्रस्तुत नबाबाचें बोलणें कडपेकराकडे चाळीस लक्षांचा वसुली मुलूख, वांटणीस दाखला पुर्ता दिल्हा नाहीं, हें गोविंदराव उभयतांस माहीत आहे. ज्यापक्षीं महमदअलीखान कुमकेस येतात त्यापक्षीं सरकार त्यास द्यावयासी करावें. नवाबाची तोड काढतां येईल. कलम १.

श्रीरंगपट्टणचा मुलूख घाटाखालीं दिंडगल कोयमतूर वगैरे अजमासें पंचवीस लक्षांचा आहे तो आम्हास द्यावा. त्यास टिपूची नड पट्टणचे मुलखावर फार आहे. तेथूनच दम धरून बसला. त्यास श्रीरंपट्टणचें राज्य तीन करोडीचें. त्यांत घाटावर अजमासें करोड रुपया असला तर न कळे. वरकड घाटाखालीं कोईमतूर, दिंडगल, कलिकोट, शालमपेठ वगैरे इकडे समुद्र, तिकडे महमदअलीचे मुलखाची त्रिचनापल्ली, त्रिनामल वगैरे सरहद्द. अजमासें दोन करोडीचा मुलूख आहे. कोणी पट्टणचा माहीतगार असल्यास पुर्ती चवकशी करितां येईल. कलम १

येणेंप्रमाणें कळावें. जितकी माहितगारी तितकें लिहिलें आहे. पंचवीस लक्षांचा समजावितात, तो दोन करोडीचा आहे. लिहून गुंतावें तेव्हां चौकशी करावी कोणीं तिकडील माहीतगार असल्यास पुसावें, नाहीं तर कलम लिहावें कीं, पंचविसांचा तुम्हीं समजाविला त्यास तिसांचा झाल्यास चिंता नाहीं. याहून अधिक असल्यास तो सरकारचा हें बोलण्यांत लिहिण्यांत असावें. मग चिंता नाहीं. रवाना छ २४ रबिलावल हे विज्ञापना

---

श्री

२६० श. १७०८ माघ शु. ११
(भा. व. १-८३) ता. २२-१-१७८७

श्रीमंत राजेश्री नानासाहेब स्वामीचे शेवेसी.

विनंती सेवक कृष्णाजी जगन्नाथ वकील कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत माघ शुद्ध ११ मुक्काम संस्थान जोधपूर येथें स्वामी कृपा कटाक्षेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. स्वामींनीं कृपाळुपणें आज्ञापत्रीं सेवकास सदैव सनाथ केलें पाहिजे. विशेष छ २ मोहोरमचें आज्ञापत्र सरकारचे आजूरदार कासीद जोडीबा पाठविलें तें पौष वद्य ११ सोमवारीं पावोन शिरसाभिवंदन केलें. पत्रीं आज्ञा लिहिली जे, ज्येष्ठ वद्य चतुर्दशीस राजे बिजेसिंग यांस देवाज्ञा जाहली म्हणोन वगैरे मजकूर विनंतीपत्रीं तुम्ही लिहिला तो कळला. पुढें गादीवर कोणास बसविणार हें सविस्तर लिहून पाठवावें, पुढें होईल तें वरचेवर लिहावें म्हणोन आज्ञा लिहिली. त्यास पेशजी बिजेसिंगाचे देवाज्ञेचें विनंतीपत्र सेवेशीं लिहिलें होतें. त्या पत्रीं विनंती सेवकानें लिहिली होती जे, राजाची आज्ञा सुरसिंग ...त्र दहा वर्षांचा त्यास बसवावें. या समत मत जुजबी मुत्सद्दीयांचें व कांहींक सरदारांचें ...त होतें. परंतु पुढें भीमसिंग निघून राज्याचे प्रीत तीं पात्रें समारून राजानें परागंदा

केला असतां बिजेसिंगास परलोक प्राप्त जाहल्यावर जे दिवशीं मुत्सद्याचे संधानानें आले. पौष शुद्ध पौर्णिमेस राज्याभिषेक जाहला. अन्यत्र संस्थानिकाचे राज्याभिषेक समयीं ठीक आले नाहींत. भीमसिंगास कार्तिकमासीं उपदंशाची बाधा होऊन दोन महिने आंतच होते. राज्याभिषेकाचे दिवशीं बाहेर आले. उजवा पाय रोगानें गेलाच आहे. अद्यापि बिलकुल आराम नाहीं. शागीर्दपेशा व सरदार मुत्सद्दी सर्वही बेदिल आहेत. जिवाजी बल्लाळ[1] मामलतीकरितां श्री पुष्करासमीप आले आहेत. सवाईसिंग जयपुराहून येऊन मामलतीचा सलोखा करणार म्हणून वर्तमान आहे. परंतु उभयपक्षीं विलक्षणच आहे. पहावें कोणते थरास जाईल. आपले सरकारचें वर्तमान पाटिलबाबांचे चालीचे संस्थानचे वकील अन्यत्र प्रकारचें लिहितात. येथें वदंता आजकाल फारसी आहे. येथें राजे भीमसिंगजी याजला विचारिलें, परंतु नाकारच केला. इकडील तपशीलवार वर्तमान श्रीमंताचे विनंतीपत्रीं लिहिलें आहे, त्याजवरून स्वामींस श्रुत होईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

२६१ श्री

श. १७०९ अ. श्रा. शु. १५

ता. ३०–७–१७८७

( भा. व. २ अ. दि. १२ )

विज्ञापना ऐसीजे. छ. १२ सवाल शनवारचे दिवशीं लढाई राजश्री पाटीलबावा यांच्या फौजेची व जैपूर, मारवाडकर, हमदानी यांची लढाई झाली. खासा पाटीलबावा चढाई चढून भाईच्या मुक्कामापुढें जाऊन उभे राहिले. तिकडून तेही खासा चढून आले. ते दिवशीं राजश्री शिवाजीपंत बापू यांच्या फौजेनें वगैरे पाटीलबावाकडील सरदारांनीं मिळोन राठोड पुढें वाढून आले होते ते शिकस्त करून मोडून माघारा घातले. चार पांचशें राठोड लढाईंत ठार पडले. चार पांच सरदार त्यांजकडील ठार जाहले. पांच सातशें जखमी होऊन ते माघारा निघाले. बापूकडील फौज वगैरे पाटीलबावांकडील फौज एक कोस पावेतों पाठीमागें लागून मारीत गेले. राठोडांचा मोड जाहला. तेव्हां महंमदबेग हमदानी राजाचे डावे बाजूस उभा होता, तो राठोडाचे कुमकेस तेथून निघाला. त्यास वाटेंत अकस्मात तोफेचा गोळा लागून मृत्यु पावला. पुढें तेही कोणी आले नाहींत. इकडील फौजांनीं चालून जावें तेंही झालें नाहीं. पर्जन्य आला व पुढें खाया, नाला, संध्याकाळचा समय जाणून परस्परें आपलाले जागीं उभे राहून अस्तमानपावेतों तोफांची मारगिरी परस्परें जाहली. भाई उभे होते, त्याजवर दोन तीन तोफा जैपूरकरांनीं थोरल्या लागू केल्या होत्या. गोळेही बहुत आले. शेंपन्नास घोडीं माणसें मेलीं व जखमी झालीं. परंतु भाई ठिकाणावरून हालले नाहींत. तोफेच्या गोळ्यानें भाईचे तरवारीच्या कवजाची वाटी उडाली, आणि तोच गोळा शिकारबंदाजवळ मोतदार उभा होता त्यास लागला. ईश्वरें

---

१ बक्षी. महादजीचा सरदार.

भाईस कुशल केलें. इतकेंहि जाहलें, परंतु भाई ठिकाण सोडून आलीकडे पलीकडे जाहले नाहीं. प्रातःकाळचे प्रहर दिवसापासून ते दोन घटका अवशीचे रात्रपावेतों तोफा परस्परें चालत होत्या. उपरांतिक तेहि सरून चवकी ठेवून आपले गोटांत गेले. हेहि चवकी ठेवून गोटांत आले. परंतु सरसी ते दिवशीं आपले इकडील चांगली जाहली. राठोड मोडून घातले. हमदानी मेला. पुढें एक लढाई आणखी चांगली यावी ही उमेद इकडील लोकांची. परंतु आंतून त्यांणीं फौजेंत फितूर केला हें समजलें नव्हतें. पलटणें व मोगल यांजकडे संधानें करून खासा पाटीलबावास व भाई आदिकरून सरदारांस दगा करावा व लढाईत घालवावें, हें न साधल्यास लढाईचे वेळेस आम्ही चालून घेऊं, ते वेळेस तोफांची मारगिरी चुकवून आम्ही त्यांचे फौजेंत शिरलों म्हणजे आम्हांस शरीख होऊन दक्षण्यांची लढाई मारावी, अशा तऱ्हेनें त्यांचीं संधानें सिद्ध झालीं होतीं. शनवारचेच लढाईंत त्यांना संधान करून घालवावें असें होतें. परंतु राठोड मोडून घातले. हमदानी मेला. बाजूकडील सेर पाहिली म्हणून तोफांची मारगिरी करूं लागले. तेहि तोफांचे मोहरे जमी (?) दोन धरून गोळा जातो. कोणी त्याचे गोळा पावेतों पोंहचे, कोणी न पोंहचे. गोळे हजारों चालतात. अद्याप राजाकडील फौज उभी आहे तेथून हालत नाहीं. तेव्हां गोळे जातात कोणीकडे हा भाईस संदेह येऊन बातमीदार पाठविले, ते येऊन सांगूं लागले, गोळा तेथपावेतों जात नाहीं. तेव्हां गोलंदाजास पुसूं लागले, गोळा तेथवर कां जात नाहीं? ते म्हणूं लागले, तोफा धाकटा गोळा तेथवर पोंहचत नाहीं. तेव्हां बिडी थोरल्या दोन तोफा नेऊन तेथें लाविल्या. त्यांचा गोळा हमदानीस लागून ठार झाल्याची बातमी आली. पुढें गोळे जाऊन राजाचे फौजेंतील पांच सातशें घोडीं माणसें मेलीं जखमी झालीं. हें शनवारच्या लढाईचें वर्तमान. उपरांतिक दुसरे दिवशीं छ १३ सवाल आदितवारचे दिवशीं भाई वगैरे फौजा चढवून लढाईचे जाग्यापुढें वाढून जाऊन दोन चार गोळे तोफांचे मारले. ते कोणी बाहेर आले नाहींत. तिसरा प्रहर पावेतों उभे राहून अस्तमानीं गोटांत आले. बावा तेथेंच भाई-जवळ मुकाम करून राहिले होते. त्याजवर छ १४ सवाल सोमवारचे दिवशीं सारे पलट-णांनीं तलब आमची सात आठ महिन्यांची चुकवून द्या म्हणोन बोलणें तटाचें घालून मलई केली. सात हजार माणूस ऐक जागां झालें. वरकड आपापले जागां बइदा करून बसले. तेव्हां बावांनीं बहुतां प्रकारच्या तडजोडी त्यांस मध्यस्ताकडून बोलविल्या. शेवटीं सौ बायांवरील वस्ता ठेवून तुम्हांस तीन रोजमरेयांचा ऐवज देऊं, वरकड हिशेब लढाई अखेर झाल्यानंतर चुकवून देऊं असेंहि बोलले. कांहीं नक्तहि द्यावयास लागले. त्यांत वरकड पलटणींनीं थोडाबहुत ऐवज घेऊन तोड पाडिली. सात हजार माणसांची मलई एके जागां झाली होती, ते कोणताहि जाबसाल ऐकतना. लढाईचे वेळीं व आधीं त्या पलटणाचे निस-बतीस मिळून सवाशें तोफा त्यांच्या जिमेस दारूगोळा छरेसुद्धां होत्या. त्या तोफांचीं तोंडें यांजवर फिरवून तलब चुकवून द्या, नाहीं तर तोफा आम्ही घेऊन जाऊं. यांणीं बहुत सांगितलें, परंतु न ऐकतां छ १५ सवालचे दिवशीं तिसरा प्रहरां कूच करोन सवाशें तोफा,

दारूगोळे, गाडीवान, गोलंदाजांसुद्धां घेऊन चालले. तेव्हां शिवाजीपंत बापू व रावराजा आदिकरून तमाम सरदार बोलावून सलाह पुसली. आपल्या तोफा व सात हजार बंदूक घेऊन चालले, पुढें यांचें कसें करावें ? कंपूनीं कूच केलें त्यापूर्वीं त्यांणीं जैपुरकराकडे सूचना करून त्यांची फौज चार पांच हजार चवकीपुढें येऊन उभी राहिली. मागून गोटांत तमाम फौजेची तयारी झाली. याप्रमाणें बातम्या पैदरपै येऊन पोंचल्या. तेव्हां सर्वांचे विचारें ठरलें जें, लष्करांत फितूर झाला नकळे. हिंदुस्थानी कोण कोण फितुरांत मिळाले आहेत. साऱ्याच पलटणांनीं तलबेचा बद्दा केला होता. परंतु वरकड राहिले. तोंच कंपू सात हजार माणूस कूच करून चालले. वरकड लष्करांत पलटणें व मोगले वगैरे हिंदुस्थानी येथें आहेत यांचा विश्वास काय ? येसमयीं लढाई घेणें सलाह नाहीं. लष्करांत एकच गर्दी होऊन आपले पारखें कोणाचा विश्वास कोणास न येतां पाणिपत होईल, कंपू तोफा घेऊन जातों, जाऊं द्यावा, या वेळेस त्याशीं लढाई घेऊं नये, याप्रमाणें समस्तांनीं बावांशीं बोलून तेथेंच बसले आहेत, तोंच कंपू कूच करोन दीड कोस इकडून गेला. तिकडून राजाची फौज पुढें येऊन तोफा व कंपूस घेऊन त्यांची चवकी उभी राहत होती तेथें त्यांस उतरविलें. त्याजवर अस्तमान झाला. तितक्यांत बातमी आली जे, कंपू दाखल जाहल्याचें वर्तमान राजास जाऊन पोहचलें. त्यावरून राठोडसुद्धां त्यांच्या फौजा तमाम तयार होऊन लढाईचे इराद्यानें येतात. दुसरी बातमी आली जे दवलतराम, पहाडसिंग फौजा घेऊन पुढें आले. राजे अद्यापि आले नाहीं. तेव्हां येथेंहि जिनबंदी होऊन चार शेरांची धारण. शिलेदारांस उपास. परंतु तेथें भाईसमागमें तमाम सरदार फौजसुद्धां लढाईचे जाग्यावर जाऊन उभे राहिले. मागाहून बावानींहि सिद्धता केली. पुढें चार पांच घटका रात्र गेल्यानंतर कंपूनें एक शिलक तोफांची केली. तेव्हां सर्वांस समजलें, आतां ते चालून घेतात. कोणी तर्क केले, कंपू त्यांकडे गेला, त्याणें सलामी तोफांची शिलक केली. त्यावर बातमीहि याअन्वयेंच आली. परंतु फौजा राठोडसुद्धां तमाम उभे आहेत, तेव्हां बावांनींहि आपलें चिलखत आणविलें, आणि निश्चय केला जे, ते तिकडून पुढें वाढून आले म्हणजे इकडून आपण चालून जावें. ईश्वरानें नेमिलें असेल तें होईल. त्याजवर बातमी आली जे त्यांच्या फौजा माघारा गेल्या, तोफखान्याजवळ चवकी हजार पांचशें स्वार आहेत. तेव्हां यांणींहि चवकी ठेवून भाई गोटांत बावाजवळ आले. त्याउपरांतिक प्रहर सहा घटिकांनीं शिवाजीपंत बापू पाटीलबावांजवळ येऊन बावा व भाई यांस एकांतीं घेऊन बसून बोलले. समय पाणिपतसारखा प्राप्त झाला. आज रात्रीसच ते चालून येते म्हणजे मरण प्राप्त. उद्यां प्रातःकाळीं कच्छे व राठोड तमाम यांच्या फौजा चालून येणार. आपलीं पलटणें तोफा त्यांजकडे गेल्यानें त्यांस हुशारी येऊन ते हावभरी जाहले. आपले फौजेची हुशारी मंदावली. फौजेंत पलटणें व मोगले रांगडे हिंदुस्थानी आहेत त्यांचा विश्वास नाहीं. परिच्छिन्न ते लढाईचे समयीं घालवितील. अझून परीक्षा पहावयाची बाकी राहिली नाहीं. दक्षणी फौज किती आहे ती आपल्या ध्यानांत आहे. चार शेरांची धारण, बाहेरून रसद येत नाहीं. शिलेदार

उपासानें मेले. घोडीं मेलीं. राहिलीं त्यांत सामर्थ्य नाहीं. वैरणीचा काळ. लढाई कशाचे बळावर घेणार. ये वेळेस चार दिवस येथून निघावें. मसलतीस टाळा द्यावा. पुढें पाहून घेऊं. याप्रमाणें चांगले-रीतीनें समयोचित बोलून कूच करावयाचा निश्चय ठरावून, मागील प्रहर रात्र राहतां सड्या फौजा तोंडावर ठेवून, बावा व आपण मागें राहून बुणग्याचें कूच माघारा करविलें. थोरले बुणगे चार पांच कोस मागें लालसोटानजीक होते तेथें सांडणीस्वार पाठवून त्यांचेंहि कूच करविलें. तितक्यांत मागील घटका रात्र राहतां सड्या फौजेचेहि बुणगे थोरल्या बुणग्यांत येऊन सामील जाहले. लोक आपापले लादायचे गडबडींत, त्या संधींत बुणग्यांत तोफा होत्या, त्यांतील एक संदूख दारूचा कोणे पलटणच्या प्यायानें बत्ती लावून उडविला. त्याचा प्रकाश व बार थोरल्या तोफेप्रमाणें कडाखा होऊन जवळ दारू आणखी होती तेंहि उडाली. बाणाच्या गाड्या तेथें होत्या, त्यांस मात्र बत्ती जाऊन पोंहचली नाहीं. संधान करणारानें कसूर केला नाहीं, परंतु ईश्वरें मोठें कुशल केलें. बाणांस बत्ती जाऊन पोहचती म्हणजे लष्कर ते दिवशींच बुडालें होतें. संदूख उडाला त्यावरून तमाम बुणग्यांतील लोकांस वाटलें जे, येथें पलटणें होतीं त्यांणीं तोफा लष्करावर फिरविल्या. आधींच समय पलटणींचा, त्यांत हें साहित्य जाहल्यानें वसवास जाऊन धडका केला. पळूं लागले. वस्तभाव लादालाद ज्यांची झाली होती ते घेऊन निघाले. ज्यांची राहिली त्यांणीं कार्याकारण घेऊन वरकड तसेच टाकून पळाले. फार करून बाजारकऱ्यांचा दाणा-दुणा, कापड, कोणाची राहुटी, कोणाचीं पालें, खाशा पाटीलबावाच्या मुदबकाची भांडीं फरासखान्यांतील ओझीं खाण्याची वगैरे तळावर तशींच राहून लोक जीव घेऊन पळतात तशासारखे पळूं लागले. कितेक तळावर आहेतच, तों अफरासियाबखानाचा बाजार लष्करचे सोद्यांनीं व पेंढारी यांणीं लुटला. विना लढाई एकच गर्दी चहूंकडून विलग तऱ्हेची होऊन बुणगे तेथून निघाले. त्याजवर पाठीमागून चौसहा घटकांनीं पाटीलबावा तळावर आले. पहातात तों पळाल्याप्रमाणें अवस्था दिसली. तेव्हां तेथें उभे राहून खाशा मुदबखाचीं भांडीं व फरासखान्याचीं ओझीं सांडण्या सुतरनाळांचे उंटावर घालून लोकांस सांगितलें, तळावरील तुमचे उपयोगी असेल तें घ्या, वरकड जमा करून फुंकून द्या. अफरासियाबखान याची स्त्री व मूल तळावरच राहिले होते. ओझीं त्यांचीं नित्य भाड्याचे उंटांवर चालत. ते दिवशीं उंट मिळाले नाहींत. तेव्हां बावांनीं हत्तीवर त्यांचीं ओझीं लादून त्यांस मार्गस्त करून आपण चार घटका तळावर बसून तळास आग देविली. ते दिवशीं पिंपळाईस येऊन तिसरा प्रहरीं मुक्काम जाहला. बुणग्यास बारा कोसांची मजल पडली. सड्या स्वारीचे लोकांस सोळा सत्रा कोसांची मजल जाहली. अस्तमानीं बावा बुणग्यांत आले. पाठीमागून चार सहा घटका रात्रीस भाई वगैरे फौजा तोफखाना सांभाळून घेऊन गोटांत आले. दरम्यान दयाराम पुरब्याचीं दोन पलटणें अडून उभीं राहिलीं होतीं. तलब आमची द्या नाहीं तर आम्ही येत नाहीं. सरकारच्या दहा पंधरा तोफा त्यांचे निसबतीस, बावांनीं बहुता प्रकारें सांगितलें न ऐकत. पाठीमागून भाई आले. त्यांणीं बावांस पुढें

बिदा केलें, आणि सांगितलें जे यांशीं बोलून पाहतों, आले तर उत्तम, नाहीं तर हीं दोन्हीं पलटणें कापून काढून तोफा आपल्या घेऊन येतों. आपण पुढें जावें. त्यावरून बावा पुढें आले. भाई तेथें उभे राहून पलटणाशीं सख्त रीतीनें बोलून तोफा पलटणें लष्करांत घेऊन आले. दुसरे दिवशीं त्याच [ अन्वयें ] बुणगे पुढें घालून आपण पाठीमागें राहून आठा कोसांवर येऊन मुक्काम केला. खुशालगडांत एक दोन तोफा व फरासखाना वगैरे होते ते तेथील तेथेंच राहिले. आणावयास बनलें नाहीं. कमावीसदार जीव घेऊन पळून आला. रांगड्यांनीं ठाणें आटोपलें. पाठीमागून हमदानीचा पुतण्या व पहाडसिंग दवलतराम हल्या पंधरा हजार फौजेनिशीं पाठलाग करावयास येतात. बातमी आली. त्यावरून नित्य खासा बावा व भाई वगैरे सरदार पाठीमागें फौजसुद्धां राहून बुणगे पुढें घालून मजल दरमजल मोठ्या मोठ्या मजली करीत, या अन्वयें डिगेपावेतों आले. रांगड्यांची फौज पिंपळाईपावेतों आली होती, तेथून माघारा परतोन गेले. नित्य लष्करांत अवाया पडत. आतां स्वस्थ आहे. परंतु लष्करानें अवाई खादली आहे. पुढें पहावें. येथून पुढें फितुराची चवकशी व फितुरीयांचे पारपत्याचा विचार होणें तो होईल. नौबतरायाचे जिमेस तोफखाना पलटणें होतीं. इतका फितूर केवळ एका दोहों रोजांत जाहला नाहीं. दोन चार महिने संधान चाललें आहे हें आतां समजण्यांत आलें. रात्रंदिवस नौबतराय तेथें असतां त्यास न समजतां जाहलें किंवा तोहि यांत आहे कळे काय ? परंतु त्याचा संदेह बांवाच्या अंतःकरणीं आला. वरकडास तो परिछिन्न आहेच. चवकशी होते. बाहेरून त्यांजवर चवकी स्वारांची आहे. पुढें काय निवडेल तें पहावें. परंतु याउपर फितुरीयांचीं पारिपत्यें होतील. बांवांनीं कुटुंबें वगैरे कुल कारखाने बुणगे ग्वालेरीस रवाना करून सडे होऊन आहेत. प्रसंगीचें सविस्तर वृत्त निवेदन व्हावें, यदर्थी तपसीलेंकडोन विनविलें आहे. नौबतराय याजकडे तोफखाना पलटणें बक्षीगिरी सांगितली. अलीकडे त्याजवर अखत्यार पाटीलबावानीं बराच दिला आहे. परंतु हिंदुस्थानी माणूस आर्जवी, फार तऱ्हेतऱ्हेनें आर्जवून कामकाज करून दाखवून मेळवून घ्यावें. समयास बनेल तशी वर्तणूक करावी अशी चाल आहे. याकरितां पाटीलबावांनीं बहुत सावधपणें वर्तत जावें म्हणून स्वामींनीं पूर्वी लिहिलें होतें व बाळाजीपंत जामगांवकर यांजवळ बोलणें जाहल्यावरून त्यांणींही या अन्वयें येथें लिहून पाठविलें. आम्ही स्वामीची वजिनस चिठी पाटीलबावांस एकांतीं वाचवून दाखवून मजकूर बोललों. ते समयीं म्हणूं लागले येविशींचा बंदोबस्त आहे, काळजी न करावी. निदान स्वामीच्या लिहिल्याअन्वयेंच प्रत्ययास आलें. आतां स्मरतात. हिंदुस्थानी यांणीं दवलतच गारद केली होती. पाणपत होण्यांत बाकी नव्हती. परंतु श्रीमंतांचे पुण्येंकरून व पाटीलबावांचे दैवेंकरून बचाव जाहला ही गोष्ट थोरली जाहली. सांप्रत बावाही आपले जागीं खिन्न आहेत. श्रीमंतांनीं लिहिलें व घरच्या मंडळीनेंहि सांगितलें. परंतु होणारासारखी बुद्धि झाली. हिंदुस्थानीयांचे विश्वासावर गेलों त्याचें फल पावलों, असें म्हणत असतात. होणारास कोणाचा उपाय नाहीं. वाईट व्हावें याकरितां त्यांणीं संग्रह केला

नव्हता. परंतु हिंदुस्थानी बेइमान, वेळेस त्यांणीं घालविले हें आतां प्रत्ययास आलें. पुढें दौलतीचा वगैरे बंदोबस्त करितात तो जाहल्यावर मागाहून लिहून पाठवूं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

२६२ श्री

(भा. व. २-८१) श. १७०९ श्रा. शु. ४

१७-८-१७८७

विनंति सेवक आनंदराव गंगाधर[१] साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ ३ जिल्काद शनवार प्रातःकाल मुकाम मौजे वाफगांव येथें यथास्थित असे विशेष. श्रावणमासाकरितां ब्राह्मण आवंदा येथें बाराशें पंधराशें जमा झाले. अनुष्ठानास लावावें येविषयीं एकदोघांनीं सुभेदारांस विनंति केली. सालाबादप्रमाणें नेमणूक करून कामें सांगावीं. सुभेदारांनीं उत्तर केलें. आवंदा ब्राह्मण कोणी श्रावणमासास लावावयाचे नाहींत. कोणी ब्राह्मणाची शिफारस करूं नये. गांवांत पेठेंत ताकीद करून ब्राह्मण पुण्यास लाऊन दिले. कांहीं गेले, कांहीं राहिले. त्यांस आज प्रातःकाळीं दर असामीस रुपया एकप्रमाणें भूर्दक्षणा देऊन ताकीद करून बाहेर घालविले. यांतहि कांहीं जातील, कांहीं राहतील असें आहे. पंचमी जाहल्यावर कांहीं थोडेबहुत लिंग करावयास लावले तर लावतील. राजश्री पाराशरपंत बाबा काल तिसरे प्रहरीं आले. राजश्री सुभेदार यांची भेट झाली. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

२६३ श्री

(भा. व. २-९२) श. १७०९

सन १७८७

अर्जी मुसा फरासीस गाडदी हुजूर सु॥ समान समानीन मया व अलफ. दिम्मत मजकूरचे लोक कर्नाटकचे स्वारीस होते. हल्लीं स्वारी करून मुकाम पुणें येथें आज भरणा खेला. हा बजीरी असामी.

| | |
|---|---|
| १ खुद्द कपीतान, ७६ फिरंगी लोक (३२ गोरे, ४४ किरस्ताव) | एकूण ७७ |
| १८३ गाडदी— ३ दफेदार, १८० गाडदी | एकूण १८३ |
| ५ दिवाण व कारकून १० निम सेरेकरी भिस्ती ढोले वगैरे | एकूण १५ |

एकूण २७५. तपशील:—२२५ बडा तैनात जाबता सरकारचा आहे, त्याप्रमाणें, आणि ५० टिपू मिय्या याजकडील लोक, सरकारचे आज्ञेवरून फितावून आणिले आहेत, त्यांचा करार आहे कीं मुकामीं गेल्यावर दूर करणार नाहीं.

एकूण २७५ गोरे व फिरंगी लोक असामी.

---

[१] चंद्रचूड.

एकूण पावणे तीनशें लोक स्वारी करून आले. त्यांपैकीं हल्लीं शंभर लोक सरदार फिरंगी, गाडदी, कारकून किरकोळ असामी सुद्धां ठेवून बाकी लोकांस फांटा देऊन दूर करावें म्हणून सरकारची आज्ञा झाली आहे. मी चाकरीचा माणूस. शंभर लोक राहिले म्हणजे माझे सरदारीचा आब रहात नाहीं. याजकरितां सेवेशी अर्जी केली आहे. कृपा करून माझे थोडेबहुत लोक आहेत, ते कायम करावयाविशी आज्ञा झाली पाहिजे. सरकारचे तैनात जाबत्याप्रमाणें स्वामी कृपाकरून राखितील ऐसा मजला भरवंसा आहे. परंतु टिपूकडील लोक सरकारचे आज्ञेवरून फितावून आणिले आहेत, ते मर्द माणूस चांगले आहेत. सरकारचे हुकमावरून माझें वचन त्यांस गुंतलें आहे कीं, तुम्हांस दूर करणार नाहीं. ऐसें असोन त्या गरीबांस विश्वास देऊन घात होतो, यावरून अर्जदास्त केली आहे. कृपाळू होऊन माझे दिमतीचे लोक थोडेबहुत आहेत ते कायम करावयाविशीं आज्ञा झाली पाहिजे.

---

श्री

## २६४

## फुलचरी ( पांडेचरी ) येथील बातमीपत्र

श. १७१० आषाढ व. ९

( भा. व. २ अ. दि. ११ )

११–७–१७८८.

पौ छ २१ जिल्काद तिसा समानीन.

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे शेवेसी.

आज्ञांकित गोपाळ बल्लाळ साष्टांग नमस्कार विनंति विज्ञापना ऐसीजे. येथील वर्तमान ता। आषाढ वा। ९ मु॥ फुलचरी स्वामींचे कृपाकटाक्षें यथास्थित असे विशेष. कृपाळु होऊन पत्रांचीं उत्तरें सरकारचे जासूद जोड्यासमागमें आज्ञापिलें तें पावून परम संतोष जाहला. मुसा कनवा जनराल यासी दोन थैल्या व मुसा कुसनी माजी जनराल याचे नांवें दोन थैल्या एकूण चारी थैल्या जनराल मशारनिल्हे यांस प्रविष्ट केल्या. घेऊन बहुत खुष जाहले. पुढें दोस्तीची वृद्धिंगत दिवसंदिवस अधिकोत्तर व्हावी म्हणोन उपचारें बोलिले. कृपाळु होऊन फरासीसाचें जहाज मैकालसुद्धां सोडून देविलें, जहाजवाल्यांची फारकतीची नकल पाठविली ते पाहून बहुतच संतोष जाहले. दोस्तीचे जागां ऐसेंच पाहिजे म्हणोन बोलिले. मुसामुतीन[1] याची वाट फार पाहतात. ते आले म्हणजे सविस्तर वृत्त त्या प्रांतींचें निवेदन करतील. त्यांचे भेटीअंतीं काय मजकूर होतो तें पाहून सेवेसी विनंति लिहीन. सांप्रतकाळीं फरासीसांचा सरंजाम येथें भारी आहे. पांच हजार फिरंगी लोक टोपीवाले, पगडीवाले दोन हजार, जंगी सरंजाम तोफा वगैरे दोन अडीचशें जरब दारूगोळाहि भारीच आहे. जंगी जहाजें दहापांच होतीं. सांप्रतकाळीं कांहीं विलायतेस गेलीं. पांचचार मात्र येथें आहेत. येणेंप्रमाणें सरंजाम आहे. टिपूकडे रा. रामराव नामें वकिलीस गेले होते. टिपूकडून बहु-

---

१ हा फ्रेंच वकील २ वर्षे पुण्यास होता.

मान वस्त्रें घेऊन फुलचरीस आले. टिपू कलिकोट येथें आहे. टिपूकडून वकील तिघे विलायतेस गेले होते ते विलायतेस जाऊन पोहचले. विलायतचे पातशहांनीं त्यांशीं बहुत आदरेंकरून मुसा पेमरो इस्तकबल पाठवून घेऊन गेले. पातशाहाची मुलाजमत जाहली. फार आदर करून ठेवून घेतलें. वकिलांनीं जवाहीर वगैरे पातशाहास गुजराणिलें. बहुत संतोषेंकरून घेतलें. पुढें कितेक बोलणीं ते बोलून परभारें जंगी सरंजाम पाहिजे तो ध्यावा, फुलचरीशीं इलाका नसावा, ऐसे निश्चय ठरावून घेतला. अद्यापि तेथून रुखसती जाहली नाहीं. पुढें काय वर्तमान येईल तें सेवेसीं विनंति लिहीन. इंग्रेजाचा फरासीसाचा स्नेह मध्यें बिघडला होता. सांप्रत काळीं सलुख झाला आहे. इंग्रेजांनीं जमाव चिनापट्टणीं याजसाठींच केला होता. सांप्रत स्नेह झाला याजमुळें कांहीं नाहीं. चिनापट्टणीं गोरंदर वगैरे झाडून नवा सरंजाम विलायतेहून येणार. रुखसत झाले आहे. राहाले कधीं येतात. हैदराबादेहून अखबारनवीस इंग्रेजाचा आहे, त्यांनीं वर्तमान लिहिलें होतें कीं, नबाबाकडून मातबर माणूस फरासीसाकडे रवाना होणार. कांहीं राजकारण करावें याअर्थी पाठवणार. अद्यापि कोणी आलें नाहीं. फरासीसाकडून मुसा उमुकाहि तोहफा जिन्नस घेऊन वकिलीस गेले आहेत. दुसरे अखबारनविसानीं लिहिलें होतें, नवाबाशीं शिंद्याशीं सांप्रतकाळीं परम स्नेह झाला आहे. पैदरपै पत्रें शिंद्यांचीं नबाबाकडे येतात. यांचीं उत्तरें त्यांजकडे जातात. दुसरें नबाबाचे चित्तांत कांहीं कल्पना आली आहे कीं नबाबाचे पुत्राचें लग्न जाहलें. त्याचे लग्नाचे महोत्सवास स्वामींनीं जावें अगर तात्यांनीं जावें तें कांहीं घडून आलें नाहीं. याजमुळें चित्तांत परम संशय आहे. याजमुळें कितेक राजकारण मांडलें आहे. स्वामीसहि या गोष्टीची सूचना असेल; परंतु ही गोष्ट सत्य किंवा मिथ्या आहे हें पक्केपणें कळलीयावर विज्ञापना लिहीन. अखबारनविसानीं चिनापट्टणास हें वर्तमान हैदराबादेहून लिहिलें होतें तें वर्तमान येथें आलें. त्याजवरून सेवेसीं लिहिलें. पुढें नवल विशेष अढळांत आलीया विनंति लिहितों. शिंद्यानीं कलकत्याहून कांहीं लोक इंग्रेजाकडील मदतीस आणविले आहेत. दोन कंपूची वार्ता आहे. सत्य मिथ्या कळलें म्हणजे लिहून पाठवीन. स्वामींनीं टिपूकडील अगर नबाबाकडील भरंवसा धरूं नये. स्वामी तों सावधच आहेत. परंतु सेवकास आढळलें वर्तमान सेवेसी लिहीन. रागास न यावें. येथले जनराल यांस चहूंकडून वस्त्रें बहुमान आला. आपल्या सरकारचा कांहीं आलें नाहीं. याजसाठीं कांहीं मर्जीस आलें तर वस्त्रें बहुमान पाठवावयाची आज्ञा करणार स्वामी समर्थ. पांच वर्षें जाहलीं, स्वामीचे चरण दृष्टास पाहावे ऐसा हेत फार आहे. स्वामींनीं कृपाळु होऊन नालबंदी रोजमऱ्याचे ऐवजीं देविलें होतें तें पावलें. बाकी पांचा वर्षांची नालबंदी रोजमऱ्याची अखे राहिली आहे, तेहि देणार स्वामी समर्थ आहेत. देशीं महर्गता विशेष झाली होती, याजमुळें खर्च भारी पडला. घरीं लेंकरें बाळें खर्चावीण हैराण आहेत. स्वामी कृपा करणार थोर आहेत. बिस्तारें काय लिहावें. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

---

२६५ श्री

श. १७१० भाद्र. व. ५

( भा. व. २-२७ ) ता. २०-९-१७८८

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीः-

विनंति सेवक आपाजी बाबाजी दामले साष्टांग नमस्कार विनंति. येथील कुशल तागाईत भाद्रपद वा। ५ पावेतों मुकाम लष्कर नजीक श्रीनाथद्वारापावेतों स्वामीचे आशीर्वादें क्षेम असों विशेष. आपली आज्ञा घेऊन आलों त्या तागाईत पत्र येऊन सांभाळ होत नाहीं व मी दोन तीन पत्रें पाठविलीं त्यांचेंही उत्तर येत नाहीं. त्यावरून चित्त उदास आहे. तरी ऐसें नसावें. सदैव आशीर्वादपत्र पाठवून सांभाळीत असावें. घोड्याविशीं आपली आज्ञा आहे, त्यास स्मरण मजला खचित आहे. आपले मर्जीनुरूप मिळाला म्हणजे घेऊन पाठवून देईन. वरकड नवल विशेष ल्याहावें ऐसें नाहीं. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति.

---

२६६ श्री

श. १७१० आश्वि. शु. ६

( भा. व. २-३९ ) पौ। छ ३ सफर सन तिसा. ५-१०-१७८८

विज्ञापना ऐसीजे. दिल्लीचें वर्तमान आश्विन शुद्ध षष्ठी रविवारीं राणेखान भाई दाखल झाले, त्यांचे भेटीस इस्माल बेग यास घेऊन खंडोजी शिंदे व हिंमतबहादर गेले' त्यांच्या भेटी होऊन भाईनीं पांच पांच किस्ती वस्त्रें आणिलीं. त्यांतून वस्त्र इस्मालबेगानीं घतली नाहीं. अत्तर, पानविडे घेतले. गुलामकादर किल्ल्यांतून पार फौजेंत गेला. त्याशीं लढाई करावयाचा मजकूर इस्मालबेग यांणीं भाईशीं केला कीं, नांवा जलद आणवा. पार उतरून लढाई करून लुटून टाकावा. भाई म्हणाले, गुलामकादर किल्ल्यांत आहे. इस्मालबेगानीं सांगितलें कीं, तो पार आहे. आमचा मनुष्य पाहून आला. देवजी गवळी व नवी फौज हिंडोन नदीपार होती ते उतरोन गुलामकादर याचे मुकाबल्यावर येऊन एक लढाई घेऊन गेले. किल्ल्यांत रुपयांचा आटा तीन शेर झाला. त्यांतून तेलंगे जमातदार दोन येऊन आपणांकडे भेटले. किल्लाहि लवकरच खालीं होईल. पार गुलामकादर याचे फौजेंतहि रसद पोहचत नाहीं. रुपये पांच शेर झाले आहेत. रामरतन मोदी याचा अंमल भाईनीं शहरांत बसविला. करोडगिरी व टंकसाळ सांगितली. झालें वर्तमान सेवेसी लिहिलें. श्रुत होय. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

---

२६७ श्री

( भा. व. २-२८ ) श. १७१० का. शु. १२

ता. १०-१०-१७८८

पौ छ १६ रबिलावल सन तिसा समानीन मार्गशीर्षमास बरोबर कासीद जोडी मुजरद.

सेवेसी आपाजी बाबाजी दामले कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागाईत छ ११ सफरपावेतों मुकाम श्रीमथुरा स्वामी कृपेंकरून यथास्थित असें विशेष. राजश्री पाटीलबाबाच्या भेटी झाल्याचें पत्र शेवटीं पेशजी लिहिलेंच आहे. त्याजवर तिसरे रोजीं राजश्री पाटीलबाबांच्या डेऱ्यास गेलों. हत्ती, घोडा, जवाहीर, कंठी, शिरपेंच, जगा, वस्त्रें याप्रमाणें सन्मान झाला. त्याजवर दुसरे रोजीं पाटीलबाबांनीं भोजनास बोलाविलें. भोजन झाल्यावर एकांतीं बसोन बोलणें झालें, तें सविस्तर वृत्त श्रीमंत राजश्री अलीबहादूरबाबांनीं लिहिलें आहे त्यावरून श्रुत होईल. खर्चाची ओढ फार झाली, साहूकार कोणी नाहींत, ऐसा पेंच आहे. राजश्री सदाशिवपंत दिवाण तों अद्याप आले नाहींत. पुढें होईल मजकूर तो सेवेशी लिहीन. सेवकानें सात आठ पत्रें सेवेशीं लिहिलीं, परंतु उत्तर आलें नाहीं. कृपा करून सेवकाचा गौरव करणार स्वामी समर्थ आहेत. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

श्री

२६८ श. १७१० आश्वि. व ९

( भा. व. २-४८ ) २३-१०-१७८८

राजश्रिया विराजीत राजमान्य राजश्री सदाशिवपंत स्वामींचे सेवेसीः-

पोष्य बाळाजी जनार्दन साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत जावें विशेष. इंग्रजांचा जमाव गोरे दर गलबतावर दोनशें तीनशें याप्रमाणें तीन हजारांपर्यंत मुंबईस जमा झाला आहे. दुसरीं सात आठ पलटणें तयार केलीं आहेत. हल्लीं नवा जनरल विलायतेहून मुंबईस आला आहे, तो कांहीं मसलत करणार अशा बातम्या येतात. येथें मालीट वकील आहे, त्याजपाशीं येविशींचें बोलणें झालें. त्याचें म्हणणें कीं आपले ठिकाणाचे बंदोबस्ताकरितां तरतूद आहे, दुसरें कारण नाहीं असें बोलतात. परंतु विश्वास धरतां येत नाहीं. पेशजीं मुंबईस पलटणींची व गलबतांची तयारी होत आहे. हा मजकूर राजश्री पाटीलबावा व कृष्णराव यांस लिहिण्यांत आला होता, तेव्हां इंग्रजांचें वकिलाशीं तेथें मजकूर केला. त्याणीं उत्तर केलें कीं, कर्नाटकांत कोणी पाळेगार आहे त्याचें पारपत्य करण्याकरितां तयारी आहे. त्यास कर्नाटकाकडे पाळेगाराचे पारपत्यास म्हणावें तर चेनापट्टणाहून गोरे व गाडद गलबतावरून मुंबईस आली. ते इकडून तिकडे जावें ते तिकडून इकडे आले याचें प्रयोजन काय ? त्याजवर बातमी आली कीं, शिद्या व

खोरीं कुदळ्या करितात, बातमी करूं देत नाहींत. हा प्रकार येथून लिहिला होता त्याप्रमाणें पाटीलबावा इंग्रजांशीं बोलले. त्यांणीं उत्तर केलें कीं, कर्नाटक प्रांतीं जमीदार आमचे पक्ष्यांत आहेत, त्यांशीं टिपूकडून खलश होणार याकारितां तयारी करविली आहे, असें बोलले. तीन वेळां इंग्रजांशीं मजकूर केला. त्याचीं उत्तरें तीन वेळां निरनिराळीं केलीं, यांत इतबार कोणत्याचा धरावा याचा विश्वास धरतां येत नाहीं. बोलणें फार स्वच्छतेनें बोलतात. कोणे वेळेस काय करतील याचा इतबार नाहीं. येविशींचे अनुभव पूर्वीं आलेच आहेत. येथून मुंबईचा पल्ला जवळ. याकरतां फौज जमा करविली आहे व तोफखान्याचीही तयारी करविली आहे. हा मजकूर पाटीलबावांस कळवावा. उत्तर येईल तें लिहून पाठवावें. सदरहूप्रमाणें मजकूर लिहून रवानगी आपाजीराव दाभोळकर यांजकडे, सदाशिवपंत[1] पुण्यास आले सबब रवाना. छ २२ मोहरम रवानगी केली. छ २४ मिनहू डाकेबरोबर.

---

श्री

२६९
( भा. व. २२६ )

श. १७१० आश्वि. व. ११
ता. २५-१०-१७८८

साहेबाचे सेवेसी. आज्ञाधारक आंबोजी इंगळे चरणावर मस्तक ठेवून कृतानेक विज्ञापना येथील क्षेम तागाईत छ २४ मोहरम मुक्काम मल्हारण प्रांत जैपूर येथें कृपाकटाक्षें करून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. ऐसीयास पेशजी पनवाडचे मुक्कामीहून साहेबांचे सेवेसी वर्तमान लिहिलेंच आहे. ज्या दिवशीं आम्ही पनवाडास आलों ते रोजीं मारवाडयांची फौज फुल्या केकडीस दहा बारा हजार आली; व जैपूरवाल्याची फौज तोड्यास आली. आणि तेथून आम्हांस पत्रें लिहिलीं कीं, तुम्ही आमचे हद्दींतून न जाणें. परभारें हडोतींतून सोपारावरून जाणें; कदाचित् आमचे हद्देंतून आला आणि उजाड बिघाड केला तर तुमचा आमचा बिघाड होईल. ऐशीं पत्रें त्यांणीं पाठविली आणि मार्गीं नवेशहर टाऊनपार व बरवडा वगैरे तमाम रजपुतांस सांडणीस्वार पाठविले कीं, तुम्ही तमाम जमाव करून रात्रींविरात्रीं फौजेवर घालणें आणि बनासी नदीचा घाट बंद करणें. खळ्यांतून मार्ग आहे. मेणे वगैरे एकच दंगा चोहींकडोन मांडला. गांवगांव गोळी वाजवीत रसत येऊं देईनात. फौज देशची लांबेल. अनाभिस्त, महागाई मोठी. रुपयाचें चार शेर पीठ झालें. तेव्हां श्रीमंत राजश्री अलीबहादरबाबा यांणीं बोलावून सल्ला पुसली कीं, पुढें मार्गाचा दंगा ऐसा, महागाई झाली. जैपूरच्या मुलखांतून जावयासी आठ रोज पाहिजेत याची काय तजवीज? तेव्हां आम्ही सांगितलें कीं, दोन मार्ग अद्याप आहेत. जैपूरच्या मुलखांतून जावें तों जबरदस्तीनें जावें; नाहीं तर जैपूरचा व बुंदीचा काकड आहे त्या मार्गांतून इंद्रगडावरून चमेलचा

---

१. नानाचा वकील सदाशिव दिनकर अभ्यंकर महादजीजवळ होता त्यास हें पत्र. तो स. १७८८ अखेर पुण्यास आला.

घाट दहा कोस आहे तिकडे चालावें. तेव्हां त्यांनीं आपले लहान मोठे सरदार जमा केले. त्यांजला सल्ला विचारली कीं, हे दोन्ही मार्ग आहेत, कोणत्या मार्गानें चालावें. तेव्हां लोकांनीं जैपूरच्या फौजेचा दंगा व गांवगर्दीचा दंगा व महागाईची अडचण जाणोन सल्ला दिली कीं, ईंद्रगडावरून चमेलच्या घाटावर जावें, हे सल्ला उत्तम. दोन दिवस अधिक लागले तर चिंता नाहीं. कदाचित् नीट मार्गानें जैपुरच्या मुलखांतून चालावयाचें असलें तर निमित्याचा जिमा आंबोजी इंगळे यांणीं आपला करून घ्यावा. श्रीमंतांची फौज आहे तेव्हां मोठ्या संकटांत पडलों कीं, या घोर चमेलच्या घाटावर जावें तर बदनक्ष होतो. इतका भारी सरंजाम हा जैपुरच्या काकडावरून माघारा न्यावा. तेव्हां रांगडे आधींच सेर झाले. आतां त्याहून अधिक सर होतील. यामुळें माघारा जातां ठीक नाहीं. सरदारापासोन अलीबहाद्दर रुसवा करून आले, तेव्हां माघारें जाणें ठीक नाहीं. नक्षावर दृष्ट देऊन जबरदस्तीनें जावें. निभलें तर उत्तम. न निभलें तरी श्रीमंतांकडील सरदार आणि सरंजामी फौज तैनाती आहे जाणोन अंदेशा. आपले सरकारचा सरंजाम असता तरी एक हातीं लोक, मनास वाटेल तिकडे निघोन जातों. दुसरें महाराजाची मर्जी न जाणो येविशीं कैसी हा अंदेशा, याजमुळें तीन कूच जैपुरचे व बुंदीचे काकडानें केलें. महागाई मोठी. रसद न ये तेव्हां कोकडाचे गांव दोन, चार जैपुरचे व दोन बुंदीचे मोडून रसद भरविली, व स्वस्थही झालें. लोकांस धीर आला. ऐसें करून इंद्रगडाजवळ आलों. एक मुकाम केला. चोहींकडून बातमीस माणसें पाठवून प्रात:कालीं कूच करून झपाई त्याचे घाटास चमेलीस जावें हा निश्चय झाला होता. तेव्हां संध्याकाळीं राजश्री अलीबहादर यांणीं बोलावून सांगितलें कीं, मी राजश्री तुकोजीबावापासोन रुसोन आलों, कीं मी राजश्री पाटीलबावाकडे जातों; आणि आतां माघारें जावें तर ठीक नाहीं. नीट जावें तों रांगडे जबरदस्त लोक. तुम्हांस म्हणतात कीं, निमित्याचे धनी तुम्ही होणें. त्याजमुळें हाहि अंदेशा करितां तरी तो न करावा. लोकांची खातरजमा करून साम दंड भेद करून कळेल तैसें करून नीट मार्गानें चालावें. तेव्हां संकट जाणोन महाराजाचे प्रतापें करून भुके रांगडे दोन चार वळणाचे होते त्यांजला पत्रें लिहिलीं. त्याजकडीलहि एक एक मनुष्य आलें; आणि इंद्रगडाहून कूच बारा कोसांचा नीट मार्ग नव्हे, शहराजवळोन भगवंतगडास येऊन मुकाम केला. तेथून आज कूच करून मल्हारण्यास आलों. येथून उदईक प्रातःकालीं कूच करून खुशालगडाजवळ दहा कोस जाऊं. तेथून हिंडोनाजवळ मुकाम करूं. दरमजलीनें साहेबांचे सेवेसी येऊन पोहचतों. जैपूरकरांनीं बनासचा घाट बंद करावयासी गंगारामशेट नवे शहरास होता, त्याजला लिहिलें कीं, तुम्ही दोन हजार माणूस जमा करून घाट बंद करणें. त्याजला आपले मुलखांतून जाऊं न देणें. घाट बंद करावा, तोंवर फौजहि येऊन पोहचेल. फौज आली म्हणजे लुटून घेणें. ऐसा फितूर मांडला होता. त्यास आम्ही मोठें कूच करून भगवंतगडास आलों, तों गंगारामशेट भगवंतगडास होता, त्याजकडे भला माणूस पाठवून त्याजला बोलावून बरोबर घेतलें. घाट बंद करावयाची तर

त्याजकडोन बनलीच नाहीं. आम्ही साम दंड भेद करून मशारनिल्हेस मल्हारण्यापावेतों घेऊन आलोंत. येथून याजला निरोप देऊं ऐसें वर्तमान असे. सर्व निर्वाह इकडील संकटाचा महाराजाचे प्रतापेंकरून दूर झाला. राजश्री अलीबहादर बाबा राजश्री सुभेदारापासोन रुसवा करून आले, तेव्हां अलीबहादराकडील वकील सुभेदारापाशीं होते, त्यांणीं आम्ही रदबदली केली कीं, चार महिने यांजला आज उद्यां चालतों ऐसें करून ठेविलें आणि ते न पुसत जातात. पुढें जैपुरचें रान. आपला त्यांचा बिघाड त्यास मुख्य तर आपणच चालावें. नाहीं तर काशीराव व बापू दोघांपैकीं एकास हजार पांचशें स्वार बरोबर देऊन त्याजपाशीं पाठवावें. पुढें चालतील. मागाहून आपण यावें. तेव्हां त्यांणीं या उभयतांची तर रवानगी न केली. एक कारकून व जैपूरचे दोन हलकारे ऐसी नेमणूक केली. तेव्हां कारकून अनभ्यस्त, उपयोग काय. हलकारे समागमें आले. कळावें. दुसरें राजश्री धर्मदास भवानी याजविशीं एक दोन वेळां सेवेसी विनंति लिहिलीच होती; आणि याजलाहि साहेबांचे चरणापाशीं येणेंच होतें. म्यांहि याची खातरजमा करून लावून ठेविलें होतें कीं, कदाचित् सुभेदार नच आले तरी अलीबहादर बाबा चालतील. त्यास नावा लांब, तोडजोडीचा माणूस बरोबर पाहिजे. त्यास धर्मदास सिद्ध करून ठेविलेच होते. तेव्हां सुभेदाराची परवानगी युक्तीनें घेतली कीं, हा वाकफ आहे याजला बरोबर नेऊं. त्यांणींहि परवानगी दिली; आणि याचें लक्ष चाकरीस होतें कीं, एकदां धन्यापाशीं जावें. तेव्हां याजला बरोबर घेतलें. पांचसहाशें स्वार सरंजाम चांगलाच आहे. या वेळेस यांणीं येथें चाकरी करून दाखविली. रांगड्यांशीं सामदंड लाविला. मार्गींहि चाकरी करीत येतात. सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

---

श्री

२७० श. १७१० का. शु. ११

(भा. व. २-३६) पौ छ १५ सफर बराबर डाक. ता. ९-११-१७८८

सेवेसी विनंती सेवक सदाशिव दिनकर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १० सफर मुक्काम बऱ्हाणपूर स्वामीचे कृपावलोकनें करून सेवकाचें वर्तमान यथास्थित असें विशेष. राजश्री पाटीलबावा यांचे लष्करांतून राजश्री विठ्ठल हरि व गंगाजी आव्हाड यांचीं पत्रें आश्विन वद्य दशमीचीं आलीं तीं सेवेसी पाठविलीं आहेत, त्यांजवरून तिकडील वर्तमान सविस्तर निवेदन होईल. स्वामींचे पुण्येंकरून मजला महायात्रा घडली. यात्रेस कुटुंब समागमें नेलें होतें. काशीहून निघतेसमयीं कुटुंब परभारा यात्रेसमागमें घरास वाटे लावून मी पाटीलबावांचे लष्करांत गेलों. यात्रेचें मांवदे अनायासें येथून पंचवीस कोस घर आहे तेथें जाऊन करावें असें मनांत होतें. परंतु सरकारकामाची निकड जाणोन घरचें जाणें ठेविलें. येथून एका दोहों रोजांनीं कूच करून दरमजल सेवेसी येतों. उज्जनीहून निघोन दरमजल महेश्वरास आलों. तेथून पार उतरून अहिल्याबाईचे निरोपास गेलों.

निरोप देईना. दिवाळी करून जा, मग निरोप देईन. आग्रह केला तेव्हां राहिलों. इतक्यांत राजश्री सदाशिवपंत दिवाण[1] अलीबहादर हेही महेश्वरास आले. त्यांची व गोविंदराव बारबकर यांच्या भेटी झाल्या. त्यांनीं दिवाळीची प्रतिपदा तेथें करून द्वितीयेस उज्जनीकडे कूच केलें कीं तेच दिवशीं मीं इकडे कूच केलें. येथें आलों. मध्यें पत्रीं आज्ञा आली कीं, लौकर येत नाहीं यास्तव घरचें जाणें मांवद्यानिमित्त व आठा वर्षांनीं देवाचें दर्शन व सर्वांच्या भेटीनिमित्त जाणें प्राप्त होतें, तें ठेवून पुढें जावयाचा नेम केला. परंतु शिबंदीचे देण्याचा करार येथील होता तो तजवीज करून निर्गम करण्यास दोन तीन रोज लागतील. निर्गम करून स्वार होऊन येतों. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

२७१ श्री

( भा. व. २-११७ )

श. १७१० का. व. २

ता. १५-११-१७८८

सेवेसी बाबूराव कृष्ण[2] करद्वय जोडून साष्टांग नमस्कार विज्ञापना छ१६ सफर-पावेतों स्वामीचे कृपावलोकनेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. मातोश्री बाइजाबाई मोहिते यांचे भ्रतार हरिचंद्र मोहिते पेशजी सरकारकामावर पाणिपतचे स्वारींत पडिले. येविशींचें वृत्त सर्व स्वामीस विदित आहे. मोहिते यांचे पोटीं संतान नाहीं. याजकरितां दत्तकपुत्र घेतला. त्यास हरिचंद्र मोहिते यांचे जातीची तैनात व पालखीचा सरंजाम सरकारांतून चालत होता, तो चिरंजीवांचे नांवें करार करून द्यावा म्हणोन बाइजाबाई यांणीं कलमबंदी लेहून दिल्ही. बंदोबस्त पुढें होईल असा शेरा कलमबंदीचे यादीवर सरकारांतून जाहला. ऐशास बाइजाबाई पुत्र श्रीमंत महाराज राजश्री छत्रपति स्वामीचे व श्रीमंत महाराज मातुश्री आईसाहेब यांचे दर्शनास घेऊन आली. त्याजवरून महाराजांनीं व आईसाहेब यांणीं सेवकास आज्ञा केली कीं, याचा पेशजीप्रमाणें बंदोबस्त याचे नांवें करून द्यावा, म्हणोन आपणास पत्र लेहून द्यावें. त्याजवरून विनंति लिहिली आहे. मोहिते महाराजांचे आप्त अगत्यांतील आहेत. यांचा बंदोबस्त करून देविणार स्वामी समर्थ आहेत. बाइजाबाई पुण्यांत खर्च खात बसली आहे. स्वामीनीं अगत्यवाद धरिला आहे तो सिद्धीस जावा. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

१. सदाशिव शामराव आस्वलकर. २. उपनांव आपटे यांचें पत्र साताऱ्याहून पुण्यास नाना फडणिसास.

श्री

२७२

( भा. व. २-२७ ) छ. २९ सफर तिसा समानीन. श. १७१० का. व. ८

ता. २१-११-१७८८

सेवेशी विनंति सेवक सदाशिव दिनकर साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ २२ सफर मुक्काम बऱ्हाणपूर स्वामीचे कृपावलोकानें करून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. राजश्री पाटीसबाबा यांचे लष्करांतून राजश्री विठ्ठल हरि व गंगाजी हुजरे यांचीं पत्रें कार्तिक शुद्ध अष्टमीचीं आलीं तीं पाठविलीं आहेत, त्यांवरून तिकडील वर्तमान अवगत होईल. राजश्री अलीबहादर यांच्या व राजश्री पाटीलबाबा यांच्या भेटी मथुरेवर झाल्याचें वर्तमान लिहिलें आहे.बहादर यांचींही पत्रें परभारा सेवेशीं आलीं आहेत. त्यांनींही साविस्तर लिहिलें असेल. सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

---

श्री

२७३

(भा. व. २-२६) श. १७१० मार्ग. शु. ९

ता. ७-१२-१७८८

पुरवणी सेवेसी आपाजी बाबाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति विज्ञापना. गुलामाचें जाणेयाचें व राणेखान भाई याजला हल्ला करणें याविशीचें वगैरे सांगणेयाचा मजकूर श्रीमंत राजश्री अलीबहादूरबाबा यांणीं सेवेसी विनंति पत्र लिहिलें आहे त्यावरून श्रुत होईल. राजश्री सदाशिवपंत आसवलकर अद्याप आले नाहीं. सिप्रीस आले म्हणोन पत्र आलें होतें. आम्हांबरोबर फौज किती आली हें ध्यानांतच आहे. राजश्री तुकोजी होळकर यांस सोडून रांगड्याचे तोंडावरून स्वामीचा नक्ष राखोन येणें प्राप्त झालें. तेसमयीं नवे स्वार आठ नवशें ठेविले होते. राजश्री पाटीलबाबांनीं भेट झाल्यावर पुसिलें कीं, फौज बरोबर किती आहे ? तेव्हां सांगितलें कीं नऊ दहा हजार आहे. मागून दिवाणाबरोबर चार हजार येत आहे. याप्रमाणें सांगितलें. मेरटास आल्यावर आम्हांस गोसगडाचे तोंडचे मार्गावर उतरावयास सांगितलें, आणि छबिना बसवायास जागा दाखविली. त्या जाग्यांत छबिन्यास फौज दहा हजार असावी, ऐसी जागा दाखविली. तेव्हां फौज थोडी हें बोलतां नये, तेव्हां आणखी एक हजार स्वार नवे ठेविले. तेव्हां कार्याकरण छबिना खबरदारीनें ठेवीत गेलों. रात्रीस खासा श्रीमंत अलीबहादर छबिन्यास जाऊन बसत होते. गुलाम पळाला तर आम्हांकडे नाकेरेपण येईल म्हणोन नवी फौज ठेवणें व खासा जाणें प्राप्त, त्यांत गोसगडाचा रस्ता हाच, याकरितां समय पाहून करणें प्राप्तखर्च दरमहा नवे फौजेचे रोजमऱ्याचा तोफा पाटीलबावांनीं दिल्या त्याचा वासला, एकूण दरमहा एक लाख रुपये लागूं लागले. व शिवाय सदाशिवपंत यांजबरोबरील फौज आल्यावर जाजती होईल. आजपर्यंत कोठील पैसा आला नाहीं. पुढेंही सालअखेरपर्यंत यावयाचा नाहीं. आषाढ श्रावण मासापुढें मुलखांतील

थोडीबहुत रसद आली तर येईल. तूर्त मुलूख वैराण आहे. खर्चाची व फौजेची बेगमी तेथून झाली पाहिजे. झालें वर्तमान सेवेसी लिहिलें आहे. पत्राचें उत्तर वरचेवर आल्यास सेवकास चाकरीची उमेद येईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

श्री.

२७४ श. १७१० मार्ग. व. ६
( भा. व. २-२९ ) ता. १८-१२-१७८८

पौ छ १० रबिलाखर सन तिसा पौष बरोबर डाक.

सेवेसी आपाजी बाबाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति विज्ञापना. येथील कुशल तागाईत छ १९ रबिलावलपावेतों मुक्काम मेरट सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. राजश्री पाटीलबावांच्या भेटी होऊन बहुमान परस्परें झाले. जरीपटका व चवघडा दिल्हा, हें वर्तमान पेशजी सेवेसी लिहिलेंच आहे; व दिल्लीचे व पातशहाचे बंदोबस्तास दिल्लीस जात आहों, हेंहि सेवेसी पहिलें लिहिलें आहे. त्याजवर मथुरेहून निघोन बलमगडपर्यंत आलों. त्यास गुलामकादर मेरटांत राजश्री पाटीलबावांच्या फौजेनें घेरला होता. पारपत्य लौकर न होई म्हणोन राजश्री पाटीलबावांचीं पत्रें आलीं कीं, आधीं मेरटास जाऊन गुलामाचें पारपत्य करावें. त्यावरून यमुना येथें उतरोन दरमजल येथें आलों. आल्यावर सभोंवत्या पाटीलबावांच्या फौजा उभ्या होत्याच. परंतु चोरून मारून रस्त जात होती म्हणून दम खाऊन होता. आपल्या फौजा आलीयावर कही व रस्त झाडून बंद पडली. आम्ही आल्याचे पूर्वी नेहमीं सोळा शेर धारण होती. आल्यापासून रोज शेर दीड शेर कमती होत होत तीन शेरांवर आली. तेही कोठें मिळेना. मग आंतून लोक स्वार व पायींचे थोडथोडे पळून येऊं लागले. ऐसे तीन रोज येत होते. इतक्यांत गुलामानें भेटीचें बोलणें रायाजी पाटील यांजकडे लाविलें, आणि बाहेर येऊन देवजी गौळी पुढें गेले त्यांची थांची भेट झाली. रायाजी पाटिलांनीं भेटावें तों सायंकाळ झाली, म्हणोन गेले नाहीं. तो माघारा मेरटांत गेला. दुसरे रोजीं गुलाम बाहेर येत होता. इतक्यांत इकडील तोफेचा गोळा त्याचे लोकांत पडोन एक दोघे मेले व घोडा पडला. तेव्हां आज येत नाहीं, उदईक येईन ऐसें सांगोन पाठविलें. मग तिसरे रोजीं छ १८ रबिलावलीं यावें तो आंतून रयत वगैरे त्याकडील लोक तमाम तिसरे प्रहरापासून पळोन येऊं लागले. जे पळोन येत होते त्यांस सोदे व पेंढारी वगैरे लुटीत होते. सायंकाळीं दिवसाचा छबिना होता तो सायंकाळीं गोटांत येऊन गोटांतून रात्रीचे छबिन्यास फौज जात येत होती. त्या वेळेस अस्तमानचे वेळेस गुलाम सडा सर्व दौलत टाकून दोन तीनशां स्वारांनिशीं पळोन दिल्लीचे रोखें बाहेर निघोन पळोन गेला. आम्ही गोसगडाचे मार्गावर नेहमीं मुकाम करून होतों व छबिनाही बहुत चौकशीनें ठेवीत होतों. गुलाम आज पळणार हें कळलें. त्यावरून राणेखान भाई वगैरे यांस

सांगून पाठविलें कीं, आज पळणार, तुम्ही आपले छबिन्यास ताकीद करावी आणि खबरदार राहावें. ऐसें सांगोन पाठवून खासा श्रीमंत श्री अलीबहादूर छबिन्यास जाऊन उभे राहिले. ज्या मार्गे गुलाम गेला त्या तोंडावर छबिना रायाजी पाटील, देवजी गौळी, जिवबादादा बक्षी ऐसे होते. त्या तोंडावरून पळोन गेला. पेंढारी सोदे वगैरे तमाम लुटारे मेरटांत जाऊन लूट हत्ती घोडे वगैरे आणूं लागले. तेव्हां भाईकडे सांगून पाठविलें कीं, लूट तर आंतून येती. गुलाम कोठें आहे म्हणोन सांगोन पाठविलें. उत्तर आलें कीं, तथ्य बातमी नाहीं. गुलाम ज्या छबिन्यावरून गेला त्या छबिन्यास व आम्हांस अडीच कोसांचें अंतर होतें. बातमी लौकर न येई. तेव्हां बातमी आणविली कीं, गुलाम कोठें आहे? त्यास पळोन गेला ऐसें कळलें. तों दीड प्रहर रात्र झाली, तेव्हां राजश्री यशवंतराव नाईक व भवानजी लोखंडे व पवाराचें पथक ऐसे दोन अडीच हजार स्वार गोसगडाच्या मार्गे फौज रवाना केली आहे. फौजेनें गोसगडापर्यंत जावें ऐसें सांगितलें आहे. मग पहावें. गुलामाची दौलत तों चोरापोरी लुटीस गेली. तोफा व हत्ती मात्र पाटीलबावांकडील फौजेकडे आले. आम्हांकडे पुरंदरे यांजकडील लुटारे यांणीं तीन हत्ती आणिले व निंबाळकरांकडील यांणीं एक हत्ती आणिला, व उमाजी वाघाकडील यांणीं एक आणिला. खास पथकांतील यांणीं चार आणिले. तोफाही आपल्याकडे पांच आल्या. वरकड त्यांजकडे गेल्या. गुलामानें छबिन्यांतून पळोन जावें ऐसें नव्हतें. मग कसा काय गेला याचें आश्चर्य वाटतें. भाई वगैरे सरदार यांस निसिद फार केलें. तूर्त तो गेला. पुढें होईल तें सेवेसी लिहून पाठवीन. सारांश मसलतीस आज्ञेप्रमाणें हरवख्त येऊन दाखल झालों. सर्व गोष्टी स्वामींचे पुण्यप्रतापें घडोन येतील. खर्चाचा ताप मोठा बसला व नालबंदीकारितां लोक गवगवा करणार. झालें वृत्त सेवेसी लिहिलें आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

२७५ श्री

(भा. व. २-२३) श. १७१० पौष व. ३
ता. १४-१-१७८९

सेवेसीं आपाजी बाबाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति विज्ञापना. येथील कुशल तागाईत छ १७ रबिलाखर मुक्काम कुंजपुरा स्वामींचे कृपेंकरून क्षेम असे विशेष. मेरटास आलों, तेव्हां सविस्तर सेवेसी लिहिलें व गुलाम कादर धरला म्हणोन संकलित सेवेसीं कळावें म्हणोन विनंतीपत्र लिहिलेंच आहे. त्याजवर गुलाम कादर मथुरेस पाठवून राजश्री पाटीलबावांस पत्र लिहिलें कीं, गुलामाची मसलत उरकली. आतां गुलामाची आई पळोन शीखांत गेली, ती हातीं लागणें कठिण. जिकडे गेली तिकडे गेल्यानें शीख बहुत जमाव भारी तीस चाळीस हजार आहे. तेव्हां शहास गुंतावें हें ठीक नाहीं. पुढें पाऊल दिलें मग मागें टाकावें हें ठीक नाहीं. गोसगड व सारनपूर येथील बंदोबस्तास तुमची आमची फौज गेलीच आहे.

त्याअर्थी तुमची फौज राणेखान भाई व आम्ही याच दाबानें जयपुरावर शह देऊं. तह झाल्यास उत्तम, नाहीं तर पारपत्य करूं. रांगड्यांपुरतें आम्हांमध्यें बल आहे. दाबानें मसलत लौकर आटोपून येईल. ऐसीं दोन पत्रें पाठविलीं. परंतु पत्रें पावून उत्तर येई-तोंपर्यंत पयदरपयी पाटीलबावांचीं पत्रें येत गेलीं कीं, गुलामाचीं रांडापोरें जेथें गेलीं असतील, डोंगरांत गेलीं तरी तेथें जाऊन हस्तगत करावीं. हस्तगत झालीं म्हणजे चार रुपये मिळ-तील ऐसींच येत गेलीं. व आपले सरदारांस निरनिराळीं लिहिलीं. त्यावरून पाटीलबावां-कडील भाई वगैरे सरदार पुढें जाऊं लागले. मग आम्हीं न जावें तर लौकिक वाईट दिसतो व मसलतीची खामी केली, चार रुपये बुडविले, ऐसें होतें. हें समजोन आम्हींहि दरकूच गोसगडास आलों. इतक्यांत पाटीलबावांचीं पत्रें आलीं कीं, तुम्हीं तेथेंच मुकाम करून फौज पुढें रांडापोरें धरून आणावयास रवाना करणें म्हणोन आलीं. त्यास पाटीलबावांचे फौजेंत खर्चाचा गवगवा फार. फौज पुढें जावयास अनमान करूं लागली. आमचे फौजेपैकीं अडीच हजार फौज व रायाजी पाटील घेऊन सारनपुराकडे बंदोबस्तास गेला. तेव्हां पुढें किती पाठवावी, आम्हीं जवळ किती ठेवावी हें जाणोन आम्हींच कूच करून चालिलों, ते यमुनेजवळ आलों. इतक्यांत राजश्री पाटीलबावांचीं पत्रें आलीं कीं, फौज पुढें करून तुम्हीं दोन अडीचशें स्वारांनिशीं निघोन आम्हांजवळ यावें. म्हणजे आग्रे, रामगड व मुलूख स्वाधीन करून घेणें त्याचे बंदोबस्ताचें बोलणें बोलूं. आमची फौज येथें आल्यावर बैदा पडेल, बोलणें होणार नाहीं. यास्तव जलद येणें म्हणोन आलीं. त्यास यमुना उतरून मुकाम मजकुरीं आलों. आतां फौज ठेवून मथुरेस आलों तर हवा फिरेल. यास्तव येणें ठीक नाहीं. गुलामाचीं रांडापोरें येथून पळोन शीखांनीं नेलीं. त्यांचे शोधास कोठें आहेत या शोधास पाठविलें आहे. बातमी आली म्हणजे हस्तगत करून शीखांकडील व पटाळे-वाला जमीदार आहे, त्याजकडे कांहीं खंडणी करार करूं. त्याचे वसुलास फौज ठेवून आम्ही सडेच येतों, ऐसीं पत्रें मथुरेस पाठविलीं आहेत. कुंजपुरेवाला पठाण याणें रांडापोरें काढून दिलीं हें निमित्य ठेवून त्यास अटक करून कुंजपुऱ्याचे जप्तीस आजच लोक पाठविले व तमाम शीखांस पत्रें भेटीस येणें म्हणोन पाठविलीं आहेत. इतक्यांत रांडापोरें कोठें आहेत ही बातमीहि येईल. हस्तगत होत ऐसीं असलीया दौड करून धरून आणूं, नाहीं तर शीखाशीं सामदाम करून माघारे मथुरेस जाऊं. बोढेकराचें पथक व खासा राजश्री रंगराव आपा अद्याप आले नाहीं. फौजेमुळें आपलें कमी फार पडलें. परंतु स्वामीचे कृपेंकरून आबा-ताबानें रहात आहों. आणखी फौज दहा पंधरा हजार असती तर सारेच आपले हाताखालीं नांदते असोत. तथापि जोरानेंच आहों. राजश्री सदाशिवपंत आस्वलकर गोसगडाजवळ येऊन दाखल झाले. गुलामास धरावयाचीं कारस्थानी कसकसी सेवकानें केली हें सेवेसी परस्परें श्रुत होईल, मीं लिहून कळवावें ऐसें नाहीं. गुलाम धरिला ते समयीं सेवकास एक गांव इनाम हजार रुपये वसुलाचा द्यावयास श्रीमंत राजश्री अलीबहादूर बाबांनीं केला आहे; आणि त्यांणीं सेवेसीं लिहिलें आहे. सेवकावर कृपाळु होऊन गांव देणार धनी समर्थ आहेत.

आजपर्यंत कारस्थानास आज्ञेप्रमाणें कमी केलें नाहीं. तथापि कमी पडिलें असेल तर क्षमा करणार धनीच समर्थ आहेत. सेवेसीं पत्रें लिहितों त्यांचें उत्तर येत नाहीं, यामुळें बहुत खेद वाटतो. यास्तव कृपाळु होऊन सेवकास उत्तर पाठवावयाची आज्ञा झाली पाहिजे मागाहून होईल मजकूर तो सेवेसीं लिहीत जाईन. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

२७६ श्री

( भा. व. २-४ )

श. १७१० फा. व. ३
ता. १४-३-१७८९

राजश्रीयाविराजित राजमान्य राजश्री हरिपंत तात्या स्वामींचे सेवेसी,

पोष्य सदाशिव राम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल तागाईत छ १६ जमादिलाखर मुक्काम पैठण गंगा दक्षणतीर यथास्थित असे विशेष. श्रीमंत राजश्री नाना यांचीं व आपलीं पत्रें राजश्री रघोजी भोसले सेनासाहेब सुभा यांस श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांच्या भेटीस येण्याविशीं ममतायुक्त आलीं, त्यांवरून बहुत संतोषास पावून भेटीस यावयाचा विचार ठरावून निघण्याचा उद्योग करावयास लागले. त्यांत पाहतांना निघण्यास गुंते घरचे व बाहेरील अनेका प्रकारचे, त्याचा तपसील लिहावयास पुरावयाचा नाहीं. सालमजकुरीं येणें घडावें असें नव्हतें; परंतु आपल्या व नानाच्या पत्रावरून ममतेचे अर्थ लिहिले ते भरून राहिले. त्याजवरून गुंते घरचे व बाहेरचे कुल एकीकडे ठेवून भेटीस यावयाचा विचार ठरावून मुहूर्त निघण्यास पाहून निघाले. पुढें मजला व राजश्री भवानीपंत मुनसीजी यांस पाठवावें, मागून आपण यावें असा विचार योजिला होता. त्याजवर फिरून आपलीं पत्रें व नानाचीं लोभाचीं आलीं जे, उभयतांस पुढें पाठवावें, मागून आपण यावें, इतका विचार येथें येण्यास लागत नाहीं. हेंही घर आपलेंच आहे. उभयतांस समागमें घेऊन आपलें येणें लौकर घडावें. तीं पत्रें यांणीं वाचून पाहिल्यावर विशेष आनंद होऊन आमचें उभयतांचें पुढें जाणें नेमलें होतें तें तहकूब करून, खासा स्वारीनें चालावयाचा निश्चय करून वराडांत आले. तेथील गुंते पाहतांना निदान चार महिने लागणार, तेव्हां वराडचीं कामें पुण्याहून आल्यावर करण्यास ठेवून आठ नऊ मुक्काम जागा जागा जरुरीकरितां करून राजश्री व्यंकोजी भोसले यांस उमरावतीपासून व सलाबतखान व विठ्ठलपंत सुभेदार व सिलमिखान यांस लाखनवाडयापासून निरोप देऊन लांब लांब मजली करून छ १५ तारखेस मुक्काम मजकुरीं दाखल जाहले. आजचा मुक्काम येथील लोकांच्या रदबदलीवरून मात्र केला आहे. उदईक येथून कूच करून दरमजल भेटीकरितां येत असेत. भेटीचा मुहूर्त पाहतां या महिन्यांत वद्य पंचमी व एकादशी दोन निघाले. पुढें चैत्र पौर्णिमेपर्यंत दिवस चांगले नाहींत. पंचमी येण्यास आटोपत नाहीं. एकादशी रविवारीं छ २४ तारखेस मुहूर्त भेटीचा पाहून ठेविला आहे. त्या दिवसाच्या सुमारास उदईक कूच

करून मजलींनीं येत असेत. आपल्या लोभाच्या लिहिण्यावर व करण्यावर दृष्ट ठेवून सर्व गुंते व कामें एकीकडे यांणीं ठेवून येत आहेत. हें ओझें यांणीं आपल्यावर ठेविलें आहे. याचा निर्वाह करणार आपण आहेत. येविशींचा तपशील जी समक्ष विनंति माझ्या करण्यांत येईल त्यावरून आपल्या ध्यानास येईल. बहुत काय लिहिणें कृपालोभ असों दिल्हा पाहिजे हे विनंति.

---

२७८ श्री

( भा. व. २-१०८ ) श. १७१० फा. व. ४
ता. १५-३-१७८९

पौ.छ २४ जमादिलाखर.

सेवेसी विनंति. सेवक सदाशिव रघुनाथ साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान तागाईत छ १७ जमादिलाखरपर्यंत यथास्थित असे विशेष. तीर्थस्वरूप राजश्री माधवराव तुकदेव व यशवंतराव नाईक निंबाळकर यांचा मजकूर पेशजी स्वामीस लिहिला, त्याजविशीं आज्ञा झाली कीं, त्याजविशींची चिंता न करणें, ते तुमच्या प्रांतास उपद्रव देणार नाहींत, आणि पत्रें व हुजरे तेथून त्यांजकडे रवाना केले. त्याजवरून राजश्री अदोपंत यांणीं लिहिले कीं, ते उपद्रव जिल्हेंत करणार नाहींत. त्यांस काम सांगितलें आहे त्या कामास जातील. असें असतां पंढरपुरास गेले. तेथून माघारे माधवराव म्हसवडास आले. पांच हजार रुपये घासदाणा देणें म्हणून राजश्री रताजी माने यास तगादा केला त्याजमुळें त्यांची व यांची गोळी वाजली. धूम मांडली आहे. आमची फौज आह्माजवळ नाहीं. स्वामीस लिहिलें असतां स्वामींनीं तुम्ही स्वस्थ असा ह्मणोन अश्वासन दिलें, याजमुळें आम्ही बेफाम राहिलों. याजमुळें त्यांणीं फैल केला आहे. हे उपद्रव करावयास चुकत नाहींत. स्वामींनीं कार्य सांगितलें तें एकीकडे ठेवून स्वदेशींच दंगा आरंभिला आहे. जिल्हे लुटूं द्यावी असें असल्यास उगेच राहूं. नांव त्याचें घेणार नाहीं. जिल्हे रक्षावी अशी मर्जी असल्यास तशीच आज्ञा करावी. होईल तितकी चाकरी करूं. फौज आमची पाठवावी. हें मूळ निर्माण झालें हें ठीक नाहीं. काल शनिवारीं मानाजी शिंदे दोनशें स्वारांनिशीं कराडावरून मशारनिल्हे यांजकडे गेले. डोंगरीहून मध्यरात्री निघाले ते प्रातःकाळचे सहा घटका दिवसास कराडानजीक आले. पुढें सुचनेस कारकून पाठविले कीं, श्रीमंताचे आज्ञेवरून जातों. समागमें हुजरे व कारकून आहेत. स्वराज्यांत उपद्रव अगर बखेडा आम्हास करावयाचा नाहीं असें बोलून निघोन गेले. ते व हे एक होणार. आपण त्यांस काय आज्ञा केला असेल ते असो; परंतु सध्यां जिल्हेचा भोग इतकें खरें. माधवराव जिल्हे लुटतात हें आमच्यानें पहावत नाहीं. आपलें पत्र यावें इतकी मार्गप्रतीक्षा करीत आहों. उत्तर यावयाची

आज्ञा निक्षून होऊन उत्तर आलें म्हणजे त्याप्रमाणें करूं. आमची फौज वरती आली असेल ती इकडे रवाना करावयास आज्ञा केली म्हणजे इकडील बंदोबस्त करूं. मागती आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक करीन. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

२७८ श्री

(भा. व. २-२४) श. १७१० फा. व. ११

ता. २२-३-१७८९

पौ छ ९ रजब तिसा.

सेवेसी आपाजी बाबाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति विज्ञापना. येथील कुशल तागाईत छ २४ जामादिलाखरपावेतों मुक्काम श्री मथुरा स्वामी कृपेकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामींनीं कृपा करून सेवकाचे पत्राचें उत्तर छ ५ जमादिलाखरचें पाठविलें तें छ २२ रोजीं पावलें. पावोन बहुत आनंद झाला. श्रीमंत राजश्री अलीबहादूर बाबा यांचे पत्रीं मजकूर राजश्री पाटीलबावांजवळ बोलावयाचा लिहिला, त्यास त्याच अन्वयें पत्रापूर्वीच एकांतीं उभयतांच बसोन बोलावयाचें तें बोललों, परंतु त्यांचा आग्रह एकच कीं अलीबहादरानीं कारभार सांभाळल्यास उत्तम बंदोबस्त करून देऊं. कदाचित् कबूल न करीत तर एखादा सरदार ठेवावा. त्याजबरोबर अलीबहादर यास ठेवावें आणि आपण देशीं जावें. हाच निश्चय पुरतेपणें दिसोन येतो. स्वामीआज्ञेप्रमाणें कबूल करीत नाहींत. परंतु त्याणीं एखादा सरदार ठेवून त्याचे ताबीनातीस देऊं लागले तर रहावें कीं त्यांजबरोबर उठोन यावें येविशींचीं आज्ञा येईल त्याप्रमाणें करतील. पटाळेवाले यांचा मजकूर वगैरे श्रीमंत अलीबहादूर बाबांनीं सेवेसी लिहिलें आहे त्यावरून श्रुत होईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

२७९ श्री

(ना. भो. ५) ता. १०-५-१७८९.

श. १७११ वै. ब. १

राजेश्री व्यंकोजी[1] भोसले सेनाधुरंधर गोसावी यांस सकळ गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य. स्नेहांकित माधवराव नारायण पंत प्रधान आशीर्वाद उपरी येथील कुशळ जाणून स्वकीय कुशळ लिहीत जावें. विशेष राजश्री रघोजी भोसले सेनासाहेब सुभा पुण्यास आले. भेटी झाल्या. मुधोजी भोसले कैलासवासी झाले याजकरितां सेनाधुरं-

---

१. हा मुधोजीचा कनिष्ठ पुत्र. याचा जन्म चंद्रपूर येथें शके १६८८ श्रावण वद्य द्वादशी सोमवारीं झाला. यास " मन्याबापू नानासाहेब " असें म्हणत.

धरीचें पद त्यांचे नांवें होतें तें तुमचे नांवें सरकारांतून करार करून दिलें पाहिजे म्हणून बोलले, त्याजवरून सेनाधुरंधरीचें पद तुमचे नांवें करार करून पदाचीं वस्त्रें व जवाहीर व हत्ती व शिक्के कटार पाठविली असे. आलाहिदा याद आहे त्याप्रमाणें ध्यावी, आणि मुधोजी भोसले याजकडेस सरंजाम चालत आला आहे त्याप्रमाणें बंदोबस्त करून सरकार लक्षांत राहून सेवा एकनिष्ठपणें करून सेनासाहेब सुभ्याचे लक्षाप्रमाणें वर्तणूक करावी. रा छ. १४ माहे साबान सु॥तिसा समानीन मया तैन[1] अल्लफ; बहुत काय लिहिणें हे विनंती. लेखनसीमा,

---

२८०　　　　श्री

( भा. व. २-१६२ )

आ. व. ७ शके १७११
ता. ११-१०-१७८९

साहेब मेहरबान फौजबक्ष फौजरशान नानासाहेब सलामतः---

खिजमतीस महमद साहेबखान टोंके पो डांगरी निशात बंदगी येथील खैरसला तागाईत छ २१ माहे मोहरम साहेबीं हमेशा पत्र पाठवून सरफराज केलें पाहिजे. दिगर भाई महादजी शिंदे यांचे निसबतीस देऊन हिंदुस्थानांत पाठविलें. त्यांहीं आम्हांस राणेखानभाई यांचे गोटांत ठेविलें. आज्ञेप्रमाणें सरकारचाकरी दहा वर्षें केली. खासा असामी एक, दोन भाकरी पोटास व अंगास वस्त्रें दोन वर्षांनीं द्यावीं. चोळणा दोन पैसे हात कापडाचा त्यास चार ठिगळें लागे तेथपावेतों दुसरा द्यावयाची आज्ञा नाहीं व खर्चावयास दहा वर्षांत धातुस्पर्श न जाहला व मनस्वी बोलूं लागले तें सोसून आज्ञेप्रमाणें राहिलों. त्यास साल-मजकुरीं राजश्री पाटीलबावा व राणेखानभाई या उभयतांनीं छावणीकरितां उज्जनीस जावयास निरोप दिला. तेव्हां निघालों तें एक मजल येऊन भाई राणेखान यांस सांगून पाठविलें कीं, आम्ही मातोश्रीचे भेटीस परगणीयांत जातों. पेशजीं एक दोन वेळां भाईंनीं सांगितलें होतें, तुम्ही आपलें घर व परगणा संभाळीत नाहीं हें ठीक नव्हे. तेथून निघालों ते सुरोज भेलशास आलों. समागमें भाईचे चिरंजीव होते ते उज्जनीस गेले. आम्ही निघोन परगणे मजकुरीं आलों. मातुश्रीची भेट घेऊन साहेबापाशीं यावें ऐसीयासी राणेखानभाईकडून महादजी पाटील यांणीं राजश्री बाळाजीपंत जांबगांवकर यासी पत्र पाठवून साहेबांस गैरवाका समजाविला कीं, टोंके न पुसतां हिंदुस्थानांतून येऊन महालीं बखेडा जमीदारास मेळवून केला म्हणोन आम्हांस सरकारचें आज्ञापत्र छ २६ जिल्कादचें पाठविलें तें छ मजकुरीं पाऊन बहुत चिंता निर्माण जाहली. हल्लीं जमीदार व पाटील भेटले. कोण्हापाशीं एक पैसा न मागतां वारीकरांनीं पांचशें स्वार व चारशें माणूस परगणीयांत आणून गांव

---

1. तैन शब्द नको.

अफरातफरी करावे, लूट माफ, ऐसा लोकांशीं करार करून ठाणें शिरसाळेयासी चढाई करून आले. त्याजवरून ठाणें सोडून दिल्हें. प्राण वांचवावयासी पहाडांत गेलों. मागें जमीदारांचीं घरें जमीनदोस्त करून माती तापींत टाकून दिल्ही. वस्तभाव वगैरे घेऊन गेले. कबिले व पांचसात गांवचे पाटील धरून कैदेंत ठेविले, व पांचसात गांवचे पाटील कुलकर्णी यांचा खंड करून ऐवज घेतला. नानाप्रकारें रयतीची छळणा करून परगणीयाचे गांव उजाड केले. रयतेस ताकीद केली कीं, टोके यास भेटूं नये, भेटल्यास पारपत्य होईल. आम्हांस धरून कैद करावें या अर्थी स्वार आमचे पाठीस लाविले. जीव वांचवावयाचें संकट पडिलें व खर्चीस कांहीं जवळ नाहीं. पुण्यास यावें तरी मार्गी चवक्या व स्वार प्यादे बसविले. तेव्हां बहुत चिंतेंत होतों. तशांत राजश्री बाळाजीराम व गणेश नारायण येथून पाठविले, त्यांहीं मालुमांत आपणास जाहीर केली विनंति मान्य करून आज्ञा केली कीं हुजूर यावें. याप्रमाणें पत्राची व हुजऱ्याची परवानगी जाहलीयावर मशारनिल्हेनीं राजश्री गणेशराम आम्हाकडे पाठविले. त्यांणीं जबानी वर्तमान सांगितलें त्यावरून समाधान जाहलें. पहाडांतून येऊन मौजे मांडलपरा डोंगरी येथें बसलों आहों. राजश्री गणेश नारायण व बाळाजीराम साहेबांस विनंति करतील ती मान्य करून पत्रें द्यावयाची आज्ञा केली पाहिजे. पेशजीं एक दोन पत्रें सेवेसी पाठविलीं होतीं तीं पावलींच असतील. आज्ञा येईल त्याप्रमाणें वर्तणूक करूं. सेवाचाकरी साहेबांची आम्हांकडून घडोन आली नाहीं. साहेबांचे पदरचे असों. वडिलांपासून आपण चालवीत आहां त्याप्रमाणें पुढेंहि चालवणार आपणच आहेत. वडिलांमागें आपण आम्हास वडील. सांभाळ सर्व प्रकारें करणार धनी समर्थ आहेत. जादा काय ल्याहावें. प्यार मोहबत असो द्यावा हे अर्ज. खिजमतीस रोश न होय हे किताबत.

---

श्री आश्विन व. ७ श. १७११

## २८१

११-१०-१७८९ ?

( भा. व. २-१५९ )

सेवेसी बेगम टोके[1] चरणारविंदी मस्तक ठेवून विज्ञापना. सावकार वगैरे यांणीं उपद्रव बहुत दिला आणि संसाराचा गलाठा आला यास्तव तोंड चुकावून जात होतों. त्यास राजश्री बहेरोपंतबाबा यांणीं मना करून राहविलें आहे. तो बागांत राहिला त्यास स्वामी कृपाळु होऊन बंदोबस्त करून देत असल्यास यादी पाठविली आहे. येविशीं आज्ञा व्हावी; अथवा आम्हास निरोप द्यावा कीं आपले जिवाचें सार्थक मकेस जाऊन करूं. आमचीं मुलें पायांपाशीं आहेत त्याजवर कृपा मजप्रमाणेंच करीत जावी. सविस्तर विनंति मुलें करतील हे विज्ञापना.

---

1. साहेबखान टोके याची मातुश्री असावी.

२८२ श्री

( भा. व. २ अ. दि. ५ ) श. १७११ का. व. १४
ता. १६-११-१७८९

सेवेसी श्रीराम सदाशिव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ता। छ २७ सफर यथास्थित असो. विशेष. राजश्री रघोजी भोसले सेनासाहेब सुभा यांजकडील दिनचर्याः— छ. ५ रोज. बाळाबाई[1] यांचे घरीं मेजवानी झाली. मुत्सद्दी मंडळी व मानकरी व पठाण वगैरे झाडून भोजनास आले होते. चार घडी कलवंतिणीचा नाच झाला. छ. ६ रोज प्रातःकाळीं स्नान देवपूजा करून रंगोबा नाईक वानवळे व महादजी लष्करी व जानो यशवंत पाग्या यांशीं चार घडी खलबत झालें; तोफखान्यास बैल नवे खरेदी वराडाहून आणले होते ते पाहिले. छ ७ रोज प्रातःकाळीं स्नान देवपूजा करून महादाजी लष्करी व जानो यशवंत यांशीं दोन घडी खलबत करून चिमाबाई यांजकडे प्रहरभर खलबत झालें. तिसरा प्रहरीं नजरबागांत बसून दहा वीस कोंबडी आणवून झुंजविलीं. सायंकाळीं व्यंकोजी भोसले यांची स्वारी शामराव ढगे शिलेदार याचे घरास गेली. पेशजी शिवणी हुसंगाबादेकडे कज्जा झाला, तेथें एक दोन मनुष्यें घोडीं जायां झालीं. त्यांत ढगे मजकूर याचे पुत्रास देवाज्ञा झाली, म्हणून त्याचे घरास जाऊन त्याचें समाधान करून क्षणभर बसून आले. छ ८ रोज प्रातःकाळीं स्नान देवपूजा करून हजामत केली. तेथें श्रीधर लक्ष्मण मुनसी व महादाजी लष्करी यांशीं खलबत झालें. तिसरा प्रहरीं नजरबागांत चार घडी बसले. घोडीं आणून पाहिलीं. छ ९ रोज प्रातःकाळीं स्नान देवपूजा करून चिमाबाई यांजकडे प्रहरदिवसपर्यंत खलबत झालें. तिसरा प्रहरीं बागांत बसून तरवारी आणून पाहिल्या. सायंकाळीं महादाजी उमाजी सिलेखानी याचे घरास स्वारी गेली. तेथें एकादशीस कथा झाली. चार घडी कथा श्रवण करून आले. छ १० रोज प्रातःकाळीं स्नान देवपूजा करून उभयतां स्वारी व मुत्सद्दी मंडळी मिळून भवानी नागनाथ मुनसी याचे घरास गेले. तेथें चार घडी खलबत करून आले. यावर द्वादशीचीं भोजनें केलीं. तिसरा प्रहरीं नजरबागांत चार घडी बसून सायंकाळीं तुळशीचें लग्न लावलें. छ ११ रोज प्रातःकाळीं स्नान देवपूजा करून दोनप्रहर पावेतों बाईकडे खलबत झालें. तिसरा प्रहरीं महादाजी लष्करी याशीं चार घडी खलबत करून, सायंकाळीं स्नान करून शनिप्रदोष होता, भोजन केलें. छ १२ रोज प्रातःकाळीं स्नान देवपूजा करून महादाजी लष्करी याशीं चार घडी दोनप्रहर पावेतों जामदारखान्यांत बसले होते. तिसरा प्रहरीं नजरबागांत पंधरा वीस कोंबडीं आणवून झुंजविलीं. उभयतां स्वारी विठोबास गेली. छ. १३ रोज प्रातःकाळीं स्नान देवपूजा करून प्रहर दिवसां स्वारी सर्वांची उमाजी महादेव सिलेखानी व शिवराम हरि खाजगीवाले यांचे घरास गेली. तेथें कार्तिकीचा उत्सव होत असतो. आज ललीत झालें. दोन घडी उभयतांचे घरीं बसून ललीत झाल्यावर आले. छ १४ रोज ग्रहणास वीस गोदानें दिलीं, व

१ राघूच्या बहिणी तीन, बाळाबाई मोहिते, ठकूबाई गुजर व झिंगराबाई मोहिते.

शंभर दीडशें ब्राह्मणास, कोणास पावली, कोणास अधेली याप्रमाणें दक्षणा दिली. तिसरा प्रहरीं स्वारी शुक्रवार तळ्यांत गेली. तेथें गणपतीचें दर्शन करून प्रहरभर तळ्याचे काठीं बसून पाण्यातील माशांस लाह्या टाकून माशांचा तमाशा पाहिला. छ. १५ रोज प्रातःकाळीं स्नान देवपूजा करून हजामत केली. श्रीधर लक्ष्मण व कुशाबा चिटणीस यांशीं दोन घडी खलबत झालें. तिसरा प्रहरीं बागांत खुलाशांत पठाण मंडळी वगैरे सुद्धां चार घडी बसले होते. छ १६ रोज प्रातःकाळीं स्नान देवपूजा करून भवानी काळो यास बोलावून बाईकडे चार घडी खलबत झालें. संताजी नाईक यास देवाज्ञा होऊन बारा दिवस झाले. त्यांचे मुलास वस्त्रें दिलीं. दोन प्रहरीं स्वारी मुत्सद्दी सुद्धां भवानीपंत मुनसी याचे घरास गेली. तेथें चार घडी खलबत करून आले. शिवणीकर पठाणाकडील भला माणूस निरोपास आला होता त्यास वस्त्रें दिलीं. छ. १७ रोज प्रातःकाळीं स्नान देवपूजा करून बाईकडे दोन प्रहर पावेतों खलबत झालें. तिसरा प्रहरीं स्वारी मानसिंग मोहिते याचे घरास गेली. तेथें चिमाबाई यांची सावत्र मातुश्री वृद्ध आहे तीस समाधान नाहीं. तेथें घडीभर बसून भवानी काळो याचे घरास आले. तेथें क्षणभर बसून आले. हपशी व रोहिले वाड्यांत धरणें बसले होते. छ १८ रोज प्रातःकाळीं स्नान देवपूजा करून बाईकडे खलबत दोन प्रहर पावेतों झालें. दोन प्रहरां स्वारी मुनसीचे घरास गेली. तेथें दोन घडी खलबत केलें. तिसरा प्रहरीं खासे मंडळी व मुत्सद्दी वगैरे शंकर दरियास गेले. तेथें नवें देवालय बांधून लक्ष्मीनारायणाची मूर्ति स्थापिली. तेथें कार्तिकीचा उत्सव झाला. आज लळीतास गेले होते. जनार्दन विश्वनाथ याजकडे लोकांस ऐवज लावून दिला. त्याचे घरीं दोन दिवस धरणे बसलें आहे. छ. १९ रोज प्रातःकाळीं स्नान देवपूजा करून महादाजी लष्करी याशीं खलबत झालें. पिराजी जाधव[1] पंधरा वीस असामी येऊन प्रातःकालपासून धरणें बसले आहेत. तिसरा प्रहरीं मानसिंग मोहिते याचे घरास गेले. घडीभर बसून आले. छ. २० रोज प्रातःकाळीं स्नान देवपूजा केली. पिराजी जाधव याचें धरणें कालपासून बसलेंच होतें, त्याची कांहीं तोड पाडावी तों चिमाबाई यांचे सावत्र मातुश्रीस देवाज्ञा झालीयाचें वर्तमान आलें. तेथें स्वारी जावयास तयार झाली, तेव्हां भवानी काळो यांणीं पिराजी जाधव यास तूर्त सांगून उठून लावलें. तेव्हां स्वारी मानसिंग मोहिते यांचे घरास गेली. त्या बाईस बागांत नेऊन अग्नि दिल्यावर दोन प्रहरीं वाड्यांत आले. छ २१ रोज प्रातःकाळीं स्नान देवपूजा करून प्रहरभर बाईकडे गेले दोनप्रहरा स्वारी भवानी नागनाथ मुनसी याचे घरांस गेली. तेथें चार घडी खलबत केलें. तिसरा प्रहरी सर्वांची स्वारी मुत्सद्दीसुद्धां भवानी काळो याचे बागांत हुरडा खायास गेली. हुरडा खाऊन सायंकाळीं आले. छ. २२ रोज प्रातःकाळीं हजामत करून स्नान देवपूजा केल्यावर बाईकडे चार घडी खलबत केलें. तिसरा प्रहरीं

---

१. पहा राजवाडे खं. १०-३३७.

व्यंकोजी भोसले तेलंगखेडीस हुरडा खायास गेले ते सायंकाळीं आले. छ २३ रोज प्रातः काळीं स्नान देवपूजा केली. दोनप्रहरा सर्वांची स्वारी शिवराम हरि खाजगीवाले यांचें बागांत हुरडा खायास गेले. हुरडा खाऊन दोन घडी रात्रीस आले. छ २४ रोज स्नान देवपूजा करून रामचंद्र दादो वकील हैदराबादेस पाठविले. त्यास वस्त्रें दिलीं व पालखी दिली. पहिले बगाजी रघुनाथ हैदराबादेस होते त्यास येथें ठेवून घेतलें. रामचंद्र दादो यास वराडचा मोकासा गंगथडीची (?) जुन्नर प्रांतीचे घासदाण्याचे बोलण्याविशीं पाठविलें. छ २५ रोज प्रातःकाळीं स्नान देवपूजा करून बाईकडे चार घडी गेले. शनिप्रदोष होता. सायंकाळीं स्नान करून भोजन केलें. छ २६ रोज प्रातःकाळीं स्नान देवपूजा केली. बिंबाजी भोसले यांचें श्राद्ध आज[1] झालें. मानकरी मंडळी वीस पंचवीस असामी भोजनास बोलाविले होते. पांडुरंग गणेश यांस हजार पांचशें फौज देऊन मंडल्याकडे पाठवावें अशी मर्जी होती. परंतु अलीकडे स्थिर झालेंसें आहे. शिवणीकडे पेशजी नरसिंगराव भोसला याणें कजिया केला, त्याजकडे पांचशें लोक पाठवावयास नेमले आहेत. पन्नास साठ स्वार बाहेर जाऊन उतरलेत. बाकी लोकांची तयारी खर्चास मिळून जावयास एक महिना लागेल. वाड्यास मोहोळ एक दोन वेळ लागलें. दुश्चिन्हें होतात म्हणून अनुष्ठानास ब्राम्हण घातले आहेत. शतचंडीचा होम करावयास कुंड मंडप घातला आहे. रघोजी भोसले पुण्यास आले,[2] तेव्हां मागें खंडोजी भोसले चिमाबाईस नित्य म्हणत होते कीं, माझी वाटणी करून देवावे. मी परिछिन्न येथें रहात नाहीं. छत्तीसगडास अथवा पुण्यास जातों. वाटणी करून देविसील तर प्रस्तुत चार महिने रहातो. तेव्हां चिमाबाई यांणीं मोठे बेळेकडून राहाविलें कीं, रघोजी भोसले यास येऊं दे. सर्वांचे विद्यमानें वाटणी करून देवीन. रघोजी भोसले आल्यावर वाटणी करून द्यावी असें बाईंनीं ठरविलें. सकरदरियाचे बागांत नवें देवालय बांधून लक्ष्मीनारायणाची मूर्ति स्थापिली आहे, तेथें श्रावण शुद्ध एकादशीस त्रिवर्ग खासे व चिमाबाई व मुत्सद्दी मंडळी जाऊन चिमाबाई व त्रिवर्ग व मुन्सी व भवानी काळो इतके देवालयांत बसून खलबत केलें. वरकड मंडळी बाहेर बसली होती. एकादशीस निराहाराचे फराळास देखील सर्वांनीं तेथेंच केलें, आणि करार केला कीं, चंद्रपूर व देवगड द्यावा. खंडोजी भोसले यांचें बोलणें कीं चंद्रपूर, देवगड व छत्तीसगड द्यावा, मग पुढें मंडल्याविशीं मी समजून घेईन. रघोजी भोसले वगैरे सर्वांचे मतें छत्तीसगड देऊं नये. अशी घालमेल होती: त्या गोष्टीस पांच सात दिवस झाले. याजकडे कोणी चित्त घालीनात.

---

१: श्राद्ध २६ सफरला म्ह. १५. ११. १७८९ ला झालें. त्यावरून बिंबाजीचा मृ. ७. १२. १७८७ चा, म्हणून हें द्वितीय वर्षश्राद्ध असावें. मुधोजीच्या पूर्वीं कांहीं महिने बिंबाजी मेला. मुधोजी १९. ५. १७८८ रोजीं मरण पावला.

२. पहा राजवाडे १०.३४६, ३४७. स. १७८८ चे आश्विनांत पुण्याहून निघून पुढील सालच्या ज्येष्ठांत तो नागपुरास परत गेला.

तेव्हां प्रस्तुत काळीं कामाकारभारांत महादाजी लष्करी बहुत आहे. त्यास खंडोजी भोसले रागें भरून दर्डावून बोलले कीं, बंगाल्याचे स्वारीचा हिशेब अद्याप देतच आहेस. तसेंच माझे कामांत येत नाहींस. मी सांगितल्याप्रमाणें करून देववा, नाहीं तर ब्राह्मण म्हणणार नाहीं. मेकसु घालून डोकें फोडीन. तेव्हां त्यानें उत्तर केलें कीं, साहेब आपण सांगितल्याप्रमाणें लौकरच करून देतों. आणखी त्याची मर्जी बहुत होती कीं, यांणीं वांटणी करून दिली तरी स्वारीस जावें हा हेतु बहुत होता. छत्तीसगडास अथवा गायलगडास जावें, नाहीं तर पुण्यास जाऊन कर्नाटकची मोहीम कबूल करावी असें बहुत बोलत होते. तेव्हां यांस बहुत भय प्राप्त झालें कीं, गायलगडास जाऊन कांहीं खटपट करतील. किल्ला मातबर व खजानाहि बहुत आहे, तेथें गेल्यास ठीक नाहीं. अथवा पुण्यास गेले तरी आपल्याकडेच कांहीं कुंभाड करतील. कमी पैशुन्य गोष्ट आपली पाहतां असें यांसहि समजलें होतें. तेव्हां कांहीं तरी उपद्व्याप करतील, चुकणार नाहींत. असें जाणून कृत्रिम केलें किंवा आणखी कांहीं संशय प्राप्त झाला; ईश्वर जाणें. परंतु परिच्छिन्न जादू करून मारले,[1] यांत संशय किमपि नाहीं. खासे व महादाजी लष्करी या उभयतांनीं केलें असें बाईस परिछिन्न समजलें. तेव्हां त्या पश्चात्तापेकडून बाई बाहेर जाऊन राहिले आहेत. वाड्यांत येत नाहींत. महादाजी लष्करी बहुतास अपाय करितो आणि खासेही त्यांचेच बुद्धीनें वर्ततात. गतवर्षी उमाजी महादेव सिलेखानी याजकडील काम दुसऱ्यास सांगून त्याजकडे तस्कारा काढला, कांहीं नागवावें, अप्रतिष्ठा करावी असें मांडले. तेव्हां त्यानेंच जहर घेऊन प्राण दिला. याजकरितां भवानी काळो हेहि कामाकारभारांत येत नाहींत; पैकेकरी आहेत. आणि त्याची नजर आतां चांगली नाहीं यामुळें भिऊन आहेत. बोलावू पाठविले तर येतात, नाहीं तर येत नाहींत. त्यांचे पुतणे चिरंजीव येतात. कामकारभार करितात. सिलेदार लोकांस वगैरे जहागीर मोकासे गांव होते. स्वारी आल्यावर झाडून जप्त केले आहेत. उपास करतात. हैराण नित्य धरणी बसतात. लोकांची खराबी बहुत. कोणीही दिलखुश नाहीं. एखादा प्रसंग पडल्यास येथें यांजवळ हजार फौज चांगली एकदील आहे असा अर्थ नाहीं. चिमाबाई गंगास्नानास चंद्रपुराकडे जाणार आहेत[2]. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

श्री

२८३

( भा. व. २-१३ )

श. १७११ फा. शु. १३

ता. २७-२-१७९०

सेवेसी विज्ञापना. राजश्री गोविंदराव कृष्ण याजकडील पत्रें—१ छ ९ जमादिलाखर २२, १ छ ११ जमादिलाखर १०, १ छ १२ जमादिलाखर ७, तीन रवानग्यांचीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं. पाहून पाठविलीं आहेत. पत्रांतील मजकूर सविस्तर कळला.

---

१ स. १७८९ च्या श्रावणांत. २ स. १७९० च्या माघ फाल्गुनांत ती पुढें गंगेस गेली. पहा राज. १०-३५३.

याप्रमाणें मशारनिल्हेनीं पत्रें मजकडे पाठविलीं होतीं. स्वामीनीं लिहिलें कीं, पत्रांत इंग्रजाशीं घरोबा करावयाचें दौलानीं मांडलें आहे. हा खुलासा मनांत यावा. पत्राचे जाब नबाबाकडे रवाना केले. भोसल्यास पत्र त्यांणीं लिहिल्याप्रमाणें गोविंदरायाकडे पाठविलीं. एके ठिकाणीं गोविंदरायास लिहिलें कीं, दौला इतका घरोबा इंग्रजांशीं करतात हा होऊं न देणें; व बदामीचे सालचा गुबार नबाबाचे चित्तांतील काढावा म्हणून तुम्हांस जाते समयीं सांगितलें व लिहून पाठविलें व तुम्ही तेथील माहित असतां कारस्थान न झालें व नबाबाचे पत्राचें उत्तर पाठविलें त्यांत मोघम फिकरा होता त्याचा अर्थ बदामीची गुंज आमचे मनांत, हा संदेह घेऊन इंग्रजाचा बळकट आश्रय करावा येथपर्यंत गेले. तुम्हांकडे पत्राची नकल पाठविली असतां या फिकऱ्यानें अधिक संदेह वाढेल असें तुमचे मनांत आलें तर पत्र द्यावयाचें नव्हतें. दुसरें लिहून पाठविलें असतें म्हणोन आज्ञा व एक पत्र गोविंदरायास मनांत आलें तें लिहून तुम्हांकडे पाठविले आहे. तुमचे विचार रवाना करावें असें आलें तर करणें. भेटीचा प्रसंग मनांत काय आणतील असें असलें तर पाठवूं नये. आमचे मतें त्यास घरोब्याचे रीतीनें समजावें हें बरें. तुमचे विचारें होईल तसें करणें. तीन रवानग्या गोविंदरायाच्या पाठविल्या, याचें कारण याप्रमाणें तुम्हांकडे लिहून पाठविलें असें नव्हतें म्हणून पुढें गोविंदरायास लिहिलें कीं, ज्याप्रमाणें इकडे पत्रें पाठवाल त्याप्रमाणें तुम्हांकडे पाठवीत जावीं, म्हणोन विस्तारेंकडून आज्ञा केली ती कळली. सरकारचे लिहिल्यांत फिकरा. त्याचा संदेह मनांत येऊन इंग्रजाशीं बळकटी करतात. येविशीं गोविंदरायांनीं सरकारचें पत्र न देतां सुचवावयाचें होतें तसें लिहून पाठवितों. त्यास इतका दूर देश चालून स्वामीकडे लिहून पाठविणें ही गोष्ट कठिण आहे. फार दिवस झाले. पत्राचे जाब आले. नेऊन दिले. परंतु ज्याचे जी मनांत गोष्ट असते ती त्याजलाच समजते. माहित असला तरी त्याचे मनांत एकाएकीं येत नाहीं. पत्र दिल्यावरी वांकडे वाटलें असें यास समजलें, तेव्हां स्वामीकडे लिहून पाठविलें.

---

२८४ श्री

( भा. व. २-१०१ ) श. १७१२ वै. व. ८

ता. २६-४-१७९०

पौ छ २० माहे साबान उर्फ वैशाख वा ८ सुा तिसैन मया व अलफ सन ११९९.

राजश्री कान्हो बापूजी स्वामीचे सेवेसी

विनंती उपरी मौजे टाकळी तालुके निघोज प्रांत जुन्नर येथील सालमजकुराचा ऐवज येणें. त्यापैकीं गुदस्ता खुद्द चांदवड रुपये १९८ पैकीं वजा पोतेचालीचा बटा दरशेंकडा ३॥ रुपये प्रमाणें रुपये ६॥।· बाकी रुपये ।९१। एकूण एकशें सव्वा एक्याणव रुपये पोतेचाल पोता असत. रवाना छ ११ साबान सुा तिसैन मया व अलफ हे विनंती.

---

२८५ श्री

( भा. व. २-४५ ) श. १७१२ भा. शु. १०
ता. १८-९-१७९०

राजश्री नाना गोसावी यांस

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत स्नेहांकित सदाशिवराव दंडवत विनंती. येथील वर्तमान छ ८ मोहरमपावेतो स्वामीचे कृपेदृष्टीकरून यथास्थित असो विशेष. तीर्थरूप कैलासवासी कृष्णाजी पवार निवर्तले. त्यास त्यांचा आमचा भाऊपणा व सरदारीचा एकवटपणा वडलावडिलीं चालत आला. येविशींचें वर्तमान पूर्वी सविस्तर आपणास समजाविलें. त्यावरून आपणहि मान्य केलें. राजश्री बाबूराव केशव व बळवंतराव भानु व राघोपंत गोडबोले यांणीं हमीविशीं सांगितलें. त्यावरून गोपाळ कृष्ण यांणीं हमीचा कारभारही सिद्ध केला. यावरून सर्वत्रास समजलें कीं, आपण अभिमान धरून कार्य सिद्धीस नेलें ऐसें प्रसिद्धांत आलें. ऐसें असोन हल्लीं ऐकिलें कीं, राजश्री बाजी खंडेराव याचे यादीवर मखलासी करून दिल्ही. त्यास यांतील अभिप्राय कांहींचे समजत नाहीं. त्यास स्वामी आपण अभिमान पुर्तेपणें धरला असतां त्याजकडे करून दिल्यास सर्व प्रकारें आमचा उपहास होतो. येविशीं त्याचे सांगितल्यावर निसबचा पक्ष आपण सोडतील ऐसा अर्थ नाहीं. हा पूर्ण भरंवसा जाणोन विनंतीपत्र लिहिलें आहे हें मनन करून अभयपत्र आलें म्हणजे भेटीस येऊं. हे सरदारी आपली जाणोन बंदोबस्त करून देणें आपल्यास आहे. आम्ही आपले आज्ञेशिवाय नाहीं. बहुत काय लिहिणें? लोभ करावा हे विनंती.

---

श्री

२८६ श. १७१२ मार्ग० शु. ६
( भा. व. २-४६ ) ११-१२-१७९०

श्रीमंत राजश्री पंतप्रधानसाहेबांचे सेवेसी

श्रीसकल गुणालंकरणअखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य आज्ञाधारक सदाशिवराव पवार दंडवत विनंती विज्ञापना, तागाईत छ ४ माहे रविलाखर जाणोन स्वकीय कुशल लेखनाज्ञा केली विशेष. चिरंजीव आनंदराव पवार हिंदुस्थानप्रांतीं पथकसुद्धां चाकरीस होते. राजश्री महादजी शिंदे यांची आज्ञा घेऊन माळवेप्रांती देवाशास आले. तेथें कार्तिक वद्य एकादशीस देवाआज्ञा जहाली. यामुळें तिकडे बखेडा जहाला आहे. व आनंदराव पवार यांचा मूल व कबिले देवाशांत आहेत, त्यांजपाशीं कोणी नाहीं. त्यांचे समाचारास गेले पाहिजे आणि हिंदुस्थानप्रांतीं चाकरीवर फौज रवाना करावी लागती. महालांत बखेडे झाले यास्तव जरूर जाणें प्राप्त म्हणोन जातों. त्यास साहेबीं आज्ञापत्र पाठविलें कीं, सरकारचे जाबसालचे फडशे जाहल्याशिवाय न जाणें म्हणोन आज्ञा. याकरितां राजश्री गोपाळपंत सेवेसी पाठविले आहेत. जी आज्ञा करावयाची ते करून पंतमशारनिल्हेस पाठ-

वून द्यावें. पहिल्यापासोन सरकारआज्ञेविरहित वर्तणूक केली नाहीं, आणि पुढेंही करावयाची नाहीं. साहेबी वडिलापासोन सांभाळ केला त्याप्रमाणें आतांही करावा. चिरंजीव राणोजी पवार विश्वासराव यांचे सरंजामापैकीं चौथी तक्षीम भाऊपण्याचे वांटणीची फौजाचें सरंजामास पूर्वापार आम्हाकडे चालत आहे. चौथाई सरंजामाची चाकरी आम्ही आपले पथकाबरोबर करीत असतां हल्लीं त्याजकडील कारभारी राजश्री मल्हार आपाजी वेगळे रावतांविशीं वगैरे बखेडे घालून महालीं आम्हाकडील कमाविसदाराशीं दिकत करून वसूल सुरळीतपणें चालूं देत नाहीं, येविशीं बंदोबस्त करून देविला पाहिजे. बहुत काय लिहिणें ? कृपालोभ करीत जावा हे विज्ञापना.

---

२८७ श्री

( भा. व. २-११३ ) श. १७१२.
स. १७९०

सेवेसी बळवंतराव हरि डिंगणकर साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे. आमचे तीर्थरूपांकडे पागा व सरदारी व काल्पी वगैरे मामलती होत्या. त्यांचा काल शके अठ्याहत्तरींत जाहला. ते समयीं मामलती व सरदारी दूर जाहली. आम्हीं दो वर्षांचे होतों तेव्हां श्रीमंत कैलासवासी नानासाहेबीं पांच हजार रुपये तैनात आमचे नांवें करून पागा व परगणे अवरासे वगैरे महाल येथील फडणिशी वेतन तीनशें रुपये व कारकुनी तीन हजार याप्रमाणें तीर्थरूपांचे नांवें होती ती आमचे नांवें नेमणूक करून दिल्ही, ती पाणिपतपर्यंत चालली. पुढें मिरजेवर श्रीमंत कैलासवासी रावसाहेब यांजकडे पागा होती हा आरोप ठेवून श्रीमंत कैलासवासी दादासाहेबीं घेतली. फडणिशीची असामी वोढेकरास सरंजाम जाहला तोंपर्यंत चालली. पुढें श्रीमंत रावसाहेबीं ताकीदपत्र वोढेकरांस दिल्हें, परंतु चालवीत नाहीं. बाग मजमदाराचे बागेशेंजारीं होता तो गंजीकरितां खासगीवाल्यांनीं घेतला. आम्ही लहान आठ नऊ वर्षांचे होतों. वडिलार्जित द्रव्य व वस्तवानी होती ती चिरमुले यांजकडे होती. त्यास सापत्न मातुश्री श्रीमंत दादासाहेब यांजकडे नाशिकचे मुक्कामीं फिर्याद जाहली तेव्हां दोन लाख रुपये सरकारांत घेतले. वस्तवानी व कर्जकुळें सवालाखपर्यंत आह्मांस दिल्ही. त्यांपैकीं पन्नास हजार रुपये आमचे हातास लागले. बाकी कुळें आहेत तीं पैसा देत नाहींत. श्रीमंत रावसाहेबांबरोबर पांच स्वाऱ्या पदरचा खर्च खाऊन शिरेची व वऱ्हाडची व निजगल वगैरे स्वाऱ्या केल्या. तेव्हां रोजमरा दुमाही तीनशें रुपये करून दिल्हा. पुढें पूर्ववत्प्रमाणें बंदोबस्त करून द्यावा तों श्रीमंत रावसाहेब कैलासवासी जाहले. त्याजवर स्वामीबरोबर बऱ्हाणपुरचे स्वारीस व तळेगांव व खंडाळें व येदगिरी ऐशा स्वाऱ्या पदरचा खर्च खाऊन केल्या. मध्यें तात्या पहिल्याप्रमाणें रोजमरा देत होते. त्यास पागा देऊन चाकरी ध्यावी म्हणोन बोललों. त्याजवर स्वामीस विनंती करून पागा देऊं ऐसें बोलिले. परंतु योग घडला नाहीं. त्यास आजपर्यंत पदरचें व कर्ज दहा हजारपर्यंत खाऊन स्वामीचे पायाजवळ

राहिलों. पुढें कालक्षेप चालवयाचा कठिण. स्वामीचे राज्यांत पूर्वार्जित सेवक आहेत. त्यांचें सर्वांचें स्वामी चालवीत आहेत. आमचे वडिलीं श्रीमंत कैलासवासी बाजीरावसाहेबांपासून श्रीमंत नानासाहेबांपर्यंत सेवा चाकरी केली. माझीही उमेद चाकरी करून दाखवावी ऐसा हेत धरून श्रीमंत रावसाहेबांपाशीं मेहनत केली. परंतु आमचे दैवानरूप काल जाहला. त्यास स्वामी कृपालु होऊन सेवाचाकरी घेणार स्वामी समर्थ आहेत. समक्ष विनंती करावी परंतु गांठ पडत नाहीं. कचें वृत्त स्वामीस विदित व्हावें म्हणोन विनंती लिहिली आहे. आज्ञा जाहली पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

२८८ श्री

( भा. व. २-११८ )

श. १७१२
स. १७९०

राजश्री नाना गोसावी यांसी,

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित कृष्णाजी रणसिंग दंडवत विनंती. येथील कुशल जाणून स्वकीय कुशललेखन करावयासी आज्ञा केली पाहिजे विशेष. आपली स्वारी बाहेर निघाली. सर्वांस पत्रें आलीं आणि आम्हास अद्यापि पत्र आलें नाहीं. आमची मंडळी चाळीस पन्नास खासा व शेंपन्नास घरचीं घोडीं अशीं घरींच बसलों याजमुळें कर्जाच्या पेचांत फार आलों. सरकारांत आमचे नालबंदी व रोजमरियाचा ऐवज येणें, येविशीं विनंती करावयासी राजश्री सदाशिवपंत पाठविले. हे विनंती करितील ते ध्यानास आणून बंदोबस्त करून देणार आपण धनी आहेत. बहुत काय लिहिणें ? लोभ असे दीजे हे विनंती.

---

२८९ श्री

( भा. व. २-१५० )

श. १७१२
स. १७९०

श्रीमंत राजश्री नानासाहेबांचे सेवेसी

साहेब मेहरबान मुषफककदरदा फैजबक्ष फैजरसा अर्जदास्त मिर्जाई सुफबेगखान बेळगांवकर सलाम बादजसलाम मारूज आंकी. येथील नेकी जाणून साहेबी कारनेकीं कलमी करावया रजा फर्माविलें पाहिजे. दिगर. फिदवीचे हकीकत तरी आमचा वृद्धापकाल पाहून कारभार तिघा मुलांचे स्वाधीन केला कीं, तिघे एकदिल होऊन सरकारास रुजू राहूं. भाऊबंद कुटुंबसुद्धां कारभारी व कर्जदार वगैरे सर्वत्रांस ज्याप्रमाणें आम्ही चालवीत आलों आहों त्याप्रमाणें चालविणें, व आमची सेवा करून वडिलांचें नांव राखूं. याप्रमाणें काळ घालवणें म्हणून स्वाधीन केले, त्या वेळेस कारभारसंमंधें आठ दहा हजार रुपये कर्ज होतें. अलीकडे मोहिद्दीनबेगांनीं पहिलें कर्ज न वारतां हल्लीं पंधरा हजार रुपये

कर्ज केलें. याखेरीज घरची जिंदगी दहावीस हजारांची होती तेही खराब केली. शेवटीं दोन गांवें सावकाराकडे गहाण घातलें. तिनी वर्षांपासोन भाऊबंदांस बाहीर घातलें. कदीम कारभारियांस दूर केलें व कर्जदारांस गांव दिलेले हिरून घेऊन रयेता वगैरेस दंड बांधिले व आमच्या अब्रूवरी गोष्टी आली. अन्नवस्त्रास महाग केलें. याप्रमाणें बदचाल चालूं लागला. शेवटीं लाचार होऊन अजम परशुरामपंतभाऊकडे तासगांवास जाणें प्राप्त जाहलें. त्याजवरून भाऊ यांणीं मोहिद्दीनबेगास बोलावून आणून चौकशी करून त्याची बदमामलीची चाल पाहून शामचीं खेडीं आमचे स्वाधीन केलीं. बाकी कितेक मजकूर अजम बहिरोपंतबाबास पत्र लिहिलें आहे. खिदमतेस अर्ज करतील ते खातरेस आणणार धनी समर्थ असो. जादा काय लिहिणें हे अर्ज.

---

२९० श्री

(भा. व. २–अ. दि. १९) पौष शु. ८ श. १७१२

ता. १२–१–१७९१

## ( दिल्लीकडील अखबार )

आखबार दिल्लीची हाजरत जील सुभानी दिल्लीचे किल्ले अर्कांत तसरीफ फर्मावितात. छ ७ जमादिलावलीं रोज बुधवारीं साडेतीन घटिका दिवस आल्यानंतर हाजरत खुदबा दौलत उत्तम समयीं खास दिवाणखान्यांत रवनुला बक्षून कुरसीवर जलूस फर्माविला. सन ३४ साल नेक यांचे पातशाहातीस सुरू झालें, त्याची खुषी केली. शाहा निजामुद्दीन मुखत्यारकार सरकारवाला यांणीं याजषपणाची मुबारकबाद गुजारर्ष केली. शाहामजकूर फकीर याजकरितां हुजूर आनवरांत नजरन गुजराणली. मीर महमदखान शाहामजकूर यांचा पुत्र यांजकडे दिल्लीचे टांकसाळेचे दरोगीचें काम याजकरितां अकरा मोहरा व एकशेंएक रुपया सन ३४ सालचे शिकयाचे व खालिता सरब मोहर एकशेंएक मोहर महादजी शिंदे यांचे तर्फेनें व एक मोहर खानमजकूर यांणीं आपल्याकडोन नजर गुजराणली व सोन्यारुप्याचीं फुलें मस्तकावरून तसदुक करून टाकलीं. मीर अल्ली रजाखान यांणीं एक फर्द, दोनशें तेवीस मोहरा नजरेबाबत असफउद्दौला व गोरंदोर बंदर कलकत्ते व पामर फिरंगी वकील गोरंदोराकडील यानें एक मोहोर आपल्याकडोन व खानमजकूर यांणीं एक मोहर व कुवर भवानीसिंग किल्लेदार किल्ले अर्कांचा दिल्लींतील समशेर बहादूर यांचे तर्फेनें अकरा मोहरा व अहमदअल्लीखान व मौलवी अताउल्लाखान यांणीं चार चार रुपये व वरकड आरकान व मुतसद्दी लहानमोठे यांणीं रुपये व मोहरा आपापले मरातबाप्रमाणें गुजराणल्या. हुजूर अकतूंन एक दस्तार सरबस्ता ब तुरा दुकेसी व चिनेचा किनखाप शाहाजादे वल्ली आहद मिर्जा अकबरशाह व सवीस पागोटीं बंधनुची व पंधरा थान गुलबदनाची व तिन्हेताळीस माळा फुलांच्या वरकड शाहाजादे व एक एक दुशाला व तिसरा वांटा किनखाप

मियासाहेब व अकबराबादी बेगम शाहाजाद्या यांस इनायत झाले. व एक एक मोहर व पांच पांच रुपये सन ३४ सालचे शिक्याचे असफउद्दौला व गोरंदोर बंदर कलकत्तेकर व दोन दोन रुपये गोरंदोर यांचे नायबास्ते बंदरांत आहेत. व मुखत्यारकार लखनौकर व पामर फिरंगी व रजा अलीखान यांचे हवालीं केले. व उभयतां वकिलांस एक एक रुपया व कुवर भवानीसिंग यास समशेरबहादुराकरितां पांच रुपये इनायत केले. आणि शाहा निजामुद्दीन यास इर्षाद झाला कीं, मामुलाप्रमाणें मोहरा व रुपये शिंदे यांस व त्यांजकडील सरदारांस पाठवावे व तमाम अरकान व मुत्सद्दी यांस फुलांचे हार इनायत झाले. एक प्रहर दिवस आल्यानंतर हाजरत जील सुभानी महाल मुबारकात तसरीफ घेऊन गेले. यानंतर मीर महमदखान शाहा निजामुद्दीन यांचे पुत्र यांची सोयरीक हाबीबशाह मनसूरशाह यांचे पुत्र यांचे कन्येशीं करार झाली. त्यास छ १५ जमादिलावलीं शाहमजकूर यांणीं सोयरिक करार झाल्याचें वर्तमान जेनाब आकमध्यें अर्ज केला. हाजरत जील सुभानी यांणीं मुबारक बाद इर्षाद फर्मांविली व मीर महमदखान यांणीं आपले सोयरिकबाबत एक मोहर नजर गुजराणली. शहा निजामुद्दीन यांणीं आपला पुत्र मीरमहमदखान व कुटुंब व मातुश्री व आणिक सोयरे व सैद महमद जावाई यांस लग्नाकरितां दिल्लीहून दक्षणेस रवाना केली. शिंदे मनसूरशाहा यांसी फार एकनिष्ठ, याजकरितां त्यांची यास खातर व हाबीबशाह यांचे अहवालावर रियायेत फार मंजूर आहे. याजकरितां सर्व तयारी व सरंजाम व लवाजमा शादीचा हाबीबशा यांचे कन्येचे कन्यादान आहे, यास्तव आपले तर्फेनें करार केले. यानंतर महादजी शिंदे छ ८ जमादिलावलीं मौजे बसोदे येथील मुक्कामीहून चितोडचे किल्ल्याहून चार कोसाचें कूच दारूलफत उज्जनेकडे कूच केलें. राणा उदेपूरकर तालुकदार व राजे भीमसेन किल्लेदार माजूल चितोडकर दोन मजला समागमीं आले. तेथून आपले तालुक्यांस रुखसत झाले. शिंदे यांणीं पंधरा खोन वस्त्रें पोषाखी व एक खोन जवाहीर शिरपेंच जिगा व मोत्याची माळ व हाथी व घोडा राणास दिला. व पांच वस्त्रें व शिरपेंच व जिगा व मोत्याची माळ व हाथी व घोडा राणास दिला. व पांच वस्त्रें व शिरपेंच व जिगा व कंठीं मोत्याची राजे भीमसेन यांची तवाजा केली. व अंबाजी सरदार.[1]

---

२९१ श्री

( भा. व. २ आ. दि ४ ) श. १७१३ श्रा. व. ३
ता. १५. ८. १७९१

## लखनौकडील आखबार

विनंति विज्ञापना ऐसीजे. लखनौकडील वर्तमान इा छ ९ माहे जिल्हेज ता छ १४ माहे मजकूरपावेतों येणेंप्रमाणें आहे.

---

१. भारतवर्षांतील हें प्रकरण येथें इतकेंच अपूर्ण राहिलें. पुढें मासिक बंद पडलें.

छ ८ मिनहूस सायंकाळीं पर्जन्य राहिल्यावर नवाब वजीर स्वार होऊन गोमती नदीचे कडेस येऊन, पूल दौलतखान्यानजीक होता त्याजवर मातीनें मजबुती करविली, व दौलतखान्यांत अतिवृष्टीमुळें दोन चार खाचा पडल्या होत्या ते भरविल्यानंतर पंच महाल्यांत येऊन शिषमहाल वगैरे स्थळें पाहून दौलतखान्यास दाखील झाले. इलमासअल्लीखान अंतरवेदचा सुभा यांणीं मुजरा केला. वजीर पाहून बोलले कीं, तुमचे बाजार दौलतखान्यानजीक ठीक नाहीं. मशारनिल्हेनीं उत्तर केलें कीं, मी व बाजार सरकारचा आहे. पाहिजे तसें करावें. कारण कीं पर्जन्य लागला, वृष्टीचे जोरानें पाणी मशारनिल्हेच्या बाजाराकडून दौलतखान्यास येत होतें. तेव्हां वजिरांनीं पाणी बंद करावयास माणसें पाठविलीं. तेथें जाऊन माणसांनीं कोणाची भिंत कोणाचें छप्पर मोडोन पाणी बंद करावयास लागले. त्याजवरून दोघे चौघे वाण्यांहीं सरकारचे हलकार यास मारहाण केली. तें नबाबास तपशीलवार समजलें. सारांश इलमासाकडील बोलणें ऐकून बाजार लुटून घेण्यास आज्ञा केली. ते अर्ध घटिका न लागतां लोकांनीं बाजार लुटून फस्त केले. आतां तेथें कोणी दुकान न मांडावी येणेंप्रमाणें हुकूम आहे.

छ ९ मिनहूस प्रातःकाळीं हैदरबेगखान वगैरे कारभारी वजिराचे मुजऱ्यास आले. खान मशारनिल्हेनीं जवाहिराची पेटी गुजराणली. वजिरांनीं पाहून तर्सीनअल्लीखानाचे स्वाधीन केली. नंतर खानमजकुरांनीं खिलत दाखवोन खिलताची तपशील स्वदस्तूर लिहून तर्सीनअल्लीखानास हवाला केलें. इतक्यांत मिर्जा गुलाम हुसेनखां फिरंगी याकडील कारभारी आला. मुजरा झाल्यानंतर मशारनिल्हेनीं तीन पत्रें दिलीं. वाचून वजिरांनीं हैदरबेगखानास सांगितलें कीं, पत्राचा मजकूर कांहीं समजत नाहीं. त्याजवरून खानमशारनिल्हेनीं उत्तर केलें कीं, पंधरा लाख रुपयाची हुंडी कलकत्त्यास पाठविली होती. त्याचा बट्ट्यापैकीं समजोन आज्ञा केली कीं, चिंता नाहीं. बट्टाही देऊं. यानंतर गणपतराव यांणीं अर्ज केले कीं, उद्यां राजा टिकेतरायाकडे मजलस आहे. खासास्वारीही आली पाहिजे. नबाबांनीं मशारनिल्हेचें बोलणें श्रवण करून बंधु आर्दलीवाला यांस टिकेतरायाकडे खबरेकरितां पाठविलें. नंतर वजीर स्वार होऊन माडीन साहेबाकडे आले. घटिका बसन बागाची सैल करीत दौलतखान्यास दाखील झाले. तिसरे प्रहरीं मिर्जा हसनरजाखां वगैरे मंडळीसुद्धां राजा टिकेतरायानीं मजलस केली होती तेथें आले. मशारनिल्हेनीं पांच मोहरा नजर दिल्या. मोलवी व अपसव्य विद्येचे विद्यार्थी बहुत जमा होते, हें पाहून वजीर राजा मशारनिल्हेसी बोलले कीं, "भैया टिकेतराय, तुम्हास अफरी आहे. तुम्ही दोन्ही धर्म आचरतां, सारांश ईश्वर एकच आहे. समजणे मात्र भिन्न असे." उपरांत किताबखानी झाली. संध्याकाळीं एकवीस खोन पारचे पोशाखी मशारनिल्हेनीं नबाबास नजर दिले. याउपर वजीर स्वार होऊन बावलीच्या बागाची सैल करीत दौलतखान्यास दाखील झाले.

छ १० मिनहूस वजीर प्रातःकाळीं जागे झाले. पर्जन्य पडतच होता. हैदरबेगखान

वगैरे यांचा गुजारा झाल्यानंतर स्वार होऊन इदगाहेस गेले. निमाज व दुगाणा झाल्यानंतर काजीस खिलत दिला. हैदरबेगखां व हसनरजाखां इत्यादि कारभारी यांनीं नजरा दिल्या. हैदरबेगखान व हसनरजाखां व टिकेतराय व राजा झाऊमल व मिर्जा गुलाम हुसेनखां वगैरे लोकांस माफीक दस्तूर खिलत झाले व पिरू पिलवानास खासी पोशाख आंगावरली दिली. दौलतखान्यास दाखील झाल्यानंतर पांच पांच आंबे पिकले हसनरजाखां व हैदरबेगखानास इनाईत केले. उभयतांनीं दोन दोन मोहरा नजर दिधल्या. याउपर वजिरांनीं बादशहाचा सुका खान मशारनिल्हेस दाखवला. त्यांत मजकूर कीं मिर्जा सलेमा सीकोह तेथें तुम्हापाशीं आहे त्याची खातरदारी बहुत करीत जाणें. सुका पाहून खान मशारनिल्हे बोलले कीं, मिर्जा सलेमा सीको याकडे नजर पाठविणें विहित आहे. त्याजवरून सात मोहरा मिर्जा सलेमा सीकोह व पांच मोहरा मिर्जा हाजी याकडे मोलवीबरोबर पाठविल्या व जबानी सांगून पाठविलें कीं, एकदोन रोजांत मीही सेवेसी हाजीर होईन. मोहरा प्रविष्ट झाल्यानंतर उभयतां शाहाजाद्यांनीं दुशाला गोस्वारा मोलवीस दिला. नंतर शाहाजाद्यांनीं मेंढ्या नबाबास व हैदरबेग व हसनरजाखां यांस पाठविल्या. वजिरानेंही पंचवीस मेंढ्या उभयतां शाहाजाद्याकडे पाठविल्या. संध्याकाळीं वजीर बडे साहेबाकडेस आले. बगलगीर होऊन बसल्यानंतर जोडी तमंचाची वजिरास गुजराणली. एक घटिका बसून माडिन साहेबाकडे खैराफीयतकरितां चोबदार पाठविला व आपण स्वार होऊन दौलतखान्यास दाखील झाले.

इलमास अल्लीखानास खिलत दिले नव्हते ते सायंकाळीं मशारनिल्हेस खिलत दिले. मशारनिल्हेनीं पायांवर डोकें ठेवून विनंति केली कीं, मी सरकारचा गुलाम आहें. मजवर कृपा चित्तापासून असली पाहिजे. वजीर बोलले कीं, तुजविशीं माझी खातरजमा आहे. परंतु मामलतीचा पैका वरचेवर पावता करीत जाणें.

छ ११ ता। छ १४ मिनहूपावेतों

कंचनगीर वगैरे दोघे चेले उमरावगिराकडील बहुत दिवसापासून येथें कैदेंत आहेत. त्यास ज्ञाणीखां कैद आहे तेथें राखण्यास आज्ञा झाली. मशारनिल्हेस कैद करावयाचें कारण दोन आहे. उभयतां चेले उमरावगिरासीं रुसून कांहीं मशारनिल्हेकडील सरंजाम घऊन येथें चाकरीस आले. उमरावगिरांनीं त्याची हरामखोरी वजिरास लिहून पाठविली त्यावरून कैद आहे. दुसरें हें कीं उभयतां गोसावी येथून पळोन नजफखांकडेस गेले. तेव्हां कंचनगीर अजीमगडास तैनातीस होता. तेथील कमावीसदारास बेअब्रू करून सरकारचे रुपये अनामत होते ते घेऊन गेले म्हणून कैद आहेत. नबाब वजीर मिरन इमखानाकडे जाफतेस गेले होते. मशारनिल्हेनीं पांच मोहरा दरवाजानजीक, सात मोहरा मसनदेवर बसले तेव्हां नजर दिधल्या. एकवीस खोन पारचे पोशाखी व एकस्ती जवाहीर नबाबास नजर केल्या. ते घेऊन वजीर हैदरबेगखानाकडे आले. एक घटिका बोलणें झालें; कळलें कीं, खान मशारनिल्हेस वजीर सांगून गेले कीं, तुम्ही मिरनइमखानाकडे जाणे तो बहुत उदास आहे. त्याजवरून खान मशारनिल्हे व मिर्झा हसनरजाखां जाणार आहेत.

वजीर चौदावी तारीख दोन प्रहरपावेतों दोन्ही शाहाजायाकडेस गेले नाहींत.

मिर्जा इसहाला वगैरे उभयतां कारभारी यास मिर्जा हाजी साहेबजायांनीं काढून दिलें होते. मशारनिल्हेनीं रोख लष्कराचे दाखवोन काशीस गेले. तेथें बेगमसाहेब मिर्झा हाजीची माय आहे, तिनें उभयतांस महासब याकरितां कैद केलें असे.

---

२९२ श्री

( भा. व. २-१११ ) श. १७१३ श्रा. व. १

ता. १४-८-१७९१

श्रीमंत राजश्री नानासाहेबांचे सेवेसी

अज्ञाधारक गंगाजी बाबर मुक्काम सोनप परगणे सांगोलें विज्ञापना. येथील कुशल जाणून स्वामींनीं आपलेकडील स्वकीय कुशललेखन करावयाविशीं आज्ञा जाहली पाहिजे विशेष. चिरंजीव गोविंदराव बाबर याचें शरिरीं समाधान नव्हतें. याजकरितां पुणियांत राजश्री बाळाजी लक्ष्मण[1] यांस लोकसुद्धां चाकरीस ठेवून स्वामीचा निरोप घेऊन गांवास आले. नंतर औषधी दैवी उपाय बहुत केले परतुं लागू जाहले नाहीं. शेवटीं कफाचा उपद्रव बहुत होऊन श्रावण वद्य १ रविवारीं प्रथम प्रहरांत देवाज्ञा झाली. स्वामीस कळावें म्हणोन लिहिलें असे. भावाचा मूल त्यांणीं वर्तमान असतां ओटींत घेतला आहे. चांगला सरकार-चाकरी करावया योग्य आहे. त्याचा अभिमान स्वामीस सर्वप्रकारें आहे. बाळाजीपंत यांस लोकसुद्धां निरोप यावयाची आज्ञा झाली पाहिजे. तेथें येऊन दिवस करून मुलास सेवेसी घेऊन येतील. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

२९३ श्री

( भा. व. २ अ. दि. ३ ) १६-८-१७९१ ?

## लखनौकडील आखबार

विनंति विज्ञापना ऐसीजे. टिपूकडील वर्तमान कळलें कीं, कंपूशीं व टिपूशीं लढाई झाली. दोन हजार तेलंगे तिकडील ठार झाले. शेवटीं टिपू पळाला. पंचवीस तोफा त्याज-कडील इंग्रेजाचे हस्तगत झाल्या. परंतु मशारनिल्हे टिपू लढाईचे तयारींत आहे. श्रीमंत साहेबाची फौज अद्याप त्याचे मुकाबिल्यास आली नाहीं. सारांश कुमकेबद्दल यांणीं कांहीं नजराणा कबूल केले होते. त्यास यांणीं आपले पराक्रमावर तुरुत गर्विष्ट होऊन बदमाम-लीचा इरादा केला, ऐसें आहे. परंतु हें वर्तमान ताम्रमुखाचे इलाखेदाराचे जबानीं ऐकिलें आहे. खरें खोटें ईश्वर जाणे.

---

१ उपनांव सलकाडे ( ? )

उभयतां बेगमसाहेबांनीं नबाबास वर्षगांठीस यावयाकरितां पेशजी लिहिलें होतें. वजिरांनीं येतो म्हणून उत्तर दिलें होतें. हल्लीं उभयतां बेगमांस येथें बोलाविलें आहे.

ठाकूरदास निा इलमास अलीखान नबाबापासून बिदा होऊन गयावर्जनास गेला.

पिरू पिलवान आज्ञेप्रमाणें हैदरबेगखां व हसनरजाखां याकडे गेला होता. दोन्ही जागेहून खिलत मशारनिल्हेस झाले.

राजा टिकेतरायानीं मजलसीबद्दल खान हुजुरात व हसनरजाखां व हैदरबेगखाना-कडेस पाठविले. छ १५ मिनहूस वजीर नबाब मदारउद्दौलाकडे जाफतेस जाणार आहे. जाफत झाल्यावर होईल तें वर्तमान विनंती लिहीन.

पांच खोजेजादे दिल्लीहून आले होते, त्याकरितां पांच किस्ती पोषाखी वस्त्राची चोपदाराबरोबर वजिरांनीं पाठविली. सेवेसी श्रुत होय. पुढें होईल तें वृत्त विनंती लिहीन.

---

२९४ श्री

( भा. व. २–३८ ) श. १७१३ पौं. शु. १३

ता. ७–१–१७९२

विनंती ऐसीजे. किल्ले चितोड तालुके उदेपूर येथें राजश्री पाटीलबावा यांणीं महासरा केला होता. तो किल्ला घेतला. फत्ते झाली. अकबर बातशा चितोडच्या किल्ल्यास लागले होते त्यास फत्ते करण्यास बारा वर्षे लागलीं. तो पाटीलबावांनीं बारा दिवसांत घेतला. याउप्पर उज्जनीस लौकरच दाखल होतील. ऐसीं पत्रें नबाबास व मध्यस्तास राजश्री बाबाराव यांचीं आलीं. पाटीलबावा उज्जनीस दाखल झाल्यावर हजरतीकडून राजश्री कल्याणराव यांस पाठवावें ऐसें मध्यस्तानीं ठरावून कल्याणराव यांस नबाबापाशीं ठेवून आले होते. हल्लीं मध्यस्तास नबाबाचा इनायतनामा आला कीं, पाटीलबावा उज्जनीस लौकरच येणार. कल्याणराव यांस लौकरच पाठविले पाहिजे. यास्तव यांचें दोनशें लोकांचें पथक आहे, तें सत्वर पाठवून देणें. त्यावरून मध्यस्तानीं साहेबजादे व आपले कबिले पानगलास रवाना केले. त्यासमागमें कल्याणराव यांचे स्वार दोनशें नेमले. हे जाऊन पोहचल्यावर कल्याणराव हुजुरांतून रुकसत होऊन तुळजापुरास जातील. पाटीलबावा उज्जनीस दाखल झाल्याचीं पत्रें आलियावर दरमजल उज्जनीस जाऊन पोहचतील, पाटीलबावाही उज्जनीस कांहीं दिवस राहून देशीं येणार. सरकारांत त्यांचीं पत्रें येतच असतील. रवाना छ १२ जमादिलावल. हे विनंती.

---

२९५ श्री

( भा. व. २ अ. दि. ६ ) फा. व. ६ श. १७१३
१४-३-१७९२

## टिपूकडील आखबार

विनंति ऐसीजे. याजपूर्वी पटणाकडील आखबार पारशी आली होती, त्याचा तर्जुमा हिंदवी करून सेवेसी रवाना केला आहे. त्याजवरून ध्यानास आलें असेल. हल्लीं पटणची आखबार आली त्याचा हा तर्जुमा हिंदवी असे. मजकूर कीं, याजपूर्वी सलाह झाली, व नक्षा पोहोंचला. महालांची वाटणी तिनहि सरकारची–जे कांहीं टिपुसुलतान याचे कबजांत महाल होते ते सांप्रत तिन्ही सरकारांत सोडले, आणि याचा नक्षा टिपुसुलतान याजकडील वकील घेऊन गेले होते, ते माघारे फिरोन गुत्ती बल्हारी हे दोन्ही किल्ले सरकारांत व कुडक[1] इंग्रजाकडे देणें हे देणार नाहीं टिपुसुलतान याचें म्हणणें. त्याजवरून लार्ड बहादूर यांणीं नाखुष होऊन मोर्चे पहिल्याप्रमाणें कायम करणें याचा तपशील पेशजी लिहिण्यांत आला होता. त्याजवरून इतला झाली असेल.

१ छ २० माहे रजब टिपुसुलतान यांचे पुत्राचे डेरे इदगाहनजीक होते. तेथून लार्ड बहादूर यांणीं कूच करवून आपले डेऱ्याचे पाठीमागें आणवून उतरविलें. त्याचे उतरल्या जागेहून उभयतां पुत्रांस लार्ड बहादूर यांणीं पालखींत घालून आणविलें. गुलाम अलीखान व अली रजाखान हे उभयतां आपले डेऱ्यासुद्धां इदगाहपाशींच राहिले. गुलाम अलीखान व अली रजाखान फिरोन टिपुसुलतान यांजकडे किल्ल्याचे जाबसालाकरितां जाऊन दुरुस्ती करून आले. बाजे बाजे जाबसाल कीं ज्याची तकरीर पुढें आली होती, ते कागदपत्राचे रुईनें समजायेश कारितात. लार्ड बहादूर यांणींहि समजोन घेऊन कबूल केलें. आजमुलउमरा यांणीं नबाबाकडील तहनामे व हरि पंडतजी यांणीं राव पंत प्रधान यांजकडील तहनाम्याचे कागद व लार्ड बहादूर यांणीं कुंपणी सरकारचे तहनाम्याचे कागद आपलाले जागीं तयार करून उभयतां खान वकील यांचे हवालीं केले कीं, टिपुसुलतान यांजपाशीं नेऊन मोहरा करून आणाव्या. त्यास छ २२ रजबीं उभयतां खान तहनाम्याचे कागद घेऊन टिपुसुलतान याजपाशीं गेले. कागद तहनामे वकील मोहर करावयास घेऊन गेले. याची खुषी राजे साम्राज्य यांणीं मानून आजमुलउमरा यास नजर केली. त्याजवरून तमाम लहान मोठे सरदार व आहलकार यांणींहि नजरा गुजराणल्या.

कलम १

१ तीन क्रोडीचा मुलूख तनख्याचा तिन्ही शरीकास आला. त्याचा वसूल पाहतां एक क्रोड वीस लाख रुपये होतात. किल्ले गुत्ती व बल्हारी व किल्ले कुडक हे तिन्ही मकानें टिपुसुलतान याजकडील हिसेब वाजवी पाहतां तीन क्रोडीचे तनख्यावर अधिक

---

१ कुर्ग.

आहेत. याचा मजकूर लार्ड बहादूर व हरि पंडतजी व आजमुलउमरा बहादूर यांणीं आपले जागीं बसोन मनास आणिला कीं, हे मकानें अधिक आहेत. याचे ऐवजीं दुसरे महाल सोडावे. परंतु असें ध्यानास येतें कीं, किल्ले गुत्ती टिपुसुलतान यांजकडे करार करतील. कलम १

१ छ २४ रोजीं त्रितीय प्रहरीं गुलाम अलीखान व अली रजाखान तहनाम्याचे कागद व महालाचे कागद वांटणीचे तिन्ही सरकारचे याजवर मोहरा करून घेऊन आले. परंतु बाजे दफेचा जाबसाल होणें आहे. व टिपुसुलतान यांणींहि तिन्ही सरकारचे तहनामे करून घेण्याचे कागदपत्र तयार करून तिन्ही सरकारच्या मोहरा करून घेण्याविशीं उभयतां खान यांचे बराबर देऊन पाठविले आहेत. कूच लौकरच व्हावें असें ठरलें होतें. परंतु कितेक जाबसाल याप्रमाणें दरपेश झाले. याजकरितां दरम्यान ढील आली होती. पुढें एकदोन जाब होणें ते सदरीं लिहिले आहेत. ते मुनला: झाल्यानंतर छ २९ अथवा छ ३० रोजीं कूच होईल व नवरोजाही पुढें आहे याची तयारी वस्त्रें वगैरे व रोषणीच्या ताव्या वगैरे आजमुलउमरा तयार करवितात. कलम १

१ परशरामपंत भाऊ हरि पंडतजी यांचे लष्करापासोन एका कोसाचे फासल्यान उतरले होते. हरि पंडतजी यांचें सांगितल्यावरून तेथून प्रथम कूच करून मोतीतळ्यावर जाऊन उतरले व तेथून तीन कोस आणिक पुढें कूच करून गेले. कलम १

१ एक एक पळ व एक एक घडी व एक एक प्रहर कसबी कामाचे जाबसाला-करितां टिपूकडोन ढील होते. यांत सरकारकामाची किफायतच तिघा शरीकाची आहे. परंतु चाऱ्याची किलत फार व गल्ल्याची गिराणी आज हादबेस्तर. आजमुलउमरा यांचे पागेचीं जनावरें व शिपाई याजकडील घोडीं माणसें व गरीबगुरब वगैरे फार जाया झालीं. व बहुतांची खाना खराबी झाली, व मनसबदार वगैरे फार तहखर्चांत आले. याचा बयान लिहितां येत नाहीं. याजमुळें आजमुलउमरा कूच करण्याविशीं बहुत जलदी करितात. कलम १

१ छ २४ रजबी गल्ल्याचा निरख येणेंप्रमाणें:—

| | | | |
|---|---|---|---|
| ८८१॥। | तांदुळ मोठे. | ८८२ | उडीद. |
| ८८१ | बारीक. | ८८३ | कुळथी. |
| ८८१॥ | कणीक. | ० | बाजरी मिळत नाहीं. |
| ८८१॥। | पीठ जोरी. | ८८१॥ | डाळ मुगाची. |
| ८८२॥ | पीठ रागी. | ८८१॥ | तुरीची डाळ. |
| ८८१॥ | पायली हरभरे मिळत नाहीं. | ॥।≈ | तूप दरशेर १४ आणेप्रमाणें. |
| ८८१। | गूळ. | ८८॥। | तंबाकु. |
| ८८१ | कांदे. | २२ | टके मुरादी दर रुपयास २२ सण्या. |
| ८८२ | साखर लाल दरशेर. | | |

येणेंप्रमाणें दर रुपयास भाव आहे.

—

७

सदरहूचे कलमासुद्धां सात कलमें आहेत.
सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

२९६ श्री
( भा. व. १-१२ ) ज्ये. व. १४ श. १७१४
२८-६-१७९२

पौ छ ३० सवाल सन सलास सित्तेन

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बाबूराव स्वामीचे शेवेसी

पोष्य बाळाजी जनार्दन साष्टांग नमस्कार विनंति उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें विशेष. दिल्लीस पातशाहींत गुलाम कादर पातशाही नौकर असतां त्याणें फंद करून पातशाहाशीं बहुत बेकैदी करून पातशहास कैदेंत ठेविलें. ते समयीं राजश्री पाटीलबावा यांणीं गुलाम कादर याचें व त्याचें मिलाफी होते त्यांचें सर्वांचें पारपत्य करून मुलकाचा वगैरे बंदोबस्त केला व पातशहास मोकळें करून पुन्हां तख्तनिसीन केलें. तें समयीं, "पातशाही चाकर बहुत होते परंतु कोणाच्यानें बंदोबस्त जाहला नाहीं. आणि तुम्हीं यथास्थित हरामखोरांचीं पारपत्यें केलीं व बंदोबस्त केला, असें कोणीही केलें नाहीं. याजकरितां पंतप्रधान यांस वकील मुतालकीचे व मीरबक्षीगिरीचे दोन्हीं पदें सरकारांतून करार करून देतों." याप्रमाणें बोलणें पाटीलबावांशीं होऊन वकील मुतालकी व मीरबक्षी-गिरी हीं दोन्हीं पदें करार करून देऊन पदांची खिलत व फर्दा व मरातब[1] पाटीलबावांजवळ

---

१ मरातब–मान–अर्थात् पदवी, राजचिन्हें, पोषाख वगैरे सर्व, यासमयीं जी सनद व वस्त्रालंकार वगैरे आले त्यांची माहिती पुढें लिहिल्याप्रमाणें:––फारशी सनदेंतील मजकूर ––"अमाइत बे अयालत मर्तबात हषमत बे षौकत मंजिलत जुबदय विफके षान दौलत खाह उमदय खैर अदषाने बिला इषातिबाह वसीरुल इक्तिदार अफिदत दिसार सईफे मसलुले षुजात समदे मसकुले मिजमार जिल्ले मषमूल अबातिफे अमिल वकीले मुल्क अमिरुल उमरा मुखतारुल मुमालिक मदासल मोहम सलतनत उमदय आशकिने फिलाफत यार बफादार सिदह शिलार सआदतमंद बजान् पयबंद फरदंदे खास–उल–खास मेलाजदेह महाराजाधि-राज पंडित परधान सवाई माधवराव नारायण बहादूर फिद्वीये शहाआलम बादशाहे गाजी." ह्या सनदेचा अर्थ फार प्रौढ व गंभीर आहे. तो येणेंप्रमाणें:––"मानकरीपणा व संपत्ति यांचे अधिकारी, सेना व संपत्ति यांचें स्थान, मित्रतेचे चिन्हानें चिन्हितांतील अत्युत्तम, विश्वासवृद्धिकारक, खात्रीचें चिन्ह आहे ज्यास, रणभूमीवरील केवळ नग्न तलवार, रणकंद-नांतील महाशूरत्वाचे केवळ तीक्ष्ण धारेचा भालाच, महाश्रेष्ठ परमविश्वासु, स्नेहभावाचे सुल-क्षणाचा आसमंतात् भाग, नानाप्रकारचे कृपापात्र, सर्व कृपा उतरण्याचें स्थान, कृपेचे छायेनें वेष्टित, अति–सर्वोत्तम देशसंबंधीं सर्वत्र काम चालविणार; सर्व अमिरांचे अमिर,

इनायत जाहला तो पाटीलबावा हल्लीं देशी आले ते समयीं बराबर आणिला, तो घेण्यास मुहूर्त आषाढ शुद्ध तृतीया शुक्रवारीं पाहिला आहे. येविशीं श्रीमंत महाराज राजश्री छत्रपति स्वामींस श्रीमंतांचे नांवें पत्र लिहून पाठविलें आहे. तुम्हीं प्रविष्ट करून, विनंती करून, खिलत वगैरे घेण्याचा मजकूर पत्रांत लिहून महाराजांचें नांवें पत्राचें उत्तर लौकर पाठवावें. गुरुवारीं उत्तर येऊन पोहोंचे असें करावें. रा छ २७ सवाल बहुत काय लिहिणें ? लोभ असो दीजे हे विनंती. महाराजांस श्रीमंतांनीं विनंतीपत्र पाठविलें आहे, हें प्रविष्ट करून ध्यावयाविसी महाराजांचें पत्र पद्धतवार श्रीमंतांस यावें हे विनंती.

---

२९७ श्री

( भा. व. १-१३ )

ज्ये. व. १४ श. १७१४
१८-६-१७९२

श्रीमंत क्षत्रियकुलावतंस महाराज राजश्री छत्रपति स्वामींचे सेवेसी. विनंति सेवक माधवराव नारायण प्रधान कृतानेक विज्ञापना. सेवकाचें वर्तमान तागाईत छ २७ सवाल पावेतों स्वामीचें कृपावलोकनेंकरून यथास्थित असे विशेष. दिल्लीस पातशाहींत गुलाम कादर पातशाही नौकर असतां त्यानें फंद करून पातशहासीं बहुत बेकैदी करून पातशहास कैदेंत ठेविलें. ते समयीं राजश्री महादजी शिंदे यांनीं गुलाम कादर याचे व जे त्याचे मिलाफी होते त्यांचें सर्वांचें पारपत्य करून मुलकाचा वगैरे बंदोबस्त केला व पातशहास मोकळें

---

सर्व देशाचा स्वसत्तात्मकपणें कारभार चालविणारे, दौलतीचे सर्व कामाचा भरंवसा आहे ज्यांवर, राज्याधाराचे केवळ आधारस्तंभच, अशा सर्व कारभारी मंडळींतील अति सर्वोत्तम स्नेहभाव सिद्धीस नेणारे सुमित्र, सेनापति, सुदैववान्, केवळ जिवलग, सरकारचे केवळ सुनिश्चित पुत्र, उपायसूचक असे जे महाराजाधिराज सवाई माधवराव नारायण पंडित प्रधान महापराक्रमी हे शहाआलम बादशहा महायोद्धा यांचे सेवक." या सनदेबरोबर जे पोषाख आले ते येणेंप्रमाणेः--

१ पोषाख--१ दस्तार शिरबस्ता. १ निमअसानी. १ चिरा. १ कंबरबंद. १ दुशाला. १ जामा. १ चारकुबा. १ बांकबंद. १ दुपट्टा.

२ नग--१ समशेर. १ कलमदान. २ मोर्चेलें. १ घोडा. १ पालखी झालदार. १ ढाल. १ शिक्के दऊत. १ हत्ती १ नालकी.

३ किता मरातब--१ अलम मयहाति. २ दुलम मयहाती. १ मरातब मयहाती २ शाग मयहाती. १ माही मयहाती.

४ रत्नजडित दागिने--१ मोत्यांचा माळ पदक. १ शिरपेंच. १ झगा. १ कलगी परगिरी.

करून पुन्हां तख्तनिसीन केलें, ते समयीं पातशहा बहुत खुष होऊन बोलले कीं, पातशाही चाकर बहुत होते, परंतु कोणाच्यानें बंदोबस्त झाला नाहीं. आणि तुम्ही यथास्थित हरामखोरांचें पारपत्य करून बंदोबस्त केला, असें कोणीहि केलें नाहीं. याजकरितां पंतप्रधान यांस 'वकील–मुतालकीचें–' व 'मीरबक्षीगिरी'चें दोन्ही पदें सरकारांतून करार करून देतों. याप्रमाणें बोलणें महादजी शिंदे यांसी होऊन, 'वकील–मुतालकी' व 'मीरबक्षीगिरी' दोन्ही पदें करार करून देऊन पदाची खिलत व फर्दा व मरातब शिंदे मशारनिल्हे यांजवळ इनायत झाला, तो शिंदे हल्लीं देशी येऊन भेटले त्यांणीं बराबर आणला आहे. परंतु स्वामीची आज्ञा आली पाहिजे म्हणोन विनंतिपत्र लिहिलें आहे. आज्ञा आली म्हणजे ध्यावयास येईल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

२९८ श्री

( भा. व. १–१४ ) श. १७१४ आ. शु. २
२१-६-१७९२

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ११९ परिधावनिाम संवत्सरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी यांणीं समस्त राजकार्यधुरंधर राजमान्य राजश्री माधवराव पंडित यांसी आज्ञा केली ऐसीजे, तुम्ही छ २७ सवालचें विनंतीपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. दिल्लीस पातशाहींत गुलाम कादर पातशाही नौकर असतां त्याणें फंद करून पातशहाशीं बहुत बेकैदी करून पातशहास कैदेंत ठेविलें, ते समयीं राजश्री महादजी शिंदे यांणीं गुलामकादर याचें व जे त्याचे मिलाफी होते त्यांचें सर्वांचें पारपत्य करून मुलकाचा वगैरे बंदोबस्त केला व पातशहास मोकळें करून पुन्हां तख्तनिसीन केलें, ते समयीं पातशाहा बहुत खुष होऊन बोलले कीं, पातशाही चाकर बहुत होते, परंतु कोणाच्यानें बंदोबस्त झाला नाहीं आणि तुम्ही यथास्थित हरामखोराचें पारिपत्य करून बंदोबस्त केला. असें कोणीही केलें नाहीं. याजकरितां पंतप्रधान यांस 'वकील–मुतालकी'चें व 'मीरबक्षीगिरी'चें दोन्ही पदें सरकारांतून करार करून देतों. याप्रमाणें बोलणें महादजी शिंदे यांसीं होऊन 'वकील–मुतालकी' व 'मीरबक्षीगिरी' दोन्ही पदें करार करून देऊन पदाची खिलत व फर्दा व मरातब शिंदे मशारनिल्हे यांजवळ इनायत झाला, तो शिंदे हल्लीं देशीं येऊन भेटले त्यांणीं बराबर आणला आहे. परंतु आज्ञा स्वामीची आली पाहिजे म्हणून विनंति लिहिली तो मजकूर सविस्तर विदित होऊन संतोष झाला. त्यावरून स्वामी तुम्हावर कृपाळु होऊन तुम्हांस पातशहांनीं दोन पदें दिलीं तीं हुजरून करार करून देऊन हें आज्ञापत्र सादर केलें असे. तरी 'वकील–मुतालकी' व 'मीरबक्षीगिरी'चे पदाची खिलत व फर्दा व मरातब तुम्ही घेणें. बहुत लिहिणें तरी सूज्ञ असा.

**तेरीख छ ३० सवाल सन सलास तिसैन. शिका मोर्तब.**

ऐ. १८

श्री

२९९

( भा. व. २-१३२ )

श. १७१४ पौ. शु. ८

ता. २१-१२-१७९२

सेवेसी आप्पाजीराम सहस्त्रबुद्धे कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता। छ ६ जमादिलावल पावेतों स्वामीचे कृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. आनंदवल्लीची हवा वाईट, जुन्नरास राहावयाचा बेत करून राजश्री धोंडभट गोखले व राघोपंत ठोसर विनंति करावयास पाठविले; त्यांणीं येऊन विनंति केली. श्रीमंतांनीं उभयतांजवळ निरोप सांगोन पाठविला आहे. विनंति करतील. राजश्री केसोपंत यांणीं पत्राचें उत्तर कसें लिहावें येविशीं विनंति केली. त्यास आज्ञा झाली त्याप्रमाणें उत्तर सेवेसी लिहून पाठविलें आहे. सारांश राजश्री गोविंदपंत गोखले यांस जातेसमयीं जाबसाल बोलावयास सांगितले आहेत. तो अर्थ हल्लीं बोलण्यांत दिसतो. धोंडभट व राघोपंत छ ४ जमादिलावलीं निरोप घेऊन गेले आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.[1]

---

श्री

३००

( भा. व. २-९६ )

श. १७१४

स. १७९२

सेवेसी विनंति. सेवक बाबाजी अनंत कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. प्रांत कराड येथिल हुजूर मामल्याची रुजवात दफ्तरीं होत आहे. रुजवात झाली म्हणजे हिशेब झाले ते व पुढें होणार त्याचा अजमास समजावितों. डुबल व थोरात व मामलेदाराकडे तफावती आहेत, त्यांचे झाडे तयार केले आहेत. आज्ञा झाली म्हणजे समजावितों. दीड महिना शरिरीं स्वस्थ नव्हतें यास्तव विनंति केली नाहीं. सांप्रत आरोग्यता झाली आहे. श्रीमंत पंतसचिव यांजकडील तुंगतिकोना येथील मामलत वीस एकवीसशें आम्हांकडे होती. त्यास वर्षास फाजील पडूं लागले. फाजीलाची वाट नाहीं. तेव्हां पंत मामलत करा म्हणत असतां आम्ही मामलत टाकिली, त्यास चार वर्षे झालीं. श्रीमंत बापू सचिव यांचे कारभारांत आम्ही व नारो शिवदेव होतों. त्या आकसामुळें दादा फडणिसांनीं कारभार केला. तेव्हां आम्हावर पंचवीस तीस हजार व नारो शिवदेव याजकडे पावणेदोन लाख काढले. त्यावरी श्रीमंत रघुनाथराव यांनीं मनास आणिलें. तेव्हां दादा फडणिसांनीं अदावतीनें लिहून दिल्हें. ऐसें ध्यानांत आलियावर नारो शिवदेव यांचे बोलणें आम्हांसच सांगितलें व आमचे मामलतीची आज्ञा केली कीं, दोन हजार तुम्ही संसारास घेऊन कच्चा हिशेब मामलतीचे ञा पासून समजावणे. त्यावरून हिशेब तयार केला. मग श्रीमंत रघुनाथराव यांस

---

[1] कोपरगांवाहून आनंदीबाई सन १७९२च्या अश्विनांत आनंदवल्लीस रहावयास गेली, त्यानंतरचें पत्र.

दादा फडणिसांनीं समजाविलें कीं, बाबाजीपंतास दोन हजार दिले म्हणजे वरकड किल्ल्याचे मामलेदारास याप्रमाणें द्यावे लागतील. तेव्हां रघुनाथराव यांनीं दादा फडणिसाशीं उत्तर केलें कीं, तुम्ही चौघे कारभारी; बाबाजीपंत त्यांस सरंजाम गावखेडे नाहीं. त्यांचें चाललें पाहिजे, यास्तव दोन हजार मामलतीत सरकारजमेशिवाय पांच रुपये साधून त्यांत महालचा खर्च व नजर व दरबारखर्च यास नेमणूक नाहीं तें साधून परभारें घ्यावें. तेव्हां दादांनीं सांगितलें कीं, वरकड मामलेदारास याप्रमाणें द्यावें लागेल. तेव्हां रघुनाथराव आम्हांस म्हणों लागले, तुम्हास नजर व दरबारखर्च व महालचे खर्चांची नेमणूक नाहीं. त्यास कच्चा जमाखर्च समजावणें आणि हजार रुपये संसारास नेमणूक खेरीज घेणें. तेव्हां आम्ही विनंति केली कीं, दोन हजार घ्यावे ऐसें आपलें वचन असतां आतां हजार घ्या म्हणतां याचा अर्थ काय ? तेव्हां म्हणाले, वरकड किल्ल्यांस दोन हजार द्यावे लागतील, यास्तव हजार मामलतींत घेणे, हजार हरएक ऐवजीं देऊं. तेव्हां आह्मी ऐकिलें नाहीं; यामुळें हिशेब राहिले. त्यास हल्लीं बाजीराव मोरेश्वर यांनीं दादा फडणिसांनीं आह्मांवर रुपये काढिले होते ती याद काढून आम्हांस तगादा केला. तेव्हां त्यांस सांगितलें कीं, श्रीमंत रघुनाथराव यांचे आमचे बोलणें झालें तें तुह्मां सर्वत्रास ठाऊकच आहे. त्यामुळें कच्चे हिशेबाचा फडशा झाला नाहीं. हल्लीं तुम्ही हिशेब मागतां त्यास कोणी मामलेदारांनीं तुम्हांस हिशेब दिले नाहींत. तेव्हां बाजीराव बोलले कीं, श्रीमंत नानांची आज्ञा आहे. तेव्हां आम्ही बोललों कीं, पंत तेच नाना. त्यांची आज्ञा आहे तर आम्ही वरकडाचा उजूर न धरतां कच्चे जमाखर्चांचा हिशेब समजावून देतों. परंतु फाजिलाचा निकाल करून द्यावा. त्यावरून ते म्हणाले कीं, तुमचा फडशा करून फाजिलाचा निकाल करून देतों. त्यावरून एकवीस सालीं कच्चे जमाखर्चांचा हिशेब समजावून दिला व फाजिलाचा झाड समजाविला. दादा फडणिसांनीं पंचवीस तीस हजार तचकरा[1] केला होता. आम्ही त्याशिवाय जाजती जमा होती ती समजावून दिली, त्यांत गुंजाईश ठेविली नाहीं. रीतीनें फडशा केला तरी उत्तम. रीतीनें न करीत तर स्वामी पंताचे जागां आहेत. मनास आणून आज्ञा करतील त्याप्रमाणें वर्तणूक करीन. ते गैरवाका स्वामीस समजावून कजिया करूं लागतील. स्वामीस कच्चें समजलें पाहिजे यास्तव विनंति लिहिली आहे. याशिवाय श्रीमंत बापू सचिव यांनीं गहाणवट कर्जांत ठेविलें होतें, तें कैलासवासी रघुनाथराव[2] मागूं लागले. तेव्हां आम्हीं विनंति केली कीं, त्यांचे लढे आहेत ते, उरकोन देऊन गहाणवट घ्यावें. तेव्हां जनार्दन अप्पाजी यांचे विद्यमानें रघुनाथराव यांनीं कबूल केलें कीं, त्यांचे लढे उरकोन देऊं तेव्हां गहाणवट घेऊं. त्यास हल्लीं गहाणाविशीं‌ही तगादा करितात. गहाणवट अजमासें चौ साडे चौ हजारांचें आहे. बापूचे हातचे लढे उरकोन द्यावे आणि गहाणवट घ्यावें. त्याचीही याद बाजीराव यांजवळ दिली आहे. आम्हांस सर्व आधार स्वामीचे पायांचा आहे. आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक करीन. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ दंड. २ रघुनाथ चिमणाजी सचिव ता. १०.७.१७९१ रोजीं वारले, त्यानंतरच पत्र.

३०१ श्री

( भा. व. २-१५२ ) श. १७१५ फा. व. २
१८-१-१७९४

सेवेसी येसाजी आप्पाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ १५ जमादिलाखर मौजे लष्कर प्रांत कुडाळ येथें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. राजमंडळचा व वाडीकर सावंताचा तह जाहला. पुढें लष्कर घाट चढून सामानगडावरून चिकोडी तालुक्यांत येऊन आपल्या निसबतीचे गांवास व तालुक्यास घासदाण्याचे रोखे करून आपले निसबतीचे गांवास उपसर्ग करून ठाणें घेणार याप्रमाणें बेत जाहला आहे. येविशीं सरकारांतून परवानगी जाहली आहे. त्यास आपण भुदरगड किल्ला घेऊन श्रीमंतांस दिल्हा. हा खुनस चित्तांत वारंवार उसणत असतात. त्यास आपण पुण्यास पत्र पाठवून श्रीमंत राजश्री नानास व श्रीमंत तात्यास विनंति करून तेथील पत्र व कारकून परभारें आणविल्यास बचाव होईल. घाटमाथा लष्कर येऊन पोहोंचल्या पूर्वीं पत्रें येऊन पोहोंचावीं. स्वार, पायदळ व पेंढार मिळोन वीस हजार जमेत आहे. कारभार प्रीतराज चवाण करीत आहेत. दुसऱ्याचें कोणाचें बोलणें रुचत नाहीं. त्यांचे विचारास येईल तसें मनस्वी करतात. त्यास आपला त्याचा येसाजी शिंदे याचे कारकीर्दीपासोन पेच आहे. राजश्री रत्नाकरपंत वगैरे आहेत, परंतु त्यांचें कांहीं त्यापुढें चालत नाहीं. येविशींचा अर्थ ध्यानांत आणून ठाण्याचा बंदोबस्त शिबंदी ठेवून करावा. खेडीं फोडून जरूर करावा. येथील विश्वास येत नाहीं. आपलें कुटुंब कृष्णापार करून पाठवावें. राजश्री सखाराम घाटगे सर्जाराव याजकडे बोलणें आहे. परंतु त्याजकडून बचाव होणें दिसत नाहीं. फौज भारी आहे. तूर्त श्रीमंत राजश्री परशुरामपंत भाऊ याजपाशीं नाहीं हें समजून या प्रसंगीं आपल्या गळीं पडणार अशी बातमी ऐकिली. याजकरितां गडी पाठविला आहे. फौजेचे खर्च तालुक्यावर उगवावे अशी मसलत आहे. याजकरितां सत्वर पुण्यास पत्र पाठवून बंदोबस्त करावा; नाहीं तरी परिणाम ठीक नाहीं. घाटास चवकी ठेविली आहे. कागदपत्राचे झाडा घेतात. विस्तार ल्याहावयास येत नाहीं. राजश्री बळवंतराव पुण्याहून येथें आले आहेत. परंतु त्यांचे विचारें केवळ आहेत असें नाहीं. त्याजकडे आम्ही जात असतों. पेंच पडल्यास त्याजकडून बचाव होणें दिसत नाहीं. जमाव भारी आहे. याचा बंदोबस्त करणें तो पक्का करावा. उभयतां श्रीमंतांचीं पत्रें लवकर येऊन पोचत तें करावें. तासगांवास राजश्री भाऊस वर्तमान लिहून कळवावें. वरकड मजकूर दादूभाई जबानी सांगतां कळेल. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

३०२ श्री

( भा. व. २. ११२ ) श. १७१५ फा. व. ४

ता. २०-३-१७९४

राजश्री बाळाजीपंत नाना फडणवीस गोसावी यांस

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेहांकित राजे खेमसांवत भोंसले बहादर सरदेसाई परगणा कुडाळ व महालानिहाय रामराम विनंति उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशललेखन केलें पाहिजे विशेष. मातुश्री कमळजाबाई ही हेरेस होती. त्यास तेथून चंदगडेस जाऊन होती. त्यास चंदगडकरांनीं राजश्री घनःशाम यशवंत देशपांडा तालुके मजकूर याचे ताबीन करून त्यांणीं सामानगडीं नेली, ऐसें पेशर्जी आपणांस लिहिलें होतें. त्यास फिरोन त्याची चौकशी मनास आणितां राजश्री त्र्यंबकराव यशवंत यांचे विद्यमानीं राजकर्ण करून सोला-पुरास पोहचविली. तेथून त्र्यंबकराव यशवंत व घनःशाम यशवंत देशपांडे यांचें एकसूत्र होऊन हेरे तालुकेंत स्वारीशिकारी करितात. एका गांवांत ठाणेंही त्यांणीं घातलें. आणखी-ही तालुके मजकुरीं उपद्रव करणारच. तेव्हां त्याचा व इकडील कलह व्हावा या विचारा-वर त्यांणीं मांडलें आहे. ऐशास सोलापूर तालुका मशारनिल्हे राजश्री पंतप्रधान यांक-डील, तेव्हां येविशींचा बंदोबस्त तिकडून व्हावा हें उत्तम. तें आपणांकडून न जाहल्यास आम्हाकडेस शब्द नसावा. यास्तव अगोदर आपणांस कळावें. आपणाकडोन याचा बंदोबस्त घडावा येविशींचें कितेक लिहिणें तें राजश्री बाबूराव पाटणकर यांस लिहिलें आहे, तेही आपणासी निवेदन करितील. तें ध्यानीं आणून त्या अन्वयें बंदोबस्त करून उत्तर पाठविलें पाहिजे. उत्तरानुरूप वर्तणूक करावयास येईल. रवाना छ १७ शाबान. बहुत काय लिहिणें ? लोभ असावा हे विनंति.

---

३०३ श्री

( भा. व. २ अ. दि. १७ ) श. १७१५ फा. व. १३

ता. २९-३-१७९४

सेवेसी कृष्णाजी जनार्दन कृतानेक शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ २६ साबानपावेतों मुकाम आनंदवल्ली येथें असें विशेष. श्रीमंत मातुश्री आनंदीबाई यांस दुखणें झालें आहे. फार प्रकृति कठिण आहे. छ २३ रोजीं सायंकाळीं घाबरी झाली, नेत्रास तटस्थता झाली, म्हणोन दर्भास्तरणावर आली. नंतर गंगोदक मुखांत घातलें. घटका अर्ध घटकांनीं किंचित् सावध झाली. कंठामध्यें कफाची दाटणी झाली होती, म्हणोन हेमगर्भ मात्रा घातली. तेणेंकरून स्थिर झाली. संपूर्ण रात्रीमध्यें जवळ बाजीराव व अमृतराव व चिमाजीआपा ऐसे बसले होते. उत्क्रांत धेनु सायंकाळींच दिल्ही. नंतर सारी रात्र दर्भावर होती. प्रातःकाळींच सूर्योदयाचे संधीस प्राणोत्क्रमण झालें. एकादशी व गुरुवार दिवस प्रातःकाळ काल झाला.

प्राणोत्क्रमणापर्यंत सावध होती. डोळे पुसणें किंवा अंग खाजवणें किंवा पदर नीट करणें व पाणी पाहिजे तर सांगावें हें सर्व आपले हातें करीत. दोन दिवस कफ गळ्यांत झाला. आणि शक्तिहीन झाली त्यामुळें शब्द बोलणें राहिलें. मरणकाळीं पोटांत प्याहा रोग होईल असें त्यांचे पत्रिकेंत होतें. तीही सांगत होती तोच रोग झाला, तेणेंकरून व्याप्त झाली. पहिला देवपूजन व जप करणें यांचा अभ्यास फार होता. मरणकाळापर्यंत देवपूजन व नमस्कार करणें, मागती मागती न्यास करावे असा छंद लागला होता. प्रातःकालापासून साहित्य होत होतें. अग्निहोत्र प्रकरण पहिलें झालेलें त्यामुळें ते उपचार झाले. अग्निमंथन करून काढिला आणि तोच विधि सर्व झाला. त्यामुळें गंगेवर जाण्यास बारा घटका दिवस आला. बाजीराव क्रिया करितात. मागती सर्व वाड्यांत येत तोंपर्यंत अडीच प्रहर दिवस झाला. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

**३०४** श्री

( भा. व. २ अ. दि. १६ ) श. १७१६ आ. व. ११

ता. २१-८- १७९४.

## नागपूरकर भोंसल्याकडील बातमीपत्र

पुरवणी साहेबाचे सेवेसी, आज्ञाधारक मल्हारजी वारपे कृतानेक विज्ञापना ऐसी जे. छ १८ मोहरमीं उभयतां बंधूंचें स्नान देवपूजा होऊन बाळाजीपंत काळकर आले. मालमामलत प्रकर्णीं दोन घटका बोलणें झालें, तों श्रीधर लक्ष्मण व गंगाधर माधव व अप्पाजी सखाराम आले. प्रहरभर बोलणें झालें. नंतर आपल्या घरास गेले. निद्रा होऊन सायंकाळीं उठून गणपतीचे दर्शनास गेले. दर्शन घेऊन तैसेच स्वारी शंकरदऱ्यास गेली. देवदर्शन घेऊन वाड्यांत आली. माधवराव भवानी बराबर होते. नंतर स्नान देवपूजा करून चतुर्थी होती. चंद्रोदय होतां पूजा करून भोजन झालें. नंतर आप्पाजी सखाराम आले. दोन घटका बोलून गेले. छ १९ रोजीं उभयतां बंधूंचें स्नान देवपूजा होऊन उभयतांची स्वारी मातुश्रीसुद्धां शिवराम हरि यांचे मोतीबागांत गेली. शास्त्री व उपाध्ये व सर्व मुत्सद मंडळी ऐसे आले. तेथें श्रीमहादेवाची मूर्त बसविली. त्याची स्थापना करून स्वारी वाड्यांत आली. नंतर तिसरे प्रहरीं उभयतांची स्वारी बाबाजी गोविंद चिटणीस यांचें येथें गेली. त्याचा कोणी गोत्रज वारला म्हणून समाधान करून घटकाभर बसून तैसीच स्वारी शंकरदऱ्यास गेली. तेथें देवदर्शन घेऊन वाड्यांत आले. छ २० रोजीं उभयतां बंधूंचें स्नान देवपूजा होऊन बाळाजीपंत काळकर आले. नंतर सेनासाहेब त्यास घेऊन जामदारखान्यांत गेले. मखमल व तापता व किनखाप पाहत बसले तों श्रीधर लक्ष्मण आले. नंतर तैसेच सेनासाहेब व सेनाधुरंधर व श्रीधर लक्ष्मण ऐसे मातुश्रीकडे वाड्यांत गेले. त्यांचें चारसहा घटका खलबत झालें. उपरांत हणमंत खिडकींत येऊन बसले. तो गंगाधर माधव व

बगाजीपंत मुनसी व आप्पाजी सखाराम वगैरे आले. दोनप्रहर पावेतों दरबार झाला. नंतर शुक्रवारतळ्याचे दक्षणेस गणेशबागांत नवें देवालय केलें आहे तेथें तमाम वाणी–उदमी शहरचे नेऊन बाजार भरविला. तेथें उभयतां बंधूंची स्वारी गेली. शास्त्री व उपाध्ये बोलावून नवा रथ मोठा दुमजला केला आहे त्याची पूजा करून वर बालाजीची मूर्त बसवून माणसांनीं ओढीत चालविला, तों मध्यें येतांना एक चाक मोडलें. नंतर दुसरें चाक बसवून ओढून शुक्रवारतळ्याचे पाळीस बुरजावर बंगल्यांत ती मूर्त बसविली. नंतर सेनासाहेबांची स्वारी शंकरदऱ्यास गेली. देवदर्शन घेऊन वाड्यांत आले. यावर बाबूराव वैद्य व श्रीधर लक्ष्मण व बगाजीपंत व गंगाधर माधव व आप्पाजी सखाराम ऐसे आले व आनंदराव नरसी आले. कारभारी पुण्याहून आले तेथील बोलण्याचें प्रकरण दहा घटका रात्रपावेतों झालें. उत्तरें प्रतिउत्तरें होत गेलीं. नंतर आपापले घरास गेले. छ २१ रोजीं उभयतां बंधूंचें स्नान देवपूजा होऊन स्वारी शुक्रवारतळ्याचे पाळीस गेली. तेथें मूर्त बालाजीची होती ती रथावर बसवून हणमंताजवळ वाड्यानजीक आणिली. तों तेथें रथ मोडला. मग मूर्त पालखींत घालून ठिकाणीं नेऊन बसविली. नंतर तिसरे प्रहरीं उभयतां बंधु व परसोजी भोसले यांची स्वारी रामचंद्र त्रिंबक फडणीस यांचे येथें गेली. मुत्सद्दीही आले. तेथें जन्माष्टमीचा उत्सव आहे. हरीरामबाबाची कथा आरती होऊन प्रसाद नारळ, पेढे, बत्तासे देऊन विडे घेऊन वाड्यांत स्वारी आली. नंतर शंकरदऱ्यास गेली. देवदर्शन घेऊन आले. उपरांत गणेशबागांत स्वारी गेली. तेथें कथा आरती होऊन वाड्यांत आले. छ २२ रोजीं उभयतां बंधूंचें स्नान देवपूजा होऊन मातुश्री चिमाबाई व बाळाबाई व ठकूबाई वगैरे बायांसुद्धां स्वारी श्रीजोगेश्वरास गेली. तेथें दर्शन घेऊन तैसेंच इंदुरास गेले. तेथें देवदर्शन घेऊन तेथें श्रावणमासापासून ब्राह्मणभोजन होत आहे त्यास कामदारास ताकीद करून स्वारी वाड्यांत आली. नंतर उभयतां बंधु बाहेर येऊन रथावर मूर्त बसवून माणसें लावून ओढोन नेला. मार्गानें जातां दहीहांड्या फोडल्या व लाह्या उधळल्या. गणेशबागांत मूर्त बसवून स्वारी वाड्यांत आली. नंतर स्नान देवपूजा होऊन सोमवार सोडला. नंतर प्रहर रात्र गेलियावर कृष्णराव माधव चिटणीस यांचे येथें जन्माष्टमीचा[1] उत्सव आहे, तेथें सखारामबावा देऊळगांवकर यांची कथा झाली. सेनासाहेब व सेनाधुरंधर व गुजाबा गुजर व बाबाभट उपाध्ये व श्रीधर लक्ष्मण व बगाजपंत व जानराव यशवंत व बाळाजीपंत काळकर आनंदराव नरसी ऐसे आले. चार घटका कीर्तन होऊन आरती झालियावर प्रसाद साखरेचा व हारतुरे देऊन अत्तर पानदान होऊन स्वारी वाड्यांत आली. छ २३ रोजीं उभयतां बंधूंचें स्नान देवपूजा झालियावर श्रीधर लक्ष्मण व गंगाधर माधव व अप्पाजी सखाराम आले. नबाबाकडून आनंदराव धोंडीराव याचें पत्र आलें. तें वाचून पाहून कट-

———

१. पहा ना. भो. ब. प्र. १४५. जन्माष्टमी. स. १७९४ची खर्ड्यांच्या लढाई पूर्वीची.

कास महादजी हरि व सदाशिवरावजी व हरवासराव यांजकडे पत्राची रवानगी केली. तों केशवराव रामचंद्र येऊन भेटले. सेनासाहेबास दोनशें भेट ठेविले. नंतर स्वारी तैसीच इंदुरास गेली. देवदर्शन घेऊन वाड्यांत आले. सेनाबहादर[1] याचें श्राद्ध होतें. पितर आप्तविशी सोयरे गुजर व महाडीक व शिरके, पालकर, मोहिते होते. भोजनें झालियावर तिसरे प्रहरीं उभयतां बंधूंची स्वारी तुळशीबागांत गेली. तेथें पुण्याहून डाकेचें पत्र आलें तें वाचून पाहिलें. नंतर तैसेच रामचंद्र त्रिंबक फडणीस यांचे येथें गेली. बाबूराव वैद्य व श्रीधर लक्ष्मण वगैरे कारभारी आले. कथा आरती होऊन पधीकपण (दधिलापण ?) झालियावर प्रसाद व हारतुरे घेऊन अत्तर पानदान होऊन स्वारी शंकरदऱ्यास गेली. देवदर्शन घेऊन आले. नंतर कारभारी आले. चार घटका बसून गेले. छ २४ रोजीं उभयतां बंधूंचें स्नान देवपूजा होऊन स्वारी रघुनाथराव घाटगे यांचे येथें गेली. तेथें कथा आरती व पधीकपण होऊन प्रसाद घेऊन गणेशबागांत गेले. मातुश्री आदिकरून बायांची स्वारी आली व शास्त्री उपाध्ये व मुत्सदी मंडळी व आप्तविशी व मानकरी लोक: आले. तेथें मुरलीधराचा उत्सव नऊ दहा रोज झाला. व नित्य दोन अडीचशें ब्राह्मणभोजनही होत होतें. त्यास कथा आरती व पधीकपण होऊन समाप्ति झाली. नंतर तिसरे प्रहरीं स्वारी शंकरदऱ्यास गेली. देवदर्शन घेऊन वाड्यांत आले. व भवानी काळो याचे कोणी गोत्रिजाची स्त्री वारली. याकरितां त्याचे कोणी दरबारास येत नाहीं. व संभाजी नाईक भोग याचीं वस्तभाव येथें कांहीं मुरारजी नाईक गडकरी याचे येथें होती. माणसांचे डो ( ई ) ओझीं बारा आहेत. कांहीं डागिने व कांहीं बासनें व मोहरा ऐसें आहे. त्यांतून एक ओझें फुटलें म्हणून पाहावयास आनंदराव नरसी व अबदुल गनी गेले. तें पाहून व नाइकाचें कर्ज येथें साहुकाऱ्यांत दहा हजार रुपये येणें होतें. त्यांतून पांच सहा हजाराचें वसूल करून सर्व हैद्राबादेस पाठवीत आहेत. वाटेचें दस्तक व एक पहारा आनंदराव नरसी यांनीं सेनासाहेबापाशीं मागितलें. जातांना वाशिमास जातील, वजिरी खानापाशीं जातील. अबदुलगनी यास निरोपाचे वस्त्र दिलें. साहेबाचे सेवेसी श्रुत होय हे विज्ञापि.

---

३०५ श्री

( भा. व. २–२ ) श. १७१६ का. व. ५

ता. १२-११-१७९४

पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

विनंति ऐसी जे.[1] स्वामीनीं कृपा करून छ ५ रविलाखरचें पत्र पाठविलें तें छ १७ माहे मिनहूस पावून परम संतोष झाला. पत्रीं आज्ञा कीं, आज वीस वर्षांत श्रीमंतांची स्वारी मसलतीवर निघणार तेव्हां सर्वांच्या परीक्षा. त्यांत होळकर, शिंदे तों बरोबरीचे

---

१ खंडोजी भोसले. हा स. १७८९ च्या श्रावणांत मरण पावला.

सरदार. कोण कसे हें खावंदाचे ध्यानांत यावयाचे दिवस जाणोन तुम्हांस आषाढमासा-पासून लिहीत असतां कशास कांहीं ठिकाण नाहीं. भाद्रपदांत येणें होईल हा भरवसा मोठा. त्यांत दसऱ्याची पराकाष्ठा असतां दिपवाळी झाली. अद्याप तापीतीर सुटलें नाहीं. गंगाजळनिर्मळ अहिल्याबाई होळकर यांनीं सरकारलक्ष धरून कळकळीनें रवानगी केली, व राजश्री तुकोजी होळकर सुभेदार यांचेंही मानस सत्वर जाऊन पोंहचावें असें असतां येणें घडत नाहीं, यास उपाय काय? सुभेदारांनीं अगोदर यावें, सलाहमसलत त्यांस समजावी, हें इकडील मानस. परंतु योग न घडे यास काय करणार? याउपर तुम्हीं हें पत्र पावतांच निघोन यावें. मागें येण्याविशीं लिहिलें होतें त्यांत हें न मोजावें, सत्वर यावें म्हणोन पत्रीं आज्ञा: त्याजवरून पत्रें पावतांच राजश्री सुभेदार यांजकडे जाऊन साकल्य सांगितलें व निरोप सांगितला. उत्तर केलें कीं, आम्हांस दिवस लागले खरेच. त्याचा अर्थ सर्व तुमचें ध्यानांतच आहे. तापीस पाणी, नावासुद्धां नाहींत. पंधरा दिवस उतारा लाग-लाच आहे. इतःपर गुंता नाहीं. सत्वरच चालतों. तेव्हां उत्तर केलें कीं, आपण थोर सर-दार, ऐशास चालण्यास आठ महिने येण्याविषयीं पत्रें येतात. आपले घरचीं सांग व्यंगें अनेक, कारभारी बारा, यानें करावें तें त्यानें मोडावें. त्यानें करावें तें यानें मोडावें. आपलें करणें हिताहित कोण काय सांगतो हें नाहीं. एकावर विश्वास नाहीं. त्यांत दोन चार हलकीं माणसें-यांनीं सा वर्षांत सरदारीची ही दशा केली व करितात. आपले ध्यानासही येतें व शासन न होतां पुन्हा संग्रह त्यांचा व लाखों खर्च होऊन बखेडे दर बखेडे चाललेच आहेत. तेव्हां वहिवाट याच प्रकारची. त्यांत जलदी चालण्याची व चालतो हेंही चाललेंच आहे. कारभारी व आम्ही आपल्यापाशीं पोहोंचल्यास महिना होत आला. कोणाचें कांहीं न चालतां पुन्हा तद्वत लबाड्या करणार ते करीतच आहेत. आपण नादीं लागणें ते लागतच आहेत. बाईनीं आपली रवानगी केली. इतःपर तरी एकहातीं काम, फौजा, पागा, शिलेदार सरं-जामी तोफखाना याचा बंदोबस्त चालून मसलत निर्वाहांत येऊन अब्रू राहील. राज्य सर्व एक जागें जमा झालें तेथें मागील चुकल्या गोष्टी सुधारणें व पुढें खावंदांची कृपा संपादणें हें घडलें पाहिजे. यास्तव बंदोबस्त होणें तो झाला. राहिला तो मार्गांत करीत दरमजल चालावें. एक क्षण विलंब न करितां कूच करावें; नाहींतर हुजरे, जासूद सरकारचे आले ते कूच करवितील. न केल्यास सरकार रीतीचे निग्रह करतील. मजला तो आज्ञा आली. इतःपर राहणें नाहीं. उदईक गुरुवारीं सष्टीस कूच करितों म्हणोन करार केला. आम्हीं राहुटीस आलों. दुसरे दिवशीं संक्रमणाची व घातवाराची कल्पना काढून मुक्काम करावेसें झालें. तेव्हां मी राहुटीस राहून कारकून, हुजरे व जासूद असामी ४ नेऊन बसविले. व निग्रह बहुत दाखविला कीं, पत्राचीं उत्तरें येणें होत नाहीं अशीं यावीं. त्याजवरून कारकुनासमागमें राजश्री श्रीपतराव मैराळ देऊन आम्हांकडे पाठविले. बहुतच नम्रता व कार्तिक व॥ ११ मंगळवारीं तापी दक्षणतीरास मुक्काम मुंढव्याचे( सेंढव्या ? ) पासीं करून दरमजल चालतों. मार्गांत मुक्काम पडल्याची कसर मोकळ्या मजला करून काढूं-

दरमजल चांदवडास मुकाम न करितां श्रीमंताचे पाय पाहतों. दरमजल चाललों म्हणजे तुमची रवानगी पुढें करितों म्हणोन शफथपूर्वक निश्चयांत आणिलें. त्याप्रमाणें एकादशी मंगळवारीं पांच घटका दिवसांत तापी दक्षणतीरास येऊन मुकाम मुंढव्याचा केला. द्वादशीस कूच करून तांदळीस तीन कोस मुकाम झाला. तोफखाना, पागा वगैरे सर्व कारखाने दक्षणतीरास आलेच होते. इतःपर दरमजल कूच करून येतात. शरीरप्रकृत केवळ जर्जर, त्यांत बुद्धीचें धैर्य थोडें, त्यांत संग्रही मनुष्यें त्यांनीं आजपर्यंत या दशेस आणिलें. व पुढेंही ते बुद्धिभ्रंश अनेक प्रकारें करितात. त्यांचे ठिकाणीं विषादही दाखवितात व संग्रहही करितात. बाईची ताकीद विशेष. पत्रांवर पत्रें नित्य येतच आहेत. तात्पर्य जैसें आहेत तैसे घेऊन सेवेसी येतों. मसलतीचे अन्वयें तेथें आल्यावर करणें तें स्वामी येथील अवस्था पाहून करितील. साहित्य सर्व अनुकूळ असून बुद्धिमांद्यतेमुळें बहुवशता, यास्तव अव्यवस्था पडते. साकल्य दर्शनांतीं निवेदीन. इतःपर यांचा निरोप घेऊन दरमजल सेवेसीं येतों. यांची मर्जी चार मजली दरमजल कूच करून तुम्हांस पुढें रवाना करितों. दिवस बहुत लागले यास्तव साशंकित चित्त झालें. यास्तव दरमजल कूचें झालीं पाहिजेत. शरीरप्रकृत दिवसादिवसांत फिरते. आजचे ××× चें अंतर पडलें. यास्तव चिरंजीव सुद्धां सर्वानुमतें मुकाम करावासें होतें. मग आमचें बोलणें झाल्यावर सुभेदाराचा निग्रह कांहीं असो; कूच करावें. त्याजवरून पांच कोस तिसरें कूच करून मुकाममजकुरीं पावले. दरमजल शरीरप्रकृतीनुरूप मजली पांच, चार, सा कोस करीत येतील. फारच प्रकृत ठीक नसल्यास मुकाम करणें प्राप्त. त्यांत जवळील मुसाहेब जुने कारभारी, त्यांस आजपर्यंत कृतदोष मनांत येऊन देशास येण्यास उत्साह नाहीं. यास्तव काळ काढावयास पहातात. परंतु बाईकडील ताकिदीवर ताकिदी व सरकारचीं पत्रें नेटाचीं व मसलतीचा समय येऊन पोहचला. चांदवडास देखील मुकाम न करितां श्रीमंतांचे पाय पाहावे, याप्रमाणें करार करून त्यांचे पत्रीं विस्तारें स्वामींस लिहिविलें आहे, त्यावरून श्रुत होईल. व राजश्री दादाजी गंगाधर यांस वरचेवर पत्रें दरमजल येतों म्हणून लिहून बोलण्यांत आणिलें आहे. शरीरप्रकृतीमुळें मातबर मजली तों होणार नाहींत. सदरहूप्रमाणें मजलीनें कमकसर एक महिन्यांत तेथें पावतील. दो चौ रोजांत निरोप घेऊन सेवेसी येतों. दर्शनांतीं निवेदीन. श्रुत होय हे विनंती.

---

३०६ श्री.

( भा. व. २-१२४ ) श. १७१६

तीर्थस्वरूप राजश्री नानासाहेब वडिलांचे सेवेसी सन १७९४

आपले बाळाबाई शितोळी देशमुख प्रांत पुणें चरणावरी मस्तक ठेवून विज्ञापना ऐसीजे. बाळाजीपंत धडफळे यांसी तीर्थरूपांनीं जांबगांवीं कैदेंत घातलें आहे, त्यांस सोडावें म्हणोन सरकारचा कारकून हुजुऱ्या येत असतो. ऐशास बाळाजीपंत यांचे वर्तुणुकीची माहीतगिरी वडिलांस असतां लेहून कळवावें असें नाहीं. यांची चौकशी करितेसमयीं तीर्थ-

रूपांनीं आपणाकडे सांगून पाठविलें होतें. आपला निरोप आला जे, तुम्ही कराल तें समजूनच कराल. त्याजवरून तीर्थरूपांनीं मनास आणून कैद केलें असतां हल्लीं श्रीमंतांची आज्ञा सोडवण्याविशीं होते. त्यास याजला सोडल्याने माझी नांदणूक वतनावर होणार नाहीं. आपण वडील, मुलें आपलीं नातवंडें. वतनाचें व आमचें संरक्षण पूर्वीपासून श्रीमंत करीत आले व पुढेंही त्यांसच करणें. याजकरतां याचा विचार आपण करून नातवंडें वतनावर नांदलीं पाहिजेत हें जाणून श्रीमंतांस विनंति करावी जे, पाटीलबावानीं स्वामिसेवा एकनिष्ठपणें केली. त्यांची कन्या बाळाबाई तिचा कारकून हरामखोर असतां त्याजविशीं भीड पडोन सोडावयाविशीं आज्ञा व्हावी आणि बाळाबाईची भीड न पडावी असें नसावें. त्यास येविशींची साहेबी विनंती मान्य करून कारकून हुजरे यांस मना करावें. श्रीमंतांचीच मर्जी सोडावें असें असल्यास जामीन त्यांणीं पक्केंपणें देऊन काशीवास करावा. मजला सर्व भरंवसा वडिलांचा आहे. वरकड गोपाळजी गुंड यासी सांगितलें आहे, विनंति करितील. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

३०७ श्री

शके १७१६

( भा. व २-१०० ) स. १७९४

याद चोळींचे शेत जमी सरकार जमीन दहा मण त्यांतील उत्पन्नसुद्धां खमस तिसेन मया व अलफ सन १२०४ शके १७१६ आनंदनामसंवत्सरे गुदस्त येसाजी शिंदे व कमाल महमद बनदार

·।·। दाणे केली उत्पन्न

·॥१८२। जोरी रास

८१॥·।॰ तुरी

॥२॥२॥॰

पैकीं वजा बीज

८१।२॥। मुद्दल बीज पेरलें ता।

८॥।२॥ जोरी ८॥।२॥

८॥·। तुरी

८१।२॥।

८॥२॥।॰ वाड दिढीप्रमाणें

८२८२॥॰

बाकी उत्पन्न ·॥·॥· केली

पैकीं वजा मेहनतीचा वाटा निमे वजा केली ·।·। बाकी सरकारी वाटा केली. ६७५ कडबा पुले सुमारें १३५० पैकीं वजा मेहनतीचा निमे वाटा पुले सुमारें ६७५. बाकी सरकारी वाटा पुले सुमारें.

---

३०८ श्री.

भा. व. २ अ. दि. १३ ) श. १७१६ पौ. व. ३०
ता. २०-१-१७९५

[ राजाराम कारकून शिलेदार यांचें पत्र, जिवाजी बक्षी निसबत दौलतराव शिंदे याचे लष्करांतून पारशी आलें त्याची हिंदवी. ]

पूर्वीं विनंतीपत्र देवजी गवळी याचे लष्करांतून डांकेवर रवाना केलें, त्यावरून इंग्रजाच्या डांकेची वगैरे हकीकत मालूम झाली असेल.

छ २५ जमादिलाखरीं मळेगावच्या मुक्कामीं सायंकाळीं पोहचून जिवाजी बल्लाळ यांची भेट घेतली. सरकारचें पत्र त्यांस देऊन बोलणें झालें. पहावें काय होतें.

छ २६ माहे मजकुरीं फुलें व शाखभाजी व फराळाचे वगैरे बहंग्या चार बहिलोलखा सुभे औरंगाबाद याजकडोन मशारनिल्हेस आल्या. कांहीं सवाल जबाब झाला नाहीं. नंतर हत्तीवर बसून मौजे दुधडावर येऊन मुक्काम केला.

तीन जोड्या जासुदाच्या जिवाजी बल्लाळ यांकडोन व पिरू फिरंग्याकडोन दोन निजामअल्लीखां यांची बातमी आणावयासाठीं रवाना झाल्या.

पिरू फिरंग्याचे भेटीसाठीं जिवाजी बल्लाळ यांसी बोलिलों. त्याचें लष्कर तफावतीनें उतरतें. त्याची भेट झालियावर त्याचें लष्कर डोळ्यानें पाहून विनंति करीन.

स्वार दहा पंधरा हजार पावेतों दृष्टीस पडतात. हरएक सरदाराच्या घरास जाऊन साकल्य विनंती करीन.

छ २७ माहे मजकुरीं कूच करून अड्लास येऊन मुक्काम केला. कोणी वकिलाचा जाबसाल जाहीर न झाला. देवजी गवळी याच्या पेंढारियांनीं मजला जासूदसुद्धां गारत केलें. सबब सारे घाबरे आहों. लष्कर बेगानें. सबब खर्चाची दया करावी. दोन तोफा मोठ्या हत्तीसुद्धां उजनीहून दौलतराव शिंदे यांच्या हुकमाप्रमाणें लष्करासमागमें आहेत. छ २८ जमादिलाखर.

---

३०९ श्री

( भा. व. २ अ. दि. १४ ) श. १७१६ माघ व. ९
१३-२-१७९५

[ राजाराम कारकून जिवाजी बल्लाळ याचे लष्करांत आहे त्याचें पारसी पत्राची हिंदवी. ]

छ २२ रजबीं जिवाजी बल्लाळ यांणीं दो कोसांचा कूच करून दौलतराव शिंदे

यांच्या पुढें बाबूलगांवावर लागू नदीच्या कांठीं मुकाम केला. हरकाऱ्याची जोडी नवाब निजामअलीखां व असदअलीखां यांच्या लष्करच्या बातमीचा लाखोटा घेऊन आली; त्यांत लिहिलें होतें कीं, आज प्रातःकाळीं असदअलीखां यांणीं समागमीचे सरदार व मुसा रहमु याच्या कंपूसुद्धां कूच करून दो प्रहरां मौजे लांजेस्वर येथें मुकाम केला. इतकियांत नवाब निजामअलीखां सडे स्वारीनिशीं लष्करांत रोषनखानाच्या डेऱ्यास आले. व सरदारांचे विद्यमानें जासुदांस चंदनबरनचा घाट पाहावयास पाठविलें. मौजे-मजकुराहून घाट चार कोस आहे. लष्कर व बहीरबुनगा मांजरा नदीवर ठेवन आपण सडे होऊन पांच सहा सरदारांसहित व दोन तीन हजार स्वार प्याद सुद्धां आले. सरकारच्य फौजेपासून आठरा कोसांवर आहेत. खबर आहे कीं, दो ठायीं मुकाम होणार. एक मौजे विटे व दुसरे बालाघाटच्या नदीवर. पाहावें कोठें मुकाम करितात.

---

३१० श्री

( भा. व. २ अ. दि. १८ ) श. १७१६ माघ व. २

६-२-१७९५

## खरडयाच्या मोहिमेंतील बातमीपत्र

यादी गोट गस्ती छ १५ रजब शुक्रवार सरकारांतून मोंगलाचे लष्करांत बातमी आणावयाकरितां जासूद जोड्या पांच व हुजऱ्या एक व कारकून एक याप्रमाणें छ ९ रजबी गेले होते. ते वाटमार्गी बार्शी पानगांवचे नजीक पेंढारियाची गांठ पडोन माणसें जखमी करून लुटले. सबब जासूद जोडी कारकुनाचें पत्र घेऊन आली आहे. हुजऱ्या जखमी झाला तो तेथेंच आहे व कारकूनही तेथेंच आहे. खिजमतगाराचे तळहातावर तरवारीची-जखम भारी लागली आहे म्हणोन सांगतात. श्रुत असावें.

यादी गोट गस्ती छ १५ रजब शुक्रवार नागपूरकर रघोजी भोसले याचे लष्कर तून सांडणीस्वार एक व सरकारचा साडणीस्वार एक उभयतांबरोबर आज लष्करांत तिसरे प्रहरीं आलेत. वर्तमान सांगतात, लाखोटपत्र सरकारांत आहेत. श्रुत होईल. कलम १

भोसले नागतळ्याच्या घाट चढोन येतात. उदईक मौजे निंबगांव नजीक कडे आष्टी मशारनिल्हेचा पाटीलकीचा गांव, तेथें मेजवानीस येणार म्हणोन वर्तमान. मागाहून दुसरी बातमी यईल. कलम १

दरेकर मंडळी पुण्याहून निघोन लष्करांत आज तिसरे प्रहरीं आले असत. स्वार १०० व ढाला दोन याप्रमाणें आले आहेत. कलम १.

बळवंतराव वाकडे पुण्याहून लष्करांत आज येऊन परशरामभाऊ याचे गोटानजीक उतरले आहेत. कलम १

कारवानी उंटें सुमारें १७५ पाउणे दोनशें आज येऊन आघाडीचे बाजारानजीक उतरले आहेत.

यादी गोट गस्ती छ १५ रजब शुक्रवार जयवंतराव देशमुख परगणे कळंबकर याचे वडील ता संस्थानिक पाळेगर हल्लीं उमेदवार शिलेदार स्वार ४० नगारा निशाणसुद्धां लष्करांत सायंकाळीं येऊन अघाडीस उतरले आहेत. बारामतीकराचे विद्यमानें सरकारांत भेटतील. कलम १

पांडुरंग बाबूराव बारामतीकर घरीहून निघोन बेलवाडीचे मुक्कामीं लष्करापासून आघाडीस तीन कोसांवर पथकसुद्धां येऊन आज उतरले आहेत. त्याजकडील माणसें लष्करांत आलीं आहेत. उदईक लष्करांत येऊन मिळतील.

---

श्री

**३११**
**(भा. व. २-१५६)**

श. १७१६ माघ. व. ६
ता. १०-२-१७९५

यादी गोटगस्ती छ १९ रजब मंगळवार राजश्री बाबा फडके काल चौ कोसांवर डावे बाजूस होते. ते आज सरकारआज्ञेप्रमाणें उजवे बाजूस होळकरांचे पलीकडे एके कोसावर उतरावयास गेले. मागाहून दुसरी बातमी येईल. कलम १

नागपूरकर रघोजी भोसले यांचे लष्करचा मुक्काम काल मौजे केळपिंपळगांव सीना नदीपासून चवदा कोसांवर होते. आज कूच करून साता कोसांवर येतील. उदईक सीना नदीचे पाण्यावर येणार. मागाहून दुसरी बातमी येईल. कलम १

बाबूराव वैद्य वकील निसबत सरकार भोसले यांचे लष्करांतून येऊन मार्गाल तळावर सरकारची भेट घेऊन काली मजलीस सीना नदीवर आले. त्याजकडील उंटें तट्टें मागाहून सायंकाळीं येऊन नदीपार सरकार डेऱ्याचे पिछाडीस रघुनाथराव बळवंत नायगांवकर यांचे शेजारीं उतरले आहेत. कलम १

आबा सेलूकर डावे बाजूस आहेत. तीन चार कोसांवर आहेत तेथेंच आहेत. आबा सेलूकर डावे बाजूसच आहेत.

---

श्री

**३१२**
**(भा. व. २-१५७)**

श. १७१६ माघ व. ९
ता. १३-२-१७९५

यादी गोटगस्ती छ २२ रजब शुक्रवार माधवराव भापकर सिलेदार घरीहून लष्करांत आज आले. बराबर ३० स्वार नगारा निशाणासुद्धां आले असत. कलम १

उमेदवार सिलेदार देवजी कोळी मौजे कळंब परगणे काठीमारडी बराबर स्वार २५ आहेत. गोपाळजी गुंड याचे विद्यमानें चाकरी राहणार. येणेंप्रमाणें आज आले. कलम १

विनायकपंत परांजपे यांजकडील गाडदी ४०० पेशजीपासून चाकरीस आहे. खासा मागें राहिले होते ते आज लष्करांत आले असत.

---

३१३ श्री

पौ. छ. २८ रमजान शके १७१७ चै. व. १०

ता. १४-४-१७९५

( भा. व. १-१० )

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बाबूराव स्वामीचे सेवेशी. पोष्य बाळाजी जनार्दन साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित असावें विशेष. तुम्ही छ १२ रमजानचें पत्र पाठविलें तें पावलें. 'लढाई जाहल्याचीं वर्तमानें लोकांचीं लिहून आलीं परंतु निर्गमीचें वृत्त आलें नाहीं. यांजकरितां चित्ताची स्वस्थता नाहीं. श्रीमंतांचें यश हें तो निश्चयात्मकच. परंतु आपले शरीरप्रकृतीची व श्रीमंतांचें सुक्ष्मतनु व दिवस उन्हाळा याची मात्र चिंता आहे. सविस्तर लिहावयास आज्ञा व्हावी. जसें मिटेल तसें मिटवावें. लोकांच्या सहस्त्र बुद्धि परंतु स्वामीस एक यश व सर्व मनसबे पहाणें हे लोकांस समजावयाचें नाहीं. निजाम अलीखान हरिपंताचे आज्ञेंत संकटाचे वेळेस चालत होते. मला सुचला अर्थ तो लिहिला. मी स्वामीपासून दूर आहें. परंतु सरकारचे हिताचीं साधकें बाधकें अहर्निशीं पहात असतों. लिहिल्यावांचून राहवत नाहीं. व आपणही माझा लेख थोडाबहुत घेत आले. लोकांचें लिहिणें ऐकिलें त्यावरून स्वामींचे मनसब्याची शर्त जाली; चक्रव्यूहाची रचना करून लढाई घेविली; अशी लढाई कधीं झाली नाहीं. स्वामीचे कृतीस महान् यश आलें येणेंकरून जो आनंद जाहला तो पत्रीं लिहिवत नाहीं. म्हणोन विस्तारें लिहिलें तें कळलें. त्यास लोकांचीं वर्तमानें जाऊन तुम्हांस कळावें आणि येथून न लिहावें असें नाहीं. परंतु मनांत होतें कीं, पुरती मसलत शेवटास गेल्यावर लिहावें, तों तुमचें पत्र आलें. त्यास श्रीमंत दैववान् गर्भी होते तेव्हांपासून हें तो विख्यात खरेंच आहे. शरीरप्रकृति नाजूक ही चिंता तुमचे मनास खरी, परंतु ईश्वरी कृपेनें खाशांचे प्रकृतीस श्रम पडावे येथपावेतों आलेंच नाहीं. एक उष्ण काळ आहे तर त्याचे उपचारही होतात व दौलत आहे तेथें सोसावेंही लागतें. चिंता करूं नये. जसें मिटेल तसें मिटवावें. हेंही मनांत कीं, संकटाचे समयीं नबाब अनुकूळ जाहले. परंतु अलीकडे नबाबाचे कारभारी मैनुद्दौला झाले. त्यांनीं अगदींच वाट सोडून श्रीमंताची दौलत घ्यावी; पुण्यांत झेंडे नबाबाचे लावावे, याखेरीज राजकारणें सरकारनाशाचीं व दंगे मारेकरीही पाठविले, अशी बहुतच केली. ते दस्तऐवजही सांपडले. नर्मदापार करावें हें भरकचेरींत बोलूं लागले. नबाबाचेही बुद्धिभ्रंश फार केला. तथापि आम्ही गाडद खात गेलों. पुढें जमीयत भारी, पन्नास हजार फौज, पन्नास हजार गलद चांगली करून श्रीमंतावर चालून यावयाचा इरादा केला. तथापि बहुत प्रकारें लिहिलें व सांगून पाठविलें.

त्यांचे मातबर आले. त्यांशीं बोलण्यांत आणिलें कीं, स्नेहांत विषाद येऊं नये. परंतु उपाय नाहीं. तेव्हां मसलत करणें प्राप्त. त्यांत टिपू काय करील हाही संशय. शिंद्याकडून एक कंपू व पंधरा हजार फौज हिंदुस्थानांतून आणविली. व भोंसल्याचाही सरंजाम वीस हजार पावेतों व फौज चाळीस हजार व वीस हजार गाडद व शिवाय होळकर वगैरे भारी सरंजाम सरकारचा एक करूं लागलों तों नबाबही जमीयतसुद्धां बेदराहून पुढें दर मजल येऊं लागले. तेव्हां इकडून पुढें होणें प्राप्त. श्रीमंतांची स्वारी सिनानदीवर आली. पुढें अघाडीस शिंद्याचे सरदार कंपूसुद्धां, व सरकारची फौज गाडदसुद्धां, राजश्री परशरामपंत भाऊ व बाबा फडके यांजबरोबर देऊन व भोसल्याकडील व होळकराकडील सरदार फौज गाडद इतके अघाडीस पुढें सहा कोसांवर करून मागें श्रीमंत वीस हजार फौजेसुद्धां राहिले. तों नबाब मोहरीचा घाट उतरून खालीं आले. पहिले दिवशीं सरकारची सडी फौज तलाव्यास गेली. त्याकडील फौज पुढें येऊन यांवर गोळे मारले. तेव्हां हे मागे सरले. इतक्यांची खुशी मानिली. त्यावर छ. १९ साबानीं कूच करून करमाळ्यावरून पुण्यास जाण्याचा रोख धरून कूच केलें, तों पुढील सरकारचे सरदारांनीं गांठ तिसरे प्रहरीं घातली. त्यांत परशरामपंत भाऊस थोडीशी उजवे डोळ्यावर तरवारीची जखम लागली. ते पुढें वाढून आले, तों शिंदे व सरकारची फौज व भोंसले वगैरेनीं त्यावर चालून घेतलें. तरवार व भाला बरची चालली. तोफांचीही मारागिरी त्यांची होऊं लागली तों शिंद्याकडील कंपूनें तोफांची मारागिरी त्यांवर भारी केली. तेव्हां त्यांचा मोड झाला. रात्र जाहली. मार भारी होऊं लागला. तेव्हां नबाबांनीं दोनदां सांगून पाठविलें कीं, आतां मार पुरे करावा. त्यावरून आवशीचे बारा घटका रात्रीस मार बंद करविला. तों पेंढारी सरकारचे हिंदुस्थानांतून दहा बारा हजार आणविले होते ते त्यांचे फौजेंत शिरले. नबाब फौज आली म्हणोन निघोन खर्डे म्हणोन ठाणे जवळ दोन कोस होतें तेथें गेले. त्या समयीं त्यांचा नाश फार जाहला. बुणगे लुटले गेले. तोफा कांहीं लढाईंत पाडाव जाहल्या. कांहीं मग ओढून आणिल्या. दारूगोळा आणिला. त्यांचे सरदार जखमी ठार झाले. फार खराबी झाली. दुसरे दिवशीं बोलणें लाविलें, मार बंद करावा, तह व्हावा. त्यावरून मार बंद करविला. तहाचे बोलण्यांत मुख्य मैनद्दौलानें एवढा नाश केला तो नसावा. नंतर तह. या गोष्टीस अनमान करूं लागले. शेवटीं मैनुद्दौलास जाच न सोसे, तेव्हां इकडे राजकारण लाविलें कीं, ज्या गोष्टी जाहल्या त्या चूक; याउपर शरण मीच आपलेजवळ येतों. चित्तास येईल तें करावें. तेव्हां करार करून घेतला कीं ज्यांत आम्हांस संदेश करूं नये. त्याप्रमाणें कबूल करून त्याची भेट होऊन त्यास बंदोबस्तांत ठेविलें. इतकें करावयाचें कारण लढाईचे दुसरे दिवशीं अगदीं नबाब बुडवावा असेंच झालें होतें. व सर्व सरदारांचेंही मानस होतें. व आचरणेंही तशींच त्यांकडून झालीं. परंतु नबाब समयास पूर्वी कामावर पडले याकरितां रक्षण केलें. पुढें तहाचें बोलणें सरकारचे अंमल वीस वर्षांचे मिळून तीन क्रोड रुपये तीहीं वर्षांत घ्यावे. तीस लक्षांची जहागीर व

दौलताबादचा किल्ला याप्रमाणें सरकारांत यावे. भोसल्याचे अंमल राहिले व त्यांचे महाल दाबिले त्याचा फडशा करावा. याप्रमाणें ठरावांत आलें. कागदपत्र होणें तेंही आठ दिवसांत होतील. ते झाल्यावर महाराजांस श्रीमंतांचीं पत्रें येतील. तुम्हांस कळावें म्हणोन विस्तारें लिहिलें आहे. सारांश, ईश्वरी कृपा व महाराजांचा आशीर्वाद व श्रीमंताचे दैवेंकडून गोष्ट घडली. महाराज व मातोश्री बाईसाहेब यांस पेशव्यांचे यशाविषयीं शुभचिंतन बहुत, श्रीशंभुमहादेव सर्व घडवील असें नित्य म्हणतात, म्हणोन लिहिलें. त्यास हें सर्व त्यांचे आशीर्वादाचेंच फल आहे. छ. २२ रमजान. बहुत काय लिहिणें ? लोभ असो दीजे हे विनंति.

---

३१४ श्री शके १७१७ वै. शु. २

(भा. व. १–८) २१–४–१७९५

यादी मतालब सरकार श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांनीं नबाब निजामअलीखान बहादूर यांजकडोन करून घेणें.

१ खानदान असफजाही व खानदान श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांना इतिफाक एक-दिली मजबूत व दुरुस्त पहिले पासून चालत असतां आलीकडे खलश नाखुशी दौलानीं केली, व नौबत जंगावरी आणिली व मुलकाची खराबी दोन्ही करविली. नुकसानी दोन्हा सरकारची असतां वाजवी मामुल कामें त्या तऱ्हेनें काढून येथवर नौबत आणिली, तेव्हां दौले बिलकूल नबाबाजवळ नसावेत.

१. मुलूख हिंदुस्थान व दाक्षिण हिंदुस्थानचे पातशहाचे ताबे आहेत. पादशाही बंदोबस्त त्याचे अखत्यार त्याचे ताबे दक्षण तालुका जो पादशाही कायदा आहे व तेथून जो अहकाम पोहोंचेल त्याची मुताबत असावी.

दाक्षिणेंत बिलकूल गोवध न करावा. मुसलमानीचा जो धर्म निमाज, रोजा, बांग-सलबात, इकरानें खुदापरस्ती करावी.

१. च्याहरम[1] व सरदशमुखी प्रांत दाक्षिणेचा सुभे येथील स्वराज्याकडे त्याचा अंमल दखल शिरस्त्याप्रमाणें व हुकूम अहकाम व अमल आपले आपले अमलाचा असावा व वसूल ज्याचा त्याणीं घेत असावा. परस्पर मुजाहीम नसावे, मात्र इतफाके करून मुलकाची अबादी करावी.

१ बुलदे व कसबे सुभे ज्यांत येथें ठाणें मुंगलाई आहे तें बहाल राहून चौथ व सरदेशमुखीचे अमलाचा अंमलदार हरएक तालुक्यांत आहे, त्यास दरमहाल ठाणें महाल पाहून, कोठें पांचचार कोठें जैसे जरूर हे ठाणेअंमलदाराकडे राहून, दरोबस्त महालांत

---

१ चाहरम् = $\frac{1}{4}$ चौथा हिस्सा, चौथाई.

दखल अमलाचा असावा. आबादी दोघांनीं इतफाकानें करून साधला ऐवज आपले हिशा-
प्रमाणें बेदिकत घेत असावा.

१ सुभे हैद्राबाद येथें अमल चौथ व सरदेशमुखीचा त्यांत नेहजे[3] व खलश यास
याची माफी कधीं स्वराज्यांतून झाली असेल, दस्ताऐवज दाखवावा, माफीचा दस्तऐवज
नसल्यास शिरस्त्याप्रमाणें अंमल दखल ज्यारी असावा.

१ प्रांत आदोनी व प्रांत निर्मल वगैरे महाल येथील अंमल करार वाकई चौथ व
सरदेमुखीचा ज्यारी घेऊन पहिले बाकीयांत त्या तालुकियांत मुरवतीमुळें राहिली ते घेणें.

१ प्रांत वराड येथील निमे निमे तह राजश्री सेनासाहेबसुभा यांचा नबाबांनीं
केलाच आहे त्याप्रमाणें ज्यारी अंमल आहे. पायाघाटचे सरकारांत चारम सरदेशमुखी व
घासदाणा सेनासाहेबसुभा यामुळें निमे ते घेतात. सरकार पाथरी वगैरे पाच सरकार बाल-
घाट येथें चौथ व सरदेशमुखी स्वराज्याचा व घासदाणा सेनासाहेबसुभा यांचा आहे, तेव्हां
पायाघाटचे व सेनासाहेबसुभा यांचा तह तो स्वराज्याचाच होय. निमेनीम बलाकी घास-
दाणा बालाघाट सुभे वराड येथें व कायम असावा म्हणजे खलश मुलखांतील दूर होऊन
आबादी दोही सरकारची होईल.

१. सुभे बेदर व औरंगाबाद येथें चौथ व सरदेशमुखी बाबती वगैरे अंमल
स्वराज्याचा आहे. तेथीलहि बंदोबस्त घासदाणियाचा घडावा म्हणजे निमेनीम मोंगलाई
निमें स्वराज्य असें घडावें.

१. प्रांत कर्नाटक येथें टिपु सुलतान यांचे तालुकियाचा आकार त्यांचे लिहिल्या-
प्रमाणें अडीच करोड रुपये, तेव्हां चौथ व सरदेशमुखीचा ऐवज नव्वद लाख रुपये
पावेतों त्यास सरदार व फौज सरकारची जाऊन साठ पासष्ट लाख रुपये खंडणीशिवाय
पन्नास साठ लाख रुपये नुकसानी पायेमाली त्या प्रांतांत होत होती. अलिकडे आंगरेजाचे
माफिकतीमुळें चाळीस चाळीस लाख रुपये याचा मुलूख घेणियांत आला. नबाबाचे सरकारांत
चाळीस लाख रुपये याचा मुलूख व गंजी कोट व सिधोट वगैरे किल्ले आले. त्या तालुकी-
यांत अंमल सरदेशमुखी चौथचा ज्यारी होऊन पहिले दो वर्षांचा ऐवज हिशेबाप्रमाणें येणें
आहे तो नबाबांनीं घ्यावा व एक किल्ला द्यावा.

१. हिंदु मुसलमान ईश्वराचें घरची दोन्ही धर्म चालत असतां मुसलमानानें हिंदूचे
जाग्यास उपद्रव करावा, हे बेमुनसफी व हिंदूनें आजतागाईत मुसलमानीचे जागे पीर
पैगंबर यांसी दुसरी गोष्ट समजण्यांत आणिली नाहीं. तेव्हां मुसलमानानें हिंदूचे धर्मास
खलश करूं नये. आपले चालीनें धर्मावरी कायम असावें. परस्परें मुजाहीम नसावें.

१. शाहाजादे पातशाही दक्षिणेंत आले त्याचा खर्च येथून निभतो, त्याची जायदाद
व मकान नबाबांनीं द्यावी.

१. गुलाम कादर व इस्माएल बेग निमकहराम यांनीं पातशहाशीं बेआदाबी
केली. त्याचे पारपत्य पातशाही तालुकदारानें व सुभ्यानें व नोकरांनीं करावें, तें कोणी न

केलें व खुशी मानून त्याचे नांवाचा खुतबा देखील ज्यारीनें ठेविला व आपली मजबुती समजले. त्यास पादशाहाशीं ज्यानें हरामनमकी बेअदा केली, त्याचें पारपत्य सरकारचे सरदारांनीं व फौजेनीं केलें, यामुळें फौजेचा खर्च मुबलग खजाना जाला, त्याचा ऐवज पातशाही तालुकदार सुभे त्यांत दक्षण सहा सुभे गणतीचे अमीरउमदे त्यांणीं जाले खर्चाची पैरवी करून द्यावी.

१. पहिले श्रीमंत कैलासवासी नाना व भाऊसाहेब यांचे वेळेस जे महाल नबाबांनीं दरोबस्त जाहागीर तरीम दिधले त्याचा अनुभव बहुत रोज राहिला. अलीकडे घरगत फिसाद पैदा जाला, नबाबांनीं आपले करारमदार जे नबाब असफजहापासून होते ते याद करून, खुद्द फौजेसहित सरकारचे सरदार व फौजेची कुमक केली, त्यास आलबता खर्च लागला म्हणोन मीर मुसाखान रुकनुद्दौले यांचे विचारें त्या महालांपैकीं जालेला खर्च याचे मदतीकरितां महाल सुपूर्द सरकारांतून केले, यास वीस वर्षें होत आलीं; तेव्हां खर्चाचा ऐवज वसूल होऊन जास्त ऐवज नबाबास पावला. सांप्रत सरकारची स्वारी पहिलीच प्रारंभ व दौलत व खर्च हें कुल समजलें. अवल घरचा बंदोबस्त नीट राखावा हे रइसास लाजम. याची खुशी नबाबास आहे व असावी. तेव्हां महाल जे मीर मुसाखान यांचे वेळेस इकडोन सुपूर्द केले व महाल किल्यांसुद्धां व अधिक जे इकडील सव्वा हिस्सा त्या बमोजीब नबाबांनीं अंमलांत आपले खुशीनेंच आणावें. जे ते वडील आहेत. इकडील दुरस्ती त्यांस मंजूरच आहे. जे पुढें अवलादीचे हक्कांत हे बंदोबस्त निभतील व चालतील.

सदरहू कलमें मतलबाचीं जे समजांत आलीं ते लिहिलीं. याउपरी माहितगारीनें सरकारचीं कामें वरप्रमाणें असल्यास ते लिहिण्यांत येतीलच. येविशीं उभयपक्षीं करार ठरून तहनामे दोहीकडील स्वराज्य व राजश्री सेनासाहेबसुभा या दोहीकडील घडावे.

---

३१५ श्री

( भा. व. १-११ ) श. १७१७ वै. शु. १५
४-५-१७९५

श्रीमंत क्षत्रियकुलावतंस महाराज राजश्री छत्रपति स्वामीचे सेवेशीं.

विनंति सेवक माधवराव नारायण प्रधान कृतानेक विज्ञापना सेवकाचें वर्तमान ता छ. १४ सवाल पावेतों स्वामीचे कृपावलोकनेंकरून यथास्थित असें विशेषः नबाब निजाम अल्लीखान बहादुर यांजकडून स्वराज्याचे अमलाचे वगैरे जावसाल होणें ते सुरळींत होत नाहींत, व कित्येक चाळी दौलतेस पेंच पडावा अशा दिसल्या याजकरितां मसलत करणें प्राप्त जाणून मसलत केली आहे, हें पेशजी सेवेसी विनंती लिहिलीच आहे. नंतर नबाबास सांगोन पाठविणें त्या प्रकारें सांगोन पाठविलें कीं, परस्परें खलुष असेल तो निवा-

रावा, सरकारचे जाबसाल होणें असतील ते फडशांत यावे, लढाईचा प्रसंग करूं नये हे गोष्ट चांगली आहे; असें सांगोन पाठविलें असतां त्यांचे कारभारीयांणी दुरदंशे चित्तांत न आणितां नबाबाचे चित्तांत विकल्प आणून पन्नास साठ हजार फौज व चाळीस हजार गाडद वगैरे पोख्त सरंजामानिशीं बेदराहून कूच करून दरमजल येऊं लागले. तेव्हां इक-डूनही कूच करून जाणें प्राप्त, याजकरितां सरकारचेंहि कूच होऊन मजल दरमजल जाऊन वीस कोसांचे फासल्यानें सीनेवर मुक्काम केला. तेथूनही त्यांजकडे सांगोन पाठविलें, तथापि त्यांचे मर्जीस न आलें. त्यावर मोहरीचा घाट उतरून खरनदीवर त्यांणीं येऊन मुक्काम केला. त्याजवरून राजश्री परशुराम रामचंद्र व रामचंद्र हरि यांजसमागमें हुजरात वगैरे सरंजाम देऊन व राजश्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा यांजकडील विठ्ठल बल्लाळ फौजसुद्धां व राजश्री दौलतराव शिंदे यांजकडील जिवाजी बल्लाळ फौज बमय कंपूसुद्धां व राजश्री तुकोजी होळकर यांजकडील काशीराव होळकर व बापूजी होळकर आदिकरून तमाम सड्या फौजा पुढें घोडेगांवावर त्यांचे मुकाबल्यास रवाना केल्या. त्या खरनदीपासून चार कोस आलीकडे मुक्काम करून होत्या. नबाबा-कडील कांहीं फौज पुढें वाढून आली. दोघांची गोळागोळी झाली. नंतर नबाबांनीं छ १९ शाबानी खरनदींतून कूच करून परांड्याचे रोंखें चालले. ते समयीं सरकारच्या फौजा तयार होऊन लढाईस नमूद जाहले. तेव्हां त्यांणीं परांड्याचा रोंख सोडून सर-कारचे फौजेवर चालोन घेतलें. लढाई सुरू झाली. तोफांची मारगिरी तिसराप्रहरपर्यंत झाली. ते समयीं नबाबाचे फौजेचा मोहरा फिरवून गोल फोडून हुजरातीनें हतेर लावून शिकस्त केलें. महाराजांकडील फत्ते झाली. नबाबाकडील हत्ती व घोडे व माणूस ठार व जखमी बहुत जाहलें. मोठे मोठे सरदार दोन चार ठार व जखमी झाले. तोफा, नौबती, उंट पाडाव झाले. बाजारबुणगें वगैरे लुटले गेले. व सरकारच्या फौजेंतील घोडे, माणूस जाया व जखमी झाले. परशराम रामचंद्र यांस तरवारीची जखम हलकी लागली. हुजरातीनें भोसले व जिवाजी बल्लाळ नि॥ शिंदे व होळकर यांणीं लढाई चांगली केली. ते वेळेस नबाब खर्डे येथील किल्ल्याचे आश्रयास निघोन गेले. पाठीमागें सरकारच्या सड्या फौजा जाऊन चौफेर घेरा दिला, तेव्हां त्यांस दम न धरवे, याजकरितां तहाचें बोलणें लाविलें; व त्यांचे कारभारी मैनु-दौला यांणीं सरकारांत पैगाम लावून त्यांजकडून निघोन इकडे आले. नबाबाची फौज गारत करावी असाच प्रसंग होता. परंतु नबाबाचा स्नेह घरोबा बहुत दिवस चालत आला हें जाणून तहाचा ठराव करून, किल्ले दौलताबाद व बत्तीस लक्षांची जहागीर व स्वराज्याचे अमलाबाबत ऐवज वगैरे जाबसालाचा दारमदार करून घेतला. नबाब निघोन दरमजल बेदरास गेले. सेवकाचेंही फौजसुद्धां कूच होऊन दरमजल पुण्यास आलों; स्वामीस निवेदन व्हावें याजकरितां विनंती लिहिली आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

३१६ श्री

( भा. व. २-१२६ ) भाद्रपद वद्य ८ शके १७१७

ता. ५-१०-१७९५

सेवेसी केसो महादेव[1] कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ताा छ २१ रविलाबल-पावेतों स्वामीचे कृपेंकरून क्षेम असे विशेष. श्रीमंत राजश्री बाजीरावसाहेब यांचें बोलणें राजश्री गोविदपंत गोडबोले पुण्यास जावयाचे निरोपसमयीं बोलिले. तेव्हां राजश्री आप्पाजीपंत सहस्त्रबुद्धे व मीही होतों. ते समयीं त्यांजवळ आज्ञा झाली कीं, पूर्वीं तीर्थरूपांचे वेळेस ज्या कांहीं वाईट बऱ्या गोष्टी जाहल्या त्या त्यांस माहीत होत्या. परंतु स्वदेशीं आले ते समयीं सर्व कल्पना दूर होऊन परस्परें स्वसत्तेनें चालावें अशा विचारें निश्चय होऊन गंगातीरीं आल्यावर कैलासवास जाहला. नंतर कांहीं दिवस मातुश्री होती तसिही कैलासवास जाहला. तीर्थरूप मातुश्रीचा वियोग ईश्वरें (केला,) आम्हीं लहान होतों. पूर्वीं काय जाहलें, कशामुळें वांकडें पडलें हें आम्हांस ठाऊक नाहीं. वाकडेपणाचा अर्थ तीर्थरूप मातुश्रीबरोबर गेला. आम्हीं मुलें राहिलों. मातुश्रींनीं आम्हांस अंतकाळीं आज्ञा केली कीं, आतां तुम्हांस वडील नाना आहेत. यास्तव आम्हीं तेंच लक्ष धरून आहों. आमचे योग्यतेनुसार सोय होऊन रहस्यानें कालक्षेप होईल तें करावें. त्यावरून सेवेसी विनंतिपत्र लिहिलें आहे. पुढें आज्ञा येईल त्याप्रमाणें वर्तणूक करीन. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

३१७ आश्विन शु. ७ श. १७१७

( भा. व. १-१७ ) श्री २०-१०-१७९५

यादी श्रीमंत महाराज राजेश्री छत्रपति स्वामी यांजकडे दसऱ्याचे पोषाख रवाना सातारा, सनगें सुमारें

१० श्रीमंत राजेश्री छत्रपति यांस

| | |
|---|---|
| ५ प्रत पोषाख | ५ प्रत पोषाख |
| १ मंदील जरी | १ तिवर पैठणी |
| १ चादर जरी | १ जाफरखानी पैठणी |
| २ जामेवार जरी | २ मिटे जरी लाल |
| १ किनखाप | १ किनखाप |
| ५ | ५ |

१०

---

१ केसो महादेव हा नाना फडणिसांकडून बाजीरावाचे तैनातीस असलेला गृहस्थ. त्याचें हें नानांस पत्र. ऐ. टि. ६.६ चें पत्र ता. ७-७-१७९५ चें असून त्यानंतर लवकरच हें पत्र लिहिलेलें दिसतें. बाजीरावाची मागणी या वेळीं होती कीं, पूर्वीचें वैर विसरून पुढें आतां सवाई रावसाहेबांजवळ रहस्यानें राहून राज्याचें काम करावें. या संबंधाचा हा पत्रव्यवहार आहे.

६ मातोश्री आईसाहेब यांस
- १ पातळ जरी
- १ लुगडें पैठणी
- १ जाफरखानी पैठणी
- १ किनखाप
- २ चाळखण

६

१२ सौभाग्यवती बाईसाहेब यांस

६ वाडा पहिला
- १ पातळ मिटेदार जरीचें
- १ चादर जरी
- १ लुगडें पैठणी
- १ किनखाप
- २ चोळखण पैठणी
  - १ पिंवळा १ तांबडा

६

६ वाडा दुसरा
- १ लुगडें पैठणी
- १ पातळ मिठ्याचें जरी
- १ दुपट्टा भरजरी अनारदाणी
- १ किनखाप
- २ चोळखण पैठणी
  - १ तांबडा
  - १ पिंवळा

  २

६

१२

२॥ महाराजाचे पुत्र यांस
- १ चिरा जरी तमामी
- १ ओढणी जरी तमामी
- ·॥· जामेवार जरी तमामी

२॥

११ महाराजांच्या कन्या

४ थोरली
- १ पातळ जरी
- १ जाफरखानी
- १ किनखाप
- १ चोळखण

४

४ दुसरी
- १ पातळ जरी
- १ जाफरखानी
- १ किनखाप
- १ चोळखण

४

३ तिसरी
- १ कुंची
- १ परकर
- १ चोळी

११

४ सौभाग्यवती जिजाबाई महाडीक सखूबाई इची सून यांस
- १ साडी शेलारी
- १ जाफरखानी
- १ किनखाप
- १ चोळखण

४

४५॥·

एकूण साडेपंचेचाळीस सनगें तागाईत संताजी चव्हाण व महादाजी पवार खिजमतगार सु॥ सीत तिसैन मया व आलफ छ ६ रबिलाखर.

---

श्री

३१८

श. १७१७ का. व. ८
३-१२-१७९५

( भा. व. १-७९ )

चिरंजीव राजश्री आप्पा यांसी आशीर्वाद उपरी. तुम्ही पत्र पाठविलें तें पावलें. श्रीमंत राजश्री नानास्वामींनीं सर्व मजकूर सांगितल्याचा अर्थ लिहिला तो सर्व कळला. त्यांस माझ्या मतें बाजीराव यांस बाईचे मांडीवर बसवावें; आणि बाजीराव बल्लाळ हें म्हणवावें; नानांशीं सख्यत्व रक्षावें. पुढें नानाहीं सर्व संशय सोडावा. बाजीराव सर्वांस उपद्रव देतील हा आशय बोलिले त्यास हा संशय नसावा. सर्वांचें दैव त्यांचें स्वाधीन नाहीं. बाजीराव यांस टाकून दुसरे करावे तरी लौकिक विरुद्ध द्वेषास कारण. त्यापक्षीं बाजीराव करावे. त्याचें भय नानांही बाळगून लौकिकांतही आणूं नये, व सरदारांसही श्रुत करूं नये. शफतक्रियेचा मजकूर तुम्हीं लिहिला जे सर्व सरदारांदेखत बाजीराव यांणीं बोलावें, मी दादासाहेबांचा वंश नव्हे, नानासाहेबांचा वंश हे शफतक्रिया तोंडानें बोलावी, त्यांस हेंही विरुद्ध दिसतें. याजकारितां बाजीराव बल्लाळ हे बाईचे मांडीवर बसवून सर्वांदेखत नांव ठेवावें, आणि शर्करा सरकारवाड्यांत व सरदारांस वाटवावी व ब्राह्मणांस कांहीं दक्षणा द्यावी. पुढें महाराजांचें दर्शन जाहल्यावर प्रधान हें अभिधान होईल. सरळपणें जसें कार्य होऊन गोडीस येईल तसें दिकतीनें होणार नाहीं. विश्वासाचा अभिमानी श्रीहरि आहे. हा मनसब नानांचे खातरेस आल्यास सर्व सरदारांस बोलावून सांगावें जे बाजीराव यांस आणावयाचा निश्चय केला असें सांगून सिद्धान्तांत आलें म्हणजे महाराजांस श्रुत व्हावें येविषयीं विनंति लिहावी. मग एखादा शाहणा मनुष्य निस्पृह पाहून बाजीराव यांजकडे पाठवून सरळ बोलणें करून बाजीराव आणावे. सर्व नानांनीं केलें हेंच रूढींत आणावें. त्यांचे माथां उपकार नानांचे दाखवावे. असा शाहणा मनुष्य आणावयास पाठवून आणावें. नानांहीं पुण्यापासून दोन कोश मंडळीसुद्धां पुढें जाऊन सन्मान करून समारंभानें पुण्यांत आणावें. तोफखानाही सोडावा. अशा गोष्टी जाहल्या असतां बाजीराव यांचे मनांत तिलप्राय संदेहाची जोत उरणार नाहीं, व पुढेंही उठणार नाहीं. हा मनसबा फारच उत्तम दिसतो. सुचला तो अर्थ लिहिला आहे. यांत श्रीमंताची मर्जी. हे आशीर्वाद. रवाना छ २० जमादिलावल.[१]

---

१. पत्र परशुरामभाऊचें रामचंद्र आप्पास असावें.

३१९ श्री

श. १७१७ का. व. ११

( भा. व. १–५ ) ता. ७–१२–१७९५

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बाबूराव स्वामीचे सेवेसी

पोष्य बाळाजी जनार्दन साष्टांग नमस्कार विनंति उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय लिहित जावें विशेष. छ २१ तुम्ही जमादिलावलचें पत्र पाठविलें तें पावलें. "श्रीमंत रावसाहेबांनीं कैलासवास केला त्यास सवा महिना जाहला, परंतु महाराजांस व मातोश्री आईसाहेब यांस आपलें पत्र एकही आलें नाहीं यावरून विस्मय केला कीं, आम्ही पेशव्यांचे वैरी नव्हे. एक तरी नानांनीं पत्र पाठवावयाचें होतें," म्हणोन लिहिलेंत हें मोठें आश्चर्य वाटलें. कसें म्हणाल तर खावंदांनीं सेवकाचा समाचार, दुःख जाहलें असतां घ्यावा. अशा समयांत मागेंच समाधानीचें पत्र त्यांणीं पाठवावें, पाठवितील असेंही वाटत होतें, तें न घडलें; उलटा त्यांणींच विस्मय केला. असो. पातशहा नबाब, भोसले आदिकरून जे थोर त्यांणीं वर्तमान ऐकतांच माझे नांवें पत्रें समाधानीची व पुढील दौलतीचे बंदोबस्त चालविण्याविशीं लिहिलीं त्या अगोदर सातान्याहून येतील असें वाटत होतें, तत्राप हल्लीं पत्रें जासूद जोडीबरोबर आलाहिदा पाठविलीं आहेत तीं पावतील. "नाना येथें दोन तीन वेळ आले व रावही आले त्या वेळेस येथील बंदोबस्ताचा अर्थ बोलण्यांत आला होता, त्याचें सार्थक कांहींच जाहलें नाहीं. आमचा तो भरंवसा नानावर असेंही एकदोन वेळां उभयतां बोलिलीं, त्याचें उत्तरही यथारीति मीं केलें. भेटीनंतर सर्व निवेदन करीन. समाधानीचाही अर्थ अवघड पडावयाचा नाहीं." म्हणोन लिहिलेंत त्यास आज बावीस वर्षें मसलतीवर मसलत काय होत गेली व घरचे दारचे फितुर वगैरे बंदोबस्त करितां करितां नबाबाची मसलत जाहली, फारच ओढींत सरकार आलें, तत्राप पुढें निर्वेध दिवस चांगले दिसूं लागले. बोलिल्याप्रमाणें सातान्याचे बंदोबस्ताचें करावें हें चित्तापासून, तों श्रीमंतच गेले, यापरतें वाईट कोणतेंही नाहीं. पराकाष्ठा जाहली. पुढेंही सर्व मिळून मलाच भरीस घालतात. बरें, ईश्वर काय करील तें खरें. तुम्हीं उत्तरें चांगलींच केलीं असाल, भेटीनंतर कळतील. रवाना छ २४. बहुत काय लिहिणें? लोभ असो दिजे हे विनंती.

---

३२० श्री

( भा. व. १–१५ ) श. १७१७ मार्ग शु. १

१२–१२–१७९५

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके १२१ राक्षसनाम संवत्सरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शाहु छत्रपति स्वामी यांणीं राजमान्य राजश्री बाळाजी जनार्दन यांस आज्ञा केली ऐसीजे. माधवराव पंडित प्रधान यांस अकालीं कैलासवास प्राप्त झाला. पोटीं पुत्र नाहीं. पेशवाईचे

पदाचा कारभार चालोन बंदोबस्त जाहला पाहिजे. त्यास त्यांचे वंशांतील रघुनाथ बाजीराव यांचे पुत्र आहेत त्यांतील पंतप्रधान यांची स्त्री येशवदाबाई यांस पुत्र देऊन पदाधिकारी करावा, तर पेशजी रघुनाथराव यांजपासोन अनन्वित गोष्ट घडली; त्या वेळचे सरदार व मुत्सद्दी यांचा पूर्ण द्वेष स्मरोन राज्यांत बखेडा पडेल व शास्त्र विरुद्ध पडतें; व पेशजी कैलासवासी बाळाजी बाजीराव यांणीं स्वामिसेवा एकनिष्ठपणें केली, एतदर्थी त्यांचे वंशाचें नांव पुढें चालावें याजकरितां पंतप्रधान यांचे स्त्रीस दत्त पुत्र देऊन पेशवाईचे पदास अधिकारी करून कारभाराचा बंदोबस्त जाहला पाहिजे, हें जाणून हें आज्ञापत्र तुम्हांस सादर केलें असे. तरी त्यांचे गोत्रजांतील दत्त पुत्र यशोदाबाई यांस देऊन कारभाराचा बंदोबस्त तुम्ही करून हुजूर विनंति करणें. जाणिजे. छ. २९ जमदिलावल सुा सीत तिसैन मया व आलफ. बहुत काय लिहिणें मोर्तब.

---

३२१ श्री

( भा. व. २-१३९ )

[ तारीख नक्की नाहीं ]

स. १७९५

सेवेसी विसाजी कृष्ण ठोसर कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. किल्ले माहुली येथील मागील बारा सालीं चौकशी सरकारचे कारकून नेमिले आहेत. त्यांची सनद पुरती जाहली व सरंजामास महाल आहेत तेथील इजाऱ्यांचे यादीवर राजश्री महादाजीपंत काळे यांनीं मखलासी केली म्हणोन ऐकतों. त्यास स्वामींनीं कृपाळु होऊन माझी विनंति समजोन घेतली पाहिजे. मला स्वामीचे चरणाशिवाय कोण आहे नाहीं हें ध्यानांत आहे, व तळ्याहून भगवंतराव येरूळकर यांचीं पत्रें आलीं, त्याची विनंति करावयाची आहे. आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत. हे विज्ञापना.*

---

३२२ श्री

( भा. व. २-१३७ )

तारीख नकी नाहीं.

स. १७९५

छ २४ रजब

विनंति गिरिधरदास सावकार याजपासून रुपये तीन हजार कर्ज घेऊन पाठविले आहेत, व दीडशें रुपये पांडूजवळ दिले आहेत. प्रविष्ट करील. नरसीदास सावकार या-

---

* ले. ३२१–३५१ हीं पत्रें नाना फडणिसांस लिहिलेलीं सामान्य स्वरूपाचीं असून त्यांच्या तारखा ठरविणें अवघड, सबब तीं सवाईमाधवरावांच्या अखेरीस एकत्रच घेतलीं आहेत.

जवळ कांहीं कर्ज मागितलें होतें, त्यास तो ह्मणतो कीं, बगलुरा आपले दहा वीस हजार रुपये आहेत तेथें पाहिजे तर देवितों. त्यास आज्ञा काय ती ल्याहावी हे विनंती.

---

३२३ श्री

( भा. व. २-८५ )

सेवेसी नारो लक्ष्मण भिडे कृतानेक शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना. परगणे हुकेरी येथील फडनिसी बाजीपंत अण्णा कैलासवासी यांणीं आपणापाशीं मागोन घेऊन मला सांगितली. त्याची हल्लीं घालमेल होत आहे. त्यास माझें वृत्त तरी तांदुळज्याचे लढाईत माझा भाऊ शामराव व भीमराव यांचे पागेकडे फडनीस होते ते ठार जाहले. व मजलाही दोन जखमा लागल्या. तदनंतर पागेंत फडनिशी मीच करीत होतों. त्यांची पागा दूर जाहली ते समयीं तीस हजार रुपये सरकारकिफायत करून दिली. राजश्री विसाजीपंत यांची स्वारी कर्नाटकांत जाहली, ते समयीं मखदुल्खान याचे लढाईंत जखमा घेऊन खजिन्याचा उंट पाडाव करून आणिला. तेरा हजार रुपये सरकारांत लाविले. पुढें श्रीमंत कैलासवासी रावसाहेब यांणं मजला हुसकोटे येथील हासमनिशी व सबनिशी सांगोन ठाणें मजकुरीं ठेविलें, तेथील कमाविस रामचंद्र त्रिंबक यांणी सांगोन ठेविलें. त्यांणीं तीन वर्षें अम्मल केला. तेथील जमीदार पुण्यासी मीं आणून एक लक्ष वीस हजार रुपयेयाची यादी लिहून दिली. त्याजवरी त्रिंबकरावमामा स्वारीस गेले. ते समयीं रावसाहेब यांणीं मामास सांगितलें कीं, परगणेयाची रुजवात करून देऊन यादीचा फडशा करणें. त्यावरून परगणेमजकुरीं शंकराजी राम रुजुवातीस पाठविले. त्यांणीं रुजवात करितां एक लक्ष पांच हजार रुपये रुजू करून दिले. त्यापैकीं एकवीस हजार चार सालां कमाविसदार यासी जातीस वगैरे खर्च मजुरा देऊन चवऱ्याशीं हजार रुपये सरकारांत घेतले. याप्रमाणें सरकारकिफायत केली आहे. हुसकोटें सहा महिने लढविलें. पुढें कौल देऊन हैदरनाईक सर्वांस बाहेर काढून बदमामली करून एक महिना कैदेंत ठेवून सर्व अपहार सर्वांचा केला. तेथें चौदा घोडीं व पांच वर्षें रोजगारसंबंधें मिळालें तें सर्व गेलें. याप्रमाणें तवईंत आलों. अन्नास महाग झालों. सहा वर्षें बेरोजगार पुढें तोतयावरी बाजीपंतअण्णा जाऊं लागले. ते समयीं आपणास विनंति करून मजला बरोबर नेलें. सुवर्णदुर्ग घेतल्यावर किल्ल्यांत मला ठेविलें. पुढें पेशजीचे कमाविसदाराकडे दिला. आपलें पत्र कीं, माजी कमाविसदाराकडे देणें म्हणोन होते तें आपणास दिलें. त्याजवरी आज्ञा जाहली कीं, तुम्ही बाजीपंत यांकडे करवीरप्रांतीं जाणें. तेथें तुमची सोय बाजीपंत करून देतील व चिकोडी तालुका राजश्री परशरामपंतभाऊ याजकडे जप्तीस होता तो दूर करून बाजीपंत यांजकडे सांगोन मजबरोबर सनद पाठविली. ते सनद बाजीपंत यांणीं माघारी पाठवून फडनिसी मात्र आम्हांस द्यावी म्हणोन करवीरचे स्वारींतून विनंती लिहिली. त्यावरून फडनिशीची सनद

नारो लक्ष्मण याचे नांवें पाठवून यावी, त्यावरून आपण माझे नांवें सनद पाठवून दिली. याप्रमाणें माझें वृत्त आहे. गरीबाबरी कृपाळु होऊन अण्णाची असामी त्याचे चिरंजीवास देऊन माझें चालतें केलें पाहिजे. मी आतां वृद्ध झालों. पंचेचाळीस वर्षे श्रीमंतांची सेवा एकनिष्ठेनें केली. पुढेंही करीन. प्रत्ययासी आणून देईन. चिकोडी तालुक्यांत मी मात्र दरकदार आहें. आपला कोणी नाहीं, ही रसद कमाविसदारच देतात; आणि असामी करतात. मग निर्मळ जाहलें हें खचित ध्यानांत आणून जें करणें तें करावें. रसद ध्याव-याची असल्यास जीवनमाफीक सांगावी. हे विज्ञापना १००००० असे.

---

३२४ श्री

( भा. व. २-१०९ )

श्रीमंत गंगाभागीरथी मातोश्री बाईसाहेब यांसी

विनंती सेवक निळकंठराव यशवंत नगरकर शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना. तागा-ईत जेष्ठ शुद्ध ४ चतुर्थीपावेतों आपले कृपेंकरून सेवकानें वर्तमान यथास्थित असे. यानंतर आमचे कनिष्ठ बंधु चिरंजीव राजश्री नारायणराव यांचे शरिरीं विकृति होऊन बहुत अश-क्तता जाहली आहे. त्यास येथील वैद्याचें म्हणणें आहे कीं, या प्रकृतीस राजमृगांक रसायण अथवा अभ्रकभस्म हीं पक्कीं खातरजमेचीं कोठें मिळाल्यास उपयोगीं पडतील आणि प्रकृत बरी होईल. त्याजवरून सेवेसीं विनंती लिहिली आहे. तरी राजमृगांक एक तोळा व अभ्रकभस्म एक तोळा ऐसीं दोन रसायणें शिलकेस असतील त्यांपैकीं दोन्ही रसायणें दोन तोळे देवावयास आज्ञा जाहली पाहिजे. कदाचित् यांपैकीं एखादें रसायण नसल्यास जें असेल तेंच कृपाकरून पाठवायास आज्ञा व्हावी. आम्ही सरकारचे कुटुंबां-तील आहों ते पक्षीं सर्वोपरी संगोपन करणें आपणाकडे आहे. वरचेवर आज्ञापत्र येऊन सेवकाचा परामृष होय असावा. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.[1]

---

३२५ श्री

( भा. व. २-१३१ )

राजश्री नाना गोसावी यांस

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेहांकित कल्याणराव कवडे दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे विशेष. आम्हाकडील कामकाजाचे बंदोबस्ताकरितां हुजुरांतून राजश्री प्रभाकरपंत तेथें आले आहेत, त्यांची भेट होऊन त्यांनीं सर्व वर्तमान निवेदन केलें असेल. त्याप्रमाणें आपण कामेंकाजें करून

---

१. पत्र गोपिकाबाईस स. १७८८ पूर्वीचें.

देवितील. आमचें अगत्य व या दौलतीचा अभिमान सर्वप्रकारें पूर्वीपासून आपल्यास आहे. दुसरें राजश्री यशवंतराव पवार नासीककर पाटील यांचे पाटिलकीचा कजिया माळी यांनीं नवीन उत्पन्न केला आहे. त्यास सरकारांतून ताकीद होऊन पवारमजकुर यांची पाटीलकी पूर्ववत श्रा याची यांजकडे चाले तो अर्थ करावा, येवेशीं तीर्थरूप राजश्री पाटीलबावांनींही आपल्यास पत्र लिहिलें असे. तर आपण आगत्य धरून पवाराचे वतनाचें कार्य करून देवावें व त्याजकडील कदीम मोकाशे आहेत तेही त्यांजवर कृपा करून चालवावें व आम्हां-कडील अहवाल कुल आपणास समजावा म्हणोन सर्व मजकूर अलाहिदा पुरवणींत लिहिला असे. तें तपसीलें पंतमशारनिल्हे निवेदन करतील तें मान्य करावें. आम्हीं आपले असोंत. सदैव ममतायुक्त समाचार घेत असावा. कळलें पाहिजे. बहुत काय लिहिणें. लोभ कीजे हे विनंती.

---

३२६ श्री

( भा. व. २–९७ )

सेवेसी सिद्धगिरि गोसावी सुरापूरकर विज्ञापना ऐसीजे. आपल्या वचनावरी आम्ही सुरापुराहून येथें पुण्यास आलों. येथें कल्याणगीर गोसावी नाना प्रकारचे तंटे आमचे पाठी-मागें लावितो. राजश्री जनोबादादांनीं पंचाइतीस बोलाविल्यास येत नाहीं. म्हणतो कीं, सिद्धगीर गोसावी आमचे घरास आले तरी आपण येऊं. त्यास त्याचा आमचा आकस आहे, याजकरितां आम्ही त्याचे घरास जात नाहीं. आम्ही तरी सरकारांत रुजू आहों. जें करणें तें धन्यानीं करावें. त्याच्या घरास आम्हीं गेल्यानें चौघा भाऊबंदांत आमचा मान राहत नाहीं. त्यास सर्व प्रकारें आमचा मान व अभिमान राखणार आपण धनी समर्थ आहेत. हे विज्ञापना.

---

३२७ श्री

( भा. व. २–९८ )

विनंती ऐसीजे. आवरंगाबादची रयत फार गळां पडली. काम चागलें. तोब्यास रयत धनी. एकंदर समापत्र झालें त्यांत मोठे मोठे आहेत. दहा हजार रुपये सालास फर-मायश येती. काम हातांत व कबज्यांत राहतें. चार कमावीसदारांचे रोजगार आबादी व लावणी झाल्यानें स्वराज्यहिसा अधिक येईल. किफायत इतके गुण आहेत. यांणीं मात्र सांगितलें पाहिजे. त्यास येविशीं जसी आज्ञा येईल त्याप्रमाणें करूं व रयतेशीं बोलूं. दहा हजार रुपयांचे चिट्टीची नकल पाठविली आहे. आज्ञा आलियास असल त्याजपासून घेऊं. रवाना छ २१ रविलाखर हे विनंती.

---

३२८ श्री

( भा. व. २-१४६ )

सेवेसी रंगो गोविंद साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे. आमचे तीर्थरूपांनीं स्वामिसेवा केली. त्यांचेमागें बंधु रघुनाथराव किल्ले ग्वालेरीवर सरकारकामावर पडले. किल्लयासंबंधें सावकाराचे देण्याचे पेच भारी आहेत. कोंठें रोजगाराची सोय नाहीं. मामलत करावी तरी सावकार रसदेस बधत नाहींत. कुटुंबास अन्नवस्त्राची सोय नाहीं. यंदां चिरंजीवाचीं दोन लग्नें केलीं. त्याचें देणें झालें याजमुळें बहुत पेचांत आलों. सालमजकुरीं अरुणचा अदमास अद्याप झाला नाहीं. त्यास फाजीलाचे ऐवजीं दरसाल ऐवज देवितां तो यंदाही स्वामीनीं कृपा करून देविला पाहिजे. शहाडौरीयाचे रसदेचे ऐवजीं नेमणूक करून वरात होते. परंतु ऐवज यावयास हिसके पडतात. सालगुदस्तां वरात झाली त्यापैकीं राजश्री बचाजीपंत भानु याजकडे बाकी दोन हजार रुपये राहिले ते देत नाहींत. बाळाजी धोंडदेव[1] याजकडे कर्ज येणें आहे तें वसूल करून घ्या म्हणतात. त्यांजकडे ऐवज बुडाला तरी तुमचा आम्हांस पैका द्यावयास मिळत नाहीं ऐसे हिसके देतात. सालगुदस्ताचे नेमणुकेपैकीं हुंडणावळ मनस्वी मागतात. बाजारभावाप्रमाणें हुंडणावळ देतों परंतु ऐकत नाहींत. मन माने तैसी हुंडणावळ मागतात. स्वामींनीं रद्दकर्जास ऐवज लाविला त्यास दिकत घेतात. याजकरितां राजश्री त्रिंबकराव परचुरे यास आज्ञा करून दुसरे महालीं ऐवजाची नेमणूक होऊन सुरळीत ऐवज पावे तें केलें पाहिजे. सर्व आधार स्वामीचे चरणांचा आहे. दुसरा तरुणोपाय नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

३२९ श्री

( भा. व. २-१०४ ) पौ छ ९ जमादिलाखर.

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी,

विनंती सेवक बाळाजीराम मुकाम हसोट कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागाईत छ २४ जमादिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामींनीं कृपा करून परगणे हसोटची मामलत सांगितली त्यास तीन वर्षे जाहलीं. दोन वर्षे वहिवाट यथाज्ञानें केली. लटके खिसे सरकारांत लिहिले नाहीं. सालमजकुरीं गव्हावर गेरव्याची आफत जाहली. महाल रबीचा मातबर गांव. गव्हांचेच रयतेकडून लावणी करण्याविशीं कमती केली नव्हती. परंतु आपतीमुळें पंधरा विसा गांवचे पाटील गैरहजीर झाले. ते म्हणतात कीं, वीस बेवीस हजार सूट दिल्यास गांवीं आबंद होऊं. त्यावरून आम्ही उत्तरें करितों कीं, गावगन्ना आपतीचा अजमास पाहून सूट देऊं. ऐसीं

---

१. नागावकर. हा स. १७८६ त मृत्यु पावला.

बोलणीं होत आहेत. जो ठराव होतां होईल तो करून वसुलाचें काम लावितों. गुदस्तापासून महालीं नेहमीं राहिलों आहें. अखेर सालपर्यंत सरकारची चाकरी जी होईल ती करून सेवेसी येऊन सविस्तर निवेदन करीन. प्रस्तुत स्वामी कृपाळु होऊन हात्तेबंदीची वरात न होय ती आज्ञा झाली पाहिजे. मजविशीं विनंती करणारा चरणाजवळ कोणी नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

३३० श्री

( भा. व २-४४ )

राजश्री बाळाजीपंत नाना गोसावी यांस,

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य प्रती लक्ष्मीबाई दाभाडे दंडवत विनंति उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असिलें पाहिजे विशेष. तळेगांवची कमावीस राजश्री आनंदराव यादव याजकडे आहे तसीच हा कालवर आहे. घालमेल केली नाहीं. त्यास हिशेब करून ऐवज ध्या म्हणत असतां हिशेब सुरळीतपणें करून ऐवज घेत नाहींत. तेव्हां घालमेल केली पाहिजे ऐसें आहे. हा कालवर कर्जवाम सावकार देत होते. कारण कीं, आपली कृपा आहे. बंदोबस्त करून देतील. प्रस्तुत जुने कारभारी यांणीं मनस्वीं बोलणीं परभारें मांडलीं कीं, आम्हांकडे कारभार सरकार निसबतीनें होणार. मखलासीची आज्ञा घेऊन लवकरच करूं म्हणतात. हें सावकार यांस कळलें. त्याजवरून सावकार कर्जवाम आम्हांस द्यावयास विचार करितात. हे दिवस नवरात्राचे. दसऱ्याचा सण. यासमयीं फारच खर्चाची अडचण पडली आहे. त्याचे वलगने-वरून सावकार दिकत करितात ऐसें आहे. हे कारभारी आम्हास नकोत. ते कोणाचीही भीड आपल्याला घालून कामांत येणार ही उमेद त्याची फार आहे. परंतु त्याचें आमचें बनावयाचें नाहीं. आम्हास त्याचे हातें काम घ्यावयाचें नाहीं. आम्ही आपल्या आश्रयावर स्वस्थ आहों. आम्हांकडील यादीवर मखलासी करावयाविशीं राजश्री त्रिंबकराव परचुरे यास आज्ञा केली पाहिजे. आम्ही आपली आज्ञा घेऊन पक्षाकरितां तळेगांवीं आलों. पक्ष केला. विजयादशमीपूर्वींच यावें कीं विजयादशमी करून यावें हें उत्तर समजलें पाहिजे. आमचें कामकाज आपण ज्यास सांगतील तो करील. संकट नाहीं. परंतु हे कारभारी नकोत. यांत अंतर असे तर आपल्या पायाची शफत असे. आपण बंदोबस्त करावा अथवा ज्यास सांगतील तो करील. सारांश हे नकोत, हें ध्यानांत धरून बंदोबस्त करावा. उत्तराची आज्ञा परचुरे यासी करावी. रवाना छ २ माहे मोहरम. बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

श्री

३३१

( भा. व. २-१४२ )

राजश्रिया विराजीत राजमान्य राजश्री धोंडोपंतदाजी स्वामीचे सेवेसी पोष्य आप्पाजी चिमणाजी गोंधळेकर साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल तागाईत पौष वद्य ५ पर्यंत जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें विशेष. श्रीमंत राजश्री यजमान स्वामीस दाखवावयाकरितां निरोपाचे मजकुराविशीं राजश्री माधवरावजीचे नांवें अलाहिदा पत्र लिहून तुम्हांकडे पाठविलें आहे तें वाचून पहावें. त्याजवरून मजकडील सविस्तर मजकूर ध्यानांत येईल. त्यास तें पत्र श्रीमंत राजश्री नाना स्वामीस दाखवून त्यांची आज्ञा घेऊन राजश्रीकडे तुम्ही आपलें पत्र व हें पत्र ऐसें पाठवावें, म्हणजे ते श्रीमंतांस दाखवितील आणि पत्रान्वयें आज्ञा घेऊन पाठवितील. पत्रांतील मजकूर पाहून तुम्ही साशंकित व्हाल तर न व्हावें. इतःपर तीर्थाटणें करावीं हेंच बरें. यामागेंच कां केलें नाहीं असें म्हणाल तर एक तर स्त्रीचा पाश होता आणि दुसरें कुटुंबसुद्धां जावें तर अनुपपत्ती होती यामुळें न घडलें. तिसरें उगाच कांहीं एक मायेसही गुंतलों होतों, यामुळें चित्त अकुंचित होत असे. यास्तव तो विचार न घडला. आतां स्त्रीचा पाश तुटला त्याअर्थी भणगवेशास मोकळीक झाली. आणि या वेशास विशेष खर्चाचेंही प्रयोजन नाहीं यास्तव हा विचार योजिला आहे. कांहींएक मायेमुळें गुंता होता तोही उलगडा झाला कीं काय असें म्हणाल तर ते तों तसेंच राहिले. नऊ वर्षें मार्गप्रतीक्षा केली. त्यास मीच बेवकूफ कीं शिष्टाशीं प्रसंग घडला असतां तें कार्य होईल कीं न होईल हा विचार माझेच ध्यानांत यावा तो न आला. व्यर्थ मायाजालांत पडलों हेंच खरें. माझेंच पाषाणहृदय कीं अनेक प्रकारचे जाच सोसून राहिलों. असो, जें झालें तें झालें. याउपर हा विचार योजिला हा बरा. तुम्हीही प्राज्ञच आहां. येविशींचा कौल तुमचाही होईल. कां कीं, कैलासवासी नारोपंतनाना सुभेदार परनिष्ठ होते त्याचे हाताखालीं तुम्हीं वागलेले आहां. यास्तव तुमचेही ध्यानांत येईल, यांत संदेह नाहीं हें जाणून तुम्हांस पत्र लिहिलें आहे, तरी श्रीमंतास पत्र दाखवून रावजीकडे पाठवावें आणि आज्ञाउत्तर आणवावें. मार्ग लक्षीत आहें. माझें लिहिणें अफरातफरा आहे. तुम्ही सुधारून श्रीमंतास समजावून पत्राची रवानगी लौकर तिकडे करून उत्तर आणवावें. बहुत काय लिहिणें ? कृपावर्धमान करावी हे विनंती. हेंही पत्र रावजीकडे पाठविलें तरी कामास येईल. चिंता काय हे विनंती. अलाहिदा पत्र रावजीस लिहिलें आहे, तें व हें पत्र श्रीमंतांस दाखवावयास आळस कराल तर माझेच वधाची शपथ तुम्हांस आहे. हे विनंती.

---

३३२

श्री

( भा. व. २-१२९ )

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी,

पोष्य रंगराव महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल तागाईत पौष्य शुद्ध दशमी मुकाम नजिक रतलाम जाणोन स्वकीय कुशल लेखन करावयास आज्ञा

केली पाहिजे विशेष. सांप्रत पत्रीं परामर्ष होत नाहीं याकरितां चित्त सचिंत असे. तरी निरंतर पत्रीं परामर्षास अविस्मर असावें. यानंतर इकडील वृत्त वारंवार राजश्री दादोपंत यांस लिहीत असतों. त्याप्रमाणें मशारनिल्हे विनंती करीत असतील. सालगुदस्तां नजराणा विशेष पडला त्याचा तोड पुण्यास साहुकाराकडून करविला. त्याचे हप्ते करूं नये. प्रांतीं येऊन सालगुदस्तां व सालमजकुरीं पेस्तर तीन सालां ऐवज घेऊन पाठविला तरी बाकी विशेष राहिली. सरदारी खर्च परभारें करावा असा साहुकाराशीं करार त्यामुळें नूतन कर्ज झालें. जुने इकडील देण्यांत दोन वर्षें पैसा न पावला यास्तव त्याची निकड भारी. पुढें खर्च चालण्याचें संकट, तेव्हां चार दिवस कालक्षेप करावा यानिमित्य देशीहून दीड हजारपावेतों लोक आणवून इकडे स्वारशिबंदी मिळोन तीन हजार ठेवून मुक्काममजकूर-पावेतों आलों. फौजेचा खर्च बहुत, संस्थानें लहानादि जोरतलबी. थोडक्या जमीयतीस दाद नाहीं. विशेष जाहल्यास पार पडण्याचें कठिण. तत्रापि न करितां दबाव कमी पडतो, याअर्थें मजल दरमजल जात असों. अखेरसालपावेतों मसलत आहे. रांगडेही फौजसुद्धां जमाव करून मेंड्यावर आले आहेत. मुकाबला थोडकाच उरला. पुढें श्रीमंतांचे प्रतापें होईल तें लेखन करूं. महालांत सालगुदस्तां आफत मातबर पडली. सालमजकुरीं खरीप दरोबस्त गेलें. रब्बीचा प्रकार काय होईल तो पहावा. कमावीसदारांचे भरणे तीन सालां अधिकच झाले. साहुकार तसेच राहिले. फौज विशेष जाहली. ही पार पडणें कठिण. ऐसें सर्व प्रकारें संकटांत आहों. इतक्याचा परिहार स्वामीखेरीज कोण करितो ! आमची तों निष्ठा एकच. दुसरा प्रकार किमपि जाणत नाहीं. सरदारी केवळ बसली, यास्तव कृपाळु होऊन सर्वप्रकारें अभिमान धरून कर्जापासून मुक्त करून कल्याणास्पद करणार स्वामी समर्थ आहेत. वडीलपणें हरएकविशीं पार पाडिलें पाहिजे. बहुत काय लिहिणें ? लोभ असों द्यावा हे विनंती.

---

श्री

३३३

( भा. व. २-१३३ )

विज्ञापना विशेष. खुशालगीर गोसावी हिंगणीकर यांजकडे सरकारचा कसर वगैरे ऐवज येणें त्याऐवजीं आम्हीं कुकरमुंढे येथील रदकर्जी वरात घेतली. ऐवज ध्यावा तों राजश्री बाबूराव निकम यांचे भिडेमुळें राजश्री विसाजीपंत बापूनीं सेवेसी लिहिलें कीं, मनाई द्यावी. परंतु मी संनिध होतों त्यामुळें मागती ताकीदपत्रें घेतलीं. हल्लीं तर त्याजकडे किल्ल्याचे फितुराचा दोष मोठाच आहे. दस्तऐवज सांपडले ते राजश्री गणेश विश्वनाथ यांजला दाखविले आहेत. मी आपले रदकर्जी वरात कबूल करोन घेतली त्याप्रमाणें ऐवज घेईन. परंतु आपल्याजवळ कोणी रदबदली केल्यास निवारण देऊं नये; व किल्ल्याचे फितु-

राचे दस्तऐवज निघाल्यास गुन्हेगारी काय द्यावी हें लिहून मागावें. दस्तऐवज हुजूर पाठवून देईन. श्रुत होय हे विज्ञापना.

---

३३४ श्री

( भा. व. २-१३४ )

विनंती उपरी राजश्री रघुनाथ कृष्ण आपणाकडे पाठविले आहेत. त्यास यांजविशीं संशय न धरावा. आम्हाकडील सविस्तर अर्थ सांगतील त्यावरून कळेल. आपल्याकडील वर्तमान मशारनिल्हेजवळ सांगत जावें म्हणजे समजेल. बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

३३५ श्री

( भा. व. २-१३५ )

श्रीमंत महाराज राजश्री नानासाहेब स्वामीचे सेवेसी

बालकें नारायणानें चरणावर मस्तक ठेवून शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत छ ७ मोहरमपावेतों स्वामीचे कृपेंकरून सुखरूप असो विशेष. महिपतराव सुमंत मेले. यांचे मोकाशीचे गांव परगणे हारसूल वगैरे येथें आहेत. याची काय वाट स्वामींनीं सरकारांत ठरविली ही बातमी सेवकास कळवायाची आज्ञा झाली पाहिजे, व राजश्री बहिरोजीपंत मेंदळें यांजकडून रसवती आणविली होती, ती आली असलिया पावती करावयाची आज्ञा करावी हे विज्ञापना.

---

३३६ श्री

( भा. व. २-१३६ ) छ २२ रजब

विनंती. बाबाचा कागद पुण्याहून आला तोची सेवेसी पाठविला आहे, त्याजवरून सर्व अर्थ ध्यानास येईल. मर्जीस आल्या जिवाजीपंतास पत्र द्यावयाचें असेल तर द्यावें. स्वामींनीं मान्यही थोडेंसें केलें होतें, असे त्याचे पत्राचा आशय. यांत जशी मर्जी. हे विनंती.

---

श्री

३३७

( भा. व. २-१३७ ) छ २४ रजब

विनंती गिरधरदास सावकार याजपासून रुपये तीन हजार कर्ज घेऊन पाठविले आहेत व दीडशें रुपये पांड्जवळ दिल्हे आहेत. प्रविष्ट करील.

---

श्री

३४२

( भा. व. २-१०२ )

सेवेसी विज्ञापना. आठ नऊ वर्षें उमेदवारीखालीं गुजरलीं. हा कालवर कांहीं सोय होत नाहीं. पारसी, संस्कृत विद्येचा अभ्यास केला व स्वामी गुणग्राहक असतां दैवयोगें-करून लाभाची प्राप्ति होत नाहीं याचा शब्द स्वामीकडे काय? साडेपांचशें रुपयांची असामी चालत नाहीं. ते साडे पांचशें व जाजती पन्नास मिळोन साहाशें दरमाही शंभर-प्रमाणें रोजमरा करार करून द्यावा. पन्नास रुपयांची जाजती रजबदली आहे. कृपा करार केली पाहिजे. पुष्कळ वर्षें झालीं. किती असेंच रहावें. मर्जीस न ये, चार दिवस निरोप द्यावा. कोकणांतून जाऊन महिन्या दोहों महिन्यांनीं फिरून येईन. उत्तराची आज्ञा केली पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

श्री

३४३

( भा. व. २-१२८ )

राजश्री पंतप्रधान गोसावी यांस,

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेहांकित हिरोजीराव पाटणकर दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करावयास आज्ञा केली पाहिजे विशेष. तीर्थरूप यांस देवआज्ञा जाहली येविशीं चित्ताचे ठायीं विवेक करून शांतवन करावें म्हणोन लिहिलें. उत्तम आहे. ईश्वरसत्तेस उपाय नाहीं. सारांश आपण खावंद आहेत, आम्हीं पदरीं आहों. आमचा सर्व अभिमान आपणास आहे. लेहून कळवावें असें नाहीं. बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

श्री

३४४

( भा. व. २-१२७ )

राजश्री नाना गोसावी यांस,

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेहांकित हिरोजीराव पाटणकर दंडवत विनंती. उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असावें विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावोन लेखनार्थ कळों आला. तीर्थरूप यांस देवआज्ञा जाहली; या अर्थें कितीएक प्रकारें विवेक करून चित्ताचें समाधान करावें म्हणोन लिहिलें ऐसीयास ईश्वरसत्तेस उपाय नाहीं. आमचा प्रकार नेणता आहे. आपण पूर्वीपासून आमचा अभिमान धरून सांभाळ करीत आलां. पुढेंही आपणच आहेत, तेव्हां लेहून कळवावें असें नाहीं. सुज्ञाप्रती विशेष काय ल्याहावें. कृपालोभ करावा हे विनंती.

---

३४५ श्री

( भा. व. २-११९ )

राजश्री आण्णा स्वामीचे सेवेसी,

साष्टांग नमस्कार विनंती विशेष. श्रीमंत राजश्री पंत राजाज्ञा यांणीं जेरखोऱ्यांत वगैरे वैरणीची शिस्त करून दिली आहे. त्यास वसूल वैरणीचा निकडीशिवाय होणार नाहीं, याजकरितां आपणाकडून एक शिपाई माहितगार वसूल शिस्तीप्रमाणें घेई ऐसा देवावा. शिपायास आपण रुबरू ताकीद करावी. निकडीनें वसूल केल्यास पंधरा दिवस अजमासें लागतील. शिपाई जरूर देवावा. खर्चास आपण देविल्यास देऊं. आमच्या समागमाचीं घोडीं गुरें आहेत त्यांस वैरणीचा फार तोटा आहे. याजकरितां शिपाई पाठविला म्हणजे महिना पंधरा दिवसांची बेगमी होईल. शेवग्याच्या शेंगा सुमारें २५ पंचवीस पाठविल्या आहेत, पावतील. बहुत काय लिहिणें? कृपा लोभ असों दिला पाहिजे हे विनंती.

---

३४६ श्री

( भा. व. २-११० )

श्रीमंत राजश्री पंतप्रधान गोसावी यांस,

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित हणमंतराव बाजी घाटगे दंडवत विनंति उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असावें. विशेष साहेबीं कृपा करून पत्र पाठविलें तें पावलें. बेलापुरावर आज्ञेशिवाय दंगा कां केला? याउपरी न करावा म्हणोन लिहिलें, ऐशास निरोपासमयीं साहेबांचे वाड्यांत राजश्री नाना व राजश्री हरिपंत तात्या यांचे समक्ष बोलणें येविशींचें होऊन आज्ञा सरकारांतून जाहली आहे, तेव्हांच जें करणें तें केलें आहे. आज्ञेविरहित कैसें घडेल? त्याहीमध्यें कैलासवासी तीर्थस्वरूप नाइकजी बाजी घाटगे बेलापुरावर मृत्यु पावलेत, त्या अर्थी मान्याच्या पिंडास हा कलह लागून चुकला. तो मध्यंतरीं कैसें चुकेल. सारांश येविशींची आज्ञा निरोपसमयीं समक्ष घेऊन कर्तव्य केलें आहे. विशेष काय लिहिणें? लोभ करावा हे विनंति.

---

३४७ श्री

( भा. वं. २-११४ )

राजश्री रंगराव आप्पा राजे बहादर गोसावी यांस

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित बाबाजी मतकर दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत असिलें पाहिजे विशेष. आम्ही आपली भेट घेऊन आल्यावर सविस्तर बोलणें आपल्याकडील चिरंजीव राजश्री बाबा यांस निवेदन केलें. पंचमीचा मुहूर्त, स्वार होऊन पुणियासी चालावयाचा बेत आपल्याशीं

श्री

३५३
( भा. व. १-१६ )

श. १७१८ मार्ग. व. ३०
२९-१२-१७९६

सेवेसी विनंती. सेवक बाजीराव रघुनाथ प्रधान कृतानेक विज्ञापना तागाईत छ २९ जमादिलाकर पावेतों स्वामीचे कृपेंकरून सेवक सुखरूप असो विशेष. खावंदांनीं कृपा करून पेशवाईचीं वस्त्रें पाठविलीं तीं मार्गशीर्ष शुद्ध पंचमीस आवशीं बारा तेरा घटका रात्रीस सिंहलग्नावर हडपसरचे मुक्कामीं अत्यादरें यथाज्ञानें स्वीकार केला. सर्व प्रकारें मी स्वामीचा आहें. माझा अभिमान हातीं धरल्याचा स्वामीस असावा; आणि मला आधार स्वामीचे पायाचा आहे. खावंदाशिवाय सेवकजनास दुसरा आधार नाहीं. त्राता स्वामी आहेत. दोन्ही हस्तक तिसरा मस्तक स्वामीचे पायांवर ठेविला आहे. याची लज्जा स्वामीस असो. सेवेशीं श्रुत होय हें विज्ञापना.

---

श्री लक्ष्मीकान्त.

३५४
( ना. भो. ६९ )

श १७१९ आषाढ शु. ९
ता. २-७-१७९७

राजश्री बाजीराव पंडित प्रधान गोसावी यांस

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो रघोजी भोसले सेनासाहेबसुभा दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहित असलें पाहिजे. विशेष प्रांत गंगाथडी येथील दस्तऐवज कै० तीर्थरूप आपासाहेबांचे नांवें सुरु सन समानीन सालांत व आमचे नांवें सुरू तिसैनीचे सालांत आपले सरकारांत होते, ते आम्हांस pावले. छ ७ माहे मोहरम सुरू समानतिसैन मया अलफ. सुज्ञांप्रति विशेष काय लिहिणें ! लोभ असों दिला पाहिजे हे विनंती.

---

श्री

३५५
( भा. व. २-१४८ )

श. १७१९ पौष व. १४
ता. १५-१-१७९८

राजश्री बाळाजीपंत नाना गोसावी यांसी

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य प्रती लक्ष्मीबाई दाभाडे दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असिलें पाहिजे विशेष. पेशजीं चिरंजीवाच्या लग्नाच्या साहित्याविशीं लिहिलें होतें. कारकून मंडळी वगैरे सरंजामी आम्हाकडील याजला एक सालां ऐवज लग्ना द्यावा म्हणून ताकीद करविली आहे. परंतु तें सुरळीतपणें कितेक द्यावयाची दिकत करतील. त्यांस ताकीद होऊन

ऐवज आली पाहिजे, येविशीं व आणखी कामाविशीं गोपाळजी गुंड विनंती करील ते ध्यानांत आणून आज्ञा करावी. रवाना छ २७ माहे रजब. बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

श्री

३५६ श. १७२०

( भा. व. २-१२३ ) स. १७९८

पुरवणी सेवेशीं विज्ञापना. राजश्री भाऊ डेरादाखल होऊन पहिली फौज राजश्री रामचंद्रपंत आपाबराबरील आकली कृष्णा उत्तरतीर येथें आहे, त्यास जाऊन मिळणार. ही संधि पाहून करवीरकर कांहीं स्वार पाठवून तासगांवावर गलबल करावी या उद्योगांत आहेत ह्मणून बातमी आहे. याजकरितां दोनशें गाडदी व दोनशें हशमी लोक व शेंदीडशें पावेतों स्वार याप्रमाणें तासगांवास ठेविले आहेत. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

३५७ श्री

( भा. व. २-१५१ ) श. १७२१ चै. शु. १०

ता. १५. ४. १७९९

श्रीमंत राजेश्री नाना फडणवीस स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक हरि महादेव खटावकर साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे. श्रीमंत राजश्री पंतसचिव यांजकडील कारभार सरकारांतून राजश्री जगन्नाथ देवजी व परशराम बाजीराव यांस सांगितला. त्यांणीं स्वामीस कारभारसंमंधें द्यावयाचा करार केला. रुपये २५००० अक्षरीं पंचवीस हजार चांदवड छापी सुलाखी त्याची हामी आम्हीं घेतली असे. तरी सदरहू कारभार चालू झाल्यापासून दोन महिन्यांनीं पंचवीस हजार रुपये आम्ही देऊं. मिति चैत्र शुद्ध १० शके १७२१ सीधारथी नाम संवत्सरे. हस्तअक्षर खुद्द. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

३५८ श्री चै. शु. ७. श. १७२१

( भा. व. १-८५ ) ता. २२. ४. १७९९

( तह टिपूसुलतान यांचा )

इंग्रज कंपिणीबहादूर व नबाब असफतज्या निजाम बहादूर, राव पंडित प्रधान बहादूर व टिपूसुलतान या चौघांची दोस्ती पूर्वीपासून आहे. ती यथास्थित राहावी याजकरितां जनरल हारिस लाटाचे स्थानीं व निजामाचे स्थानीं मीर आलम बहादूर, राव पंडित प्रधान यांचे स्थानीं चौघे यांचा व टिपूसुलतानचे स्थानीं टिपूसुलतान यांचा व तिघां सरकारचा तह जाहला. कलम

१. तीन सरकारचे वकील यांस कारण पडेल तोंपावेतों टिपूसुलतान यांणीं आपल्या

मुलुखाचें संरक्षण करावें तें एकीकडे ठेवून निरनिमित्या फौज तयार करून आम्हाशीं लढाई करावी अशा प्रयत्नाचें कारण काय? असें विचारिल्यानंतर टिपूसुलतान यांनीं जबाब रीतीच्या रुईनें दिला नाहीं. सबब इंग्रज कंपिणीबहादूर व निजामबहादूर व पेशवे राव पंडित बहादूर या तिघां सरकारांनीं आपले आपले मुलुखाचे संरक्षणार्थ टिपूसुलतान याचा व फ्रांसिस याचे कांहीं जबरी आपले मुलुखांत होऊं नये याजकरितां व आपले आपले मुलुखावर आपले आपले संबंध कर्तृत्व परिपालण करावें याजकरितां व परशत्रु हत करावे याजकरितां तीन सरकारांनीं आपआपली फौज तयार करून एकंदर करून टिपूसुलतानावर लढाईस प्रारंभ केला.

याजवर ईश्वरसत्तेनें तिघां सरकारांचा जय फत्ते लढाईमध्यें जाहला. महिसूर शहर घेतलें. टिपूसुलतानाचें मरण जाहलें, तेव्हां त्याची जबरी नाहींशी जाहली. त्याची सर्व प्रजा आमचे तिघांचे हस्तगत जाहली असे. लढाईमध्यें त्याचा मुलुख ज्याप्रमाणें घावयाचा संबंध आमचा होता त्याचा मुलूख व रयत ईश्वरानें आमचे हस्तगत करून पुढें राज्यांत असा अनर्थ न होईल अशी आम्ही लढाई करून जय आले. त्या लढाईचे खर्च व नुकसानाबद्दल त्याचें राज्य आम्हाला घेणें प्राप्त जाहलें. या कारणें कंपिणी इंग्रजबहादूर यांचा व निजाम असफतज्या बहादूर याचा तह लाटाऐवजी जनरल हॅरीस व कर्नल वसली व हानरेबल वसली व कनरल किरकप्यात्रीक व करनल कलोज व निजामचे मीर अलम बहादूर यांनीं तह केला.

कलम

१ टिपूसुलतानाचें पारिपत्य करावयाचें कारण आमचे आमचे मुलूख शत्रूचे हस्तगत होऊं देऊं नये. निरनिमित्य कोणी शत्रु उत्पन्न जाहाला तर त्याचें पारिपत्य करून पुढें असा कोणी न येई असा बंदोबस्त करण्याविसी याचे लगत यादीप्रमाणें इंग्रजाचे वाटणा मुलूख लढाईचे खर्चाविसीं इंग्रजांनीं घावे. आपले मुलुखासारखी भावना करून घावे; आणि हैदरअलीखान व टिपूसुलतान यांचे खानदान लोकांविसीं दोन लक्ष होन दरसाल इंग्रजांनीं घावे, त्याचा तपशील सन १७९२ टिपू सुलतानाचे मुलूख याचा ऐवज आकाराप्रमाणें इंग्रज कंपिणीबहादूर याचे वाटणीस आला मुलूख त्याची बेरीज खेडराइ होन ७७७१७० सात लक्ष सत्याहत्तर हजार एकसें सत्तर पैकीं वजा खानदान लोक हैदरअलीखान व टिपुसुलतान यांचे त्याबद्दल फुली होन दोन लक्ष अथवा खेडराई होन दोन लक्ष चाळीस हजार. बाकी इंग्रज बहादूर याजकडे मुलुखाचा आकार राहिला होन ५३७१७० पांच लक्ष सदतीस हजार एकशें सत्तर.

२ निजामदौला असबतज्या बहादूर यांची वांटणी किलुखच ऐवजांत मीर कबरुद्दीन बहादर व त्याचे खानदान लोकांस एक जहागीर गुरुमडा प्रगणा दोन लक्ष दहा हजार रुपये अथवा खेडराई होन सत्तर हजार याची जहागीर घावी. तो मीर कबरूदीनखानानें निजामाकडे चाकरी करावी. याबद्दल वेगळी जहागीर निजामानीं घावी. निजामाचा हिसा

मा होनचे हिसेबाप्रमाणें खेडराई होन ६७३३२ पैकीं वजा कबरुदीनखानाची जहागीर ७०००० होऊन बाकी निजामास राहिले होन खेडराई ५३७३३२. कलम

३ या बंदोबस्ताविसीं इंग्रजाकडे श्रीरंगपटण किल्ला व त्याचे बेट त्याचे हिसेप्रमाणें सदा इंग्रजांनीं अनभवावे. कलम.

४ म्हैसूर संस्थान एक करून पूर्वीं म्हैसूर राज्याची हल्लीं खानदान आहेत त्यांतील वंश उधारून कृष्णराय वडेर यांस हद करून मुलूख द्यावा.

५ इंग्रजांनीं व निजामांनीं यादीप्रमाणें म्हैसूर राज्यास एक मुलूख हद करून दिला. त्याचा आकार खेडराई होन १३७९७६०८८८३ तेरा लक्ष एकूणऐंशी हजार सातशें साठ, आठ आणे एक पैसा, पैकीं वजा इंग्रजाचे वाटणींत हरीदनकिली व तलमावत लब्रू हा प्रगणा ऐवज खेडराई होन ५०००; बाकी राहिली १३७४७६ आठ आणे एक पैसा. कलम

६ इंग्रज कंपिणी यांणीं कबूल केलें कीं, हैदरअल्लीखान व टिपूसुलतान यांचे खानदानांत कोणी एक मेले तरी त्याचा खर्च रुपये आम्हींच ठेवूं. कदाचित ते खानदान लोकामधी कोणी इंग्रजासी अगर म्हैसूर राज्यासीं बिघाड करून फितूर फंद केला तरी ते वेळेस त्यास त्याचा खर्च कमी करूं व त्यास न द्यावें असें जाहल्यास इंग्रजाचे मर्जीस येईल त्याप्रमाणें करतील. कलम

७. पेशवे राव पंडित प्रधान बहादूर यांनीं कांहीं लढाई केली नाहीं. परंतु दोस्ती असावी याजकरितां त्यांचा हिसा इंग्रजांनीं व निजामांनीं म्हैसूर राज्यांनीं ठेविला आहे, त्यास हा तह त्यांनीं मंजूर करून कित्येक कलमें निजाम व इंग्रज त्यास कळवितील तेहीं एक महिन्यांत मंजूर केलें तरी हिसा घेतील त्याचा हिसा ठेविला आहे. तो सदा अनुभवावा. येविशीं पुण्यांतील इंग्रजाचे वकील कळवितील. हिशाचा आकार खेडराई २६३९५७ पावणेचार आणे. कलम.

८. पेशवे यांनीं तह केल्यावांचून कलमें मंजूर केलीं नाहीं तर त्याचे वाटणी मुलूख इंग्रजांनीं व निजामांनीं वाटणी करून घ्यावी. पेशव्याचा हिसा त्याचे मुलुखाचे नजीक ठेविला आहे, त्यास त्यांनीं न घेतला तर तो मुलुख कुंभार राज्यास देऊन आपआपले लगत मुलुख कुंभार राजे त्याचे मुलखांत बदलून द्यावे. कलम

९. म्हैसूर राज्यास मुलुख देऊन त्याचे कुमकेसाठीं फौज ठेविली पाहिजे, यास्तव इंग्रजांनीं ते राज्याशीं एक तह करून त्याजकडे आपली फौज ठेवितील. कलम

१०. हा तह दाहा कलमें आहेत. सन १७९९ जून मास ता. २२, हिजरी सन १२१४ रमजान तारीख १७, लाटस्थानीं सदरीं पांच सरदार यांनीं निजामस्थनीं मीर अलम बहादूर यांनीं हा तह केला. हा तह बागाकलागाणी आठ दिवसांत मंजूर करून पाठवावा व निजामांनीं पंचवीस दिवसांत रुजू करून पो. मीर अलमाची मोहोर पांच सरदारचे समक्ष साक्षीभूत जानमनबअईब.

कालमाहात्म्य म्हणावें. रा. राघोबास सविस्तर लिहिलें आहे. बोलतील. सारांश परस्पर स्नेहाची जोड जालियाचें निदर्शन होत असावें. रवाना छ ११ जिल्काद. बहुत काय लिहिणें? लोभ असों दीजे हे आशीर्वाद.

---

श्री

३६३
( भा. व. १–२५)

श. १७२४ मार्ग. शु. १२
ता. ७–१२–१८०२

छ अजी सबब मिस्तर हेन्री[1] रसेल साहेब साबीतजंग बहादूर बदसलाम खैरयत अजाममशहुदबाद अंके येथील खैरयत जाणून हमेशा खत पाठवीत जावें. दिगर आपलें खत मार्फत राघो भास्कर वकील वसुल होऊन मजकूर दर्याफत झाला व खातरेस बिसियार बिसियार खुर संदगी हशील झाली. हमेश यादमाफक फिरसाद करून जास्ती खुषवख्तीची फरमावीत असावी. असमतपन्हांनीं अवळ्याचा मुरंबा पाठविला तो बहुत खुषवख्तीनें कबूल केला. राघोपंत गोखले हमेशा हजर असतात. जादा काय लिहिणें. रवाना छ ७ डिसेंबर हे किताबत. इंग्रजी सही[1]

---

श्री

३६४
( भा. व. १–२४ )

श. १७२४ मार्ग. शु. १२
ता. ७–१२–१८०२

श्रीमन्मातोश्री जिऊबाईसाहेब यांचे सेवेसीः—

अजतर्फ जनरल वेलस्ली बहादूर सलाम अँकीं येथील खैरखुषी जाणून साहेबीं आपली खैरखुशाली नामेशी कलमें करवून दील ताजा करीत असावा. उपरी आयाम तुमचेविषयीं आम्ही अजम कर्नल क्लोस साहेबांस लिहून पाठविलें आहे. आतां थोडे रोजांत त्यांचा जाब येईल. जाब आल्याक्षणींच आपल्याशीं विदित करीत असे. दुसऱ्यांनीं कांहीं रदबदली केल्यास आपण त्यांची गोष्टी ऐकूं नये. हरएक गोष्टीस आपले मर्जीस समर्पक आल्याप्रमाणें करणें. आपणाशीं कांहीं इजा न होईल; आपण कांहीं अंदेशा करूं नये. कळावें, बहुत काय लिहिणें. प्यार मोहोबत असो दीजे हे किताबत.

---

श्री

३६५
( भा. व. १–८४ )

पौ. शु. ७ श. १७२४
३१–१२–१८०२

( तह बाजीराव रघुनाथ पंतप्रधान यांचा व इंग्रज बहादुर यांचा पहिला वसई मुक्कामचा )

तहनामा दोस्तीचे मजबुदीकरितां सरकार दौलतमदार श्रीमंत बाजीराव रघुनाथ पंतप्रधान बहादुर व यांचे पुत्र व यांचे वारीसदार व ताबेदार यांचा व सरकार इंग्रज

---

१ पुण्याचा अर्क्टिंग रेसिडेंट.

कंपिणीबहादुर यांचा जनरल कलकतेकर की हे इंग्रजाचे बादशहाकडून व इंग्रज कंपिणी-बहादूर यांजकडन तमाम मुलखाचे मुकत्यार आहेत. त्यांजकडून कर्णेल कलोष बहादर हे मुखत्यार यांचे विद्यमानें ठराव जाहला.

१. ईश्वरी सत्तेनें पेशजीपासून दोस्तीचा मार्ग सरकार कंपिणी इंग्रज बहादर व सरकार राव पंतप्रधान बहादुर यांमध्यें मजबूत आहेत व मागील तहनाम्यावरून दोस्तीचा मार्ग दृढतर आहे. दोन्ही सरकार याणीं समयावर दृष्ट देऊन ही मसलत करार केली कीं, उत्तम प्रकारें मसलतीचा पाया व दोस्तीचा नक्षा ठराव जाहला कीं, हरदो सरकारचे मुलखाचा बंदोबस्त व्हावा व दोहींकडील सरकारचे शरीकाचा व ताबेदाराच्या मुलखांत शत्रु हंगामा करतील त्याचा बंदोबस्त दोही सरकारांतून व्हावा. दोस्तीचा मार्ग दोही सरकारचा मजबूद आहे त्याची वृद्धि व्हावी. दोन्हीकडील मित्र व दोहींकडील शत्रु एक जाणावे. ही गोष्ट दोही सरकाराकडून मान्य जाहली. पूर्वीचे तहनामे व करार दोही सरकारांत मजबूत जाहले ते कायम आहेत व मागील तहनाम्याप्रमाणें हाही तहनामा मजबूत जाहला.
कलम

२. कदाचित् कोणी एक सरदार दुसरा राव पंतप्रधान बहादूर यांचे सरकाराशीं व कंपिणी इंग्रज बहादूर यांचे सरकाराशीं व दोहीकडील ताबेदार व शरीक यासीं कारण नसतां कोणाविशीं बदमामली करतील त्यास त्याची चौकशी उत्तम प्रकारें अमलांत यावी. त्याजकडील मजकूर ध्यानांत आणोन दोस्तीचे मार्गीनें व इनसाफाचे रुईनें त्यास सांगावें. तो न ऐके तरी दोही सरकारचे मुखत्यार यांचे विचारें जो मनसुबा ठरेल त्या अन्वयें करावें. जनराल कलकतेकर सरकार इंग्रज बहादूर यांजकडून सदरहूप्रमाणें करार करीत आहेत, कीं कोणी एक सरकार राव पंतप्रधान बहादूर यांचे मुलखांत बेकैद करतील तरी करूं देणार नाहीं. बाकी आम्ही कंपणी इंग्रज बहादूर यांचे मुलखाचें संरक्षण ज्याप्रमाणें करितों त्याचप्रमाणें सरकार श्रीमंत पंतप्रधान बहादूर याचे मुलखाचें संरक्षण करूं.
कलम

३. या तहनाम्याच्या शर्ता शेवटास जावयाकरितां दोही सरकारांतून ठराव होऊन उभयपक्षीं करार जाहला कीं, सहा फलटणें शिपाई, सहा हजार बंदुक व तोफा व गोलंदाज फिरंगी लढाईचा सरंजामसुद्धां हमेशा सरकार राव पंडित प्रधान बहादूर यांचे मुलखांत राहतील.
कलम

४. पलटणें वगैरे जमियत ते जातियाचे खर्चाकरितां बेकिलाफ पावत जावे याजकरितां कित्येक तालुके या तहनाम्यांत अलहिदा लिहिले आहे ते तालुके कंपणी इंग्रज बहादूर यांचे सरकारांत हमेशा दिल्हे असत.
कलम

५. ही गोष्ट ध्यानांत असावी कीं, तालुक्यांपैकीं कित्येक तालुके सदरीं कलम लिहिलें आहे त्याप्रमाणें इंग्रज कंपिणी बहादूर यांचे सरकारांत दिल्हे आहेत ते तालुके

सरकार कंपिणी इंग्रज बहादूर यांचे उपयोगी न पडतील यास्तव राव पंतप्रधान बहादूर करार करीत आहेत कीं, कंपिणी इंग्रज बहादूर यांचे सर्देसमीप पूर्वी तालुके दिल्हे असतील ते कित्येक तालुके माघारा घेऊन त्याचे मुबदला दुसरे तालुके कंपिणी इंग्रज बहादूर यांचे सर्देजवळ उपयोगी चांगले वसुलाचे देतील व दोही सरकारांतून मंजूर जाहलें कीं, तालुके द्यावयाचे चौथे कलमांत लिहिलें आहे ते घेऊन मुबदला द्यावयाचे कलमांत लिहिले आहेत ते तालुके कंपिणी इंग्रज बहादूर यांचे स्वाधीन व यांचे सरकारचे कारभारियाचे स्वाधीन राहतील तेथें कोणाची दखलगरी न रहावी. सदरहू तालुकेयांत मागील बाकी राहिली असेल त्याचा तगादा तालुक्यांत होऊं नये.

कलम

६. तैनाती जमियत याचे कुलखर्चाकरितां पंचवीस लक्ष रुपये करार जाहले. परंतु चौथे कलमांत तालुके सवीस लक्षांचें द्यावयाविशीं राव पंतप्रधान बहादूर यांणीं ठरविले आहेत ते तालुके सरकार कंपिणी इंग्रज बहादूर याचे सरकारांत दिल्हे; तालुकेमजकूर पैकीं वसूल कमी होईल यास्तव लाख रुपयांचा तालुका जाजती दिल्हा कीं कंपिणी इंग्रज बहादूर यांचे सरकारांत नुकसान न व्हावें.

७. हा तहनामा जाहालियावर ज्या समयीं राव पंतप्रधान बहादूर दरबारचे मसनदेवर बसतील त्या समयीं राव पंतप्रधान बहादूर यांचे खिसमतीस विनंती करूं कीं चौथे कलमांत तालुके लिहिले आहेत त्याचे बंदोबस्ताकरितां कंपिणी इंग्रज बहादूर यांचे कारभारी तालुके मजकूरचे बंदोबस्ताकरितां जाण्यास सिद्ध होतील त्या वेळेस श्रीमंत पंतप्रधान बहादूर यांणीं आपले अमलाचे वगैरे याचे नांवें ताकीदपत्रें कंपिणी इंग्रज बहादूर यांचे सरकारचे कारभारी स्वाधीन तालुके करावयानिशीं सादर करावी, आणि श्रीमंत राव पंतप्रधान बहादूर यांचे सरकारांतून असा करार जाहाला कीं हा तहनामा तयार जाहाला याचे तारखेपासून कंपिणी इंग्रज बहादूर यांचे कारभारी तालुके मजकुरांत पोहोंचे तोंपर्यंत राव पंतप्रधान बहादूर यांचे अमीन वगैरे यांणीं वसूल घेतला असेल तो कंपिणी इंग्रज बहादूर यांचे सरकारांत द्यावा.

कलम

८. जे तालुके इंग्रज कंपिणी बहादूर यांचे सरकारांत दिल्हे आहेत त्या तालुक्यांत जे किल्ले असतील ते कंपिणी इंग्रज बहादूर यांचे सरकारांत स्वाधीन करावे. श्रीमंत राव पंत प्रधान बहादूर यांचे सरकारांतून असा करार झाला कीं, किल्लेमजकूर ज्याप्रमाणें पूर्वी होते त्याप्रमाणें तोफा वगैरे लढाईचें सरंजाम सुद्धां सरकार कंपिणी इंग्रज बहा र यांचे सरकारांत स्वाधीन करूं.

कलम

९. गल्ला वगैरे जिन्नस खायाप्यायाचा सरंजाम व हरएक सामान व पोशाखीं वस्त्रें गुरें, बैल वगैरे व घोडीं व उंटें वगैरे तैनाती जमेयतीचे सरदार आणवितील त्यांची जकात श्रीमंत राव पंत प्रधान बहादूर यांचे सरकारांतुन माफ असावी. पलटणचे सरदार व यांचे तैनातीचे सरदार आहेत त्याचे मान महत्त्व इंग्रज कंपिणी बहादूर यांचे सरकारांत ठेवि-

तात, त्याप्रमाणें श्रीमंत पंतप्रधान बहादूर यांचे सरकारांत मान महत्त्व होत असावें. याप्रमाणें करार आहे कीं तैनाती फौज यांणीं हमेशा मातबर कामाचे चाकरी व श्रीमंत पंतप्रधान प्रधान बहादूर यांचे ताबेदारी व त्यांचे पुत्र व वारिसदार व ताबेदार यांची रखवाली व श्रीमंत पंतप्रधान बहादूर यांचे मुलखांतील हरामखोर असतील त्यांचे पारिपत्य व रयत वगैरे जे सरकारांत पैका देत नसतील त्यांची तंबी करीत जातील. परंतु लहान कामाकरितां प्यादे जेव्हां तालुक्यांत तहसिलीस जातात त्याप्रमाणें जाणार नाहींत व कोणती एक मोहिमेस मराठे मातबर सरदार खंडणी घ्यावयाकरितां परमुलखांत जातात त्याप्रमाणें मुलुकगीर करावयाकरितां हुकूम नसावा. कलम

१०. सुरत बंदरामध्यें श्रीमंत पंतप्रधान बहादूर यांचा कित्येक दस्तुरामध्यें बहुत खलेल जाहला आहे. यास्तव दोनी सरकारांतून करार जाहाला कीं, मुंबईचे जनरालचे कारभारी सरकार श्रीमंत पंतप्रधान बहादूर यांचेविषयीं सदरील हक दस्तुराची चौकशी करतील व श्रीमंत राव पंतप्रधान बहादूर दोस्तीवर दोही सरकारचे करार जाले आहे त्याजवर नजर देऊन आपले तर्फेनें व आपले वारीसदार व ताबेदार यांचे तर्फेनें करार करीत आहेत कीं, बंदर सुरत येथील हक दस्तुर अक्षई सोडतील. दरोबस्त वसूल तेथील हा तहनामा जाहला आहे त्याचे तारखेपासून घेणार नाहींत व कंपिणी इंग्रज बहादूर दोस्तीचे मार्गानें करार करितात कीं, सुरत बंदरचे हक दस्तुराचा ऐवज जो होईल तो चौथे कलमांत तालुके आम्हांस दिल्हे आहेत त्या ऐवजांचा मजुरा देऊं. सदरहूप्रमाणें श्रीमंत राव पंतप्रधान बहादूरही असा करार करीत आहेत कीं पैकीं चवऱ्यायशी चिखली येथील हासील आम्ही आपले सरकारांत घेत आहोंत त्याप्रमाणें घेत जावा. व श्रीमंत पंतप्रधान बहादूर आपले तर्फेनें व आपले वारीसदार व ताबेदार यांचे तर्फे करार करीत आहेत कीं, सदरहू हासील अक्षई दिल्हा असे. या तहनाम्याचे तारखेपासून आम्ही घेणार नाहीं, कंपिणी इंग्रज बहादूर करार करितात कीं, हासिलाचा ऐवज जो होईल तो आम्हास तालुके चौथे कलमांत दिल्हे आहेत त्यापैकीं वजा देऊं. कलम

११. फिरंगी लोक अथवा दुसरे कोणी जातीचे पंतप्रधान बहादूर करार करितात कीं कदाचित इंग्रज बहादूर यांचे लोकांशीं अथवा दुसरे फिरंगियांचे जातांचे लोकांशीं लढाई होईल. समजण्यांत आलें कीं श्रीमंत पंतप्रधान बहादूर यांचे नोकरीपैकीं कोणी लोक फिरंगियांचे जातीचे लोक इंग्रजाचे लोकांशीं लढाई करतील, इंग्रज बहादूर यांचें सरकारांतून नुकसान लागलें व आदावत करूं लागले तर त्या लोकांस सरदारांतून बरतर्फी करून आपले मुलखांतून काढून द्यावें. कलम

१२. दोही दौलतीस शत्रूचे उपद्रवापासून संरक्षण व्हावें हा करार या तहनाम्यांत जाहला आहे. याकरितां श्रीमंत पंतप्रधान बहादूर याजकडून करार जाहला कीं, केव्हांही आपले सरकाराकडून नबाब असबज्या बहादूर याचे सरकारांत अथवा कोणी

कंपिणी इंग्रज बहादूर याचे स्नेहांत व नौकर यासीं व कोणी मातबर मराठे यासीं जाजती व जबरदस्ती अमलांत देणार नाहीं. कदाचित कांहीं एक कालीं मुकदम्याकरितां तकरार दरम्यान आलियास इंग्रज कंपिणी बहादूर यांचे सरकारचे कारभारी हे वर्तमान ध्यानास आणोन व पुरतेपणें समजोन ठराव करितील त्याप्रमाणें श्रीमंत पंतप्रधान बहादूर यांणीं मान्य करावें. कलम

१३. कित्येक मजकूर मागील कालीं मुकदम्याचे श्रीमंत राव पंतप्रधान बहादूर याचे सरकारचे व नबाब असबज्या बहादूर याचे सरकारचें परस्परच बोलणें आहेत व त्याचा फैसला दोस्तीचे मार्गानें होऊन दोही सरकारांत फायदे व्हावे याजकरितां श्रीमंत राव-पंतप्रधान बहादूर सदहू कामावर नजर देऊन आपले तर्फेनें व आपले वारीसदार ताबेदार यांचे तर्फेनें करार करीत आहेत कीं, या तहनाम्याचे अन्वयें अंमलांत येईल व श्रीमंत राव पंतप्रधान बहादूर यांसही मंजूर जाहलें कीं, कंपिणी इंग्रज बहादुर याजकडील मुखत्यार लोक नबाब असबज्या बहादूर याजकडील चौथाईचे ऐवजाचे जाबसालाकरितां सर्व प्रकारें ध्यानास आणोन जाबसालाची तकार पडोन दोन्ही सरकारांत संशय येईल तो दूर करितील. श्रीमंत राव पंडित प्रधान बहादूरही करार करितात कीं, कदाचित् पुढें नबाबाचे व आमचे सरकारचे समधें मामलतीविषयीं तकरार येऊन त्याचा आमचा बिघाड होईल त्याचे अगोदर त्याचे व आमचे तकरारीचे जाबसाल सदहू लिहिल्याप्रमाणें कंपिणी इंग्रज बहादूर यांचे सरकारांत इतला करून कंपिणी बहादूर मध्यस्तीत येऊन दोस्तीकरितां मागील मामुलाप्रमाणें जाबसाल ध्यानास आणूस सल्हा सांगतील त्याप्रमाणें दोही सरकारांनीं समजावें. हा करार आहे कीं, सरकार कंपिणी इंग्रज बहादूर यांचे मुखत्यार लोक अजरुई इनसाफ ध्यानास आणून निश्चय करून सांगतील त्याप्रमाणें दोही सरकारांनीं कबूल करावें. आमचा असा बेत नाहीं कीं, कंपिणी इंग्रज बहादूर श्रीमंत प्रधान बहादूर व नबाब असबज्या बहादूर या तिही सरकारांत परस्परें दोस्तीचे मार्गांत अंतर यावें पाहिजे. कितीही सरकारांत कांहीं एक जाबसाल पडल्यास दोस्तीच्या मार्गानें एकमेकांस इतला करीत जावें. कलम.

१४. सरकार कंपिणी इंग्रज बहादूर व सरकार राजे आनंदराव गायकवाड बहादूर या उभयतामध्यें दोस्तीचा तहनामा मजबूत जाहलायांत असा आहे कीं, श्रीमंत पंतप्रधान बहादूर यांचे वाजवीनें हक्क गायकवाडाकडे असतील त्यांत नुकसान न व्हावें. श्रीमंत पंतप्रधान बहादूर सरकार कंपिणी इंग्रज बहादूर यांचे दोस्तीवर दृष्टि देऊन मान्य करितात कीं, गायकवाडाहून कित्येक काळी व मुलकी जाबसाल मागिल अद्याप फैसले जाहले नाहींत. कित्येक जाबसाल हिशेबी कागदपत्रीं श्रीमंत पंतप्रधान बहादूर यांचे सरकाराविषयीं व गायकवाडाविषयीं परस्परें आहेत. याजकरितां श्रीमंत पंतप्रधान बहादूर सरकार कंपिणी इंग्रज बहादूर इतबारावर कबूल करितात कीं, गायकवाडाकडील कागदपत्रीं हिशेबीं सहा साल सरकार कंपिणी इंग्रज बहादूर ध्यानास आणून फडशा करून देव-

वितील. श्रीमंत राव पंतप्रधान बहादूर करार करतात कीं, कंपिणी इंग्रज बहादूर निश्चय करून सांगतील तें आम्हांस मान्य आहे. कलम

१५. दोही सरकारचे मुखत्यार व सरदार यांणीं परकीय सरदार जवळचे व दूरचे यांमध्यें परस्पर बिघाड न होई येविशीं मेहनत करून जेथपर्यंत आपल्याच्यानें होईल तेथवर उभयतांची दोस्ती करून यावी; व हिंदुस्थानचे व दक्षणचे सरदार यांचे मतलब वाजवी समजून घेऊन दोस्तीचे मार्गानें या तहनाम्याप्रमाणें दोही सरकारचे मुखत्यार याणीं बंदोबस्त करून यावा. कदाचित एखादे समई दोही सरकारची व कोणी परकीय दुसरे सरकाराशीं बिघाड होऊन मोहीम ठरली, याजकरितां श्रीमंत राव पंतप्रधान बहादूर यांचे सरकारचे तर्फेनें असा करार जाहला कीं, साहा पलटणें पैकीं दोन पलटणें हुजूर ठेवून बाकी चार पलटणें व सहा हजार बार व दहा हजार स्वार एकूण दहा हजार स्वार व दहा हजार बार तोफा वगैरे लढाईचे सरमजाम सुद्धां शत्रूचे पारिपत्याकरितां सत्वर रवाना करावे व श्रीमंत पंतप्रधान बहादूर यांजकडून करार जाहला कीं, याशिवाय या मोहिमी-करितां आपले मुलखांतील फौज अनुकूल पडेल ती सत्वर रवाना करावी. जेथपर्यंत होईल तेथपर्यंत काम शेवटास न्यावें. सरकार कंपिणी इंग्रज बहादूर यांचे तर्फेनें करार ठरला कीं, श्रीमंत पंतप्रधान बहादूर याचे तैनातीस फौज आहे याखेरीज सरकार कंपिणी इंग्रज बहादूर यांजकडील फौज जी असेल ती शत्रूचे पारिपत्याकरितां रवाना केली जाईल. कलम

१६. श्रीमंत पंतप्रधान बहादूर यांचे तर्फेनें करार जाहला कीं, कदाचित या मोहि-मीस अडचण पडून दिवसगत लागल्यास लमाण व वणजारी व बेपारी आपल्यास अनुकूल पडतील ते जमा करून आपले सरहद्देचे किल्लयास वगम वगैरे जकिरा जमा करावा. कलम

१७. या तहनाम्याप्रमाणें सिलसिला दोही दौलतींमध्यें या प्रकारें मजबूद जाहला कीं दोही सरकार मिळोन एक समजावें. याजकरितां श्रीमंत राव पंतप्रधान बहादूर यांचे सरकाराकडून असा करार जाहला कीं, कंपिणी इंग्रज बहादूर यांचे संमतिशिवाय परकीय सरदार यासी कोणी गोष्टीविशीं जाबसाल करण्यांत येणार नाहीं. कंपिणी इंग्रज बहादूर यांचे सरकाराकनडूही जाहिर करितात कीं, कंपिणी इंग्रज बहादूरचे सरकार याजला श्रीमंत राव पंतप्रधान बहादूर यांचे पुत्रासीं व आपतासीं व सरदारांसीं व नोकरांसीं कांहीं एक प्रयोजन नाहीं. श्रीमंत राव पंतप्रधान बहादूर हे सर्व प्रकारें आपले दौलतीवर सदरीं नांव-निशीं लिहिणें त्याजवर मुखत्यार आहेत. कलम

१८. ईश्वरकृपें करून या तहनाम्याप्रमाणें दोस्तीचा सिलसिला जसा पाहिजे तसा मजबूत जाहला, दोही सरकारचे मतलब मुद्दे एक जाहाले, यास्तव दोही सरकारांकडून असा करार जाहाला कीं जे तालुके श्रीमंत राव पंतप्रधान बहादूर यांचे सरकारांतून कंपिणी इंग्रज बहादूर यांचे सरकारांत दिल्हे, कदाचित त्या तालुक्यांत दंगा जाला तरी श्रीमंत राव पंतप्रधान बहादूर यांचे सरकारांतून परवानगी व्हावी कीं तैनातीजमियती पैकीं

जितकी प्रयोजन पडेल तितकी तालुक्याचा दंगा दूर व्हावयाकरितां आज्ञा व्हावी. श्रीमंत राव पंतप्रधान बहादूर यांचा तालुका इंग्रज बहादूर यांचे तालुक्याजवळ असेल त्या तालुक्यांत दंगा जाहाला तर तैनाती फौज आहे त्याजला तेथें पाठवावयाकरितां अनुकूल न पडल्यास त्यासमई श्रीमंत राव पंतप्रधान बहादूर यांचे आज्ञेप्रमाणें कंपिणी इंग्रज बहादूर यांचे सरकारची जमियत त्या दंग्याचे परिहार करावयायोग्य त्याजला कंपिणी इंग्रज बहादूर यांचे सरकारांतून हुकूम होईल कीं श्रीमंत पंतप्रधान बहादूर यांचे मुलकांतील दंगा दूर करून त्या तालुक्याची मदत कुमक हरएकाविसीं करीत जावी. कलम

१९. या एकुणिसावें कलमाप्रमाणें दोही सरकारचा करार करणार जाहीर करितात कीं, हा तहनामा सदरहू कलमांप्रमाणें त्यांतील तात्पर्यार्थ यावत् सूर्यचंद्र आहे तोंपर्यंत श्रीमंत बाजीराव रघुनाथ पंतप्रधान बहादूर यांचे दौलतीची वृद्धि दिवसेंदिवस अधिकोत्तर व्हावी; कोणेविसीं नुकसान न व्हावें. हा तहनामा कायम असावा. कलम

तारीख ३१ माहे दिसेंबर सन १८०२ इ० मुताबिक छ ५ मोहरम सन १२१७ हिजरी. वसईचे मुक्कामीं जाला असे.

---

३६६ श्रीम्हाळसाकांत श. १७२४ पौष व. ९

( भालेरावसंग्रह* ) पौ छ १३ माहे सवाल १७-१-१८०३

राजश्री आत्माराम शिवराम गोसावी यासी

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर दंडवत विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहीत जाणें विशेष. आलीकडे तुम्हाकडून पत्र येऊन समाचार कळत नाहीं तरी असें न करितां सर्वदा पत्र पाठवून संतोषवीत जावें. तुम्ही पूर्वीपासून दौलतींतील पदरचे माहितगार; कोणत्याही जाबसालांत असल्यावर तुम्हाकडून जे घडणें तें मार्गाचें आणि ज्यांत बखेडा तुटून बंदोबस्त घडेल तेंच करण्यांत येईल हे खातरजमा आहे. दौलतीचा फेड होणें तिन्ही पिढ्या चालत आले हें सरदारांच्या व व कारभाऱ्यांच्या जपण्यानें चाललें. आलीकडे कालमहात्म्यानुरूप प्रकार घडले याजवर मदार नाहीं. तुम्हासारखीं पूर्वचालीचीं माणसें प्रसंगीं आहेत तेव्हां उचित तेंच घडावें. तुम्हाकारणें मकरसंक्रमणाचे तीळ शर्करायुक्त पाठविले आहेत, स्वीकारून उत्तर समर्पक पाठवावें. रा छ २२ रमजान सुा सलास मयातैन व अलफ. बहुत काय लिहिणें हे विनंती ( मोर्तबसुद ).

---

* ' मराठशाही बुडाल्याची मीमांसा ' या प्रकरणांत श्री. भा. रा. भालेराव त्यांनीं या काळचीं कांहीं महत्त्वाचीं पत्रें छापलेलीं टिकाऊ स्वरूपाचीं असल्यामुळें यांच्या परवानगीनें येथें घेतलीं आहेत.

[ श्रीम्हळसकांत चरणीं तत्पर
मल्हादजी सुत खंडेराव होळकर ]

३६७
( भालेराव सं. )
शिक्का

श्रीम्हळसाकांत

शके १७२७ चै. शु. १४
६-४-१८०३

राजश्री कृष्णाजी आत्माराम गोसावी यांसी

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेहांकित काशीराव दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहीत जाणे विशेष. तुम्ही छ ७ जिल्हेजच्या तेरिखेचें पत्र पाठविलें तें पाहून सर्व अर्थ ध्यानास आला. इकडे येण्याविसीं दर पत्रीं लिहित गेलों; त्यांतील पर्याय बाबांनीं लिहिले, परंतु पुढील मसलतीवर विश्वास ठेवून सर्वांचे गुणदोष या समयीं मनांत न आणतां लवकर येणें घडावें. या भावीं राजारामभाऊची रवानगी केली आहे. सविस्तर विनंती करतील म्हणोन लिहिलें, येसियासी पंतमशारनिल्हे चवगांवचे मुक्कामीं दाखल होऊन तिकडील प्रसंगीक वगैरे सर्वार्थ निवेदन केला. खासा स्वारी तिकडे येण्यास अडचणीचे पर्याय सर्वांस वारंवार लिहिण्यांत येऊन उपयोगाची गोष्ट नमूदास नच ये, तेव्हां कारकून पाठविले; तथापि त्यांतील आशयार्थ एकीकडे राहून आसभूत गोष्टी प्रधानेंकरून कल्पना चालत आहेत, त्याची परिमार्जनात्मक पान्हेरे लिहित असतां निवृत्ति होत नाहीं. त्यास अशा विषयाच्या निदर्शनाचे दिवस हेच आहेत. अस्तु. तुम्हीं लेखनान्वयें सर्वार्थ येकीकडे ठेवून आज चोपढ्यास मुक्काम करून दो दिवसांत आडावदेस स्वारी दाखल होईल. तिकडून राजश्री अंबाजी इंगळे याणीं यावें या भावी मशारनिल्हेस पत्र लिहिण्यांत आलें आहे. तुम्हींही इंगळे यांसी इकडील निखालसतेच्या चाली खात्रीपुरस्सर बोलोन रा। अमृतराव जिवाजी यांस समागमें देऊन जलद येत असें करणें. सारांश या समयीं अडचणी स्वराज्यांत व परराष्ट्रादिक फारच. परंतु त्यांतही दुरांदेश विचार करून मनसव्याचे चालीनें थरचे चिरे थरीं बसवून करणी होऊं लागल्यास अवघड कांहीं एक पडावयाचें नाहीं. इत्यादि विषय समजावया जोगेही आहेत. या गोष्टी समयसमर्पक बोलत जाणें. स्वारीही येतच आहे. भेटी होऊन सर्वार्थ समजतील. रा। छ १३ जिल्हेज सुरू सल्लास मयातैन व अलफ, बहुत काय लिहिणें हे विनंती. मोर्तबसुद.

---

३६८
( भा. सं. )

श्रीसीताकांत

श. १७२५ वै. व. ८
१४-५-१८०३

रा। दौलतराव सिंदे गोसावी यांसी

सकलगुणालंकरणआखंडीतलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो। व्यंकोजी भोसले सेनाधुरंधर रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लेखन

करीत असो विशेष. पेशजी कित्येक मजकूर प्रसंगोपात मसलतप्रकरणीं रा आत्माराम शिवराम व बाळाजी यशवंत यांसी बोलण्यांत येऊन आपल्याकडेही इषारा करण्यांत आला असे उभयतां मशारनिल्हेनेंही तपसिलें आपणांस लिहिण्यांत आणिले असेल, त्याजवरून इकडील सर्व समजण्यांत आलें असेल. सांप्रत येथें कळण्यांत आलें जे आपणांकडील कोणीयेक सरदार व फौज बंगाल्याकडे कटक प्रांतीं जाणार. त्यास फार चांगलें आहे. तिकडे फौजा गेल्या असतां जलचरास निकडही भारी बसेल येविसीं लांबण नसावी आणि पुर्तेपणें तिकडील रवानगीचे ठरल्यास इकडे सूचना आगाऊ लवकर यावी, त्याबमोजिब इकडूनही योजना करण्यांत येईल. येविसीं तपसील उभयतां मशारनिल्हे लिहितील त्याजवरून समजण्यांत येईल. वरचेवर पत्रोत्तरीं संतोषवाप्ति होत असावी. रा छ २२ मोहरम, बहुत काय लिहिणें ? लोभ असों दीजे हे विनंती.

---

३६९ श्रीम्हाळसाकांत

( ना. भो. ७३ )

पो १२ रविलाबल सन १२१३ मुक्काम घारखेड प्र. बोंदड श. १७२५ आषा. शु. ६

ता. २५-६-१८०३

पुरवणी राजश्री श्रीधरपंत व कृष्णराव गोसावी यांस

दंडवत रामराम विनंती उपरी. तुम्हाकडील पत्रांची उत्तरें राजश्री यशवंतराव रामचंद्र व व्यंकटराव कृष्ण यांसी रवानगी होऊन केलीं आहेत, ते पावल्यानंतर सविस्तर बोलतील. इकडील कामाविषयीं अंतःकरणपूर्वक आपलें काम जाणून जपतां हें लक्षांत आहे. सर्व बंदोबस्त घडतील हे खातरजमा आहे. तेव्हां आपले केलेले श्रम वायां जाणार नाहींत, याविशीं खातरी असावी. चंद्र ५ रबिलावल सुा आरबा मयातेन व अलफ, बहुत काय लिहिणें ही विनंती. ( मोर्तबसुद. )

---

३७० श्री

( भा. सं. )

ज्येष्ठ शु. १७२५

जून १८०३

श्री यादी* श्रीमंत स्वामीची सेवा पेशजीपासून तुम्ही आम्ही एकवाक्यतेनें करीत आलों; त्याप्रमाणें पुढें एकनिष्ठेनें उभयतांनीं सेवा करून तेथील मर्जीचा संतोष तें करावें.

श्रीमंत स्वामीची सेवा पूर्वीपासून एकवाक्यतेनें निखालस करीत आलों, त्याप्रमाणेंच

---

* यशवंतराव होळकरानें दौलतराव सिंयास कलमें लिहून पाठविलीं त्यांची ही यादी.

पुढेंही तुम्ही आम्ही सेवाचाकरी करूं येविसी आम्हापासून दुसरा अर्थ होणार नाहीं. श्रीमंत स्वामीचा संतोष तसेंच घडेल. भोसले यांचा स्नेह पहिलेपासून येथें आहे तसाच तुम्हाकडून असावा. मीरखान याजविषयीं त्यांचे मनांत संशय आहे तो तुम्हांकडून दूर होऊन त्याची खातरजमा व्हावी. त्रिवर्गाची एकवाक्यता असावी यांत श्रीमंतांचा संतोष व सरकार चाकरीचा उपयोग. सदरहूप्रमाणें. त्याचें उत्तर तुम्हांकडून कारभारी यांचें म्हणणें दौलतीस बोढ बहुत; फौजेचा पगार वगैरे बंदोबस्त जाला पाहिजे, त्यास आपले विद्यमानें सावकाराची योजना होऊन चार रुपयाचा मोबदला जाल्यास त्याचा ऐवज निमे एका वर्षांत यावा, दुसरे वर्षीं अखेरसालीं सारा फडशा करून यावा याप्रमाणें बोलण्यांत आलें त्याप्रमाणें सावकार करून देविला जाईल. सदरहूप्रमाणें उत्तर.

पुा कलमें—

मारवाड येथें दरसाल आमची खंडणी आहे, तेथें तुम्हांकडून मीरखान याचा महम्मदशाखान कंपूसुद्धां चाकरीस राहिल्यामुळें खंडणीचा ऐवज येत नाहीं. फौज पाठवून त्याचें पारिपत्य करावें तर ती फौज आपलीच यामुळें विचार पडतो. त्यास तिकडे फौज पाठवून रांगड्यास जरब दिली असतां महम्मदशा खान याणीं मारवाडवाल्यास सामल राहूं नये. याचा बंदोबस्त राहणें तसा राखावा. सदरचें उत्तर याचप्रमाणें.

तुम्हांकडील आम्हांकडील सुभे मुलकांत फिरोन बंड करून खंडण्या घेतात व मुलुक खराब करितात हें होऊं नये. याचा बंदोबस्त आजपासून तीन महिन्यांत करावा. याउपर खंडणी घेऊन कोठें नुकसान केल्यास परस्परें मुजरा यावें घ्यावें. सदरहू अन्वयें उत्तर.

पेंढारी मुलकांत धूम करून प्रांत लुटितात यामुळें श्रीमंतांची मर्जी दिक्क होते. त्याचे बंदोबस्तास साडेसात लक्ष रुपयांची जागा तुम्ही आम्ही भोसले त्रिवर्गांनीं लावून यावी.

सदहूचें उत्तर देणें आहे. तेथें जाऊन कानावर घातल्यावर होईल. नवाब मीरखां यास महालाकडे खंडण्याचा ऐवज लावून दिल्हा आहे तितकी जागा त्यास पुरत नाहीं. जमा थोडी, खर्च फार. येविसी श्रीमंत स्वामीस लेहून याचा बंदोबस्त व्हावा म्हणून तुमचें बोलणें त्याचें उत्तर.

महाल मुलुक पागेकडे व कंपू व सिलेदारांकडे गुंतले आहेत याजमुळें महाल आयास येऊन आबाद होत नाहींत; त्यास आपले विद्यमानें मामलेदार सालसुद करून यावे. त्याचे गळीं माहाल घालून उस्तवारी करविली जाईल. पागेकडे वगैरे गुंतलेले आहेत ते मामले होतील म्हणोन तुमचें म्हणणें, त्याप्रमाणें येथून सालसूद पतीचे मामलेदार दिल्हे जातील. त्यांसी बोलण्यांत येईल त्याप्रमाणें पार पाडावें. मामलतीची घालमेल करणें

झाल्यास त्यांचा पैका व्याजसुद्धां परत देऊन नंतर मामलतीची घालमेल करावी, यांत अंतर पडल्यास त्याचें उत्तर येथून केलें जाईल. याच अन्वयें उत्तर.

श्रीमंत स्वामींची आज्ञा येईल ते समयीं पंचवीस हजार फौज व पलटणें तोफखाना वगैरे तयार करोन सांगतील तिकडे चाकरीस जावें. त्यानें उत्तर. श्रीमंत स्वामींची आज्ञा आपलेकडे ( सिंद्याकडे ) येईल. आपण वडीलपणें आम्हांस सला सांगाल त्याप्रमाणें फौज पलटणासुद्धां तयार करून सांगाल तिकडे जाऊं. मेवाडची वाटणी उभयतांची बराबर आहे. श्रीराणाजीकडील खालसा जागा त्यांची त्यांजकडे ठेऊन बाकीची वाटणीस माहाल वाटून द्यावे. ज्याची त्याणीं लावणी आबादी करावी. परस्परें माहाल मुलकास उपसर्ग होऊं नये. सदरहू प्रमाणें उत्तर.

---

३७१ श्रीम्हाळसाकान्त

( ना. भो. ७६ ) श. १७९५ आषा. व ५

चंद्र ६ माहे जमादिलावल सन १२१३ मुताबिक रहिमाअल्ला. ता. ९-७-१८०३

पुरवणी राजश्री रघोजी भोसले सेनासाहेब सुभा गोसावी यांस

रामराम विनंति उपरी. इंग्रज प्रकरणीं व राजश्री अमृतरावजी यांजविषयींचा मजकूर राजश्री यशवंतराव रानचंद्र व व्यंकटराव कृष्ण बोलतील त्याप्रमाणें घडावें म्हणून लिहिलें, ऐशियासी येविषयींची उत्तरें उभयतां मशारनिल्हेसी बोलण्यांत आलीं आहेत हे आपल्याशीं बोलतील. चंद्र १९ माहे रबिलावल. बहुत काय लिहिणें हा विनंति. (मोर्तबसुद.)

---

३७२ श्रीम्हाळसाकांत

( ना. भो. ७९ ) १. ८. १८०३

शके १७२५ श्रा. शु. १३

( शिका वाटोळा मल्हारजीसुत खंडेराव होळकर यांचा )

चंद्र ६ माहे जमादिलावल सन १२१३ मुक्काम रहिमाबादचा कूच.

राजश्री रघोजी भोसले सेनासाहेब सुभा गोसावीं यांस

सकळगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित येशवंतराव होळकर रामराम विनंती उपरी येथील कुशळ जाणून स्वकीय लिहीत असावें विशेष. आपण चंद्र २० माहे रबिलावलचें व चंद्र १ माहे रबिलाखरचें पत्र पाठविलें तें पाऊन लेखनार्थ अवगत जाहला. राजश्री येशवंतराव रामचंद्र व व्यंकटराव कृष्ण आले, त्यांनीं बोलण्याचें जमा सांगितलें. कलमबंदीच्या यादी दाखविल्या त्याअन्वयें आम्ही राजश्री दौलतराव सिंदे यांसी कारभारियासह होऊन यादविर मखलासी व त्यांचा करार करून घेऊन उभयतांची रवानगी केली आहे. सविस्तर बोलतील. मनन करून ज्यांत मसलतीचा उपयोग घडेल

तें करावें. इंग्रजाकडील जाबसालाची निकड आहे यास्तव जलदी घडेल तितका उपयोग आहे म्हणून विस्तारें करून लिहिलें. ऐसियासि आपण उभयतांचे बोलण्याचे भाव समजून कलमबंदीच्या यादीवर मखलासी करून पाठविली, त्यांतील अर्थ पाहतां जागाजागां दिकती व बाजद बरसाद मसलत होण्याचे अर्थ, तेव्हां सध्यां फौजेचा निर्वाह चालून मसलतीस कसा उपयोग पडतो हे अर्थ आपल्या मनांत न यावे ऐसें नाहीं. मसलतीची निकड आणि जाबसाल उगवल्याखेरीज फौजेचा चरितार्थ कोण रीतीनें चालतो. कागदीं पत्रीं लिहिण्यानें लांबण पडती. यास्तव राजश्री मल्हार शामजी व माधवराव गोविंद व विठ्ठल लक्ष्मण व शामरावजी बाजी यांसी घेऊन राजश्री येशवंतराव रामचंद्र व व्यंकटराव कृष्णासह रवानगी केली आहे. सविस्तर बोलतील. सर्व अर्थ मनन करून जाबसाल उगऊन भेटी आपल्या घडून, स्वराज्याचे मसलतीचा उपयोग घडे तो अर्थ जाणल्यानें सर्वांपरी चांगलें आहे. चंद्र १२ रबिलाखर सुाा आर्बैन मयातैन व अलफ. बहुत काय लिहिणें हे विनंती. श्री मोर्तबसुद.

---

३७३ श्रीम्हाळसाकान्त

( ना. भो. ७२ ) श, १७२५ भाद्र. शु. ६

चंद्र ६ माहे जमादिलावल सन १२१३ २३-८-१८०३

( शिका वाटोळा मल्हारजीसुत खंडेराव होळकराचा )

राजश्री श्रीधरपंत व कृष्णराव गोसावी यांस

अखंडितलक्ष्मीआलंकृत:राजमान्य स्नेहांकित यशवंतराव होळकर दंडवत अनेक रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय लिहित जावें विशेष. तुह्मी चंद्र २९ माहे रबिलावलचें पत्र पाठविलें तें चंद्र ३ माहे जमादिलावलचे पावून लेखनार्थ अवगत झाला. आपलीं बोलणीं पुणियाचे मुक्कामीं इंग्रजप्रकरणीं होत गेलीं याअन्वयें आम्हीं यजमानसाहेबाजवळ येऊन त्यांस बोलावून त्यांजला बाहेर काढून शिंद्याच्या भेटी करून आपल्याकडील जाबसाल उगवून पाठविले. कांहीं तथा राहिली नाहीं. हल्लीं इंग्रजांनीं नगरचा किल्ला घेतला, नमुदी होण्यांत कसर राहिली नाहीं. उभयतां सडे होऊन मुकाबलास गेले. या प्रसंगीं आपलें येणें घडावें, यांत उपयोग फार आहेत म्हणून ऐसियासि तुम्हांशीं बोललों त्याप्रमाणें पुणियाहून कूच करून औरंगाबादेपर्यंत आलों. इकडील जाबसाल उगवून न येतां कूच करून, माघारें चांदवडचे सुमारास जाण्याविषयीं तयनायत गेली. आम्हांस सर्व प्रकारें राजश्री सेनासाहेबसुभा यांची मर्जी दरकार, तेव्हां लाचार होऊन माघारे आलों. सहा महिने जाबसालची मार्गप्रतीक्षा करीत राहिल्यामुळें खर्चाचे पेंचांत किती आलों ! मुख्य जाबसाल मुलखाचे वांटणीचा त्याजला ठिकाण नसतां कांहीं तथा उगवण्यांत राहिली नाहीं; हें लिहितां अपूर्व आहे. आम्हांस बोलल्याप्रमाणें मसलतीस अनकूल असावें हेंच लक्ष, त्याजमुळें राजश्री मल्हार

शामजी आदिकरून मंडळीची रवानगी तिकडे केली, आणि आम्हीही कूच करून भोकण-गांवापर्यंत आलों, त्यांचीं बोलणीं होऊन उत्तराची मार्गप्रतीक्षा आहे. उत्तरें उगवून समर्पक सत्वर यावी. चंद्र ५ जमादिलावल. हुकुम खुरवान चंद्र ८ अलर्फ. बहुत काय लिहिणें हो विनंती.

(मोर्तबसुद)

---

श्रीम्हाळसाकांत

३७४

(ना. भो. ७४)

श. १७२५ भा. व. ७

पौ २४-८-१८०३

पौ चंद्र ६ माहे जमादिलावल मुक्काम रहीमाबाद

राजश्री श्रीधरपंत व कृष्णराव गोसावी यांस

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेहांकित यशवंतराव होळकर दंडवत अनेक रामराम विनंती उपरि, येथील कुशळ जाणून स्वकीय लिहित जावें विशेष. तुम्ही चंद्र १ माहे रबिलाखरचें पत्र पाठविलें तें पावून लेखनार्थ अवगत जाला. राजश्री यशवंतराव व व्यंकटराव आले; त्यांनीं बोलण्याचे भाव सांगितले, कलमबंदीच्या यादी दाखविल्या, त्या-अन्वयें यजमानसाहेबांनीं राजश्री दौलतराव शिंदे यांसी बोलून आपले मनोदयानुरूप जाबसाल उगवून मखलाशी व करार लिहून घेऊन उभयतांसमागमें पाठविलीं आहेत. याउपरी येणें घडून ज्यांत मसलतीचा उपयोग तें घडावें. इंग्रजाकडील निकड फार आहे. जितकी जलदी होईल तितकें चांगलें आहे म्हणून लिहिलें. ऐसियासी उभयतांनीं बोलण्याचे जबाब सांगितले. मखलाशीची याद दाखविली. त्यांतील अर्थ पाहतां सध्यां फौजेचे निर्वाहाचा उपयोग घडून मसलतीस येणें घडावें हे प्रकार कसे घडतील हें त्याहावें तेव्हांच समजावें असें नाहीं. तथापि मसलतीची निकड कागदपत्रीं लिहावयास लांबण पडती, याजकरितां राजश्री मल्हार शामजी, माधवराव गोविंद, लक्ष्मण विठ्ठल व शामरावजी यांची रवानगी राजश्री यशवंतराव रामचंद्र व व्यंकटराव कृष्ण यांसह केली आहे. हे सविस्तर बोलतील त्याप्रमाणें मनन करून उत्तरें उगवून समर्पक पाठवावीं. राजश्री सेनासाहेब सुभा यांच्या भेटी होऊन मसलतीस उपयोग घडे तें करावें. बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

श्रीम्हाळसाकान्त

३७५

(ना. भो. ७५)

श. १७२५ भा. शु. १०

२७-८-१८०३

चंद्र २० माहे जमादिलावल

सन १२१३ मु० देऊळगांव राजा नजीक.

(शिक्का मल्हारजी सुत खंडेराव होळकर याचा)

राजश्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा गोसावी यांस

सकळगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेहांकित यशवंतराव होळ-

कर रामराम विनंति उपरी. एथील कुशळ जाणून स्वकीय लिहीत असावें. आपण चंद्र ५ माहे जमादिलावलचें पत्र पाठविलें तें पावून बहुत संतोष जाहला. आम्ही व राजश्री दौलतराव शिंदे घाट चढून वरतीं आलों. इंग्रजांची चाल आहे, ह्या प्रसंगीं आपलें येणें घडावें यांत उपयोग आहे; इंग्रजांनीं फोडतोड करावयाचा विचार आरंभिला आहे. त्यास तिकडे त्यांचे संधान येईल त्याजवर न जावें. आपल्याकडील कारभारी येऊन पोहोंचले. बोलणीं जाल्यावर मागाहून लिहून पाठवूं म्हणून लिहिलें. ऐशियासी इंग्रजांची चाल पाहून आपण उभयतां अजंठयाचा घाट चढोन गेलां, उत्तम आहे. छेटी थोडकी. तेव्हां सावध होऊन हुशारीनें असावें. इकडीलही ज्यांत मसलतीचा उपयोग तोच विचार घडेल; येविषयींचा अर्थ सविस्तर लिहून पत्रांच्या रवानग्या कालच केल्या आहेत, त्याजवरून सायंत ध्यानांत येईल. इंग्रजांच्या चाली चहूंकडून जाल्या आहेत तेव्हां आपणही त्याप्रमाणेंच चाली धरल्यानें हिकडील इंग्रज फोड-तोड करावयास चुकणार नाहींत हें सिद्धच आहे, परंतु त्यांचा अनुभव येण्यांत तथा राहिली नाहीं. आपली सर्वांची एकदिली जाली, तेव्हां त्यांचें कारस्थान चालावें हें घडणार नाहीं, येविषयीं आपली पक्की खातरजमा असावी. राजश्री शामजी व माधवराव गोविंद आदिकरून तेथें पावले. भेटी बोलणीं जालींच असतील. जाबसाल खचीत उगऊन उत्तरें समर्पक यावीं. इकडील संशय कोणेविशीं काडीमात्र न यावा. इंग्रजांस जरब पडून ज्यांत मसलतीचा उपयोग तोच अर्थ घडेल. खातरजमा असावी. छ ९ जादिलावल सु॥ अर्बा मयातैन अलफ. बहुत काय लिहिणें ही विनंती.

( मोर्तबसुद. )

---

३७६ श्रीम्हाळसाकांत

( ना. भो. ७८ ) श. १७२५ भा. शु. १०

( बाजूवर शिका ) २७–८–१८०३

चंद्र १० माहे जमादिलावल सन १२१३ नजीक देवलगांव राजा.

राजश्री रघुजी भोंसले सेनासाहेब सुभा गोसावी यांस

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेहांकित यशवंतराव होळकर राम राम विनंती उपरी. एथील कुशळ जाणून स्वकीय लिहीत असावें विशेष. आलिकडे आपल्याकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं तरी असें न करितां सर्वदा पत्र पाठवून सविस्तर वृत्त लेखन करून संतोषवीत असावें. इंग्रजांस स्वराज्याचा लोभ उत्पन्न होऊन चाल करावी ह्या इरायांत बहुत दिवस होतेच. प्रस्तुत श्रीमंत राजश्री बाजीराव साहेब अनकूल हें निमित्यास कारण होऊन पुणियास येऊन अलीकडे चाल करून नगरचा किल्ला घेतला. अपल्यापाशीं वकील होता तो न पुसतां उठून गेला. नवाबाकडील फौज व दळ येणें. औरंगाबादेनजीक आहेत. त्यांची चाल पाहून आपण व राजश्री दौलतराव शिंदे सडे

होऊन भांदोल्याचे घाटावरतीं चढून त्याची आपली छेटी थोडी आहे म्हणून वर्तमान ऐकतों, त्यास आजपर्यंत आपसांत फूट होती याजमुळें त्यांचा इतका प्रसार झाला. प्रस्तुत आपली त्रिवर्गांची एकदिली जाली. तेव्हां स्वराज्यांतील सर्व लहान थोर सरदार मराठे मुसलमान सामने होतील. हिंदुस्थान प्रांतीचे राजेरजवाडे व राजश्री समशेरबहादूर बुंदेले व झांसीवाले आदीकरून छोटेमोटे आनकूळ होतील. इतका भरणा पाहतां पांच-सहा लाख फौज व दहा कंपू होतील. दोन थोक करून चाल केली असतां कांहीं जड पडावें असें नाहीं. कर्नाटक, बंगाला व अंतरवेद आदिकरून त्यांचा मुलूक कोट्यावधींचा आहे. इतका आपल्या पेट्यांत पडल्यानंतर आपलें हित किती ! त्यांजला इकडील मुलकांत येऊन नफा काय होणार हें विचार लावून पाहिल्यानंतर बळाबळ पक्ष इकडील पडून कायल होतील. आपण उतावळी करून गांठ घालून ते हांवभरी होऊन चाल करतील असें न करावें. धमकावून पोक्त विचारानें पाऊल पडल्यास सहजांत कायल होतील. त्यास याच बेतास लागावें. कांहीं अवघड नाहीं. त्यांची चाल चहूंकडून आणि आपण एके ठिकाणींच घोटाळल्यानें ठीक नाहीं. फौजा व कंपू तिकडील जिल्ह्यांतील बोलाऊन घेऊन त्याची आपली छेटी लांब पल्याची राहून, सध्या नबाबाचा मुलुख पोटीं पाडा, व इकडे आम्हीही तसाच बेत धरितों. त्रिवर्गाची एकदिली झाली त्या अर्थीच पाहून तें करूं; आपण इकडील कोणेविशीं संशय मनांत न आणितां सर्व प्रकारें मसलतीस अनुकूळ आहों, हे खातरजमा ठेवून तेथें मसलतीचा नक्षा येईल तैसा इतला इकडे येत जावा. इकडे घडेल तैसें आपल्यास लिहीत जाऊं. यांत उपयोग आणि मसलतीचे पल्ले फार आहेत. राजश्री मल्हार शामजी आदीकरून मंडळी पावून बोलणीं जालींच असतील. सारांश ह्या प्रसंगीं एकदिलींत कसर नसावी. याचे पोटांत कामें बहुत आहेत. आपण विचारवंत दूरदेशीं आहां. विस्तारें ल्याहावें ऐसें नाहीं पत्रांच्या रवानग्या वरचेवर होत जाव्या. रवाना चंद्र ९ जमादिलावल सु॥ आर्बैन मयातैन अलफ. बहुत काय लिहिणें ही विनंती. मोर्तबसुद.

---

श्री।गैबी प्रसन्न

३७७ — श. १७२५ आश्वि. शु. १३
( भालेराव सं. ) — ता. २९-९-१८०३

राजश्री चिंतोपंत[1] बापू गोसावी यांसी

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्ने सखाराम घाटगे सर्जेराव दंडवत विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत जावें विशेष. तुम्ही पत्र पाठविलें तें पावलें. वासुदेव नारायण यानीं येथील पत्रावरून तुम्हांकडील पलटणें आणविलीं त्यास

---

1 चिंतो आतमाराम तांबोळी.

तुम्ही खानदेशांत आहां म्हणून पलटण कामगिरीस देविलें होतें. तिकडे गेलां त्यापेक्षां पलटण यावयाचें प्रयोजन नाहीं. दर कूच पलटणें व फौज घेऊन बराणपुरास जावें. तिकडे पुढें साहा पलटणें चकत्या साहेबाच्या त्यास पेंढारी यांस पत्रें पाठविलीं आहेत ते तुम्ही आपल्यास सामील करून घेऊन दरमजल पुढें जावयाचें करणें. खर्चाचें ओढीचा मजकूर लिहिला, त्यास माहाल गांव पाहून घासदाणा घेत जावे. फौजेचा जमाव करून सरकारनक्ष राहे तें करावें. वासुदेव नारायण यांसही पत्र लिहिलें आहे. ते उठोन येतील. रा छ १२ माहे जमादिलाखर, बहुत काय लिहिणें ? लोभ कीजे हे विनंती.

---

३७८

( ना. भो. २७ )

श्री

श. १७२५ कार्ति. शु. १३

२८-१०-१८०३

श्रीमंत महाराज सौभाग्यादिसंपन्न मातुःश्री[1] माईबाई साहेबांचें सेवेसी

आज्ञाधारक रामचंद्र वाघ व माधवराव नलिकंठ अनुक्रमें दंडवत व विज्ञापना ऐशीजे, येथील वर्तमान ताा. छ ११ माहे रजब मुा बाळापूर येथें साहेबांचे कृपादृष्टी करून यथास्थित असो विशेष. साहेबांकडून सांप्रत अज्ञापत्र येऊन सेवकांचा सांभाळ होत नाहीं, त्यास वरचेवर आज्ञापत्रीं सनाथ करावें. इकडील प्रकार तर अंग्रेजांनीं असेरीचा किल्ला घेतला. मलकापुरावर तीन पलटणें आलीं आहेत. शिंदे एरंडोलचे मैदानांत आहेत. श्रीमंत राजश्री बापूसाहेबांकडील सांडणीस्वार छ १० तारखेस आले. त्यांपैकीं एक नागपुरास रवाना केला. स्वारी टोंक्यावर आहे. आमचे यजमान मुकाम मजकुरीं आहेत. फौजेचा जमाव करणार. राजश्री विठ्ठलपंत[2] सुभेदार वगैरे यांस पत्रें गेलीं आहेत. राजश्री मालजी आहेरराव व गुलाबसिंग आलेत. याप्रमाणें आहे. पुढें अंग्रजांची मसलत जैसी ठरेल तैशी विनंती लिहिण्यांत येईल. मुलुखगिरीचे कष्ट बहुत झाले. याचे दुःखाचा परिहार जेव्हां महाराजांचे पाय पाहूं तेव्हां होईल. आज्ञेप्रमाणें सरकारचाकरीस रात्रदिवस जपून असों. याचा सर्व निर्वाह महाराजांचे आशीर्वादें करून होईल. यजमानसाहेबांची प्रकृति सांप्रत स्वस्थ आहे. चिंता न करावी. तेथें उभयतांसी तीर्थरूप मातोश्री आहेत. त्यांचा सांभाळ करणार महाराज मायबाप समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ दुसऱ्या रघूजीची बायको. २ विठ्ठल बल्लाळ सुभेदार.

३७९ श्रीनाथ प्रसन्न. श. १७२५ पौ. शु. १२
२५-१२-१८०३

( भालेराव सं. )

राजश्री आत्माराम शिवराम गोसावी यांसी दंडवत विनंती तुम्ही पौष शुद्ध ४ चें पत्र पाठविले ते पावले. लिहिला मजकूर पत्रावरून व आत्माराम यांणीं विनंती केल्यावरून सविस्तर कळो आला. जमीयेतीसुद्धां पुढें बराणपुरास येऊन तेथील ठाणे फिरंगीयांचे उधळून देऊन सरकारचें ठाणे कायम करून नंतर मागाहून मातुश्री बाया वगैरे खटले बराणपुरास आणावे असा तुम्ही विचार केला आहे. त्यास फिरंगीयाचे सलूखाचें संधान आलियावरून रा. येशवंतराव घोरपडे अमीरुल-उमराव गेले आहेत हे तुम्हांस कळलेंच आहे. त्याजवर सलुखाचे बोलणे ठरून रा. विठ्ठल महादेव यांची रवानगी फिरंगी यांजकडे केली आहे, तेव्हां बराणपुरी प्रस्तुत गलबल केली असतां सलुखाचे बोलण्यास बाध पडतो असें जाणोन रा. अपाजीराव निंबाळकर यांसी तूर्त गलबल बराणपुरी न करितां अदकोस पावकोस सरकून राहण्याविषयीं लिहिलें आहे. तुम्हीही बराणपुरी गलबल न करितां मातुश्री बरोबरच यावयाचें करणें. रा छ १० रमजान सु॥ अर्बा मयातैन व अलफ हे विनंती.

( मोर्तबसुद )

---

३८० श्री श. १७२५ फा. व. ३
ता. २८-२-१८०४

( भालेराव सं. )

राजाश्रिया विराजित राजमान्य राजश्री बाबा स्वामींचे सेवेसी पोष्य विठ्ठल महादेव साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल तागाईत फाल्गुन व. ३ जाणोन स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे विशेष. आपण माघ व० ५ चे मितीचें पत्र पाठविलें तें पाहून परम आनंद जाला. असेंच निरंतर पत्रोत्तरीं परामर्ष करीत जावा. लिहिलें कीं प्रसंगीं सांप्रत तुम्ही माहितगार, आपसांतील फुटेमुळें नानाप्रकारचीं वर्तमानें येतात, येणें करून परकीयांशीं परज दृष्टीस येऊन मसलतीस पायबंद पडतो याचें मनन राखून तूर्त समेट घालून क्रम चालवावा. राजश्री गणपतरावजीस साह्य आपलें आहे म्हणून विस्तारें लिहिलें तें समजलें. ऐसीयासी प्रसंगीं आम्हांकडून जितका उपयोग घडावयाचा त्यांत अंतर होत नाहीं. दुर्जनांनीं दौलतींत बखेडे करून अनेक प्रकारचे तंटे पलटणवाल्यांस सामील करून करतात. येविसींचें सरकारचे व रावसाहेबांचे पत्रावरून ध्यानांत येतच असेल. आमची पराकाष्टा तोंपर्यंत कायावाचेमनें करून सर्वस्वीं लाखो रुपयांचे सावकारांचे देण्यांत राखून उपयोग पडण्यास कमी नाहीं. जोंपर्यंत प्राणांत प्राण आहेत तोंपर्यंत दौलतींत चाकरी करण्यास सिद्धच आहें. आपण मकरसंक्रमणाचे तीळ शर्करायुक्त पाठविले ते पाहून अति आदरें स्वीकार केला. बहुत काय लिहिणें कृपा लोभ करावा हे विनंती.

---

३८१ श्री.

( भा. व. १-२० ) श. १७२५ अ. चै. शु. १४

२५-३-१८०४

कौलनामा श्रीमंत कैलासवासी राजश्री नाना फडनवीस यांचें कुटुंब मातोश्री जिऊबाई यांशीं

कुंपनी सरकार इंग्रेज बहादूर यांजकडून वेलस्ली बहादूर यांनीं लिहून दिल्हा कौल ऐसाजेः--राजश्री धोंडोपंत सुभेदार लोहगड यांसी केले ते कराराप्रमाणें आपली वस्तवानी व खासगत चाकरलोकांनिशीं श्रीमंत पेशवेसाहेब राव पंडित प्रधान बहादूर यांचे मुलुखांत आपले मनासीं कोठें प्रशस्त असेल त्या स्थळीं सुखरूप असावें. आपले पोटगी खर्चाकरितां इंग्रेज बहादूरचे सरकार विद्यमानी सालिना १२००० बारा हजार रुपयेप्रमाणें आपण कुंपनी इंग्रेज बहादूरचे सरकार व श्रीमंत पेशवा साहेब राव पंडित प्रधान यांचे शत्रुवर्गाशीं संबंध न ठेवीत तों पावेतों पावत जातील. आपणाशीं कोणाकडूनही कोणे गोष्टीची इजा पोहोंचणार नाहीं. अभय असे. ता. २५ माहे मार्च सन १८०४ इसवी मुतावल छ. १२ जिल्हेज मुकाम मुंबई.

---

३८२ श्री

( भा. व. १-३० ) श. १७२६ अ.-चै. शु. १४

२५ मार्च १८०४

करारनामा महाराज जर्नेल वेलस्ली बहादूर कुंपनी सरकारचे तर्फेनें व राजश्री धोंडोपंत* लोहोगडचा सुभेदार या उभयतांमध्यें करावा ऐसा जेः—

१ अवल कलम लोहगडचा किल्ला व किल्ले केळंजा हे दोन्ही किल्ले जंगी सरंजाम तोफ वगैरेनिशीं श्रीमंत पेशवासाहेब राव पंडित प्रधान बहादूर यांच्या सरकारचाकरीकरितां कुंपनीच्या फौजाशीं सोडून द्यावे.

१. दुयम कलम धोंडोपंत लोहोगडचा सुभेदार यांनीं कुंपनच्या आश्रितांत येऊन काठ राहावें म्हणून अपेक्षतील कीं तेथें त्यांची चीजवस्तसुद्धां राहूं नये तरी श्रीमंत पेशवा साहेब राव पंडित प्रधान बहादूर यांचा अथवा इंग्लिश बहादूर यांचे सरकारचे शत्रुवर्गाशीं संबंध ठेवूं नये. संबंध न ठेवतील तोंपर्यंत इंग्लिश बहादुराकडून संरक्षण होईल. एखाद वेळेस शत्रूचा संबंध ठेवतील तरी इंग्लिश सरकारचें संरक्षण उडून जाईल.

१. तिसरें कलम श्रीमन्मातोश्री जिऊबाईसाहेब इंग्लिश बहादुराच्या आश्रयाखालीं येऊन श्रीमंत पेशवासाहेब रावपंडित प्रधान यांचे मुलुखांत कोठें पाहिजे तेथें रहावें तर त्यांचे पोषणास्तव सालिना खर्चास बारा हजार रुपये कंपनीकडून मुकरर करून मातोश्रींनीं

---

* निजसुरे.

वस्तवानी व आपले चाकर लोकांनिशीं सुखी असावें. यास कुंपनी सरकार जामीन आहे. अभय असे.

१. चौथें कलम धोंडोपंताची मर्जी असल्यास श्रीमंत मातोश्री यांचे समागमें असावें. मातोश्रीचे ठायीं ज्यापक्षीं इंग्लिश बहादूर सरकारचें संरक्षण असावें तरी मशारनिल्हेकडून उभय सरकारचे शत्रुवर्गांशीं संबंध असूं नये. एखादे समयीं संबंध जालियास हे करार निष्प्रयोजन होऊन जातील.

१. पांचवें कलम आजच्या तारखेपासून आठवे दिवशीं लोहगडचा किल्ला रिकामा करून व किल्ले केळंजाच्या किल्लेदारास किल्ला सोडून देण्याविषयीं ताकीदपत्र देऊन दोन्ही किल्ले कुंपनी सरकारचे स्वाधीन करावे. असे करार राजश्री धोंडोपंत किल्लेदार यांजकडून कुल-अखत्यारीनिशीं आले ते कारकून राजश्री अंताजीपंतांनीं केले. त्यास सदर्हू करार सिद्धीस जात पावेतों अंताजीपंतांनीं मुंबईंत ओल असावे. सही कलम.

एकूण कलमें पांच ता० २५ माहे मार्च सन १८०४ इसवी मुताबील छ १२ जिल्हेज मुक्काम मुंबई.

---

३८३ श्री

( भा. व. १–२१ )

श. १७२६ अ. चै. व. ६
१–४–१८०४

मेहेरबान असमस दस्तगाहा जिऊबाई साहेब सलाम हुकवताक

छ अजी सबब कर्नेल क्लोस साहेब बहादूर बाद सलाम खैरयत आजाम अंकें येथील खैरयत जाणून हमेशा खत पाठवून दिलशाजगी करीत गेलें पाहिजे. (ठराविक) आसाहेबांचें पत्र एक तिळाचे थैलीचें व दुसरें जाहागिरीचे बंदोबस्ताचें ऐशीं दोन खतें वसूल जाहलीं. लिहिला मजकूर दर्याप्त जाहला. अजम राघोपंत गोखले यांनीं जाहीर केलें कीं, श्री काशींत वाडा आहे तो वाडा प्रभाकरपंत निसबत अमृतरावसाहेब यांनीं बळकाविला आहे म्हणून सांगितलें. त्याजवरून येथील सरकारांस चकती लिहून दिली असे. तरी श्री काशीचे वाड्याचा बंदोबस्त होईल. दुसरें आपले वकील बोलत होते कीं, कल्याणास जाऊन रहावें म्हणून आपला इरादा आहे. त्यावरून कलमी केलें जातें कीं, आसाहेबांचें राहणें पनवेलीस बहुत मुनासब आहे. वस्ताहकी तेथें लोकांची नजर राहते. बंदोबस्त पाहाऱ्याचा वगैरे चांगला आहे. दुसरे जागीं आपण गेलें तर पाहारे वगैरेचा बंदोबस्त राहणार नाहीं. या बाबे अजम राघो पंडित यांशीं बोलणें जाहलें आहे ते लिहितील. जादा काय लिहिणें. रवाना छ. १ माहे एप्रिल. प्यार मोहोबत असो दीजे हे किताबत.

इंग्रेजी सही

---

३८४ श्री.

( भा. व. १०-२० )* श. १७२६ वै. व. ८

ता. १-६-१८०४

यादी जिऊबाई भानु बाळाजी जनार्दन यांची स्त्री पुण्यास होती ती दंग्यामुळें किल्ले लोहोगड येथें जाऊन राहिली होती, ती तेथून निघून जाऊन कसबे पनवेल प्रांत कल्याण भिवडी येथें राहिली आहे. ती पुण्यास येऊन आपले घरीं राहणार याविषयींचे बंदोबस्ताविषयीं सुरू सन आर्बा मयातैन व आलफ. कलमें

१. बाळाजी जनार्दन यांचे निसबतीचे कारकून वगैरे असामी

| | |
|---|---|
| १ जनार्दन | १ आबाजी |
| १ राघो | १ गंगाधर |
| १ आपाजी | १ राघो |
| — | — |
| ३ | ३ |

एकूण सहा असामी यांनीं आपले घरीं येऊन स्वस्थ राहावें. फंदफितूर वगैरे करूं नये. त्यांस सरकारांतून उपद्रव लागणार नाहीं.

१. जिऊबाई यांचा भाऊ परशराम गोपाळ वैशंपायन कैदेंत आहेत त्यांस मोकळें केलें जाईल. त्यांनीं घरीं जाऊन स्वस्थ राहावें. फंदफितूर करूं नये.

१. जिऊबाई यांस सालिना बेगमीबद्दल रुपये बारा हजार द्यावयाचे: त्यांपैकीं बाळाजी जनार्दन यांजकडे इनाम गांव व जमिनी व वतनें सरकारांतून व लोकांकडील चालत होतीं, त्यांतून जिऊबाई यांस द्यावयाचें ठरलें तें नेमून देऊन त्यांची बेरीज बारा हजार रुपयांत वजा करून बाकी ऐवज सरकारांतून दिला जाईल. बाळाजी जनार्दन यांची चीजवस्त जप्तीस गेली ती गेली. प्रस्तुत त्यांची स्त्री जिऊबाई यांनीं चीजवस्त घेऊन पुण्यांत आपलें घरीं स्वस्थ राहावें. फंदफितूर वगैरे काडीमात्र वावगी वर्तणूक करूं नये. एकूण पांच कलमें सदर्हूप्रमाणें करार. छ २२ सफर वैशाखमास सन आर्बा मयातैन.

---

* भा. व पु. १ यांतील ले. १९ ते २९ पावेतोंच्या पत्रांस मुळांतील अंक चुकले आहेत.

३८५ श्री

( भा. व. १-२१ ) श. १७२६ वै. व. ९
२-६-१८०४

श्रीमंत मातोश्री जिऊबाईसाहेब यांचे सेवेसी

अजतर्फ कर्नल वेलस्ली साहेब बहादूर सलाम आंकीं येथील खेरखुषी जाणून आसाहेबीं आपली खेरखुषी नामी कलमी करवून दिल ताजा करीत असलें पाहिजे. बिअयाम साहेबाचे विद्यमानें श्रीमंत पेशवे साहेब बाजीराव रघुनाथ पंडित प्रधान बहादूर यांनीं करार केल्या त्या यादी आपणाकडे पाठविल्या असे. पहिले पनवेलीवर आम्ही आलों असतां आपण आमच्या रुबरू केले ते सवाल सर्वही यांत आहेत. ते सर्व गोष्टींसही पेशवा साहेब महसुफ यांना कबूल आहेत. आपले बंधु राजश्री परशराम गोपाळ वैशंपायन यांसी शिवगडांत ( सिंहगडावर ? ) कैदेंत ठेविलें होतें, तरी त्याविषयीं आम्ही श्रीमंत साहेबाशीं सांगून कैदेंतून सोडून पत्रासहित लेहून आपणाकडे पाठविले असे. हें पत्र मशारनिल्हेकडून आपणास पावेल आणि आम्ही बहुत प्रकारें आपणाशीं याचना सांगत असे जे, पावसाळा दिवस पाऊस लागण्याचे पूर्वींच आपण शीघ्र पुण्यास येऊन पावतसें करावें. केळंजाचे किल्लेदार राजश्री महादजीपंत व राजश्री धोंडोपंत सुभेदार व त्यांचा बाबसा नोकरीसुद्धां त्याचेविषयीं तहनाम्याप्रमाणें तुमचे समागमें पुण्यास येऊन त्यांनीं एकनिष्ठपणें चालत असे. जोंपर्यंत त्यांचे मनांत कोणते जाग्यांत रहावयाशीं समर्पक पडेल त्यांचे संतोषानुसार स्वस्थ राहणें. कळलें पाहिजे. रवाना चंद्र २२ सफर मुताबील माहे जून २ सन १८०४ इसवी. जादा काय लिहिणें ? प्यार मोहबत असो दीजे हे किताबत.

---

३८६ श्री

( भा. व. १-२१ ) श. १७२६ ज्ये. शु. १
८ जून १८०४

श्रीमंत मातुश्री जिऊबाईसाहेब यांचे सेवेसी

अजतर्फ जनरल वेलस्ली बहादर सलाम आंकी येथील खुशी जाणून आपली षादमानी कलमीं करीत असिलें पाहिजे. बिअयाम तुम्ही छ० २२ सफरचें दोन्ही पत्र याददास्त एकसहीत पाठविलें तें पावोन लिहिला मजकूर जाहीर जाहला. आम्हीं लिहिलें तें सर्व पत्र आपणांस पावलें नाहीं म्हणून मनांत संदेह असेल त्यास आपण लिहिलें त्या पत्राचे अन्वयाबद्दल कळत आहे कीं, पत्र तमाम आपणांशीं पावलें म्हणून तर ही आपले मनांतील संदेह परिहार होण्यास्तव पनवेलीहून आम्ही निघून आपले अरजे अजीपर्यंत आपणाशीं लिहिलें तें पत्र दरोबस्ताची नक्कल करून सांप्रत आपणाकडे पाठविलें आहे, त्यावरून संदेहनिवृत्ति होईल. आम्ही छ० २२ सफर मुताबीला छ० २ माहे जूनचे

रोजीं पुण्याचे मुकामींहून आपणास एक पत्र लिहून त्यांत श्रीमंत पेशवासाहेब बाजीराव रघुनाथ पंडित प्रधान बहादूर यांचे करारनाम्याची याद सहीत घालून तें पत्र आपले भाऊ राजश्री परशराम गोपाळ वैशंपायन यांचे हातीं देऊन आपणाकडे पाठविलें असे. कळावें. केळंजाचा किल्ला श्रीमंत पेशवासाहेब मोसुफ देऊन चुकल्यावरी आणखी कोणा-सही देणें होत नाहीं व आपण दुसरे एक पत्रांत जमिनी, इनामगांव वगैरेंची तपशीलवार यादी पाठविल्या होत्या, कीं त्यांत खर्चाची अडचण आहे तर पैका द्यावा म्हणून लिहिलें होतें. तरी या विद्यमानें आम्ही त्या यादीस दर्याफ्ती करून मागून याचा जबाब पाठवीत असों. कळावें. बहुत काय लिहिणें? प्यार मोहोबत असों दीजे. रवाना छ० २८ सफर मुताबील छ० ८ जून सन १८०४ इसवी ही किताबत.

---

३८७ श्रीनाथप्रसन्न

( भा. सं. )

श. १७२६ ज्ये. शु. ८

ता. १५ जून १८०४

रा आत्माराम शिवराम व बाळाजी येशवंत गोसावी यांसी दंडवत विनंती उपरी. तुम्हीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं. राजश्री सेनासाहेबसुभा यांचें लक्ष्य स्वधर्मसंरक्षणाविसीं पूर्ण आहे. प्रसंग पाहून जलचरांसी तूर्त समेट घातला. परंतु त्याजवर कायम नाहींत. प्रस्तुत कटक बंगाला इकडे दोन्हीकडील फौजा जाऊन जलचरांस शह बसवावया भावें फौजेची तयारी हजरीचे निमित्यें होत आहे. आपल्याकडून सुभा त्या प्रांतीं रवाना व्हावा म्हणजे त्यांची फौज जाऊन त्यास सामील होईल म्हणोन वगैरे लिहिलें तें विदित जालें. अशास स्वधर्मावर खंबीर होऊन उद्योग होत असावा हें त्यांस विहित होय. तदनुसार त्यांनीं विचारणा केली हें युक्तच केलें. हिंदुस्थानांत सोबत्यांनीं पायबंद बसविला तेव्हां इतर जागा जलचरांकडील फौज पलटणें कोठें नाहींत, सारे इकडेच गुंतले असें जाणोन कटक बंगाला या प्रांतीं दुंदी मचवावी याकरितां फौज देऊन पेंढाऱ्यांसुद्धां सुभा रवाना केला आहे. हल्लीं सेनासाहेबांकडील फौज जाणार हे गोष्ट फार चांगली. त्याची तिकडे माहितगिरीही आहे. तिकडील इकडील फौजांनीं धामधूम करून चार दिवस पोट भरावें यांत जलचरांस शह बसून आयास येतील. असेच चौघांकडून चहूंकडे पायबंद बसल्यावर कोठवर पुरी पडतील. याकरितां जे त्यांनीं योजना केली तीच अमलांत आणोन फौज सत्वर बिदा करावी. त्यांचें कूच जालें म्हणजे इकडील सुभा गेला आहे त्यास सामील व्हावयाविसीं लिहिलें जाईल. छ ६ रबिलावल सु॥खमस मयातेन व अलफ हे विनंती.

( मोर्तबसुद )

---

३८८
( भा. सं.)

श्री गैबी प्रसन्न

ज्ये. शु. १५ श. १७२६
ता. २३-६-१८०४

रा. आत्मारामबावा गोसावी यांस

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो सखाराम घाटगे सर्जेराव दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावें विशेष. तुम्ही पत्र पाठविलें तें पावलें. इकडे यावयाचा बेत केला होता परंतु श्रीमंत सेनाधुरंधराणी राहऊन घेतलें कीं पत्रें पाठविलीं आहेत, त्यांचीं उत्तरें आलीं म्हणजे तुम्ही आम्ही समागमेंच जाऊं, त्यावरून राहिलों. कर्नेल कलस याचा काहींच मतलब जाहला नाहीं; सबब माघारी आपले फौज पलटणांत जाणार. त्यांचे चितांतील काय भाव हा समजत नाहीं. या प्रसंगीं आम्हीं तेथें असावें परंतु कोणते वेळेस निघालों तें येणें घडत नाहीं म्हणोन विस्तारपूर्वक लिहिलें व सविस्तर रा भाऊचे पत्री लिहिला मजकूर मशारनिल्हेनी समजाऊन सांगितल्यावरून समजलें. ऐशियासी सेनाधुरंधर याणीं राहून घेतलें तें ठीकच आहे. जलचराशीं तह केला ते प्रशेस्तपणें चित्तांत वागत नाहीं याजकरितां परतोन इरादा करावा हें मानस आहे. या करितां हजिरी घेऊन बळ बांधणार त्यास हें ठीकच आहे. इकडीलही उभयतां सरदारांचा इरादा सडे होऊन दिल्ली प्रांतें जावें असें आहे; त्यास इकडे यावें म्हणोन अलाहिदा पत्रें सरकारचीं व हातचिठ्या पाठविल्या आहेत त्याप्रमाणें इकडे येण्याचें करतील. तर तुम्ही त्या समागमे लष्करांत येऊन पोहोंचावे. कर्नेल कलस माघारी आपले फौज पलटणांत जाणार, परंतु त्यांचे चित्तांत इरादा कोणता होता, आले कां, माघारी जातात कसे, कांहींच कळलें नाहीं. तर येविसीचा खुलासा समजल्यास लिहून पाठवावा. आम्ही तेथें नाहीं म्हणोन लिहून दर्शविलें त्यास हें चित्तांत काहीच आणूं नये, आपणच येथें आहां असें समजावें. या मागें कामें करीत आला आहांत व पुढेंही कराल असा भरवसा आहे, तेव्हां लिहून कळवावें असा अर्थ नाही. सेनाधुरंधर येतील त्यांजसमागमें तुम्हीहि यावयाचें करावें. रावसाहेब बाळाजी यशवंत यांचे मारफतीनें ऐवज यावयाचा आहे तो अद्यापि वर्षे भरत आलीं तरी भरणा होत नाहीं म्हणोन मशारनिल्हेचें लिहिलें आलें. त्यास ऐवज द्यावा असें त्याचे चित्तांत वागत असल्यास फडशा करून द्यावा. न दिल्यास ठीकच आहे. मगर त्याजकडेस मागूं नये. हुंड्याच्या पेट्या माघारी पाठविल्या आहेत ह्या बाळाजीपंतास द्याव्या व त्याजकडून ऐवज आला तो सरकार उपयोगी काय पडला न पडला हें माहीत आहेच. तर एक पैसा उपयोग पडत नाही तर पेट्या पाठविल्या आहेत ह्या माघाऱ्या देऊन सरकारचा दस्तऐवज त्यांजकडे गुंतला असेल तो मागून घ्यावा. येविसी जाबसाल बाळाजीपंत सेनासाहेबांसी करतील. रा छ १४ रबिलावल बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती.

३८९ श्री ज्ये. व. ११ श. १७२६
(भा. व. १-२१) ता. ३-७-१८०४ चे पूर्वी

असमतपन्हा व शराफत दस्तगाह जिऊबाई साहेब सलाबत,

छ अजी सबब कर्नेल क्रोस साहेब बदजु सलाम अंकें. जनरल वेलस्ली साहेब बहादुर यांनीं तुम्हांविषयीं श्रीमंत साहेबांपाशीं बोलून श्रीमंताचा कौलनामा व आपलें पत्र अजम परशरामपंत यांचे समागमें पाठविलें आहे. तरी आपण खातरजमेनें पुण्यास येऊन आपले हवेलींत रहावें. श्रीमंत साहेबांचे पत्रावरून खातरजमेनें व खुषवक्तीनें परशरामपंताचे बरोबर पुण्यास यावें. तुम्हांस कोणेविषयीं तोशीस लागणार नाहीं. जादा काय लिहिणें हे किताबत.

सही इंग्रेजी.

---

३९० श्री ज्ये. व. ११ श. १७२६
(भा. व. १-२१) ता. ३-७-१८०४

श्रीमन्माताश्री जिऊबाईसाहेब यांचे सेवेसी

अजतर्फ जनरल वेलस्ली बहादूर सलाम अंकीं. येथील खैरखुषी जाणून असो वि।। आपली षादमानी कलमी करीत असिलें पाहिजे. विआयाम साहेबांनीं राजश्री परशुरामपंत वैशंपायन यांचे समागमें पत्र पाठविलें तें पुण्याचे मुक्कामीं पोंचून मजकूर जाहीर झाला. आणि श्रीमंत पेशवे साहेबांचा करारनामा आपणाकडे पाठविला होता तरी याचे अन्वयें (चांगलें समजलें नाहीं.) त्या करारनाम्यांत तुम्ही तुमचे कारकुनांसहित आपले संतोषानुसार पुण्यांत येऊन रहावें यास कांहीं इजा होणार नाहीं, म्हणून लिहिलें होतें, व तुमचे इनामगांव, जमिनी वगैरेचे बातबेत सालिना बारा हजार रुपयेप्रमाणें देणें प्रो झाले आहेत ते ऐवज वसूल घालून बाकीचे तुम्हांस देतील. परंतु आपण पुण्यास येऊन रहाण्यास आपणाशीं समर्पक नसल्यास आपल्या संतोषानुसार कळविलें. हा व दुसरा कोणता तरी पेशवे साहेबांचे मुलुखांत हा सुरक्षित राहातैसें करणें आणि साहेबांनीं कोणतें जागीं राहिलें तरी आपण व आपणाकडील लोक कुंपनीचे आश्रयांत आहेत. आतां कर्नेल क्रोस साहेबांचे नांवें एक चकती लिहून आम्हीं आपणाकडे पाठविली असे. तरी त्यांत लिहिलें आहे कीं, आपणाशीं वेळेवेळेस चांगलेपणें तुमचे दरमहा पावतसें करवणें व आपले मनोदयानुसार आपलें बरें होण्याविषयीं दृष्टि ठेवणें म्हणून असें लिहिलें. कळावें. जें कांहीं तुमचें कामकाज पडेल तर तें करण्यास्तव आम्हांसी बहुत खुषी आहे. वरचेवर आपली खैरखुषी लिहून पाठवीत असावी. रवाना छ. ३ माहे जुलई सन १८०४ इसवी मुताबी छ. २४ रबिलावल जादा काय लिहिणें? मोहोबत असो दीजे हे किताबत.

---

३९१ श्री

( भा. व. १. २१ )

श. १७२६ आषा. शु. ९
१६ जुलै १८०४

साहेब मुषफक जिऊबाई साहेब फडनवीस सलमु महुताला,

अज सौब जनरल वेलस्ली बहादूर यादकैदमुफक येथील खैरयत खुषी जाणून आपली षादमानी कलमी लिहीत आली पाहिजे. दिगर तुम्ही खत १९ रबिलावलचें पाठविलें पाहून लिहिली कैफियत मोसफल जाहीर झाली. तुम्ही आपले कामानिमित्यें फार विस्तार लिहिला होता, या कामास आम्ही या अगोदरच एक खात अमारत व अयालगमरगबद्दल कर्नल क्लोज साहेब बहादूर यांस लिहून रवाना केला आहे. तरी साहेब मैसुफताव आलबंग कांहीं ज्युबई नाहीं. विशेष तुम्ही आपल्याकडून एक कारकून यांकडे पाठवून दिला त्यांनीं तुमच्या कामास कुमक करून चालविल्या......कामास कर्नल साहेब बहादूर मौसुफ सलजाहारी लावीत जाणें. त्यांणीं सांगितल्याप्रमाणें वर्तणुकेंत आलिया कामाची बहेतरी असे. जादा काय लिहिणें? तारीख १६ माहे जुलई सन १८०४ इसवी मुक्काम श्रीरंगपट्टण.

---

३९२ श्रीम्हाळसाकांत

( भा. सं. )

श. १७२६ कार्ति. शु. ६
८-११-१८०४

राजश्री गोपाळराव भाऊ चिटणीस गोसावी यांसी

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित अनंदराव गायकवाड सेनाखासखेल समशेरबहादुर रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन करीत जावे विशेष. येथून राजश्री भगवंत शिवराम व भगवंत बल्लाळ उभयता आपणाकडे पाठविले आहे. त्यासी आम्हाकडील वर्तमान सर्व जबानी मशारनिल्हे सांगतील त्याजवरून सर्व ध्यानास येईल. हे उभयता आम्हाकडील वर्तमान बोलतील तें आम्ही समक्ष आपल्याशीं बोलल्याप्रमाणेंच मोजावें, आणि आमचा अभिमान धरून कार्य अगत्य करावें. भरवसा जाणोन उभयतांस पत्रें देऊन आपणाकडे रवाना केलें. त्यासी सर्व प्रकारें आमचा अभिमान धरून जलचर याचें पारिपत्य करून आमचें संस्थान कायम राहील तें करावें. सरंजाम पाा त्यासी पैका पाहिजे त्यासी आमचा प्रकार तरी येथें शंभरावरची भळावण अथवा हुंडी त्यांचे इतल्याखेरीज होत नाहीं. त्यासी चार रुपये सरंजामास खर्चास पाहिजे तरी तुम्ही आपले सावकारापासून घ्यावा. येथें आल्यावर व्याजासुद्धां देऊं, चिंता न करावी. हे उभयता आमचे अंतरंगांतील आहेत. हे तेथें बोलतील ते आम्हांस मान्य आहे. जाणिजे छ ४ साबान मोर्तबसुद.

---

३९३ श्रीगैबी प्रसन्न

( भा. सं. ) श. १७२६ मार्ग. शु. १०

ता. १२-१२-१८०४

राजश्री आत्मरामबाबा गोसावी यांसी आखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य सखाराम घाडगे सर्जेराव दंडवत. विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित जावें विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. फौज प्रकरणीं व आपण यात्रेस जात होतां ते दिनावधीमुळें राहाणें जालें म्हणोन कित्येक विस्तारपूर्वक लिहिलें ते समजलें. ऐसियास रा बाळाजी यशवंत यांजकडून रुपये वीस हजार तूर्त देववून रा नरसो आप्पाजी हजरनीस रवाना केले आहेत तर आपणाकडून कोण्ही नागपुरास मशारनिल्हेकडे पाठवून सदर २० हजार रुपये आणवून फौज जोंपावेतों जमेल तोंपावेतों जमवावी. अलाहिदा रा. बाळाजी येसवंत यांस पत्र लिहिलें आहे त्याप्रमाणें ते तुम्हाकडे ऐवज पाठवितील. आणीकही सरबरा करून मागाहून पाठविण्यांत येईल. फौज जमविण्याविषयीं आळस एकरूप करूं नये. जमाव झाला म्हणजे येथें लिहून पाठवावें. येथून उत्तर येईल त्याप्रमाणें करावें. वरकड मजकुर राजश्री कृष्णाजी आत्माराम यांसी बोलावण्यांत आलें साहे. ते तुम्हास लिहितील. फौज जमवावी. तूर्तचा प्रसंग कसा आहे हे सर्व लक्ष्यांत आहेच. एक वेळ सरकारची चाकरी करून दाखवावी हेंच लक्ष्य सर्वपरी ठेवून कर्तव्य करावें. सविस्तर मजकूर खोलून मागाहून लिहिण्यांत येईल. वरचे वरी पत्र पाठवून संतोषवीत असावें. भाऊविषयीं काळजी आपण करूं नये. रा. छ ९ रमजान, बहुत काय लिहिणें? लोभ कीजे हे विनंती.

---

श्री

३९४ श. १७२७ फा. शु. १०

( भा. सं. ) पा छ १० मोहरम मु॥ नागपुर, स. १२१५. ता. २८-२-१८०६

श्री म्हाळसाकांत

राजश्री व्यंकोजी भोसले सेना धुरंधर गोसावी यांसी,

सकलगुणालंकरणअखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेहांकित येशवंतराव होळकर रामराम विंनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहीत असावें विशेष. आपण छ. १६ रबिलाखरचें पत्र पाठविलें तें छ. ८ जिल्हेजीं पावलें, अभिप्राये अवगत जाला. आपलें पत्र आलें होतें त्यावरून येण्याची सिद्धता जाली, परंतु अनेक प्रकारच्या अडचणी प्राप्त होऊन येण्याचा योग तूर्त घडत नाहीं. जमीयेत रवाना केली आहे ती येऊन पावेल, हरएक निमित्यानें नर्मदा उत्तरतीर येणें घडेल व सविस्तर राजश्री व्यंकटराव कृष्ण यांचे

लिहिल्यावरून कळेल म्हणोन लिहिलें व मशारनिल्हेचे लिहिल्यावरून समजण्यांत आलें; ऐसियासी स्वराज्यांत जलचरांचा प्रसर विशेष जाला, हा घडूं नये यास्तव माहाल मुलकाची आशा न ठेवतां कळेल त्याप्रमाणें फौज व कंपू वाढवून करोडों रुपयांचे पेंचांत येऊन आज दोन अडीच वर्षे होत आलीं. रात्रंदिवस आंग्रजांसीं मुकाबल्याचा प्रसंग घडत आला. दरम्यान राजश्री दौलतराव शिंदे यांसी मेळ करून भेट घेतली. त्यांचे आपले विचारानें पगडीबंद सामल राहतीलच याच भावें आपल्याकडे पत्रांच्या रवानग्या होत गेल्या. मेवाडप्रांतीं आलियावर ताम्रांस चौंकडून पायेबंद देऊन हारीस आणावें यास्तव पंजाबपावेतों यावयाचें केलें. इकडे लाहूरवाले वगैरे सिखांच्या भेटी होऊन सर्व सामल जाले. जमाव पोक्त जाल्यामुळें फिरंगी मागें पंचवीस तीस कोसांचे अंतरानें येत गेले. त्याणीं पटाल्याचे मुक्कामापासून समेटाचें बोलणें लाविलें. इकडील मुस्तदी पाहून सोबत्याणीं राजेरजवाडे अनुकूल करून दिल्लीचे सुमारें येऊन शह द्यावा तें न करितां कारभारी दुराशेंत येऊन पुन्हा त्यासी येकोपा ठेवून मेवाडांतच राहिले! स्वराज्यांतील ऐक्यता बहुत, येणेंकरून आजपावेतों व्यंग न पडतां एकछत्रीच अमल फैला होता. हालींच्या आपसांतील बदचाली पाहून सर्वांस आपलालें घर संरक्षण करून जमीदारीनें असावें हेंच प्राप्त जालें. येणेयाची प्रतीक्षा होती तो योग न आला. फौज सामल होईल हें कागदपत्रीं मात्र श्रवण जालें, अथवा तिकडेच बंगाल्यांत वगैरे बल धाडलें असतें तरी किती उपयोग घडता. हिंदु धर्मास मुख्य आपले इरादे नमूद असावे तें कांहीं एक दिसण्यांत येईना. स्वधर्मास एक आमचा नफा, वरकडांची नुकसानी असाहि अर्थ नाहीं. सर्वत्राची उमेद, अनुभव व प्रत्यय पाहून आंग्रजांकडून समेटाचें बोलणें आलें होतें त्याजवरून समेट करून घेतला. फिरंगी कूच करून माघारे दिल्ली प्रांते गेले. आमचे मुक्काम व्यासगंगा व सुतलज नदीचे द्वाबांत असे. इतःपर दरकूच माळवे प्रांतीं यावयाचें घडेल. वरकड घरोब्याचे विचार सनातन आहेत ते यथाक्रम चालवावे. इकडील दुसरा अर्थ मानूं नये. सविस्तर रा. व्यंकटराव कृष्ण यांचे लिहिण्यावरून कळेल. सर्वदा पत्र पाठऊन कुशल वर्तमान कळवीत असवें. रा छ २५ जिलकाद सुा सीत मयातेन व अलफ, बहुत काय लिहिणें? लोभ कीजे हे विनंती. मोर्तब.

---

३९५ श्रीम्हाळसाकांत

( ना. मो. ५३ )

श. १७२९ ज्ये. शु. १२
ता. १७-६-१८०७

राजश्री बाळोजी कुंजीर गोसावी यांसि

छ अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्री यशवंतराव होळकर राम राम विनंती उपरी येथील कुशळ जाणोन स्वकीय कुशळ लिहित जावें विशेष. तुम्हाकडोन रा. त्रिंबकराव यशवंत आले होते, त्यासी सर्व अर्थ बोलून मशारनिल्हेची रवानगी तुम्हांकडेस

झाली आहे. भेट झाली असतां आद्योपांत त्यांणीं सांगितलेंच असेल. प्रस्तुत राजश्री उमाजी पाटील आले, त्यांणींही तेथील भावगर्भ सांगितले. त्याचीं उत्तरें व कित्येक पैरवच्या गोष्टी यासींही बोलण्यांत आल्या आहेत. हेही तुम्हापाशीं आल्यावर सर्व अर्थ सांगतील. सारांश मिळोन पूर्वक्रमानुरूप थरचा चिरा थरीं बसावा यांत सर्व गोडपणा आहे. रवाना छ १० रविलाखर सुरू सन समान मयातैन व अल्फ. बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

३९६ श्री म्हाळसाकांत

( ना. भो. ५४ ) नक्कल. श. १७१९ का. शु. ३
२–११–१८०७

राजश्री व्यंकटराव कृष्ण व केशवराव व्यंकटेश गोसावी यांसि,

छ अखंडितलक्ष्मीआळंकृत राजमान्य श्री यशवंतराव होळकर दंडवत सुरुसन-समान मयातैन व अल्फ. तुम्ही मुजरद आजुरदार माणसासमागमें छ २६ चीं पत्रें पाठविलीं तीं छ २५ साबानी पावोन लेखनार्थ अवगत झाला. त्याचीं उत्तरें इकडील वर्तमान येणेंप्रमाणें:—

१. बहुत दिवस झाले पत्र आलें नाहीं. याजमुळें लक्ष्य लागिलें आहे, त्यास वरचेवर पत्राची आज्ञा होऊन सेनासाहेबांचे नांवें व राजश्री श्रीधरपंत बापूचे नांवें पत्रें येऊन तिकडील सर्व व्रत कळत असावें म्हणोन विस्तारें करून लिहिलें, तें सर्व समजलें. ऐसियासि कोठथानजीक मुक्काम असतां पत्राच्या रवानग्या झाल्या व भानपूरचे मुक्कामाहूनही दोन वेळ पत्रें रवाना झालीं, तीं पावलींच असतील, व प्रस्तुतही तुमचें लिहिण्यावरून सेनासाहेबसुभा यांसि व श्रीधरपंत याजला पत्रें आलाहिदा पाठविलीं आहेत. ज्यांचीं त्यांस देऊन इकडील वर्तमान सांगणें तें सांगून उत्तर घेऊन पाठविणें.

१. स्वारी इंदुराकडेस आली. पुढें कदाचित् सेंदव्यापावेतोंही जाण्याचा बेत घडेल ऐसें ऐकण्यांत आल्याचें लिहिलें, त्यास भानपुऱ्यास आल्यानंतर अडीच मासपावेतों मुक्काम गांवांत होता. फौज वगैरे कारखाना बाहेर लगताच होता; विजयादशमीचे मुहूर्तें अदकोसाचें कूच होऊन, मासपक्ष मुक्काम येथेंच आहे. तूर्त इंदुरास व सेंदव्यापावतों जाण्याचें कारण नाहीं. सेंदव्याचा बंदोबस्त येथूनच होणें तसा होईल. कलम

१. इंग्रजांकडील वकिलानीं फराशिसाकडील लढाईचें वर्तमान सांगितल्याचा मजकूर लिहिला तो समजला. कलम

१. पुण्याकडील वर्तमान ऐकिल्यात आल्याचें पुरवणींत लिहिलें तें समजलें. त्यास स्वकीय परकीवाले बोज लोभ करूं लागल्यास त्याचे धणीपणाला विहितच आहे, पुरा हिताची (?) समजोत ज्याचे त्याजपरी केली नीटच आहे. कलम

१. सेनासाहेबसुभा याची दौलत वाध्यांत असतां कोणी कोठील आला त्याचें संगोपन ज्याचें त्याजपरी करून कोणासहि विन्मुख होत नाहीं म्हणोन लिहिलें, त्यास दौलतीच्या चाली पूर्वापार अशाच जाहेत. हिंमत मात्र असावी, तो अवलंब त्याणीं धरलाच आहे तेव्हां उत्तम तेंच घडेल. कलम

१. राजश्री दौलतराव शिंदे यांजकडील स्नेह लोभाचे चालीचा मजकूर तीन पुरवण्या विस्तारें करून लिहिल्या त्या समजल्या; ऐसियासि त्याचा प्रत्यय पुढें अनुभवीं येईल तो खरा. परस्पर स्नेह घरोबा अत्यंत ठेवतात, हें युक्तच आहे. इकडील विचार उभयतांशिवाय नाहीं. सारासार वरचेवर समजण्यांत आल्यानें मसलतीचें धोरण राहतें, तेंही समजवाल तर दूरंदेश समजोनच कर्तव्य तें करतील. कलम

१. सेनाधुरंधर यांणीं वांकडे शिवरामसुत यांजला लगी लावून त्यांचे संतोषास बहुत जपतात, यास वांकडे दौलतीचे उपयोगी असें जाणोन सेनाधुरंधर त्यांचें मनोगत राखितात, हे ही चाल मार्गाचीच आहे. काल महात्मानुरूप बुद्ध होऊन येते; तेही कुलीन तेव्हां उचितास चुकणार नाहींत. घडेल तसें वरचेवर कळवीत जावें. कलम

१. फौजेंत फितूर झाल्याचें वर्तमान ऐकून बहुत काळजी करून लिहिलें त्यास पलटणवाल्यांनीं खाया खर्चा करितां दंगा केला होता त्याचा फडशा करून दिल्हा. प्रस्तुत बंदोबस्तच आहे. कलम

१. देशचे महालीं सरकारचीं ठाणीं बसून लावणीचेही बंदोबस्त जाहले, सेवकाची नेमणूक चिरंजीवासहित पहिल्या पासोन प्रो आबंड येथें आहे, तेथून प्राप्त व्हावी. नवे काय असतील ती असो, त्यास तुम्हापाशीं नेमणुकीचे सनदेची नकल असेल त्याची प्रत पाठवून देणें, अथवा तुमचे येणें लवकर झाल्यास समागमें घेऊन येणें, म्हणजे समक्ष पाहण्यांत येऊन पुढील बंदोबस्त करणें तसा करून देण्यांत येईल. कलम

१. सेनासाहेबसुभा यांणीं उभयतांचे चालीचा स्तव वारंवार केल्याचा मजकूर लिहिला तो समजला. त्यास तिन्ही दोलतींत वडील माणूस तेव्हां त्यांजवेगळे प्रसंगी संतोष मानून ध्यावयास यांजविरहित कोण आहे. येथेंहि माणसास कमती नाहीं, वडिलांचे वेळचीं बहुत आहेत, परंतु काल महात्मानुरूप वर्तून धावा घेतात, ते अर्थी वर्ष दोन वर्ष पावेतों जोवरीं येथें त्यांच्या मनाच्या प्रवर्ति होतात तोंवरीं त्यांचे मनोगत राखणें प्राप्त. आगमनाचींहि संधानें येतात; आल्यास अव्हेर होतां संगोपनही चालीनें होणें तसें होईल. दहा वर्षांमागें सर्व लहान मोठे होते, त्यांणीं दौलत संरक्षण करण्यांत ठेविली नव्हती, परंतु श्रीलक्ष्मीकांताचे कृपेनें जें झालें तेंही प्रख्यातच आहे, तेव्हां विस्तारें काय लिहावें.. सोबती याजपाशीं माणसांचा जथ चांगला, आणि तेही त्यांच्या अनुषंगानें चालून दौलत करितात, हेही युक्तच आहे. दुतर्फांही बोज राखण्यास जागा मिळोन सेनासाहेबसुभा हेच आहेत. कलम

१. कोट्यानजीक असतां व भानपुऱ्यास मुक्काम आल्यावर, एक दोन वेळा पत्राच्या रवानग्या तिकडील जासूद जोडया व इकडील एक दोन जोडया समागमे करून सारांश लेखनांत आला, परंतु तुमचीं पत्रें एका महिन्यांनीं आलीं त्यांत बहुत दिवस पत्र न आल्याचें लिहिलें; त्यास इकडील जोडी कदाचित् मध्यंतरी राहिली किंवा काय झालें असेल तें असो, परंतु तेथील जोड्या तरी पोहोंचल्याच असतील. पत्रोत्तर नाहीं तेव्हां संदेह प्राप्त होतो. कलम

१. भानपुरियास आल्यावर नवीन तोफा जिनसीच्या पंचवीस व पलटण रजबानच्या शंभर येकून सवासें तोफा ढाला वोतायाचे ठरावून धातु वगैरे सरंजामाचा मेळ पाहून कारकाना चालू करून पंचवीस तीस तोफा तयार झाल्या. बाकीच्याही सत्वर तयार होतील. पेशजीचे दोन कंपु होते त्यांतून निवडक माणसें नाटून साहा पलटणें पुरीं भरलीं. व आणिक जागांतून निवडक माणसांची भरती आणोन साहा पलटणें तेही भरल्या. ऐकून बारा पलटणें व रद्दी सामायन दारु गोळा सुद्धां तयार आहेत. व आणखीही पांच साहा पलटणीची भरती आणावयास आफिसर लोक जागोजाग गेले आहेत. फौज मराठी दरोबस्त व कांहीं पठाण आहेत. देशाहूनही पांच चार हजार फौज येणार आहे. त्यांचे कारकून येथें येऊन पत्रें घेऊन गेले आहेत, तेही मासपक्षांत येतील. तूर्त मोहीम मिळाले महाल मुलखाचा बंदोबस्त करावा. मसलतसीर काम पडल्यास कर्तव्य तसें करावयास येईल. उभयतांचे सल्लेखेरीज दुसरा विचार नाहीं.. कलम

येकून ११ कसमें पाहिल्यावर कळोन येईल. जाणिजे छ १ माहे रमजान. बहुत काय लिहिणें. ( मोर्तबसुद )

---

३९७ श्री म्हाळसाकांत

( ना. भो. ५२ ) श. १७२९ पौ. व ९
२१-१-१८०८

( शिका वाटोळा )

राजश्री जनार्दन सिवाजी गोसावी यांसि

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो॥ यशवंतराव होळकर दंडवत सुरुसन समान मयातैन व अलफ. तुम्ही पत्र पाठविलें तें पाऊन लेखनार्थ अवगत क्षाला. सालगुदस्तां महाराजांकडे यावें हें लक्ष धरोन नागपुरास आलों. पुढें यावें तों मार्ग कठिण आणि स्वारीही मारवाडचे लक्स्यास याजमुळें न आलों. येथें श्रीमंत राजश्री सेनासाहेबसुभा यांची कृपा त्यांनीं जवळ ठेवून घेतलें. हें वृत्त व मसलत प्रकरणीं मजकुर राजश्री उमाजी पाटील, यांच्या पत्रावरून समजण्यांत ध्यानास येईल म्हणोन लिहिले व पाटील मजकुर यांचाहि पत्रावरून सायंत वृत्त आलें. ऐसियासि स्वारी लांब पल्यास आणि मार्गाचा बइदा पाहून तेथें राहिलों. सेनासाहेबांनीं लोभ केला हें युक्तच आहे, इकडे लक्ष्य आहे

ते पक्षीं उत्तम तेंच घडेल. मसलती प्रकरणीं मजकुर सर्वांनुमतें घडेल, त्यास अनुसरूनच आहों. इकडील उभयतांचे सल्लेखेरीज नाहीं. सविस्तर पाटील मशारनिल्हेस लिहिलें आहे, त्यावरून कळेल. वरचेवर पत्रें पाठवून वर्तमान सारांश तें लिहून कळवीत जाणें. जाणिजे छ २२ जिल्काद बहुत काय लिहिणें. मोर्तबसुद.

---

श्री

३९८
( जो. सं. )

श. १७३० वै. शु. ५
ता. १-५-१८०८

श्रीमंत मातुश्री माईसाहेब यांनीं समस्तराजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री बाजीराव पंडित प्रधान यांसी आज्ञा केली ऐसीजे. भेटीस बहुत दिवस जाहले. भेट व्हावी अशी इच्छा आहे. तरी याचा योग सत्वर घडावा, म्हणजे चित्ताचा बहुत संतोष होईल. तरी किती अवकाशें भेट होईल तें लिहून पाठवावें. आमचा सर्व भार तुम्हांवर आहे. येथें संशय कोणताहि नाहीं. गांठ पडल्यावर येके बैठकेंत उलगडा होईल. बहुत लिहिणें. तरी सुज्ञ असा. रा छ. ४ रबिलावल सु॥ तिसा मयातैन व अलफ रविवार.*

---

श्री

३९९
( जो. सं. )

श. १७३० पौ. व. १
ता. २-१-१८०९

श्रीमंत मातुश्री माईसाहेब यांनीं रा. का. धु. वि. नि. रा. रा. बाजीराव पंडित प्रधान यांसी आ. के. ऐसीजे. रामाजी भुजंग यास पाठवून देणें म्हणजे लग्नाचे तिथीचा निश्चय करून लिहून पाठवूं. यावरून त्रिंबकजी डेंगळे यास पाठवून द्यावा म्हणून पेशजी आज्ञापत्र पाठविलें, परंतु मा॥निल्हे आले नाहींत. त्या उभयतांस सरंजाम सुद्धां पाठवून देणें. मुलाचे व नवरेमुलीचे दागिने येथें नाहींत हे तुम्हास सर्व माहीत आहे. त्याची तर्तूद झाली पाहिजे. मंडपास फरासखान्याचें सामान तेथून पाठवावें. कोंकणांत नवरेमुलीस आणावयास पालख्या व घोडीं पाठवावयाचीं तीं सत्वर पाठवावीं. जाणीजे. छ. १५ जिल्काद तिसा मयातैन व आलफ.

---

* हें व पुढील बारा पत्रें सातारा दप्तरांतील स. १९१९ सालीं रा. वा. वि. जोशी यांनीं मजकडे पाठविलीं त्यांच्या नकला ठेवून अस्सल परत केलीं. छत्रपति व बाजीराव यांचा संबंध कशा प्रकारचा होता हें समजण्यास या पत्रांचा उपयोग विशेष आहे. स. १८०८त प्रतापसिंह गादीवर आला तेव्हां तो लहान असल्यामुळें कारभार त्याची मातुश्री आनंदीबाई माईसाहेब शिरके ही पाहत असे. म्हणून तिच्याच नांवचीं हीं पत्रें आहेत. पत्रें एकाच विषयाचीं असल्यामुळें सर्व एकत्रच दिलीं आहेत. गो. स. स.

४०० श्री
( जो. सं. ) श १७३० पौष व. १२
ता. १३-१-१८०९

श्रीमंत महाराज मातुश्री माईसाहेब यांनीं स० रा० का० धु० वि० नि० रा. रा. बाजीराव पंडित प्रधान यांसी आज्ञा केली येसी जे, तुम्ही विनंतिपत्र व खाशा पालख्या पांच व श्री नरसोबा देव करावयाचा त्यास सोने वजन ४८ तोळे व चिरंजीव बाबाकडील शेवेस जवळील मंडळीस शेलपागोटीं जोड्या २० वीस येणेप्रमाणें सरंजाम पाठविला, तो प्रविष्ट जाहाला. त्याप्रो जिकडील तिकडे दिला. त्रिंबकजी डेंगळा येथें आल्यानंतर बोलावून आणून शनवारीं चिरंजीव बाबा व आपास घेऊन शहरांतील वाड्यांत राहिलों आहों. चिरंजीव भाऊ किल्ल्यावर आहे. माघ शुद्ध २ मंगळवारीं खाली येण्याचा मुहूर्त आहे, त्याप्रों आणावयास येईल. चिरंजीव बाबाची स्वारी खाली येतेसमई अंबारींत बसली होती. खवासखान्यांत बसावयास त्रिंबकजी डेंगळे यास आज्ञा केली. त्यानें अपेक्षा घेतली कीं, मी रायांचे परवानगीखेरीज बसणार नाहीं. मग रामाजी भुजंग याचे विचारें चिरंजीव खंडेराव शिरके यास बसावयास विा आज्ञा केली. पालख्या वगैरे सरंजाम पाहून बहुत संतोष जाहाला. बहुत काय लिहिणें ? छ २६ जिल्काद तिसा मयातैन व अलफ.

---

४०१ श्री श. १७३० माघ शु. १५
( जो. सं. ) ता. ३१-१-१८०९

तुम्ही विनंतीपत्र व पाघरावयास धोतरजोडा एक पाठविला तो प्रविष्ट जाहाला. चि॥ आपाचे लग्नाबद्दल लिहिलें त्यास आपाजोगती मुलगी लहान पाहण्यांत नाहीं. पुढें करावयास येईल. चिरंजीव बाबा यांचें दुसरें लग्न करावयाचें त्यास सातार्‍यांत भिकाजी शिर्के यांची नात दहा वर्षांची चांगली स्वरूपवंत पाहण्यांत आली आहे. त्रिंबकजी डेंगळा यानेंही पाहिली. त्यास करावयाचा बेत असिलियास वैशाखमासीं घडावें. पत्राचें उत्तर पाठविणें म्हणजे ठरावांत आणावयास येईल. छ. १४ जिल्हेज तिसा मयातैन व आलफ माघ शु. १५ मंगळवार शके १७३०.

---

४०२ श्री माघ वद्य १ शके १७३०
( जो. सं. ) ता. १-२-१८०९

श्री नरसोबाची अर्चा करावयाची त्यास चारशें रुपयेपर्यंत लागतील, त्याचा बंदोबस्त करून पाठवावा. छ १५ जिल्हेज तिसा मयातैन व आलफ माघ व॥ १ बुधवार शके १७३०.

---

**४०३** श्री माघ वा। ३० शके १७३०
ता. १६-३-१८०९
( जो. सं. )

श्रीमंत महाराज मातुश्री माईसाहेब यांनीं समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री बाजीराव पंडित प्रधान यांसीं आज्ञा केली ऐसीजे, तुम्ही कोपरगांवास गेल्यापासून पत्र आलें नाहीं, तरी वरचेवर पत्र पाठवून कुशल अर्थ कळवीत जाणें. आम्हाविशीं कोणे गोष्टीचा संशय मनांत न यावा. कोणी कांहीं समजाविल्यास समक्ष गांठ पडोन संशय निवृत्त होत असावा. येविशीं पेशजी बोलण्यांत आलें आहे त्याचें स्मरण असोन त्याप्रमाणें परस्परें वागणुकेंत यावें. चित्तांत संशय धरूं नये. भेट व्हावी हा मानस आहे, तरी याचा योग कधीं घडेल त्याची सूचना लिहून पाठविणें. आमचा सर्व भार तुम्हांवर आहे. तुम्ही पेशजी सातारियाचे मुकामीं येऊन गौरव करून मर्जीचा संतोष केला. स्मरण वारंवार होतें तें पत्रीं कोठवर लिहावें ? त्याचे आम्हांस सर्व जोड राव तुमचीच आहे. यास मनोमन साक्ष आहे. भेटीअंतीं सर्व सविस्तर कळों येईल. जाणिजे. छ २९ मोहोरम सु॥ तिसा मयातैन व आलफ. बहुत लिहिणें तरी सुज्ञ असा.

---

**४०४** श्री
( जो. सं. ) श. १७३१ ज्ये. व. १३
ता. १०-६-१८०९

पेशजी तुम्हांकडील खिसमतगार चार असामी येथें होत्या, त्या चांगल्या साळसूद येथें राहाण्याजोग्या होत्या. तरी त्या अगर दुसऱ्या तुमचे जवळील चार असामी साळसूद राहाण्याजोग्या येथून हुजरे आले आहेत त्यांजबरोबर सत्वर पाठवून देणें.[1]

---

**४०५** श्री अ. आ. शु. १३ श. १७३१
ता. २५-६-१८०९
( जो. सं. )

राजमान्य राजश्री बाळाजीपंत नातू यांसी आज्ञा केली ऐसीजे, तुम्ही गेल्यापासून वर्तमान कळत नाहीं, याजकरितां सदोबाची रवानगी करून दिली आहे ते बोलतील. व अलपिष्टन साहेबही पुण्यास गेले. यास्तव जो खंबीर व भरंवसा अलपिष्टन यांचा आहे येविशीं तुम्हांकडे वकेली ठेविलीच आहे. तरी बहुत बहुत तरेनें त्यांचा समाचार व खुशी करून उत्तर पाठवावें. जाणीजे. छ ११ जमादिलोवल सुा सन अशर मयातैन व अलफ.

---

१ माईसाहेबाचें पत्र बाजीरावास.

४०६ श्री

( जो. सं. ) भाद्र. व. ६ श. १७३१

ता. १९-९-१८०९

श्रीमंत महाराज मातुश्री माईसाहेब यांनीं स. रा. का. धु. वि. रा. रा. बाजीराव पंडित प्रधान यांसी आ. के. ऐसीजे, पेशजी तुम्ही विठू जगन्नाथ याजबरोबर सासवडचे मुकामाहून निरोप सांगितला. त्यास कच्चा मजकूर त्रिंबकजी डेंगळा याजबरोबर लिहून पाठवावा म्हणजे ध्यानीं येईल. आम्हांस कोणतेहि गोष्ट कळविणें तरी तुम्हाखेरीज कळवणार दुसरा कोण आहे ? येथील काळजी तुम्हांस आहे. बहुत लिहिणें तरी सुज्ञ असा. छ १९ साबान अशर मयातैन व अलफ.

---

४०७ श्री

( ना. भो. ३९ ) श्रीलक्ष्मीकांत कार्तिक शु. १० श. १७३१

ता. १६-११-१८०९

राजश्री बाळाजी[1] रामचंद्र गोसावी यांस

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ रघोजी भोसले सेनासाहेब सुभा दंडवत सु॥ आसर मयातेन व आलफ, राजश्री अमृतराव पांडुरंग व महमद सिदक अल्लीखान यांचे विनंतीपत्रावरोन मजकूर समजला. तेथें मीरखानाचे लढाईत तुम्ही सरकारचाकरींचे उपयोगीं पडलां, त्यास तुम्ही सरकारचे पदरीं वडिलोपार्जित राहून सेवा करीत आलां, व हल्लींचे वेळेसही तुम्ही जें सरकारचें अन्न खात आले त्याची शर्त करून दाखविली. या गोष्टीचा संतोष सरकारास जाला याचा विस्तार काय ल्याहावा.

तुम्ही पदरचीं माणसें, तेव्हां तुम्हांकडून अशा गोष्टी घडून येणें अशक्य नाहीं व सरकारांतूनही तुमचा निर्वाह तुमचे वडिलोपार्जित तुम्हांपर्यंत जालाच आहे व पुढेंही तुमचे वंशस्थांचा निर्वाह सरकारांतून करण्यांत येईल, येविषयीं खातरजमा ठेवणें. जाणिजे. छ ७ माहे शवाल. बहुत काय लिहिणें.

---

४०८ श्री

( जो. सं. ) श. १७३१ मार्ग. व. १४

तां. ४-१-१८१०

( माईसाहेबांचें पत्र बाजीरावास )

मार्गशीर्ष व. १४ भृगुवारीं सायंकाळचे सहा घटका दिवसास आपा हत्तीवर माहताचे पुढें बसून हत्तीस चालवीत होता. हा हत्ती तुम्ही दिलेला होता, तो भडकला.

---

[1] हे जातीनें ब्राह्मण; आडनांव क्षीरसागर.

खालीं बसेना. शेवटीं हत्तीस वैरण दाखवून लंगर केला. मग आपा खालीं उतरला. बाबा महातास खूप रागावला; व त्यास दोन चपराकहि लगावल्या. महात बदलला पाहिजे.

---

श्री

**४०९**
( जो. सं. )

श. १७३१ माघ शु. १२
ता. ६-२-१८१०

( प्रतापसिंहाचें पत्र बाजीरावास )

माईसाहेबांस समाधान नाहीं. सबब औषधखर्चाबद्दल त्रिंबकजी डेंगळा यांजकडून एक हजार रु. देविले ते पावले.

---

श्री

**४१०**
( भा. व. १-३४ )

श. १७३२ ज्ये. शु. १
ता. ३-६-१८१०

पैवस्ती छ ३ जमादिलावल सन इहिदे अशर मयातैन व अलफ.

श्रीमन्महाराज राजश्री छत्रपति स्वामींचे सेवेसी. विनंती सेवक सदाशिव माणकेश्वर कृतानेक विनंती विज्ञापना तागाईत छ २९ रबिलाखर पावेतों स्वामीचे कृपावलोकनेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. स्वामींनीं कृपावंत होऊन चंद्र २४ रबिलाखर सन इहिदे अशर मयातैनचें आज्ञापत्र सादर केलें तें चंद्र २६ मिनहूस पावोन संतोष जाहला. पत्रीं आज्ञा कीं, राव यांचे भेटीस बहुत दिवस जाहले. हल्लीं माहुलीस आले, भेट व्हावी हा हेतु बहुत आहे. भेटीस येण्याविषयीं आज्ञा केली त्याजवरून रायांनीं विनंती पाठविली कीं, कारभारियांचे इतल्याशिवाय मी भेटीस कसें यावें? त्यास आमचे तर्फेचे बोलणें पेशजीपासून तुमचे कडेसच आहे. तुमचीं आमचीं खातरजमेचीं बोलणीं समक्ष जाहलीं असतां भेटीस येण्याविषयीं तुमचा आक्षेप घेतात त्याजवरून हें आज्ञापत्र सादर केलें असे. तर भेटीस येण्याविषयींचें रायांस खातरजमेचें पत्र पाठवून भेट होय तें करावें. येथें आले असतां कोणत्याहि गोष्टीची अडचण घालावयाची नाहीं. रायांचे भेटीची उत्कंठा आम्हांस व तीर्थरूप मातोश्री माईसाहेब यांस बहुत आहे. हा हेतु पूर्ण करणें तुम्हांकडे. आम्हांस सर्व जोड रायांखेरीज दुसरी नाहीं. राव इकडे आहेत तों भेटीचा योग करून पत्राचें उत्तर सत्वर पाठविणें म्हणोन आज्ञा, त्यास श्रीमंत राजश्री राव यांची स्वारी माहुलीस आली यावरून भेट व्हावी येविषयीं मी राव यांस विनंती लिहावी म्हणोन विस्तारपूर्वक आज्ञा सादर जाहली. त्यास राव यांणीं महाराजांचे दर्शनास येऊन निरंतर अधिकोत्तर प्रीति चालावी हेच सेवकाची इच्छा. येविषयीं श्री जेजुरीचे व पुण्याचे मुक्कामीं सेवकाकडून विनंती जाहली. तें मनांत वागत असेल. खासास्वारी सासवडास

आली ते समयीं कसकशीं बोलणीं झालीं तीं राव यांचे आज्ञेवरून व त्रिंबकजी डेंगळे यांचे सांगण्यावरून व आखबारेवरून सेवकास समजलीं. त्याचे निराकरणाचीं बोलणीं राव यांचीं व माझीं झालीं नाहींत. तेव्हां दर्शनास यावयाची सलाह कशी लिहूं ? सांप्रत वाईस स्वारी आली, तथापि पत्रीं कोठवर काय लिहावें ? पुण्यास राव यांची स्वारी आल्यावर बोलणीं होतील तशी विनंती सेवेशी करीन. सेवकाकडून बोलण्यास कमती होणार नाहीं. हल्लीं राव यांस विनंतीपत्र यास्तव लिहिण्यांत आलें नाहीं. हा प्रकार अंतःकरणाचे दृढ विश्वासाचा आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

४११ श्री

( भा. व. १–३३ ) श. १७३२ आषा. शु. ३

ता. ४-७-१८१०

पौष चंद्र ५ जमादिलाखर सम ईहिदे अशर मयातैन व आलफ.

साहेबांचे सेवेसी सदाशिव माणकेश्वर कृतानेक विनंती विज्ञापना तागाईत चंद्र ९ माहे जमादिलाखर पावेतों साहेबांचे कृपावलोकनें करून सेवकांचें वर्तमान यथास्थित असे विशेष. साहेबी कृपावंत होऊन चंद्र १० जमादिलावलचें आज्ञापत्र हुजरे यांजबराबर सादर केलें, तें प्रविष्ट होऊन सेवकास अति संतोष झाला. पत्रीं आज्ञा कीं, रावांस भेटीस पाठविण्याविषयीं पेशजी तुम्हांस आज्ञापत्र पाठविलें होतें. तुम्हीं कोपरगांवाहून आल्यावर तिकडे येतील म्हणून विनंतीपत्र पाठविलें, त्या कराराप्रमाणें राव येथें येऊन गौरव केला. आनंदाचीं भाषणें परस्परें झालीं, त्याचा संतोष बहुत झाला तो पत्रीं कोठवर लिहावा ? राव व राघो मल्हार तेथें आले आहेत. सविस्तर सांगतील. चित्तांत भेट व्हावी हा हेतु होता. तो पूर्ण तुम्ही केला. पुढें आम्हाकडील तर्फेचें बोलणें हरएक विषयीं करून रावांची भेट करणें तुम्हांकडेस आहे. येविषयीं राघो मल्हार यांस समक्ष आज्ञा झाली आहे, ते तुम्हांशीं बोलतील. तुम्हांस पोशाख व शिरपेंच पाठविला आहे. घेऊन पावल्याचें उत्तर पाठविणें म्हणून आज्ञा,त्यास साहेबांची आज्ञा पेशजी खातरजमेची सादर झाल्यावरून श्रीमंत पेशवेसाहेब यांची अंतःकरणापासून खातरजमा करून भेटीस जावयाचें नेमांत आणून विनंतीपत्र लिहिलें. या निश्चयाप्रमाणें त्यांचें येणें हुजूर होऊन दर्शनाचा समारंभ झाला. परस्परें आनंदाचीं भाषणें झालीं. हें सविस्तर वर्तमान श्रीमंत पेशवेसाहेब यांची स्वारी पुण्यास आल्यावर त्यांचे मुखें व राघो मल्हार यांचे सांगण्यावरून सेवकास अति आनंद झाला. आम्हाकडील तर्फेचें बोलणें हरएकविषयीं करून रायांची आमची भेट करविणें तुम्हांकडे म्हणून आज्ञा. त्यास पेशजी आज्ञापत्र सादर झालें, त्या दिवसापासून साहेबांकडील बोलणें सेवक बोलत आहे. पुढें आज्ञा सादर होणें तशी होत असावी. श्रीमंत पेशवे साहेब यांस विनंती करून त्यांचे व माझे विचारें ठरावांत येईल त्याची विनंती लिहीत जाईन. ज्याप्रमाणें राव यांचें लक्ष साहेबांचें पायांशीं मनःपूर्वक आहे, तसाच साहेबांचा लोभ त्यांचे

ठिकाणीं असावा, म्हणजे सेवकास साहेबांचे तर्फेचें बोलणें बोलावयास प्रशस्त. साहेबांनीं कृपा करून पोशाख व शिरपेंच सेवकास हुजरे यांजबराबर पाठविला तो पावून आत्यादरें स्वीकार केला. सदैव कृपापात्र सादर होऊन सेवकास सनाथ करणार स्वामी समर्थ. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

श्री

**४१२**
( जो. सं. )

ता. १२-१०-१८१०

( माईसाहेबांचें पत्र बाजीरावास )

श्रीपंढरी व शंभु महादेव व जेजुरी येथील यात्रेस स्वारी गेली होती ती आश्विन शु. १५ भृगुवारीं ३ प्रहरीं शहर सातारा येथें आली. यात्रेस जावें असें मनांत होतें त्याची गोष्ट तुम्हापाशीं काढतांच तुम्ही अगत्य धरून घडविलें, याचा संतोष वारंवार होतो. त्याचा विस्तार पत्रीं कोठवर लिहावा! आजपर्यंत घडलें नाहीं, पुढें घडण्यास अशक्य तें राव तुम्ही आमचे वचनास अनुमोदन देऊन मनांत होतें त्यापेक्षां खर्च-वेंचाचा वगैरे बंदोबस्त यथास्थित करून देऊन त्रिंबकजीस पाठविला, त्यानें कोणे गोष्टीचें कमी पडूं दिलें नाहीं.

---

श्री

**४१३**
( जो. सं. )

का. व. ८ श. १७३२
ता. ४-११-१८१०

( माईसाहेबांचें पत्र बाजीरावास )

किल्यावरील नव्या वाड्याची चौसोपी करावयाविशीं पुणें मुकामीं बोलणें जाहालें तुम्ही अजमास लिहोन पाठवोन द्यावा म्हणोन सांगितलें, त्याजवरून पेशजी त्रिंबकजी हेंगळे याजबरोबर पत्र व अजमासाची बेरीज लेहून पाठविली त्याचें उत्तर आलें नाहीं. तुम्हांस पुत्र जाहाला त्याची शर्करा घेऊन तुम्हांकडील खिजमतगार आला. बहुत संतोष जाहला.

---

श्री

**४१४**
( भा. व. १. ३२ )

माघ व. ९ शके १७३२
ता. १७-२-१८११

पौ छ २६ मोहरम सन, इहिदे अशर मयातैन व आलफ

श्रीमत् क्षत्रियकुलावतंस महाराज राजश्री छत्रपति स्वामीचे सेवेशी,[1]

विनंती सेवक बाजीराव रघुनाथ प्रधान कृतानेक विज्ञापना. तागाईत छ २२ मोहो-

---

१. असेंच पत्र याच तारखेचें बाजीरावानें छत्रपतींची राणी माईसा० यांस लिहिलेलें का. स. प. या. ले ४७७ येथें छापलें आहे.

रम सन इहिदे अशर मयातैन पावेतों स्वामीचे कृपेंवरून सुखरूप असो विशेष. राजश्री यशवंतराव होळकर यांचें बोलणें कीं, माझे प्रकृतीस समाधान नाहीं, याजकरितां मजला जेजूरीस येऊन देवदर्शन घ्यावयाचें. देवदर्शनावांचून माझा प्राण जातो, त्यापक्षीं मजला आज्ञा झाली असतां जेजुरीस यावयाचें. अथवा आज्ञा न झाली तरी जेजुरीस येऊन देवदर्शन घ्यावयाचें. देवदर्शनावांचून येथें माझा प्राण जातो. त्यापक्षीं मजला जेजुरीस येणें प्राप्त, मग प्राण जावो अथवा राहो. परंतु मजला जेजुरीस यावयाचें. म्हणोन होळकराकडील वकील सरकारांत बोलतात. त्यास होळकरांस येणेंविषयीं सरकारांतून आज्ञा न झाली तर जबरदस्तीनें पक्षपातानें यावयाचा इरादा त्याचा आहे. तेव्हां होळकर याचे वास्तविक प्रकृतीस ठीक नाहीं म्हणोन जेजुरीस देवदर्शनाकरितां येणार किंवा देवदर्शनाचे निमित्यानें इकडे जबरदस्तीनें येणार, कोणत्या मतलबाकरितां येतो याचा निश्चय नाहीं. त्यास होळकर यांचें आमचें बांकडें कसें व त्यानें प्रान्ताची दशा कशी केली या सविस्तर मजकुराची समक्ष विनंती केलीच आहे व हा मजकूर जगप्रसिद्धही आहे. यास्तव होळकराचें इकडे येणें जाहलें असतां मी पुण्यास रहावें हें मसलतीस येत नाहीं. याजकरितां होळकराचा दक्षिणेंत येणेंचा प्रकार दिसला म्हणजे मी विजयदुर्गास जाऊन राहावयाचा बेत केला आहे. होळकर इकडे आल्यावर प्रसंग कसा पडतो याचा नियम आज समजत नाहीं. पेशजी परशुरामभाऊ पटवर्धन यांणीं चिरंजीव राजश्री चिमणाजी रघुनाथ यांस यशोदाबाईचे मांडीवर बसवून, चिमणाजी माधवराव असे शिक्के व पेशवाईचीं वस्त्रें आणून दिल्हीं. तसेंच यशवंतराव होळकर याणीं चिरंजीव राजश्री विनायक अमृतराव यांस पेशवाईचीं वस्त्रें आणिलीं. पूर्वी असे बखेडे जाहले. कारण सातारा जागा नाजूक, बाकी नव्हे, बलकुबलीस राहावयाचे उपयोगी नाहीं. सबब पूर्वी शिवाजी महाराज यांणीं रायगडासारख्या जागा वसवून दौलती केल्या. प्रसंगाचे दिवसांत साताऱ्यास खासा स्वारी राहणें हें माझे व राजश्री सदाशिव माणकेश्वर यांचे विचारास येत नाहीं. रायगड जागा चांगली मजबूत कोणी म्हणेल कीं तेथें फौज पाठवून वस्त्रें आणूं, किंवा बंडबखेडे करूं, तर होणार नाहीं. असें माझे व मशारनिल्हेचे विचारांत आलें. याकरितां स्वामीचे मर्जी मुबारिकेंत आल्यास यशवंतराव होळकर दक्षणेंत येऊन कोठें लढाईचा प्रसंग न करितां कराराप्रमाणें नर्मदा पार माघारा गेल्यास मी विजयदुर्गाहून पुण्यास येईन. तेसमयीं स्वामींची स्वारी साताऱ्यास जावी. कदाचित् यशवंतराव होळकर लढाईच्या इराद्यावर येऊन बखेडा करूं लागल्यास, ते मसलत शेवटास जाय तों पावेतों रायगडास महाराजांनीं कुटुंब सुद्धां आनंदांत असावें. मसलत शेवटास गेल्यावर मग साताऱ्यास यावें. याचें मनन करून हे मसलत बाहेर कोठें न फोडतां आज्ञोत्तर यावें. सेवेशीं हे विज्ञापना.

---

श्री

४१५
( जो. सं. )

वै. व. ११ श. १७३३
ता. १८–५–१८११

( माईसाहेबांचें पत्र सदाशिव माणकेश्वरास )

राव यांचे भेटीस बहुत दिवस जाहले. भेटीस येण्याविशीं आज्ञा केली तों माहुलीहून रायांनीं विनंती पाठविली कीं, कारभारियांचे इतल्याशिवाय मी भेटीस कसें यावें ? त्यास आमचे तर्फेचें बोलणें पेशजीपासून तुम्हाकडे आहे. तुमचीं आमचीं खातर-जमेचीं बोलणीं समक्ष जाहलीं असतां भेटीस येण्याविशीं तुमचा आक्षेप घेतात. त्याजवरून हें आज्ञापत्र सादर केलें आहे. तरी भेटीस येण्याविशींचें रायांस खातरजमेचें पत्र पाठवून भेट होय तें करावें. राव येथें आले असतां कोणत्याहि गोष्टीची अडचण घालावयाची नाहीं. रायांच्या भेटीची उत्कंठा चिरंजीव बाबास व आम्हांस बहुत आहे. हा हेतु पूर्ण करणें तुम्हांकडे आहे. आम्हांस सर्व जोड रायांखेरीज दुसरी नाहीं. राव इकडे आहेत तों भेटीचा योग करून पत्राचें उत्तर सत्वर पाठविणें.

---

श्री

४१६
( जो. सं. )

फा. शु. १४ श. १७३३
ता. १६–२–१८१२

( माईसाहेबांचें पत्र सदाशिव माणकेश्वरास )

पागेकडे खासगीकडील घोडीं आहेत तीं पुण्यास पाठवून द्यावीं म्हणोन चिंते। वामन देशमुख यांजकडील कारकून याणें विनंती केली. त्यास आज्ञा केली कीं रायांस लेहून पाठवूं. राव सांगतील त्याप्रमाणें करावयास येईल. ऐशियास तुम्हीं चार घोडीं दिलीं, त्यांत दोन घोडीं अद्याप बसावयाच्या धारणेस लागलीं नाहींत. याजकरितां घोडीं ठेवावीं असें तुमचे विचारें ठरोन उत्तर आल्यास ठेवूं, अगर पाठवून देऊं.

---

श्रीम्हाळसाकान्त

४१७
( ना. मो. ७७ )

भाद्र. शु. ६ श. १७२५
ता. २३-८-१८०३

चंद्र १० माहे जमादिलावल सन १२१३.

( शिक्का )

राजश्री रघोजी भोसले सेनासाहेब सुभा गोसावी यांस

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित यशवंतराव होळकर रामराम विनंती उपरी येथील कुशळ जाणून स्वकिय कुशळ लिहीत असावें विशेष.

आपण चंद्र हे २९ माहे रबिलाखरचें पत्र पाठविलें तें चंद्र ३ माहे जमादिलावलला पावून लेखनार्थ अवगत जाला. पुणियाचे मुक्कामीं राजश्री श्रीधर लक्ष्मण व कृष्णराव यादव यांसि आपलीं बोलणीं इंग्रज प्रकरणीं जालीं कीं, त्यांची पसर स्वराज्यांत होऊं न यावी, या गोष्टीस आम्ही सर्व प्रकारें अनुकूल, त्यावरून उभयतांनीं आमची खातरजमा केली, व आपलीं पत्रेंही याच अन्वयें येत गेलीं, तेव्हां आम्ही बाहेर निघोन राजश्री दौलतराव शिंदे यांची भेट घेऊन तुम्हांकडील जाबसाल उगवून पाठविले कांहीं तथा राहिली नाहीं. इंग्रजांनीं नगरचा किल्ला घेतला, आम्हीही उभयतां सडे होऊन मुकाबिल्यास गेलों. या प्रसंगीं तुमचें येणें घडावें. हिंदुधर्म सर्वांनीं मिळून राखावा, स्वराज्यांतून त्यांजला काढावें हें सर्वोपरी चांगलें आहे म्हणून लिहिलें, ऐशियासि, आम्ही पुणियाचे मुक्कामीं उभयताशीं बोललों त्याप्रमाणें औरंगाबादेस येऊन आपल्यास पत्रें पाठविलीं. नमूद होण्यास कसर ठेविली नसतां आपण इकडील जाबसाल उगवून न पाठवितां आम्हांस माघारे चांदवडाकडे जावयाविशीं लिहिलें; तेव्हां सर्वप्रकारें आपली मर्जी. दरकार लाचार होऊन माघारे गेलों. सहा महिने आजपर्यंत खर्चाखालीं किती आलों, अद्याप आमचे जबसाल वांटणी संबंधे निर्बंध आम्हांस प्राप्त व्हावे असे उगवले नाहींत. याजमुळें राजश्री मल्हार शामजी आदिकरून मंडळीची रवानगी केली, ते पावून सविस्तर बोललेच असतील. आम्हांकडील जाबसाल उगवल्यानंतर मसलतीस सिद्धच आहों. मशारनिल्हेची रवानगी केल्यानंतर विचार तुमचे करून भिकणगांव नजीक आलों. त्यांचे उत्तराची मार्गप्रतीक्षा करीत असों. आजपर्यंत जाबसाल उगवले असते तर इतकी लबाडी कशास पडती. आम्ही आपल्याकडून त्याहावयास कमी केली नाहीं. अद्यापिही सर्व प्रकारें अनुकूळ आहों. वाटणीसंबंधें जाबसालाचा मात्र गुंता आहे. फकत चंद्र ५ जमादिलवल सन १२१३ बहुत काय लिहिणें ही विनंती. मोर्तबसुद.

---

४१८ श्रीलक्ष्मीकांत च. शु. ७ श. १७३४
( ना. भो. ४२ ) ता. १९-३-१८१२

राजश्री बाळाजी रामचंद्र गोसावी यांस,

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य श्रो। रघोजी भोसले सेनासाहेब सुभा दंडवत सु॥ सन इसने अशर मयातैन व अलफ. राजश्री अमृतराव पांडुरंग यांनीं विनंतिपत्र पाठविलें त्याजवरून सरकारचे समजण्यांत आलें [कीं] पेंढारियांची जमाव येकायेकीं कोणास बातमी न समजतां नागपूर शहरचे जवळ येवून मंगळवारी पेठेस आग दिल्ही; आणि चहूंकडून येकच [1]बलवा केला. त्या प्रसंगीं तुम्हीं नीं जाऊन तोफखाना व बाणांच्या कैच्या रवाना केल्या होत्या त्या माघाऱ्या आणोन, तोफखान्याचा गोलंदाज वगैरे एकत्र करून पेंढारियांची

---

१. दंगा.

लढाई घेऊन त्या लोकांचें पारपत्य करून शहर वाचविलें व त्यांचे मागें धावत जाऊन जागजागीं ज्या ज्या रुखावर त्यांचा शह त्या त्या रुखावर तोफेचा आणि बाणांचा मार करून परागंदा केलें, इत्यादिक मजकूर सरकारचे समजण्यांत आले. यास तुम्हीं तीर्थस्वरूप कैलासवासी आबासाहेब यांचे वेळेपासून वडिलोपार्जित सरकारचाकरी ऐसीच निस्सीमपणें करीत आलां, व फार दिवस सरकारचे पदरीं अन्न खात आलां व सरकारची सेवाहि करीत आलां, तेव्हां तुम्हाविषयीं सरकारची खातरजमा आहेच. हल्लीचे वेळेस सरकारची खांसा स्वारी प्रसंगीं नसतां मेहनत केली आणि अमृतराव पांडुरंग यांस गोळी लागून जखमी जाले असतां सर्वत्रांस समेटून राजश्री शिवराम पांडुरंग यांस पुढें करून सरकारचा नक्षा कायम ठेविला याचा संतोष सरकारास फार जाला. त्यास ऐसी चाकरी तुमचे वडिलांपासून होतच आली आहे. त्याप्रमाणें हल्लीं तुम्हीं केली व पुढेंही करीत जाणें. तुम्हाकडेस हजेरी गणती वगैरे फौजेची आहे त्याप्रमाणें चालेल आणि तुमचे वंशस्थाचा निर्वाह शिलशिल्यानुरूप सरकारांतून होईल, एविशीं तुम्ही आपली खातरजमा ठेवणें. जाणिजे छ ५ माहे रबिलावल. बहुत काय लिहिणें?

( शिका. )

---

श्री

**४१९**

( भा. सं. )

पौ. व. ११ श. १७१५
ता. १७-१-१८१४

श्री सहस्त्रायु चिरंजीव राजश्री बायजाबाई शिंदे यांसी,

येस्वदाबाई[1] पंतप्रधान आर्शीवाद उपरी येथील कुशल तागाईत पौष वद्य ११ सोमवारपर्यंत क्षेम असो विशेष. सवाई साहेब यांचा वरदहस्त दौलतराव यांचे मस्तकीं. त्यांचे मागें तुम्हीं स्त्रिया असतां धैर्य धरून हिंमत अधिक, हा लौकिक जनांचे मुखें ऐकोन परम संतोष जाहला. शाबास, श्री तुमचें कल्याण करो. येश संपादावें. पेशवे पंतप्रधान हे तुमचे कोण हें मनांत आणून गादीचे चाकरीचें लक्ष वागवून उत्तम सुकीर्ति मिळवावी. आम्हीं श्रीक्षेत्राहून कलकत्तेवाले लाट गौरनल याचें येणें श्रीस जाहालें, तेव्हां निघालों ते खर्चाचे अडचणीमुळें बुंदेलखंडांत आलों. ते समयीं वोडसेवाले विक्रमाजीत महेंद्र यांणीं किंचित खर्चाची योजना करून पूर्वी कीर्ति श्रीमंतांच्या व चार पदरीं सुमनुष्यांचें लौकिक मनांत आणून बहुत विस्मय जाहला. अस्तु. त्यांनीं आपले सामर्थ्या-

---

१. ही सवाई माधवरावाची बायको रायगडावर बाजीरावाचे कैदेंत ता. १४-१-१८११ रोजीं मरण पावली. तदुत्तरचें हें पत्र आहे. या बाईचा पुढें तोतया उत्पन्न झाला होता, त्यानें हें पत्र लिहिलें असेल पत्रांतील मतलब ऐतिहासिक उपयोगाचा असल्यामुळें पत्र स्वीकारिलें आहे.

पेक्षां आम्हांस उपयोग दिला. तुम्हीं तीस कोसांवर असतां आम्हीं अन्नवस्त्राकरितां बुंदेले रांगडे यांचे घरीं राहावें हें उचित तुम्हांस नव्हे. तरी पूर्व महादजी याजपासून परंपरा मनांत आणून आम्हांस तेथें घेऊन जावें. तिकडे येण्याचा योग आला असतां श्रीगंगातिरीं तीर्थरूप बाजीराव साहेब आमचे सासरे यांची भेटी घेवून येणें घडेल. तुमचें मानस समजल्यावर करणें तें करावयास येईल. रावसाहेब यांचे चिरंजीव शिंदे आणि तुम्ही सून हें मनांत आणावें. बऱ्हाणपूर मुक्कामीं पांच हजार रुपये जयसिंग यांचें हातें पाठविली व हैद्राबाद मुक्कामीं पत्रें पाठविलीं असें असतां तेथें आलों. ते समयीं नानाप्रकारचे उपद्रव प्राप्त जाहले, तेही ईश्वरी इच्छा. श्रीकृपेनें आमची व तुमची भेटी जाहली असतां परस्परें सर्व मजकूर समजतील. आम्हीं पावशेराचे मालक, त्यांत स्त्रियांचा देह. तुमचे धनी श्रीमंत पंतप्रधान यांचा वंश चालता केल्यानें गोब्राह्मणांचा प्रतिपाल व भगवा झेंडा उभारावा ही कीर्ति संपादिल्यास लोकीं परलोकीं यश पावेल. ईश्वरें नेमिलें असेल तेंच घडेल, परंतु तुम्हीं पदरचे जाणून सूचना लिहिली असे. बहुत काय लिहिणें, लोभ कीजे हे आशीर्वाद.

---

श्री

**४२०**　　　　　　　　　　चैत्र व. ८ श. १७३८
( भा. व. १-३१ )　　　　　　　ता. २०-४-१८१६

यादी-[1]

श्रीमन्महाराज राजाराम महाराज छत्रपति यांचे पुत्र श्रीमन्महाराज शिवाजी महाराज छत्रपति-श्रीमन्महाराज ताराबाई साहेब यांचे चिरंजीव, शके १६२३ वृशानाम-संवत्सरे सुरु सन मया व अलफ राजशक २७ या सालीं सिंहासनारूढ जाहले. राज्य केलें सालें ११. शके १६३४ खरनामसंवत्सरे सुा इसने अशेर मया व अलफ पर्यंत राज्य केलें कलम १.

श्रीमन्महाराज संभाजी महाराज छत्रपति सिंहासनारूढ जाहले, शके १६३४ नंदननामसंवत्सरे सुा सलास अशर मया व अलफ. पुत्र राजाराम महाराज छत्रपति यांचे श्रीमन्महाराज राजसबाई यांचे चिरंजीव संभाजी महाराज छत्रपति यांहीं राज्य केलें सालें ४९. राजशक ३९. श्रीमन्महाराज संभाजी महाराज छत्रपति यांच्या जनानखान्याची वाडियाची नांवनिशी वि॥

१. सौ. आनंदीबाईसाहेब घाटगे यांची कन्या.

२. सौ. उमाबाईसाहेब, खानवलकर यांची कन्या.

३. अर्कवृक्ष.

---

१. या यादींत करवीर राजे व त्यांच्या स्त्रिया यांची नांवनिशी आहे.

४. सौ. जिजाबाईसाहेब, शिंदे यांची कन्या.

५. सौ. सुंदराबाईसाहेब, घाटगे यांची कन्या. राजसबाईसाहेब यांची भाची.

६. सौ. सकवारबाईसाहेब, सूर्यवंशी राजे यांची कन्या.

७. सौ. दुर्गाबाईसाहेब, मोहित्यांची कन्या.

८. सौ. कुसाबाईसाहेब, वाडीकर सावंत यांची कन्या.

शके १६८२ विक्रमनाम संवत्सरे सुा इहिदे सितैन मया व अलफ सालीं संभाजी महाराज छत्रपति यांची स्वारी कसबे वडगांव येथें होती. तेथें प्रकृति जड जाहली. यामुळें निकडीनें राजे स्वारी करविरास निघाली. ते समयीं टापेनजीक माळावर यांहीं कैलासवास केला. संभापूर नांव ठेविलें. गांव वसविला. मार्गशीर्ष शुद्ध १२ द्वादशी मंदवार दोनप्रहर कैलासवास केला. राजशक ८७ विक्रमनाम संवत्सरे.

श्रीमन्महाराज राजश्री शिवछत्रपति सिंहासनारूढ झाले. आश्विन शुद्ध १० विजयादशमी. रोज इंदुवासर अकरावे तारीं; वास्तव्य किल्ले पन्हाळा; छ. ९ माहे रबिलाबल सुा सलाससीतैन मया व अलफ. शके १६८४ चित्रभानुनाम संवत्सरे राजशक ८९. अगोदर शुद्ध पंचमीस दत्तकविधि होऊन जातकर्म (नामकर्म) केलें. राजश्री शहाजी भोंसले खानवटकर यांचे पुत्र श्रीमन्महाराज मातोश्री जिजाबाईसाहेब यांणीं ओट्यांत घेतले.

श्रीमन्महाराज राजश्री शिवछत्रपति महाराज यांचे जनानखानेचे वाड्याची नांवनिशी बिा

१. सौभाग्यवती सईबाईसाहेब, तुळजोजीराव घाटगे सर्ज्याराव कागलकर यांची कन्या.

२. सौ. चिमाबाईसाहेब राणोजीराव शिंदे चावरेकर यांची कन्या.

३. अर्क वृक्ष.

४. सौ. सकवारबाईसाहेब, लक्ष्मणराव शिंदे सेनाखासखेल किल्ले तोरगलकर यांची कन्या.

५. सौ. उमाबाईसाहेब, मुकुंदराव पवार देसाई जांबुटेकर यांची कन्या.

६. सौ. सुंदराबाईसाहेब, रत्नाजीराव खानवलकर यांची कन्या. त्यांचे पोटीं कन्या व चिरंजीव श्रीमन्महाराज राजश्री संभाजीराजे महाराज छत्रपति.

१. सौ० आऊबाईसाहेब घाटगे राजश्री यशवंतराव घाटगे सर्ज्याराव कागलकर यांसी दिली असे.

२. चि० बाळाबाई निंबाळकर सुलतानराव निंबाळकर यांसी दिली होती. परंतु राव मशारनिल्हे यांचा काल जाहला.

३. सौ. बजाबाई घाटगे बाजी राजश्री नारायणराव घाटगे बाजी नागपूरकर यांसी दिल्ही असत.

४. सौ. एसूबाई निंबाळकर राजश्री शिदोजीराव नाईक निंबाळकर निपाणकर यांसी दिली होती. त्यांचा काल जाहला.

५. सौ० चिमाबाई पाटणकर राजश्री नागोजिराव पाटणकर यांस दिल्ही असत.

६. श्रीमन्महाराज राजश्री संभाजी महाराज छत्रपति पुत्ररत्न प्राप्त. यांचा जन्म शके १७२२ रौद्रनाम संवत्सरे, वास्तव्य करवीर, फाल्गुन वद्य ८ मंदवासरे संध्याकाळचे प्रहर दिवसास जन्म जाहला. राजशक १२७, सुरु सन इसने मयातैन व अलफ छ २१ माहे.

७. सौ० अकूबाई शिंदे राजश्री शंकरराव शिंदे सेनाखासखेल तोरगलकर यांचे चिरंजीव लक्ष्मणराव शिंदे यांसीं दिली असे.

८. सौ० अहिल्याबाईसाहेब राणोजीराव घाटगे सर्ज्याराव कागलकर यांची कन्या.

९. सौ० आनंदीबाईसाहेब जानराव पाटणकर यांची कन्या.

१०. सौ० मैनाबाईसाहेब लक्ष्मणराव शिंदे सेनाखासखेल तोरगलकर यांची कन्या.

११. सौ० गंगाबाईसाहेब अथणीकर देसाई पवार यांची कन्या;

१२. सौ० दर्याबाईसाहेब सयाजी घाटगे मुरुगुडकर यांची कन्या.

१३. सौ० सकवारबाईसाहेब खंडेराव शिंदे कउलकर यांची कन्या.

१४. सौ० आनंदीबाईसाहेब धोंडजीराव पाटणकर यांची कन्या.

१५. सौ० कमलजाबाईसाहेब लिंबाजी नाईक निंबाळकर वैरागकर यांची कन्या. त्यांचे पोटीं पुत्ररत्न श्रीमन्महाराच राजश्री शहाजी राजे महाराज छत्रपति. यांचा जन्म छ. १ माहे सवाल सुरुसन खमस मयातैन व अलफ. पौष शुद्ध ३ गुरुवासरे सुर्योदयीं प्रातःकालीं जन्म जाहला. शके १७२५ रक्तनाम संवत्सरे वास्तव्य करवीर राजशक १३१.

श्रीमन्महाराज राजश्री संभाजीराजे व शहाजीराजे या उभयतांचा कैलासवासी महाराज यांणीं व्रतबंध केला असे.

श्रीमन्महाराज राजश्री संभाजीराजे छत्रपति यांच्या जनानखानेचे वाडेची नांवनिशी बितपशीलवार.

१. सौ. सईबाईसाहेब, राजश्री त्रिंबकराव खानवेलकर यांची कन्या, लग्न जाहल्यावरी निवर्तली.

२. सौ. जिजाबाईसाहेब, धारराव निंबाळकर गजेंद्रगडकर यांची कन्या.

३. अर्क वृक्ष.

४. सौ. सईबाईसाहेब राजश्री नारायणराव शिर्के यांची कन्या.

श्रीमन्महाराज राजश्री शाहाजीराजे यांचे जनानखान्याच्या वाड्याची नांवनिशी बितपशील.

१. सौ. अंबिकाबाईसाहेब, राजश्री आप्पाजीराव नाईक निंबाळकर वाटारकर यांची कन्या

श्रीमन्हाराज शिवछत्रपति यांहीं कैलासवास केला चैत्र वद्य ८ भृगुवासरे सायंकाळचे ३ घटिका दिवसास करविरीं केला. शके १७३४ अंगिरानाम संवत्सरे सुरुसन सलास अशर मयातैन व अलफ छ २१ माहे रबिलाखर.

महाराज यांणीं कैलासवास केला, त्यांचे पाठीमागें बाडे—

१. सुंदराबाईसाहेब.

२. आनंदीबाईसाहेब,

३. कमलजाबाईसाहेब, बाबामहाराज यांची मातोश्री.

महाराज यांचे पाठीमागें वारल्या त्यांचीं नांवें--

१. कमलजाबाई साहेब कार्तिक शुद्ध ५ सुरुसन सलास अशर मयातैन व अलफ तारीख छ १८ माहे जिलकाद, शके १७३१, अंगिरानाम संवत्सरे, कैलासवास केला करविरीं. श्रीमन्महाराज राजश्री बाबासाहेब यांची मातोश्री

२. आनंदीबाई साहेब याहीं कैलासवास केला, चैत्र वद्य ८, तारीख छ २१ माहे जमादिलावल सुरुसन शीत अशर मयातैन व अलफ शके १७३८ धातानाम संवत्सरे.

हल्लीं मातोश्री सुंदराआईसाहेब कारभार करीत आहेत. श्रीमन्महाराज राजश्री बाबासाहेब यांची मातोश्री.

---

**४२१** श्रीम्हाळसाकांत

( म्हाळसाकांतचरणीतत्पर तुकोजीसुत कासीराव होळकर )

( भा. सं. ) श. १७३८ माघ शु. १४

ता. १-२-१८१७

राजश्री आत्माराम शिवराम सोसावी यांसी

दंडवत विनंती उपरी. इकडील मजकूर सविस्तरें अलादा पुरवणीपत्रीं लिहिण्यांत आला आहे. त्याप्रमाणें तेथें बोलणी होऊन पोख्त सलेनें वडीलपणें सला होऊन तुमचीं उत्तरें येतलिच. दिवसाचे मानानें पदरचे माणसांच्या बुद्धीस विपर्यास होऊन प्रसंग प्राप्त, याजकरितां रा. कर्नेल ज्यान बत्तीस व आबाजी सखाराम याजला इकडे सामील होण्याविसीं परभारें ज्यान बत्तीस व आबाजी सखाराम यांजला पत्रें कीं तिकडील पत्र येतांच तुम्ही जाऊन शामील होणें या भावी लिहून रवाना करणें. येथें जरूरी दिसल्या सारखी पत्र लिहून त्याजला बोलाबून घेण्यांत येईल. अलीकडे अशा गडबडींत आबाजी सखाराम यांची फौजसुद्धां इंदुर व देपालपूर व सावेर परगण्यांत मुकाम करून मौजे गिरोता येथें खंडणी घेऊन गांवखेडीं लुटून गौतमपुऱ्यावर जाऊन मुकाम केला. रा. तुकोजी लांभाते व रघुनाथराव आपाजी यांजला स्वारींत बोलावून घेण्यांत आलें. सांप्रत मशारनिल्हे मनस्वी धामधूम करून मुलखाची खराबा मांडली आहे. हे विचार लौकिकांत कसें दिसतें यावर

तुम्हीं तेथें बोलावून त्यांजला निक्षून लिहिण्यांत येऊन पुन्हा आपसांत कोणेविसींचा खिसा न वाढे तें करणें. रा. छ १४ रबिलावल सुा सब्बा आसर मयातेन व अलफ, बहुत काय लिहिणें हे विनंती. मोर्तबसुद.

---

४२२ श्री माघ व. ३ श. १७३८
( भा. सं. ) ता. ४-२-१८१७

राजश्री आत्मारामपंत बाबा गोसावी यास अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेहांकित बापूजीराव शिंदे रामराम विनंति उपरी. येथील कुशल तागाईत छ १७ रबिलावल पावेतो मुक्काम सितामहू येथें यथास्थित जाणोन स्वकीय कुशल लिहित असावे विशेष. आम्ही सितामहूस चिरंजीव राजश्री आबाजीराव देशमुखाचे लग्नाकरिता आलों. येथें आलियावर पेशजी आपणास एक दोन पत्रें पाठविली त्यांची उत्तरें आली नाहींत. तेथेंहि वर्तमान समजलें कीं, बांसवाड्याचे संस्थान फिरंग्यांनी साहा आणे ठराऊन घेऊन आपला प्रवेश बासवाडयांत करून सट्ट मर्दीत दस्त बसविला. पुढें संस्थान मेवाडांतहि त्यांचा इरादा व श्रीराणाजीकडील ही येविसींची पैरवी फिरंग्याकडेस करून इकडे आम्हांसहि लिहिलें कीं हें संस्थान अनादिसिद्ध; शिंदे होळकर आजवर मर्यादा ठेऊनच चार रुपये घ्यावयाचे ते घेत आले. सांप्रत सहा सहा फौजा प्रांतांत शिरून प्रांत बरबाद करून आम्हासही प्रांतांत ठिकाण ठेविला नाहीं. तुम्ही आपल्यासही ठिकाण ठेवित नाही. तेव्हां या चालीने आमचा परिणाम कैसा लागतो व दोही प्रकारचे ऐवजाचें साधन कैसें राहतें; यास्तव तुम्हास आमचे संरक्षण करून आपला रुपया सालाबाद घ्यावयाचा आहे तरी दोहीकडील फौजा मेवाडांतून काढून मेडयांवरते ठेवावे आणि चार रुपये सालाबादचे ठेराव करून आमचे कुंवरजीस प्रांतांत फिरते राहतील ते प्रांताची आबादी करून तुमचाही ऐवज पुरा पाडून देवीत जातील. या चालीनें तर संस्थानही कायम राहोन तुम्हांसही दोन रुपये मिळावयाचे ते आमचे हातानें पावते होऊन नक्ष उभय पक्षीं राहतो, नाहीं तर धामाधुमींत तुम्हासही रुपया मिळावयाचा नाहीं व आम्ही लाचार होऊन आतां दुसऱ्याचा आश्रय करून बासवाड्याप्रमाणें आपला बचाव करूं. हिंदु धर्म म्हणोन तुम्हांस सुचविलें. येविसींची चाल बांधली तरी फिरंग्यासी प्रयोजन नाहीं; नच चाल बांधली तरी लाचार होऊन हें करूं. दोष आम्हांकडे नाहीं. हें संस्थानिकाचें स्पष्ट बोलणें पडल्यावरून आम्ही श्रीमंत महाराज राजेश्री मल्हारराव साहेबांसही विनंतीपत्र लिहीत आहे व आपले सरकारांत लिहीत आहे. आपणही तिकडून तेथें आलां; यास्तव आपणांसही लिहीत आहे. येविसींचा विचार पुर्तेपणें सरदारांचें व कारभारियाचे विचारास येऊन चाल धरलियास नबाब मीरखाजीस व राजेश्री जगोबा बापूस सुद्धां मेवाडच्या फौजा काढून मेडयावर ठेवाव्या आणि दोनहीकडील ऐवजाचा ठेराव करून श्रीराणाजींचे कुंवरजीस मेवाडांत फिरते ठेवून त्यांचे हातूनच ऐवज

पुरा पाडून ध्यावा. तो ऐवज परभारा खाजगीकडेस आणविल्यास खाजगींत पावेल अथवा फौज खर्चांत लावून ध्यावयाचा तो फौजेस मेडयाबाहेर ज्यास देवणें त्यास देवावे, परंतु चाल बांधून मेवाडचा आखाड मिटल्यास तरी संस्थान उभयतां सरकारचे लगामी राहातो. नाहीं तर चहूंकडून माराकुटी करून प्रांत बरबाद केलियास दोही सरकारचा अर्थ कांहीं होत नाहीं. मकान जाया होऊन फिरंग्याचे घरांत जाते. अनासिद्ध जागा हे गेली, तेव्हां जयपुर जोधपूरही गेल्यांतच आहे. यास्तव आपण तेथें ये विषींचे परियाय सर्व सुचवून चाल बांधून नबाब मीरखांसुद्धां फौज मेडयाबाहेर काढवावी. आपलेकडील ही फौज मेडयावर ते करवून चाल बांधली नाहीं, त्याप्रमाणें उभयपक्षीं चालावें. दुसरियाचे पाय शिरूं नये म्हणोत सविस्तर आपणांस व यजमानास लिहिलें आहे. तरी खचितार्थ विचार करून उत्तरें सत्वर यावीं. आपले सरकारांत आपणही हा मजकूर सविस्तर तिकडून ल्याहावे. सध्यां जगन्नाथ राजाराम याणी श्री राणाजीचे चार गांव खालशाचे तेथें ठाणें बसवून दाबिले, त्याजमुळें राणाजी उदास आहेत. येविसी विनंती करून खालशाचे गांवचे ठाणें उठोन खालशांत उपद्रव करूं न पावे तें करावें. बहुत काय लिहिणें ? लोभ करावे हे विनंती.

---

श्री

**४२३**

( भा. सं. )

श. १७३९
स. १८१७

साहेबांचे शेवेशीं आज्ञाधारक आत्माराम शिवराम[1] कृतानेक विज्ञापना. महाराजांचे कृपें करून श्रीव्यंकटेशजीचें दर्शन घेऊन पुण्यास आलों.[2] श्रीमंत स्वामींचे आज्ञेप्रमाणें चार दिवस राहाणें होऊन पांचचार बैठकी जाल्या. त्यांत सरकारउपयोगीं व मसलतीचीं धोरणें महाराजांचें ठिकाणीं आस्था हे भाव बोलण्यांत आले. त्यांतील कांहीं प्रकार विनंती केली ते सरकारच्या ध्यानांत असेलच. पुढील कित्येक बोलणें व्हावयाचें, त्याविसी आज्ञा जाली कीं देवबा बापू यांचे विद्यमानें बोलत जावें. त्याप्रमाणें आजपर्यंत मागील व पुढें हैदराबादचे व होळकराकडील वगैरे संधानें येत गेलीं, त्याचीं धोरणें त्यांस समजावीत गेलों. त्यांणीं सरकारच्या कानावर घातलींच असतील. श्रीमंताचा[3] निरोप घेतल्यास दाहा महिने जाले. तेथील पत्रें येथें राजश्री गोविंदपंत वकील यांस येतात, त्यांत आमचे बोलण्याचा व येथून भीमाजीपंत गेले होते त्यांचा दाखला लिहितात, त्यांचें उत्तर त्यांजकडून व आम्हांकडून कांहीं जात नाहीं. महारा-

---

१ वाकडे. २. स. १८१४ त. ३ पेशव्याचा.

जांची वेगळी गांठ पडावी म्हणोन राजश्री देवबा बापू जवळ आजपावेतों प्रयत्न केला. योग न घडे याजकरितां शेवेसी विनंती लिहिली आहे. होळकराच्या लढाईत चिरंजीवानीं स्वामिकार्यावर दृष्टि ठेवून देहाचा संकल्प केला, त्याचा आरंभ शेवट दोन्ही महाराजांचे ध्यानांत आहेच. त्या दिवसापासून सर्व वेव्हार बंद जाले व होळकराकडील जागीर व इनामगांव व दरख त्यांणीं जप्त केले. लोकांकडे कर्जाऊ येणें ते सरकारच्या हातचिठ्ठया खेरीज देत नाहींत. खर्चाचा बेत······समजून त्या प्रसंगीं कारभारी यांची अवकृपा, याजमुळें पांच वर्षे बाहेर यात्रेच्या निमित्यें क्रमिलीं. तेथेंही खर्चाचा पुस्तपुन्हा कोणी-कडून न जाला. परंतु चिरंजीव भाऊचा प्रतिपाळ खाविंदांनींच केला. चिरंजीवाची पत्रें या प्रसंगीं लष्करांत यावें म्हणोन आलीं त्यावरून येथें येऊन आठ महिने जाले; कांहीं सेवा चाकरीची आज्ञा होऊन साहेबचाकरी घडून येईल हे उमेद होती तो योग दिसोन न आला. सरकारांत ऐवजाचा भरणा कमबेश वीस एकवीस लक्षाचा आहे. त्याप्रमाणें कांहीं हिसेब फडणीसाचे दपतरीं लागू जाले व कांहीं ऐवजी कैलासवासी यादवराव भास्करजीकडील लाख रुपये रदकर्जी लाऊन सोनकछ माहाल लाऊन देत होते. तूर्तच्या प्रसंगीं खावंद कृपावंत होऊन जो ऐवज लाऊन देतील त्यांत कांहीं श्रीमंत स्वामीची आज्ञा कीं आलीज्याबाहादर यांणीं आम्हाविसीं कस्त विशेष करून रूपास आणिलें व त्यांची निष्ठा कसी हें सर्व मनांत वागत आहे. परंतु सांप्रत आम्हीं अडचणींत पडलों. कोठें कोणासीहि बोलावयासी जागा नाहीं. पुढें स्वराज्याचें कल्याण हे भिस्त त्याजवर आहे. यांतील प्रकार आम्हांस समजतात हे तुम्हांस समक्ष सांगतों. हें तुम्ही तेथें बोलावें व येथें यांतील नक्षा कोण्हे तऱ्हेचा निघतो याचा इतला येथे करावा. सर्व दौलतदारांची एकवाक्यता होऊन पत्रें व निरोप इकडे यावे. यांत स्वराज्यास श्रेयस्कर अशी मसलत होऊन भेटीचा योग घडावा असें कितीक बोलण्यांत आलें. त्याची विनंती समक्ष करावयाची ते श्रवण जाल्यावर परस्पर खुणा मिळत जातील व अनुकुलता राहात जाईल.

मातुश्री बायांच्या व होळकराच्या मसलतीमुळें राज्यांत बखेडे होऊन माहाल मुलखाची व दौलतीची नुकसानी बहुत जाली, यामुळें स्वराज्यांत शत्रूचा प्रवेश होऊन प्राबल्य बहुत जालें, यामुळें हें सर्व ठायीं मनांत वागत आहे.

आजपावेतों जागजागी बंडे होऊन मार्ग बंद जाले, माहालमुलकाची जमा बहुत कमी पडली व कोणीकडूनही उस्तवारीचा विचार होत नाही हें वागणाराच्या वोढीमुळें घडत गेलें. माहाराज दैववान पुण्य समर्थ म्हणोन सर्वांवर तेज राहून सर्वांस जाब आहे. सांप्रत खाविंद सर्व जातीनें पाहातात, तेव्हा हरामखोरांचीं पारिपत्यें होऊन मुलकाची आबाद प्रजापालन व्हावें, फौज वगैरेचा बंदोबस्त होऊन सोबत्यांची परस्परें अनुकूलता असावी, येणेंकरून शत्रूवर जरब राहून बहुत उपयोग आहे. येविसी येथील श्रीमंत स्वामीची आज्ञा आहे ते समक्ष विनंती करीन. खासगत विनंती महाराजांनीं कृपाळु होऊन

लाहाणमोठीं कामें सेवकाचे हातें घेऊन निभावणी केली, यामुळें चौघा दौलतदारांत प्रसिद्धि होऊन लौकिकांत आबरू मोठी बसली व तसाच खर्च बाळगून राहावें लागलें. हाली दिवाणगिरीचे दरखावें काम चालतें हें ही मोठेंच आहे. यासमंधीं नवीन ऐवजाचा भरणा जाला, व त्या ऐवजीं रदकर्जास वराता लावून दिल्या. त्या कोणी सही केल्या तो देखील ऐवज त्याजकडून पावला नाहीं. नेमणुकीपैकीं सात आठ हजार रुपये दायत्या ऐवजी येतात. बाकी कोणी पैसा देत नाहींत. खर्चाची अडचण नित्य पडती. सावकारही कर्ज द्यावयासी अनमान करितात. मनन होऊन आज्ञा करणार खावंद समर्थ.+

---

श्री

४२४ आश्विन शु. २ श. १७४०
ता. ९-१०-१८१८

( ना. भो. ३६ )

श्रीमंत कैलासवासी[1] रघोजी भोसले सेनासाहेबसुभा यांचें देहावसान सन १२२५ साचें सालीं फा।। वद्य नवमी रोज शुक्रवारीं[2] जाल्या दिवसापूर्वी आश्विन मासींपासून शरीरप्रकृति दिवसेंदिवस नानासाहेबाची नादुरुस्त. मुधोजी[3] भोसले बिन व्यंकोजी भोसले सेनाधुरंधर यांचे जागीं सेनासाहेबांचा लोभ विशेष व सेनाधुरंधरांचा[4] काळ श्री क्षेत्रांत झाला, सबब मुधोजी भोसले व मैनाबाई[5] साहेब यांचा तेथून आणण्याचा उद्योग करून त्यांजला नागपुरास आणून, याजकडील चंद्रपूर संस्थानास जाऊन आपण जातीनें किल्ल्याबाहेर नदीवर राहून त्याची वशीहत्[6] व जागा त्याचे जिमेस करून याजवरून, त्याजपासी कारपरदाज[7] सेनाधुरंधराचे हाताखालीं लोभांतील वागलेले, नेमून देऊन मुधोजी भोसल आपासाहेब याजला समागमें घेऊन नागपुरास येऊन आपासाहेबास आपले जवळ घेऊन बसावें व त्यांनींही लेकुरपणानें हत्ती व घोडे वगैरे चांगली वस्तु जी न देण्याजोगी असल्यास ती मागावी. त्यास पासखातर[8] जाणून देत जावी; वस्त्रें दागिना वगैरे उमदी वस्तु घेतली असतां भलत्याच क्षुल्लक माणसास द्यावी. असाही क्रम दिसं

---

+ पत्र दौलतराव शिंद्यास लिहिलेलें दिसतें

१. ह्या लेखांत दुसऱ्या रघोजीच्या मरणापासून तों तिसऱ्या रघोजीच्या सिंहासनाधिरोहणापर्यंत झालेली कची हकीकत आहे. २. इ० स० १८१६ मार्च २२; मरणसमयीं रघोजीचें वय ५४ वर्षे १० महिने २० दिवसांचें होतें. ३. मुधोजी हा दुसऱ्या रघोजीचा पुतण्या; यास आपा साहेब म्हणत. ४. व्यंकोजी भोसले सेनाधुरंधर हा श्री काशीक्षेत्रीं फसली १२२१ सालीं श्रावण मासीं निवर्तला. ५. मैनाबाई—ही व्यंकोजी भोसल्याची बायको. ही श्री काशीहून परत आल्यावर निवर्तली. ६. सांत्वन—रा० व्य० को० श्लो० १८९ वशीयत् =बुद्धिवाद. ७. कारभारी.

लागला. तशांत रामचंद्र[१] वाघ व मनभट वगैरेंनीं दुर्व्यसनी ख्याल व नाटकशाळा आदिकरून, आपासाहेबाकडून करवून, हा प्रकार नमूद वर्तणूक अमर्यादा होऊं लागली. व हें सेनासाहेबास न पहावे. मनांत कळकळा लोभाचा, ही समजूत वडीलपणें सांगणें शिकविणें जातीनींही झालें; व मध्यस्थद्वाराही बोलविलें. असें असतां मधील माणसास आपली द्रवी करून आपासाहेबाचे लोभांत शिरावें. यास्तव त्याचे जातीस ऐसे छंद लावून तिकडेस एक व सेनासाहेबांस एक भासून आपासाहेबाचे अंतःकरणीं मळीणता आणिली; नागो[२] त्रिंबक व रामचंद्र वाघ व मनभट ऐसे त्रिवर्गांनीं मसलत आपली जागा केली कीं, जेणेंकरून आपले मालकास दौलतीची मालकी घडेल व आपण दौलतीचा कारभार करूं ऐसी योजना करावी. हा मंत्र आपासाहेबांस देऊन त्यांचे बुद्धीस विपर्यास केला आणि आंतील आंत मन माने अशी वर्तणूक करूं लागले. हें वर्तमान सेनासाहेबांचे जातीस न समजतां हा उद्योग चालला. तों आश्वीन शुद्ध नवमीचे दिवशीं सायंकाळीं सेनासाहेब शौचास गेलें तेथें एक बेला गश[३] येऊन अचेतन झाले. तसेच उचलून आणिले, अवषध उपचार केला; तेव्हां ऐसें व्हावयास कारण काय ऐसा होष सर्वत्र कारपरदाजांस व जातीस झाला. यावरून या विषयींचा शोध आंतील बेतांनीं केला; तो मनास आणितांना आपासाहेबांकडून त्यांचे कारभारी यांणीं शांबरी[४] प्रयोग शंकरभट[५] भदे याजकडून करविला. त्यांनीं सिंवेवर जाऊन नग्न होऊन जारणमारण

---

(मागील पानावरील) ८. व्यंकाजीचे. ९. पास खातर=विश्वासपूर्वक, भरंवसा जाणून.

१. रामचंद्र वाघ हा मराठा सरदार आप्पासाहेबाच्या स्वारांचा नायक होता. आपासाहेब ज्या पांच कारभाऱ्यांच्या अनुरोधानें वागे त्यांची नांवें नागोपंत, नारायण पंडित, मनभट उपाध्ये, सिदक अल्लीखान व रामचंद्र वाघ; या रामचंद्र वाघाविषयीं प्रस्तुत लेखांत व आपासाहेबांचे पोवाडयांत बरीच हकीकत आहे. २. नागो त्रिम्बक-यास 'नागोपंत' असें म्हणत. हा आपासाहेबांचा खासगी दिवाण होता. यास नारोबा चिटणवीस याच्या जागीं नेमावें असा आप्पासाहेबांचा बेत होता. परंतु तो साधला नाहीं. नागोपंत व नारायणराव पंडित हे दोघे आपा साहेबांच्या वतीनें रेसिडेन्टापाशीं वकीलातीवर असत. ३ बेलागश ? या शब्दाचा अर्थ समजत नाहीं. परंतु हा जादूनें व मंत्रांनीं भारलेला बेला असावा. ४. शांबरी प्रयोग=जादूगिरीचा प्रयोग, बीरविद्येचा प्रयोग. ५. सन १८१७ ऑक्टोबर ता. ५ रोजीं आपासाहेबांची बायको ठमाबाई ही आजारी असल्यामुळें तिला सदहू शंकरभट भदे यांच्या गृहीं दैवी, मानवी व औषधी उपचार चालला असतां ती असें बोलूं लागली कीं, मी धर्माजी भोसले, परसोजी भोसले व त्यांची सती गेलेली स्त्री काशीबाई आहें, त्यांच्या गतीप्रमाणें माझीही गती व्हावयाची. ठमाबाई पुढें १८१८ जून महिन्याचे २० व्या तारखेस नागपुरास मरण पावली. शंकरभट भदे यांचे अंगीं जादुगिरी, पिशाच विद्या, जारण-मारण इत्यादि कसबें वास करीत असत असें दिसतें.

इत्यादिकही प्रकार त्याजकडून चालविले. त्याशिवाय कित्येक बाकी माणसें याजकडूनही शांबरी विचार करविले व मिरजापुरास[1] व मातापुरास[2] व तुळजापुरास[1] व चंद्रपुरास[3] इत्यादि जागजागां सहस्रचंडया व पुरश्चरणें होऊं लागलीं व त्यांतील क्षुल्लक माणसें मुसलमान वगैरे सेनासाहेबांनीं धरलीं व चौकशी करणें त्या केल्या. हें पाहून आपले मनांत बहुत प्रस्तावा केला; आणि दुर्लौकिकाचें भय बाळगून आपलें मनांतच गोष्ट ठेविली. कारण घरांतील विचार जगत्प्रसिद्ध जाले असतां, यांत आपलेच नांवलौकिकास गौणता हें पाहून येविसींचा प्रस्तावापूर्वक पत्र श्रीधर[4] लक्ष्मण याजला वाराणसीस लेहून पाठविलें कीं, येथील विचार पत्रांत ( पहातां ) ऐसा आरंभ झाला ही गोष्ट कोण्हासी सांगावी, एक प्रस्तावा याची जागा तुम्ही; त्यास तुम्हीही एक बदल्यावर, तेव्हां कैसें करावें ? त्याचें उत्तर मशारनिल्हेकडून आलें कीं, आपण खाविंद व मालिक सर्वज्ञ आहेत, येविसीं आपणांस कोण्ही सांगावें व शिकवावें; तो विचार, आम्हांस तालीम आपणच दिल्ही, तेव्हां या पलीकडेस आम्ही विनंती काय लिहावी; परंतु खाविंदाची सलामती, यांचे पोटीं शौर चांगलें याजकरितां ऐसे विचार दृष्टोत्पत्तीस पडतात; तेव्हां जेथें हा क्रम तेथें याचा बंदोबस्त करावा व या करण्यांतील जीं माणसें असतील त्यांचें पारपत्य करावें; यांत खाविंदाकडेस, हें न केल्यास हाच दोष आहे याचा अंदेशा नसावा. हें पत्र सेनासाहेबांनीं पाहून पुन्हा आपले जागां दूरदेशी केली कीं, हें करितों तरी माझे वडीलपणास अनुचित. ऐसा जाणतीचा विचार पाहून देवावर भार ठेवून चालले. इकडेस शरीराची अवस्था पहातांच दिवसेंदिवस शरीरावर काळीमा व चौघे कारभारी पाहून आपली जागीं बहुत विचार करीत. सेनासाहेबांचा दाबदबाव[5] भारी. याजमुळें कोण्हाची हिंमत येविसीं बोलावयास न चाले; परंतु तैशांत या चालीचे पोटीं सेनासाहेबांचे मनांत आपासाहेबांविसी सोह[6] झाला तोही बाहेर दिसूं न देतां आपला जो लोभाचा क्रम तोच ठेविला. आपासाहेबांकडील वर्तणूक पहातां त्रिवर्गांसी[7] एकांत व सेनासाहेबांकडे येणें जाणें मानसिक, ऐसी चाल धरली. तों [8]मैनाबाई-साहेबांस यांचें शरीर अशक्त त्यांजला औषध वगैरे देणें तेंही सेनासाहेबांस समजों देऊं नये व डाकटरसाहेब याजला आणण्याचा उद्योग इकडेस [9]इतल्ला न करितां [झाला]. त्याजला आणून त्याचे हातून औषधाचा विचार करविला; अंग्रेज लोकांचा स्नेह असावा हाही बेत

---

१. हें देवीचें प्रसिद्ध स्थान. २. माहुर, दत्ताचें स्थान. ३. चांदा येथें आपासाहेब राहात असे. हें शहर सांप्रत चंद्रपूर जिल्ह्याचें सदर ठिकाण आहे. ४. श्रीधर लक्ष्मण मुनशी हा जातीचा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण, दुसऱ्या रघोजीचा दिवाण, इंग्लिश लोकांच्या पक्षास अनुसरून वागत असे, म्हणून त्याजवर त्यांची मर्जी असे. देवगांवच्या तहाच्या वेळेस यास ३० हजार रुपये पेनशन मिळालें होतें. याचे वंशज नागपुरीं आहेत. ५. वजन, महत्त्व, दरारा. ६. संशय ? ७. रामचन्द्र वाघ, मनभट व नागोपंत. ८. आपासाहेबाची आई. ९. सूचना.

होता. हें वर्तमान समजल्यावरून येशवंत [1]रामचंद्र यासीं आपासाहेबांकडील चाल पाहून या जपणुकीविशीं ताकीद केली. परंतु आपासाहेबांचे मनांत दुर्भाव[2] संचारला व पदरीं त्रिवर्ग माणसें संसारिक त्यांनीं हें काम आरंभिलें व दृष्टांत आपासाहेबांस सांगावें कीं राजयोगास[3] कोणताही एक दोष नाहीं. आपले आजे [4]मुधोजी भोसले सेनाधुरंधर याणी कैसा विचार करून दौलत मेळविली हें आपणांस समजोन आलें व आमचाही सेवाधर्म हाच आहे कीं, बजाहां आपणांस सेनासाहेब करावें, ऐसें आपासाहेबांचे वृत्तीचें [वशीकरण] करावें. इकडेस सेनासाहेबांचे शरीरप्रकृति बिघडत चालली. औषधिउपचार करणें तो करीत असतां गुणावह होऊं नये. मुखांतून रक्त देखील पडावें. ऐसें उघड होत असतां, याची बरदास्त हिंमतीनें सेनासाहेबांनीं करावी; इकडे मैनाबाईसाहेब यांजला औषधउपचार होत असतां गुणास न येतां फाल्गुन शुद्ध ३ या मित्तीस तिचा देह अवसान झाला. तिचें दहन नजरबागांतच[5] करण्याचा विचार आपासाहेबीं केला. परंतु सेनासाहेबांचे भयास्तव बाबासाहेबांचे[6] देवालयाजवळ नेऊन दहन केलें. पुढें दिवसोंदिवस अवगुणता आपासाहेबांनीं सेनासाबांची मानोन आपले उद्योगीं प्रवर्तक राहून सेनासाहेबांची बेअरामी फारच जाणोन, आरब व सिल्लेदार वगैरे लोक यांतही शकटभेद दोनशें रुपये खर्चास वगैरे देणें सुरू करून आपले लगामी लावण्याचा प्रकार केला. सेनासाहेब देह अवसानापूर्वी तीन दिवस त्याचे निद्रेचे गालिच्याचे पदरीं यंत्र[7] कोणी बांधलें हेंही न समजलें. मृत्युसमयीं तें दृष्टीस पडलें. ऐसा समय सेनासाहेब जाणून श्रीमंत बाळासाहेब[8] व आपासाहेब व गुज्याबादादा[9] व चौघे मुत्सद्दी येशवंतराव[10] भवानीशंकर व नारायण गोपाळ[11] व येशवंतराव रामचंद्र व गंगाधरराव माधव चिटनवीस, बाळाजी नारायण जामदार व नारायण येशवंत निजबत चिटनवीस व नारायण कासी काळीकर व धर्माजी[12] भोसले व समस्त जनानखाना इत्यादि

---

१. यशवंतराव रामचन्द्र–हा श्रीधर लक्ष्मण याच्या हाताखालीं कारभारी होता. यशवंतरावाची बहिण श्रीधर लक्ष्मण मुनशी याचे भावास दिली होती. दोन्ही घराणीं एलिचपुराकडील. २. दुष्ट भाव. ३. राजयोग=राजपद प्राप्त करून घेण्याचा उपाय. ४. मुधोजी–रघोजीचा बाप. ५. नागपुरांतील एक ठिकाण. ६. थोरले रघोजी महाराज. ७. यंत्र=जादुगीर. मंत्रयुक्त कागदावर अथवा धातुमय पत्र्यावर रेखांकित व णक्षरयुक्त जें साधन करतात तें. ८. परसोजी–रघोजीचा मुलगा. ९. परसोजीचा आतेभाऊ. १०. यशवंतराव भवानीशंकर. ११. नारायण गोपाळ पंडितजी. १२. धर्माजी भोसले–हा दुसऱ्या रघोजीचा दासीपुत्र होता व तो नागपुरास राहत असे. हा बाकाबाईच्या तर्फेचा होता. याच्याकडे खासगी व सरकारी मिळून एक कोट रुपया राहत असे. याचें अंतःपुरांत आणि आरब सैन्यांत मोठें वजन होतें. रघोजीच्या कारकीर्दीच्या अखेरीस यानें पुष्कळ धामधूम केली. पेंढारी लोकांप्रमाणें त्रास देऊन पैसा उपटणें हा याचा धंदा होता. हा आपासाहेबास प्रतिकूळ होता, म्हणून आपासाहेबानें यास ता. ११ एप्रिल स. १८१६ बृहस्पतवारीं कैद केलें व पुढें २४ दिवसांनीं ठार केलें.

सामान असतां दादांनीं व मुत्सदी यांनीं विचार केला कीं सेनासाहेबसुभा दाणा दूरदर्शी[१] यांनीं जातीनीं सर्वत्र रईसांत[२] आपला स्नेह रक्षून व दाब ठेवून दौलत यावत् या समया पर्यंत केली. त्याची वेळ ऐसी येऊन बाजू खालली. पुढें दौलतीचा बंदोबस्त याचे हातचा संच बहाल आहे तेव्हां त्या रितीनें पुढें चालावें, त्यास तुम्ही आम्ही चौघे या गोष्टीस पाहाणार, यांतून कोण्ही कैसे रितीनें चालावें हें या वेळेस न पुसणें व सेनासाहेबापासून या गोष्टीचा धारा बांधून न घेणें, हें तुम्हा आम्हा सर्वत्रास ठीक नाहीं. याजवरून सर्वत्रांनीं सेनासाहेबास विनंती केली कीं आपल्यास ईश्वरांनीं ऐसा वक्त प्राप्त केला, पुढें आम्हांस जी आज्ञा करणें ती करावी. तेव्हां श्रीमंतांनीं सर्वांस आज्ञा केली जे, तुम्हांस मालिक खास आहेत व तुम्हीं चौघे पहिलेपासून आपापले कामीं बाहाल आहां; व आजपावेतों या दौलतींत अन्न खाल्लें आहे व बाळासाहेब[३] शरीरानी पंगु, त्यांजला जपून व आपापलें काम तुमचें तुम्हीं करून अंग्रेजाची व चौघा रइसांची दोस्ती आमचे हातची आहे ती बळकट ठेवून पुढें दौलतींत उणें न दिसूं देतां संच[४] ठेवावा. हें तुम्हां चौघांस पदरीं बाळगल्याचें [श्रेय] संस्कार तुम्हांस आहे. तितक्यांत धर्माजी भोसले यानीं विनंती केली कीं आपासाहेबांस कांहीं आज्ञा करावी. याचें उत्तर जालें कीं कैलासवासी नानासाहेब[५] यांचे वेळेसच बंदोबस्त करून दिल्हा त्याचा इलाकाच तुटला. चंद्रपूर व छत्तीसगड त्याजकडेस आहे. त्या जागां त्यांणीं मनास येईल तसें करावें; या दौलतीसीं संबंध नाहीं. ऐसी आज्ञा जाली. तेव्हां मुत्सद्यांनीं दौलतीचे बंदोबस्ताची याद नारायण येशवंत याजकडून करून याजवर सेनासाहेबांनीं जातीनें निशाणी करून दिली. नंतर प्राणोत्कर्ष जाला. त्या समयांत दानधर्मादि विचार होणें तो जाला. त्या [वेळच्या] शोकाचा तपसील काय लिहावा. नंतर यावयाचे समयास आरंभ. बाळासाहेब पुत्र या कर्माचे अधिकारी, परंतु शरीर अचल आहे; असा क्षौरादि[६] यांनींच करावें, आपासाहेब साक्षीभूत जवळ असावे. बाळा साहेब दौलतीचे मालिक. युवराज्याचा अधिकारी आपासाहेब, सेनासाहेबानीं याचा विभाग या दौलतींत संबंध न ठेवितां वडिलापासून तोडून दिल्हा. व अंतःकाळीं याद पंच ठरावावरून दिल्ही. ऐसे सर्वत्रांनीं बाळा साहेबाकडून कर्मांतर करावें ऐसें ठरविलें; तें आपा साहेबांनीं ऐकून बहुत वैषम्य मानिलें. सेनासाहेबांस बाबा[७] साहेबांचे देवालयाजवळ समारंभानीं दहनास नेलें. बाळा साहेबाकडून अग्नि धरविला. त्या संधींत आपा साहेबानीं चौकी पाहऱ्याचा बंदोबस्त ठेविला. मिस्टर जनकीन[८] साहेब बहादुर यांचे दोस्तीचा विचार सेनासाहेबांचा फारच. त्यांचें चित बंगल्यावर

---

१. शहाणा व विचारशील. २. राजेरजवाड्यांत. ३. परसोजी. ४. बेत, एक मेळ. ५. नाना साहेब=व्यंकाजी भोसले, आबासाहेबांचे वडील. ६. बाळासाहेब इतका वेडा झाला होता कीं, रघोजींच्या मरणानंतर लौकरच दरबारांत आपल्या मिशा काय झाल्या म्हणून विचारूं लागला. ७. पहिला. रघोजी याच्या. ८. सर रिचर्ड जेंकिन्स हा या समयीं रेसिडन्ट होता.

स्थिर न राहे. या समयास सेनासाहेबांचा सारखा दक्षणेंतील पगडीबंदांत मातब्बर रईस व दाणा दूरदर्शी व आमसी त्यानीं ऐसी दोस्ती केली आहे कीं त्याचे मागें सरस बाजू[1] राहावी. या वेळेस ऐसे सल्ल्यास जाऊन दृष्टीनें पहावें. याजकरितां मुबारकीची सवारी त्या स्थळास येण्यास निघाली. तों चौकीपाहऱ्याचा बंदोबस्त बिकट पाहिला, शहराचे आसपास चौक्या बसल्या होत्या त्या चौकीदारांनीं साहेब महसुफाचे येण्यास मना केलें. सबब ते गणेशबागापासून माघारे फिरून सिताबर्डीवर बंगल्यांत जाऊन येविशींचा अपसोस[2] केला. इकडे सेनासाहेबाचें दहन जालें. नंतर गुज्याबा दादा समागमें महसुफ माघारे फिरून गेल्याचें वर्तमान समजलें. याजवरून तो दिवस तैसी गुजरली. यावर दादांनीं दुसरे दिवशीं ते चवकीदार बरतरफ केले. हें वर्तमान आपा साहेबांस समजतांच तीं माणसें पुनः त्यानी चाकर ठेविले. बाळा साहेब व बाकाबाईसाहेब[3] नवे हवेलींत राहून कर्मांतर चालविलें. नवे हवेलीचा बंदोबस्त धर्माजी भोसले यानीं ठेविला होता. आपासाहेबानीं बाळासाहेबांकडेस यावें जावें बसावें व सुतक निवृत्ति जाली. यावर तेव्हांच दरबार चवघांमुत्सदियां समवेत व्हावा. सुतकाचे दिवसांत बहादूर महसुफ सांत्वनास त्याच जागीं आले होते. बहुतां रीतीनें शांतवन केलें, व बाळा साहेबानीं त्याजकडेस बुजरुगी[4] देवून उत्तरां प्रतिउत्तरें केलीं. ऐसा, क्रम दोन दिवस चालिला. इकडेस आपा साहेबांनीं मनांत आणिलें कीं बाबासाहेब तर ऐसे, कामदार प्रबल पाहतां नारायण येशवंत निजबत चिटनवीस राजकारणी प्रकरणात व धर्माजी भोसले व बाकाबाई, त्यांचे स्वाधीन नवे हवेलीचा बंदोबस्त त्यानीं केला आहे, व त्याचें आंगीं कर्तृत्वाचा गरा[5] व गुज्याबा दादा फौजबंद, तैशांत तिघेही मातोश्री बाकाबाई साहेबांचे वचनी व येशवंत रामचंद्र सिताबरडीवर बहादूर महसुफाचे वागणूकींत. याचेंही लक्ष बाईकडेसच. त्याजमध्यें धर्माजी भोसले याचे कितीकांचे [ विषयीं ] चित्त शुद्ध नाहीं, व आपले व आपले जातीसीं तों दाया[6] बांधून आहे. तेव्हां आपली कारवाईच[7] करावी जे, कारभारियांस प्रेम दाखवून आपले लगामीं लागेत व धर्माजी भोसल्याचें पारपत्य होय ऐसी मसलत आपले कारभारियांस घेऊन जालियाशिवाय दाब बसणार नाहीं, या योजनेंत लागून होते. इकडे सेनासाहेबांचे अशौच्यांतच बाकाबाई साहेबांजवळ धर्माजी भोसले येऊन तेथून बोलावणें नारायण येशवंत निजबत चिटनवीस, नारागण गोपाळ व महमद सिदका अलीखान याजला पाठविलें. आज्ञेप्रमाणें त्रिवर्ग बाईसाहेबांजवळ जाऊन हजर जाले, आणि बोलण्याची बैठक जाली. तेव्हां धर्माजी भोसल्यानीं प्रश्न केला कीं पुढें कैसा विचार, काय सल्हा. त्या वेळेसे नारायण गोपाळ बोलले कीं खाविंद सर्वज्ञ होता, त्यानीं आपले [8]जोहाजांनीं दौलत केली. सर्वांसी स्नेह संपादन ठेविला आहे. तैसें आपण करूं जातां कैसें. त्यापक्षीं एखादे आसरा बेलिष्ठ संपादून करणें तें करावें. हें धर्माजी भोसल्यानें ऐकून जवाब दिल्हा जे, तुमचें अंतः-

---

१. महत्त्व, श्रेष्ठत्व. २. शोक, खेद, दुःखोद्गार. ३. रघोजीची बायको ( तिसरी ) ४. बुद्रुखी=श्रेष्ठपणा, पूज्यता. ५. गर्व, गुर्मी. ६. वैमनस्य. ७. योजना, युक्ति. ८. अकलेनें ?

कर्णी दौलत अंग्रेजाचे घसांत[1] घालावी ऐसें दिसतें. हें नारायण गोपाळ व नारायण येशवंत यांनीं ऐकून खामोश[2] जाले; व या भावें आमचें बोलणें नाहीं हेंही उत्तर केलें; व हें वर्तमान महमद सिदका अलीखान याजला कळविलें. बाकाबाईजवळ व सुरेश स्वदेशी धर्माजी भोसला नेहेमीं वाड्यांतील राहणार व बंदोबस्त त्याचा, तैशांत त्यानीं ऐसी कल्पना घेतली. तेव्हां कोणे वेळेस काय बाईसाहेबांस समजावील हा संशय सर्वांचें अंतरीं जाला. बाईसाहेबाची भेट होणें मानसिक होऊं लागली. इकडे आपासाहेब यांचे मनांत तो धर्माजी भोसले यापारपत्य करावें. सेना साहेबांचे देह आवसानाचे तिसरे रोजीं नागो त्रिंबक याजला आपासाहेबानीं नारायण येशवंत याजकडेस पाठवून याचें मनांतील भाव पहावायास्तव पाठविलें. मशारनिल्हे नारायण येशवंत याचें घरास येऊन एकांत बैठक जाली, आणि बोलले कीं, सेनासाहेबांचे हातचे तुम्ही, आपा साहेबाचें लक्ष तुम्हांकडेस, तुम्ही सांगाल तैसे वागतील, व याचें उत्तर यानीं आपले जागा हेच समजोन केलें जे आपा साहेब दुरंदेश आहेत, दौलतीचा अकस[3] साहेबाची व बाळासाहेबाची मालकी ठेवून चौंघांस घेऊन करील व आपले माणसाकडून करील; हें अंतःकरणांत निसीम भाव ठेवून नागो त्रिंबक याजला उत्तर दिल्हें जे, आपा साहेब मालिक, आम्हांस खाविंद आहेत, ते ऐसी आज्ञा करितात व जितका सेनासाहेबांचे मागें लोभ करून आमची निभावणी करतील त्या योगानीं आम्हीं सेवेसीं पात्र आहों. नागो त्रिंबक यानीं खातरजमेची[4] उत्तरें देवून बोलले कीं पुढें या गोष्टीचा जैसा तुम्हांस कळेल तैसा विचार पहावा. ऐसें बोलून ते गेले. त्या उप्रांतिक नारायण येशवंत यानीं आपले जागीं विचार केला कीं, सेनासाहेबांचे हातचा शिलसिला[5] चौघां वकिलांकडेस आहे, यास्तव सर्वत्रांस पत्रें पाठवून सिलसिला आहे तो बहाल ठेवावा; हें पाहून आपले नांवानीं पत्रें नारायण[6] बाबूराव वैद्य व सदाशिव बापूजी धारपूरे पुण्यास होते यांसी व शिंदे यांचे लष्करांत बाळाजी येशवंत व बापूजी मल्हार व देवराव पैस केशव रामचंद्र यासी पाठविलें कीं सेनासाहेबाचे मागें बाळासाहेब मालिक व जो घरोबा आहे तो दिवसेंदिवस वृद्धीस पावावा, हें तुम्हीं करवीत असावें. ऐसे रीतीनें पत्रें गेलीं व दौलतीचे बंदोबस्तानीं आपासाहेबानीं बाळासाहेबासीं ऐसे रीतीनें करावें. ही कलमदी लेहून तयार केली व काशीस श्रीधर लक्षुमण मुनशी याजकडेस बाळा साहेबांचे नांवाचीं पत्रें सेनासाहेबांचा मृत्यु जाला तेवेळीं त्याचे निद्रेचे गालिच्यांत यंत्र निघालें इत्यादि मजकुराचें लिहून त्याजवर निशाणी करून घेऊन धर्माजी भोसले यासीं दाखविलें. तें त्यांनीं पाहून उत्तर केलें कीं, तुम्ही कोणते घरावर आहां? तुमचें घर तुमचे स्वाधीन राहिलें नाहीं. आपा साहेब कंपनीचे घरांत शिरले; पुढें येविषयींचा विचार पहावा, तुमचे स्वाधीन राहिलें नाहीं, तेव्हां पत्र पाठवून फळ काय? श्रीधर लक्षुमण दूर राहिले. मशार-

---

१. हातांत, आटोक्यांत. २. स्तब्ध. ३. आटोप. ४. विश्वासाची ५. पूर्वापर वहिवाट. ६. पेशव्याचे वकील बाबूराव विश्वनाथ वैद्य यांचे चिरंजीव.

निल्हेनी प्रसंगोपात उत्तरें करून पत्राची रवानगीं काशीस केली व कलमबंदीची याद केली तीही आपासाहेबास नागो त्रिंबक यासी घेऊन दाखविली. ती त्यांनीं पाहून बाहेर रंगीं उत्तम आहे म्हणोन बोलले. परंतु मनांतील धर्म[1] सेनासाहेब जीवंत असतां जो त्रिवर्ग कारभारी यांनीं योजिला, त्याजला नारायण येशवंत अनुकूळ असावे, यांचे मनांतील धर्म तों बाबासाहेबाची मालकी असावी. याजकरितां आपासाहेबांनीं नारायण येशवंत याजकडेस मध्यस्तद्वारा जो उद्योग करणें तो केला.परंतु आपासाहेबाचे मनाजोगे भाव दिसले नाहीं; हें पाहून यासी धातुपोषण नाद ठेवून धर्माजी भोसले यांचे पारपत्याचा विचार मांडला. त्याजवर नारायण येशवंत यानीं ती कलमबंदी खंडो भगवंत निजबत चिटणवीस याज-समागमें धर्माजी भोसले याजकडेस पाहावयास पाठविली व बाकाबाई साहेबांस दाखविली. हेंही सांगितलें. ती कलमबंदी भोसले याजकडेस मशारनिल्हे घेऊन गेले. नवे हवेलींत त्याची भेट घेऊन कलमबंदी वाचून दाखविली ती त्यांनीं पाहून उत्तर केलें कीं, तुमचे स्वाधीन काय राहिलें आहे, तुम्हीं चौघे मुत्सदी साहेबाचे हातचे. यावेळेस एकही कामाचे नाहीं; उगेच यादी करून फळ काय ? असो बाईसाहेबांस दाखवितों. असें मोठे आविर्भावानीं सक्त उत्तर सांगितलें. तें खंडो भगवंत यांनीं नारायण येशवंतास कळविलें. त्याउपर दुसरे रोजीं यादीही पाठविल्या. इकडेस आपासाहेबानीं धर्माजी भोसले याचे चालीची व बोलण्याची चालण्याची बातमी ठेऊन होतेच हें समजावें. फौजेंत शकटभेद करून लोकांस खर्चास देणें सुरू केलें; व नवीन कलमज्यारी[2] केली व श्रीधर लक्ष्मण याजकडूनही पत्राचे जबाब आले ते आपासाहेबांस समजले. याजवरून त्यांचे मनांत नारायण येशवंत याजविशीं विकृति आली, व चवघां मुत्सदियानींही आपले जागीं विचार केला कीं, धर्माजी भोसले तो कोण्हाचे स्वाधीन नाहींत. ते केवळ आपलेच जातीचे गऱ्याथर. बाई साहेब त्याचे बसांत. इकडेस आपासाहेबांचा विचार ऐसा. फौजबंद सरदार त्याचे सूत्रांत. तेव्हां दौलत त्याचे स्वाधीन जाली. सेनासाहेबाचे मागें अधिकारी आतां तीन बलिष्ट त्यापक्षीं जाले. जेसें कळेल तैसें करतील. आपण उगेच बदनाम होऊन आपली हुर्मत एखादे वेळेस जाईल हें चांगलें नाहीं. ऐसा दूरवर विचार पाहून तो [ ते ? ] आपा-साहेबांचे डोळ्यांकडेस पाहूं लागले व त्याचे मर्जीप्रमाणें वागूं लागले. आपासाहेबानीं नागो त्रिंबक व रामचंद्र वाघ व मनभट यासी कंपनीचे सरदार साध्य करण्याची मसलत करून नारायण पंडित यासी बोलावून त्यासीं प्रेम व खातरजमा करून नागो त्रिंबक व जात तिघे मिळोन या मसलतीचें उद्‌घाटण केलें. त्यानीं ऐकून घेऊन दम खाऊन उगेच राहिले. आपासाहेबांचा आग्रह येविशींचा फारच पडला, हें यानीं पाहून मिस्तर जेंकिन साहेब बहादूर यासीं इतल्ला आपासाहेबांचे मनोधर्माप्रमाणें धर्माजी भोसले याचे पारपत्याचा विचार केला. त्यानींही त्यांचे घरांतील आख[3] कोण्हाचे स्वाधीन नाहीं, जी गोष्ट सेनासाहेबांचे पदर-

---

१. भाव, उद्देश. २. सैन्यांत नवीन भरती करणें. ३. अखत्यार.

त्यांनी पहावी ती त्याचे स्वाधीन नाहीं. येशवंत रामचंद्र हेही नारायण येशवंत यांजकडे येऊन स्थायीभाव[1] पाहिला. याचा त्यांचा मेळ मिळाला नाहीं. हेही मिस्तर जेंकिन साहेबास समजलें. अनायासें आपले आपण सेनासाहेबांचे घरांत आला. फुटून आपले स्वाधीन येत आहे हें मनांत ठेवून नारायण पंडित यासी उत्तर केलें, तुमचे घरचा विचार ज्यांत तुमचे दौलतीस सरसंबज हें तुम्ही पाहून जैसें कळेल तैसें करावें. हें उत्तर मशारनिलेनीं ऐकून आपासाहेबांस सांगितलें. त्या उपरांतिक नागो त्रिंबक व पंडितजी यांचा विचार होणें तो झाला. पंडितजींनींही दूरदृष्टीनें पाहिलें कीं, बाळासाहेब शरीरांनीं पंगू, दौलत करण्याचें आंगवण आपासाहेबांचें जातीस. धर्माजी भोसले अमर्याद. तेव्हा ज्यांत दौलतीची बुनियाद[2] कायम तें करण्यास दोष नाहीं. बाळासाहेब मालिक आहेतच. चौघे माणसेंही आंतून बाहेरून आपासाहेबांकडेस पहातात, त्यांत आपल्यावर लोभ करून दौलतीचे बंदोबस्ताची गोष्ट आपले हातांनीं करितात, हें आपण नाहीं म्हणावें तर ज्यांत अंतःकरणीं ऐसें आलें तें हरकोण्हाकडून करवितील, हें पूर्तेपणें पाहून आपासाहेबांचे मर्जीनरूप जेंकिन साहेबासीं डाक्टर साहेबास घेऊन बोलण्यांत आणून मिस्तर जेंकिन साहेब व सौथबी ऐसे दोघे साहेब रात्रौ बेमालूम नागो त्रिंबक याचें घरीं येऊन तेथें आपासाहेब व पंडित यांसहित एकांत बसून मसलत जाली. त्या बैठकींत भवतिनभवति होऊन धर्माजी भोसले यांचे धरण्याचा व दौलतीचे बंदोबस्ताचा व नवीन तह करण्याचा निश्चय, पलटणें वराडांतून नागपुरास आणावीं याचा इत्यादि ठरून याची त्याची पकायेत[3] जाली. हे पक्केपणा होऊन नंतर महमद सीदकअल्लीखान याजलाही आपले सूत्रांत मिळविलें. तेही आबदाब[4] पाहून अनुसरले. कारण हेही फौजबंद सेनासाहेबांचे लोभांतील. परंतु याची फौज रेवा दक्षिण तीरास. तैशांत धर्माजी भोसले याचे चालीचा विचार ऐसा समजला, व आपासाहेबांनीं जेंकिन साहेबास अनुकूल केलें, तेव्हां आपण याजला अनुकूल न होतां परिणाम नाहीं. हें समजोन खान मशारनिलेही आपासाहेबांस त्यांचे मर्जीनरूप मिळाले. पहातां धर्माजी भोसले हे जातीनें निराळे राहून आरबांचा जमाव नवे हवेलीभवते व त्यांनीं आपले वाड्याचा बंदोबस्त करून बाळासाहेब व बाईसाहेब व पार्वतीबाई[5] व काशीबाई[6] इतक्यांस आवळून राहिले. इकडेस आपा साहेबांकडेस झाडून फौजबंद अनकूळ झाल्यामुळें सारे सेनासाहेबांचे पदरचे माणसांची कोठें कोण्ही गोष्टीची दोही प्रकरणांत काबू[7] न चाले. हें पाहून पुढें दौलतीचा ओघ कसा चालतो हें पाहून आपआपले ठिकाणीं खिन्न होऊन राहिले, व जेंकिन साहेबांकडे आंतील बेतानी जो विचार होणें तो आपासाहेबांकडून जालाच होता. त्याजवर साहेब महसुफांकडून प्रश्न आला जे, बाळासाहेब सेनासाहेबाचे फरजंद[8] व तुम्ही त्याचे भाऊ युवराजाचे अधिकारी, परंतु सेनासाहेबांचे जे

---

१. स्थिरता, कायमपणा. २. शक्ति, जोर. ३. कायमपणा, निश्चितपणा. ४. महत्त्व वजन. ५. पार्वतीबाई—दुसऱ्या रघोजीची दुसरी बायको. ६. काशीबाई—परसोजीची बायको. ७. युक्ति, कारवाई. ८. पुत्र.

आहेलगार[1] चौघे आहेत त्यांजला तुम्ही मिळवून सर्वत्रांचे रुकाराचा इस्ताहार[2] आम्हां-जवळ यावा. म्हणजे आम्हांस सेनासाहेबांचे दौलतीचे बंदोबस्ताची पास खातर अगोदर आहेच. त्यांचे मागें ही गोष्ट करणें जरूर असतें. आपासाहेबीं ऐकून जे जे सेनासाहेबांचे पदरचे आहेलकार वगैरे याजवर प्रेमाची साकर पसरून आपले लगामीं व ज्याजविषयीं संशय ये ते मनांत येऊन, येशवंत रामचंद्र आंग्रेज साहेबाचे वागणुकींत त्याजवर लोभ दाखवून तिकडील वागणुकींत दोन रोज येऊन आपली गुप्त गोष्ट त्याजला न सांगतां भावार्थ मनास आणावे; व नारायण येशवंत निजबत चिटणवीस याजवर बाह्य रंगीं प्रेम कार्याकारण दाखवून येके दिवशीं सर्वत्र सामान फौजेचे सरदारांसुद्धां जमा करून इस्ताहार याजवर एक एकाचे रुकार करून घेतले. एक गुज्याबादादांनीं तकरार केली कीं, त्यांतील अनुभव आम्हांस समजला असतां रुकार करूं, नाहीं तरी करीत नाहीं, त्यास त्या प्रसं-गास गुप्त गोष्ट, तो प्रकार ठेविला होता. यास्तव दादांस न सांगितलें. हें दादांनीं पाहून बोलले कीं, आमचा मालिक बाळासाहेब, तो जें करील त्यास आम्ही रुजू. तुम्ही सम-जावीत नाहींत तेव्हां आम्ही रुकार करणार नाहीं, ऐसें म्हणोन ताडा[3] खावून गेले. हें आपासाहेबांनीं पाहून त्याचा संशय मनांत धरून होते. त्याजपाशीं फौजेचा जमाव तो फोड करावा, परंतु अगोदर धर्माजी भोसल्याचें पारपत्य करून हें खूळ मोडलें म्हणजे पुढें हे व नारायण येशवंत यांचा बंदोबस्त करावा हें अंतःकरणीं धरलें. इस्ताहारावर जितके रुकार झाले त्यासुद्धां जंकिन साहेबाकडे पाठविला. इकडेस धर्माजी भोसले मध्य-स्थद्वारा बोलण्याचालण्याचें संधान लाविलें व प्रेमही बहुतसा दाखविला. जीं जीं धर्माजी भोसले याचीं बोलणीं पडलीं तिला कबूल केली. ऐसा विश्वास त्याजला हस्तगत करण्यास्तव दाखविला;आणि आपूण जुने हवेलीचा बंदोबस्त त्याजला न समजूं देतां व फौजेची तयारी करून त्याजला बोलविण्याचे निमित्ये जुने हवेलींत दक्षिणेकडील बुर्जांत बैठक करून तेथें बोला-वून नेऊन हस्तगत करून कैद केलें. पायांत बेडी घातली. तेव्हां नवे हवेलीभवते आर-बांचा जमाव होता त्यांत संचार करून तेही फोडून आपले लगामीं लावून नवे हवेली-चाही बंदोबस्त आपणच केला. व धर्माजी भोसल्याचे पदरचीं माणसें जैरामभुत व गोविंदपंत सोनदेव व तानबा कऱ्हु वगैरे माणसें त्याचे खासगींतील कित्येक धरून धर्मा-जीची दौलत हस्तगत केली. नवे हवेलीभोंवताले चौकी पाहारे वगैरेचा बंदोबस्त आपा-साहेबीं केलाच होता. त्या हवेलींत सेनासाहेबांनीं जानबा जवजाळच्या हवाला त्याचे विद्य-मान सोने मोहरा वगैरे क्रोड रुपयांचे वित्त विषय ठेविला होता, तो ही दरोबस्त त्याजपासून आपले दस्ती घेऊन गेले. ऐसे रीतीनें धर्माजी भोसल्याचें पारपत्य करून आपला कबजा केला. त्या प्रसंगास नारायण येशवंत बाहेर निघोन गेले होते, त्याजलाही खातरजमा करून आणिलें. नंतर त्रिवर्ग नागो त्रिंबक व रामचंद्र वाघ व मनभट [ उपाध्ये ] यांनीं

---

१. आहेलकरी=कारभारी ? २. लेखपत्र. ३. मोठमोठ्यानीं बोलून.

आपासाहेबांस हेंही समजाविलें कीं, दौलतीचें संधान सेनासाहेबाचे हातचा ज्या ज्या माणसाचे हातांनीं आहेत ते जितकें बाळासाहेबाचें कल्याण पहातील तितकें लक्ष जातीं-कडे आपलें ठेवणें मानसिक पडेल. त्यास आपले आंगीं आंगवण नसल्यास दुसऱ्याचे तोंडाकडेस पहावें तें कशास करावें ? हाही बंदोबस्त आपले हातें करावा. हें समजोन नरसिंगराव बल्लाळ, बाळाजी येशवंताचे चिरंजीव शिंदे याजकडून त्याचे हस्तक नारो सखाराम व होळकरांकडून केशवराव व्यंकटेस याजला रामचंद्र वाघ व माधवराव निळ-कंठ यांजकडून त्यासीं संधान करून आपले मिळणींत मिळवून उभयतां सरदार शिंदे होळकर यांजकडेस लिखावट ठेवून आपला सिलसिला ज्यारी केला. बापूजी मल्हार जुने शिंदे याजवळ वकीलीचे कामीं त्याजला काढावें हेंही योजना मांडिली. पुण्याकडील नारायण बाबुराव वैद्य व सदाशिव बापूजी घारपुरे यांचें विद्यमानें तिकडील लिखावट होती, तेथेंही आपला सिलसिला निराळा करावा. हें मनांत वागवून राघो धोंडदेव यांसीं बोलण्या-चालण्याचा वरून उच्छेदित प्रकार जाले; कारण हे व बापूजी मल्हार व सदाशिव बापूजी व नारायण येशवंत यांचे वगरी [ ? ] हे समजोन नागो त्रिंबक यांसी शिंदे होळकर यांजकडील लिखावटचा बंदोबस्त आपले हातीं आणून आपले आत्मीय खंडो गोविंद गुप्तद्वारें पुण्यास काळ्यांचे[1] दुकानीं आदौच पाठवून बाजीराव पंतप्रधान यांजकडेस संधान नारायण बाबू-राव व सदाशिव बापूजीं यांसी सोडून केलें. कागदपत्र जितके येणें ते आपणाजवळ आणून ठेवावे ऐसा क्रम मांडला. पंत प्रधान बहुत कल्पना घेणार, परंतु आपासाहेबांनीं संधान शिंदे होळकर यांजकडेस लागून परस्परें लिखावट सुरू जाल्या; येविशीचे इतल्ले उभयतां सरदाराकडोन पुण्यास जाले, याजवरून खंडो गोविंदास मेळ पंत प्रधानाचा ज्यारी जाला. नागो त्रिंबक यानीं आपले अंगीं समदारून माहमी आणिली. पुढें श्रीमंत बाळासाहेबांस नवे हवेलींतून आणोन मसनदनसीन करावें, व आपासाहेब दौलतीचे मुखत्यार आंग्रेज साहेबांकडून बाळासाहेबांचे हातें करावे. ही मसलत त्यांनीं अंतस्थ ठेवून राहून बाहेरंगीं सर्वांस समजोन सर्वांचे विचारें सुमुहूर्त पाहून या[2] तारखेस आपासाहेबांनीं जातीनें नवे हवेलींत जाऊन बाळासाहेबांस पालखींत घालून आणून जातीनें हातीं चौरी घेऊन पायउतारे पालखीबरोबर येऊन जुने हवेलींत मसनद व सर्वत्र मान मुत्सदी सरदारांसुद्धां करून तेथें आणिलें. मिस्तर जंकीन साहेब बहादूर यांसींही येविशीं इतल्ला अगोदरच करून त्यांचे संमतें हा बेत ठरावून, यांजला प्रसंगास बोलावून आणिलें. तेही आले. नाच रंग आधींकरून समारंभ मोठे जलशाचा झाला. बाळासाहेबांचें अंगावर पोषाख, जवाहिर घालून सुमुहूर्तें मसनदनसीन केलें. सर्वत्रांच्या नजराणा झाल्या. व सेनासाहेबांचे पदा नांवाची धर्मादाय ब्राह्मणांस सनदा करून देवून त्यांजवर सिक्के करून दिले. त्या समयांत मिस्तर जेंकीन

---

१. काळे—हे पुण्यांतील नामांकित सावकार होत. २. ता० १४ एप्रिल स. १८१६ आदितवारी वैशाख मासीं परसोजी गादीवर बसला. व आपासाहेब त्याचा कारभारी झाला.

साहेब बहादूर यांनीं मोठे संतोषानीं बाळासाहेबांसी बोलण्यांत आणिलें कीं, रघोजी भोसले सेनासाहेब आम्हांस वडील होते. त्यांनीं आमची दोस्ती बहुत करून आपला येकीन[१] मजबूद ठेविला. मोठे खष बरोबर उणेसा दिसूं दिलें नाहीं. ती पास खातर आम्हांस बहुत आहे. आपण त्यांचे जागां आपले दौलतीचे मालिक जाले याची खुशी फार जाली. पुढे या दौलतीची सरसबाजी दिवसोंदिवस अधिक अधिक असावी हें आमचे मनांत लागून आहे. त्यास आतां आम्हांस बोलावयास व पुसावयास आपण आहेत. तेव्हां बाळासाहेबांनीं साहेब महसुफांकडेस पाहून उत्तर दिलें कीं, कैलसवासी आपणाजवळ याच दिवसाकरितां स्नेह जोडला आहे. त्याची पासदारी जितकी ठेवाल तितकी आपणास लाजम[२] आहे. आपासाहेब माझे राजेंद्र आहेत. हें सर्वांनीं पाहून त्या प्रसंगास ऐसा समारंभ होऊन पानदान अत्तरदान देऊन दरबार बरखास्त जाला. आपासाहेबानीं बाळासाहेबांस जुने वाड्यांतच राहावयास जागा मुर्तीचे चौकांत करून दिल्ही. आंतील बेतांनीं बाळासाहेबाजवळ चौकी पाहाऱ्याचा बंदोबस्त आपासाहेबांनीं केला. नंतर जंकीन साहेबांनीं आपासाहेबाचें संधाना-प्रमाणें वराडांतील पलटणें कलमेश्वरचें[३] मार्गें नागपुरास दोन पलटणें तैलंगखेडीवर[४] फुटाळे तळ्यावर येऊन पोहोंचलीं. बाकी पलटणें कलमेश्वरानजीक ठेविलीं. पलटणांत कर्नेल इसकाट साहेब मालिक होते. आपासहेबांचे चितांत गुज्याबा दादा व नारायण येशवंत यांचा बंदोबस्त करणें, सबब आपण जातीनें तैलंगखेडीचे बागांत राहून तेथें सर्वत्र मुत्सदी व फौजेचा गाहा[५] केला. नंतर या पूर्वीं गोपाळ भगवंत कढवलीकर नागपुरास येऊन आपासाहेबांस समजाविलें कीं, इकडील पत्रें हलकारे हिंगणीकर भोसल्याचे मुलास दत्तक घेण्याविशीं नागपुराहून हिंगणीस[६] गेले ते हलकारे आमचे तालुक्यांतील गांवीं मुक्कामास राहिले होते. त्यांनीं गांवचे पाटलास ऐसें वर्तमान सांगितलें. ही बातमी आम्हांस समजली याजवरून त्यांजला धरून आणावयास माणसें पाठविलीं. परंतु ते हातीं न लागतां निघोन गेलें. हें वर्तमान आपासाहेबांनीं ऐकून नारायण येशवंताचें हें कृत्य ऐसा संशय घेतला. दुसरे हरि बल्लाळ व नारायण सखाराम सेनासाहेब जिवंत असतां आपले तीर्थरूपाचे भेटीस शिंद्याचें लष्करांत गेले होते व नरसिंगराव बल्लाळ यांणीं आपासाहेबांकडेस अगोदरच लोभाचा प्रकार केला होता. सेनासाहेबांचा काळ जालियावर आपासाहेबांचे संधानाची[७] कृति शिंदे यांजपाशीं करून हरि बल्लाळ व नारो सखाराम नागपुरास आले. आपासाहेबांची भेट घेऊन तेथील प्रकार मन माने तैसे समजावले व हेंही सांगितलें कीं, नारायण येशवंत यांनीं आपणांस क्षणभंगूर ठरवून पत्रें पाठविलीं, तीं आम्ही पाहिलीं. हें ऐकून आपासाहेबांस बहुत विषाद आला. तिसरे श्रीधर लक्ष्मण यांजकडेस बाबासाहेबांचें

---

१. निष्ठा. रा. व्य. को. श्लोक २५३. २. योग्य. ३. हा गांव नागपुरापासून ७ कोसावर आहे. ४. हें स्थल नागपुराहून सुमारें एका कोसावर आहे. ५. जमवाजमव. ६. हिंगणी हा गांव नाशिक जिल्ह्यांत आहे. ७. वश करून घेण्याची युक्ति.

नांवें पत्रें पाठविलीं. चौथे कलमबंदी केली. ऐसे चौ प्रकरणांचा राग नारायण येशवंत यांचा आपासाहेबांस आलाच होता. [१]बापूसाहेबांनीं अंतःकाळीं याद करून दिली होती. बाळासाहेब बाळ मसनदनसीन होण्यापूर्वी कलमबंदी होती ती ऐसी दोन्ही नारायण येशवंत यांजपासून आपासाहेबांनीं नेलें. परंतु पोटांत संताप धरून नारायण येशवंत यांचें पारपत्य अगोदर करावें, नंतर गुजाबादादा यांसी खालीं[२] करावें. त्या प्रसंगांत नरसिंगराव बल्लाळ व केशवराव व्यंकटेश यांणीं आपले सरदारांकडील पत्रें वरचेवर दाखवून एकांत करून मनस्वी आपासाहेबांचे मर्जीप्रमाणें वर्तमानें सांगावीं. त्याउपरी तेलंगखेडी-वरून आपासाहेबांनीं नारायण येशवंत व गोविंदराव त्रिंबक यासी आषाढ शुद्ध अष्टमीस बोलावून नेऊन तेथें आपण राहिले, त्या वाड्यांतच नेऊन ठेविलें. त्याजवर एकादशीचे रोजीं गंगाधर चिटणवीस यांजकडील खंडो भगवंत व हैबतराव अनंत व सखाराम व्यंक-टेश यांजला जाऊन खास बोलाविणें पाठविलें. तेलंगखेडीस नेलें. बागांतील हौद्राबर पंडि-तजी व नागो त्रिंबक व अमृतराव पांडुरंग व बाजीराव कृष्ण व्यवहारे व नरसिंगराव बल्लाळ व हरि बल्लाळ व नारो सखाराम ऐसे बसून चिटणविसांकडील त्रिवर्गांस समक्ष नागो त्रिंबक यांनीं विचारलें कीं, शिंदे होळकर व पंतप्रधान यांजकडेस नारायण येशवंत यांनीं फंदाची पत्रें कैसेकैशीं लिहिलीं तीं तुमचे हातचीं लिहवलीं आहेत, त्याचा मजकूर सांगावा; नाहीं तरी तुमचें पारपत्य केलें जाईल. तेव्हां त्यांनीं जें वास्तविक होतें तीं उत्तरें केलीं. तेव्हां त्यांची खातरजमा त्या उत्तराचे बोलण्यावर न होतां नारायण सखाराम यासी बोलले कीं, हे काय म्हणतात. तेव्हां हरि बल्लाळ व नारायण सखाराम बोलले कीं, हे बोलतात तें गलत[३] आहे. नारायण येशवंत यांणीं बापूजी मल्हार यासीं लिहिलें कीं, आपासाहेबानीं नागपुरास ऐसी कृति करून सेनासाहेबांस ऐसें केलें. तीं पत्रें बजिन्नस शिंदे बहादूरांस पहावयास मशारनिल्हे नेऊं लागले ते आम्ही दृष्टीनें पाहिलीं. याची खतावणी[४] याचें दप्तरांत असेल तीं दप्तरें आणावीं. ऐसी मनास येईल तैसी वागणूक करून असत्य भाषणें केलीं. याजवरून चिटनविसाकडील त्रिवर्गांचें बोलण्याप्रमाणें नागो त्रिंबक यांनीं आपासाहे-बांचे नांवें लिहिणें करून घेतलें, व यांनींही करून दिलें. त्या उपरी नागो त्रिंबकास यांनीं बाजीराव व्यवहारे यांजला हैबतराव व सखाराम यांजला बरोबर देऊन नारायण यशवंत यांचे घरीं चिटनविसांकडील दप्तरें होतीं तीं दरोबस्त सरकारचे उंटावरी लादून तेलंगखेडीस आपासाहेबांचे बंगल्यावर नेऊन ठेविलीं. नंतर तेच रोजीं रात्रौ आपासाहेब व नागो त्रिंबक अमृतराव पांडुरंग व पंडितजी व अनंदराव माधव व नारोबा काळीकर व बाजीराव कृष्ण असे बसून चिटणविसांकडील त्रिवर्गांस आपसाहेबांनीं समक्ष बोलावून दफ्तरें सोडून कागद पाहून एक एक कागद पाहिला व त्रिवर्ग बोलले तसेंच वास्तविक दिसलें. परंतु आपासाहेबाचे

---

१. दुसऱ्या रघोजीनें. २. दूर करणें, अधिकाराच्या पदावरून काढणें. ३. चूक, अयथार्थ. ४. टिप्पण, दाखला. रा. व्य. को. श्लो. ३१४ पहा.

मनांत नारायण येशवंत यांजविषयीं विकृतीचा विचार बाळासाहेबांचे पक्षावरून, यास्तव त्याजलाही समक्ष बोलावून उगेच दोषादोष काढिले. आपासाहेबांकडेस खाविंदी उत्तर करावें तरि दुर्मतीसी गांठ. यास्तव यांनीं सफर केली. या उपरी मशारनिले बिऱ्हाडास पाठवून पलटनाचा पहारा बसाविला. व नागपुरास घरावर आपाजी आनंदराव या बरोबर आरबांची जमीयेत व जासूद पाठवून चौक्या बसविल्या. अमर्याद विचार केले. चिटनाविसांकडील त्रिवर्ग त्याच रात्रीं अमृतराव पांडुरंग याचें बिऱ्हाडास अटकेंत ठेविले. दुसरे रोजीं त्रिवर्ग व नारायण यशवंत एकजागीं केले. पाहऱ्याचा बंदोबस्त केला. व नारायण यशवंत याज-पासून बेतरख[1] गुन्हेगारी सवालक्ष रुपयांचे दोन फरजे[2] लिहून घेतले. ऐवज देण्याचा तगादा केला. तेव्हां त्यांनीं उत्तर केलें कीं, आम्ही पायांजवळ हजर आहों. घरही तुमचें स्वाधीन आहे. मनास येईल तसें करावें. ऐसें रितीनें नारायण येशवंत याचा बंदोबस्त केला. राहतांना बांकाबाईसाहेब यांचे मिळणींतील व बाबासाहेबांचा पक्ष धरून गुजाबादादा होते हे फौजेबद्दल. याजला खालीं करावें हें समजोन रंगो रघुनाथ भोई हे त्या जमावांतील कारभारी. हाजरी गणतीचे कामीं गणपतराव माधव तिखे होते. यांजला समक्ष बोलावून आपासाहेबांनीं सांगितलें कीं, तुमचे कडील जमाव दरोबस्त फोडून निराळा करावा. तुम्हांस खर्चास सरकारांतून देऊं. हें [ न ] जमल्यास तुमचा मुलाहिजा होणार नाहीं. तेव्हां [ अक्षरें ५-समजत नाहींत ] यांनीं पाहून तिखे यांनीं विनंती केली कीं, हजर गणती घेऊन याजवरून रंगो रघुनाथ यासी आज्ञा केली. तेव्हां आपासाहेबांचे आज्ञेपुढें उपाय नाहीं हें पाहून गुजाबादादाकडील फौजेचा जमाव फोडून अलक उतरविलें. गुजाबादादांनीं आपले जागां विचार केला कीं, आपासाहेबांनीं झाडून फौज आपली केली. सेनासाहेबाचें अन्न सर्वत्र सरदारांनीं आजवर खाल्लें असतां कोणाचीही एकीन बळकट न राहतां व सर्व एकादिली ठेवून बाळासाहेबांस साथ न देतां असा विचार झाला. व आपासाहेबांजवळ क्षुल्लक माणसें भलत्या वेळेस भलते समजावितां त्याजवर आपासाहेबाचें लक्ष, ते पक्षीं आपला बचाव तें करावें. याजवरून आरबांची जमीयेत येऊन आपलें घर राजवाड्याचा बंदोबस्त केला. नंतर आपासाहेबही तैलंगखेडीवरून नागपुरास हवेलींत येऊन राहिले. मिस्तर जेंकी-नस साहेब बहादूर यांसीं प्रेम जोडला. त्याची दिवसानुदिवस वृद्धि ठेविली. बाहदूर महसु-फासी आपली जागा बहुत कळकळ करून पाहिलें कीं, सेनासाहेबाकडील माणसें आपला आहाळा करून एकादा विचार करतील. सेनासाहेबांनीं आम्हांशीं बहुत दोस्ती केली ते आमचे दिलांत आहे. परंतु ती गोष्ट माणसांकडून जाली. आपासाहेबांनींच ऐसा विचार केला व बाबासाहेब मसनदनसीन समयीं राजेन्द्र माझा ऐसें बोलिले. तेव्हां याचें बोलण्याप्रमाणें जरूर झालें हें समजून तह रद्द करण्याचे, बोलण्या चालण्याचा जैसे आले होते त्याप्रमाणें तह-नामा आपासाहेबांपासून लिहून घेतला. आपणही दिला. सहा पलटणें चाकर ठेविलीं. तीं

---

१. योग्य सबब नसतां. २. दस्तऐवज, रोखे.

तैलंगखेडीवर छावणी करून राहिलीं. याचा दरमाहा सहामाही द्यावा ऐसा कौल करार व त्या पलटणांचे मदतीस पांच हजार फौज आपासाहेबांकडील रहावी; पलटणांची महावारी[1] करारा बरवक्त देणें; व पलटणें नेहमीं राहण्यामुळें प्रांतांतील नाज[2] त्यांनीं खरेदी केली, सबब नाजाची अडचण व लाखों रुपये महसुलाची माफी हें नुकसान, तैशांत ऐवज देण्याची अडचण पडूं लागली. त्यास बाहादूर महसुफांचें बोलणें पडलें कीं, सहा पलटणें तुम्हीं आपले दौलतीचे कारवाईकरितां ठेविलीं, यांतून तुमचाही नफा पुढें चांगली धारणा ठेवल्यास दिसेल; कौल करार तुमचा आमचा झाला, त्याची बळकटी तुम्हीं ठेवीत जावी. आपासाहेबांनेंही साहेब महसुफांचे संतोष रीतीनें खातरजमा पुरविला असें बोलून वर्तणूक करावी. त्या उपरी साहेब महसुफांचे धाकटे भाऊ मेजर जेंकिन साहेब याविशीं मिस्तर जेकिनसाहेब बहादुरांनीं आपासाहेबांशीं बोलण्यांत आणिलें कीं, आमचे भाऊ आमचेजवळ आहेत, याजला आपले खाजगींत दोन पलटणांशीं चाकर ठेवावें. ते आपली चाकरी हुकूम बरहुकूम करतील. याजवरून बहादूर महसुफांचे मर्जीचे संतोषास्तव ठेविली व त्याचा दरमाहा ज्यारी झाला. पलटणाचा दरमाहा देण्याची अडचण व घरांत फौजेचा खर्चाबदल वोढ ऐसा अडचणीचा प्रकार दिवसोनदिवस जाला. तैशांत हुसेंगाबादीचा[3] किल्ला अंग्रेजांनीं कोठी वगैरे ठेविण्यास मागितला, व हाशिल[4] माफीचीही नुकसानी ऐसी चहूंपक्षीं पलटणांची अडचण व याजकडील बोलण्या चालण्याची अडचण ये गोष्टी रीचीहीन साहेब व हे, समजोन मनांतील मनांत खिन्नता मानूं लागले कीं, हे गोष्ट चुकून जाली, येविशींची तजवीज योजावी हें मनांत आणिलें; तैशांत नारो सखाराम व नरसिंगराव बल्लाळ व केशवराव व्यंकटेस वगैरे सन्मान त्यांत नारो सखाराम यांनीं मनःकल्पित आखबारा लेहून शिंदे यांजकडील राजकारणाचा विचार व पुण्याकडीलही साधन सिंद्याचें सूत्र ऐसें भलतेंच आपासाहेबांस समजावीत असावें, त्याही गोष्टी आपासाहेबांस रुचत चालल्या. नागो त्रिंबक यांणीं खंडो गोविंद पुण्यास आपले तर्फेनीं पंत प्रधान यांजकडेस संधान लाऊन ठेवलें होते, ते पुण्याहून नागपुरास तैलंगखेडीचे मुकामीं आले, आपासाहेबांची भेट करविली. पुण्याकडील जो प्रकार समजविणें तो समजाविला. त्यांतील कारण हेंच कीं, अंग्रेज बहादूर यांचा स्नेह आपला आहे, व तो पंडितजीचे विद्यमानें जाला; या योगानीं पुण्याहून आलफिष्टीन साहेब यांचे विद्यमानें पंत प्रधान यांजकडून सेनासाहेबाचें पदाची मालकीचीं वस्त्रें आणावीं. हा संकल्प नागो त्रिंबक यांचे मनांतील हे गोष्ट आपले हातांनीं करून दौलतीचा कारभार दिवसेंदिवस अधिक करून दाखवावा, व त्याच रीतीनें आपले आंगीं सर्वेध्यक्षताही

---

१. दरमहाचा पगार. २. नाज=धान्य. ३. इंग्लिशांचा सेनापति जनरल आडम्स् याच्या ताब्यांत हुंषगाबादेचा किल्ला इ. स. १८१७ मध्यें होता. पुढें सन १८१८ पासून इंग्लिशांचें येथें ठाणेंच असून कोणी मोठा लष्करी अम्मलदार राहत असे. ४. हाशील= वार्षिक करांपासून व जकातींपासून झालेलें उत्पन्न.

आणिली. रामचंद्र वाघ व मनभट हे मशारनिल्हेसीं बाह्यात्कारें प्रेम ठेवून, अंतरंगीं आपासाहेबांकडून मनमोल तैसे ख्याल करवीत असावें. त्याजवर नागो त्रिंबक यांनीं खंडो गोविंद यास आपासाहेबांकडून पालखी देवून पुण्यास वस्त्रें व जवाहीर त्याचे सांगितल्याप्रमाणें देवून रवानगी केली; ते तिकडेस गेले. सिताबरडीचे जाण्यायेण्यांत नागो त्रिंबक यांनीं आपले व्याही श्रीधर जयकृष्ण यासी नेमून व मुनसीगिरीही त्याजकडून चालविली. ऐसा क्रम नागो त्रिंबक याचा चालिला. नरसिंगराव बल्लाळ व नारो सखाराम व रामचंद्र वाघ यांनीं आपले जागीं विचार केला कीं आपासाहेब आपले तंत्रीं लागून पंडितजी व नारो त्रिंबक यांस अलग होय ऐसा प्रकार कोण्हे तऱ्हेनीं करावा; आपासाहेबांस निराळे मार्गे समजाविलें कीं, अंग्रेज बहादूर यासीं आपण स्नेह केला, परंतु यांतून आपले दौलतीस अपाय, त्यापक्षीं आपण पगडीबंद शिंदे, होळकर, पंत प्रधान एकचित्त जाले असतां याचें पारिपत्य करणें अगाध नाहीं. नागो त्रिंबक व नारायण पंडित हे अंग्रेजांत मिळाले यांचा भरवसा धरावयाचा नाहीं. त्यांनीं आपले कल्याणाकरितां तुम्हांकडून त्यांसीं स्नेह करून पलटणें आणलीं, आतां आपल्यास ऐवज देण्यास किती अडचण; दौलत दिवसेंदिवस पेंचांत येऊन किती नुकसान याचा विचार आपणच पहावा. हें आपासाहेबांनीं ऐकून ही मसलत करावी ऐसा लेकूरपणाचा बिचार आंगीं; ज्यांनीं जैसें सांगावें तेंच चित्तांत धरून करावें. व हेंही समजाविलें कीं अंग्रेजाचा व पंत प्रधानांचा येवढा स्नेह असतां अंग्रेजांनीं गंगाधरशास्त्री गाइकवाडाकडील याचा पूर्वपक्ष केला. गाईकवाड सरदार पेशव्यांचे पदरचे मोठीं माणसें याचे बोलणें अंग्रेज बोलूं लागले; तें बाजीराव पंतप्रधान यांचे चित्तांत वैषम्य आलें. गंगाधर शास्त्री याचा तैसा प्रकार जाला. ती बलागत[1] त्रिंबकजी डेंगळे पंत प्रधानाचे लोभांतील याजवर अंग्रेजांनीं आणिली आणि आग्रह करून त्रिंबकजीस धरून नेवून पाण्यांतील जंजिऱ्यांत ठेविलें. त्याजला ईश्वरांनीं मार्ग देऊन सुटला. त्यांनीं जमाव केला. त्याचें पंतप्रधानाचें सूत्र व पंतप्रधानांचीं संधानें सिंदे होळकर यांजकडेस, हे दोन्ही सरदार यांचे, त्रिवर्गांचा एक विचार. आपण आपले सरसबाजीस अंग्रेजांसी दोस्ती केली असतां आपल्यास त्याजकडील इतक्या अडचणी अतांच दिसूं लागल्या, तेव्हां पुढें फायदा काय होणार? अंग्रेज ज्या घरांत शिरेल त्याचे घरचा परिणाम कोण्हाचा चांगला जाला? लखनौ हैदराबाद वगैरे दृष्टांत देवून आपासाहेबांचें पोट भरलें आणि बोलले कीं, बाजीराव यांसीं आपण संधान करावें म्हणजे सर्व गाठोडें एक जालें. ऐसे नाना प्रकार भासवून आपासाहेबीं बुद्धि फिरविली. बाहेर गुबार[2] दिसूं दिला नाहीं. या योगांनीं नारायण पंडित यास या मसलतींतून काढून बाह्य रंगीं दरबारचें येणें ऐसे तऱ्हेनीं अलग केलें व नागो त्रिंबक याजवर एखादा दोष ठेवून त्याजलाहि खासी द्यावी हें पाहून चंद्रपूर आदिकरून ऐवजाच्या झडत्या यांचे हातांनीं मनांस येईल तैशा जाल्या, त्याचा हिशेब

---

१. बलागत = आपोआप आलेलें संकट; अनर्थ. २. गुबार = अन्तस्थ दुःख.

समजून घ्यावा हें फंद करून आपासाहेबांकडून नागो त्रिंबकाविषयीं विकृति आणविली व त्याचे शरीरसंबंधी रावजी परशराम याजवर आरोप ठेवून गर्दी करून त्याचें घर लुटून त्याजला चंद्रपुरास कैदेंत पाठविलें. नरसिंगराव बल्लाळ याचे पदरचे नारो सखाराम असतां नरसिंगराव बल्लाळ याजलाहि त्यांनीं गाठून रामचंद्र वाघ व आपण एकचित्त होऊन आपासाहेबांकडून ऐसे विचार करविण्यास आरंभ केला. अंग्रेजाचे वागणुकींत पंडितजी महकूफ होऊन रामचंद्र वाघ नमूद जाले. नागो त्रिंबक याचे आंगीं मामलती राजकारणी विचारल्यास राजकारणाचा प्रकार तसा केला व मामल्याचें कामकाज महंमद सिदक आलीखान यासी आपासाहेबांनीं प्रेम दाखवून चालीं लाविलें. याचे आंगीं कर्तृत्व तेणेंकरून चालीं लागलें. नागो त्रिंबक यांनीं खाविंदाची मर्जी पाहून सोमयज्ञ[1] नागपुरास तुळसीबागांत केला. आपासाहेबीं वीस हजार रुपये खर्चास त्याजला यज्ञास दिल्हे. यज्ञ झाल्यानंतर मनभट येके दिवशीं आपासाहेबांकडून ऐवजाचे झडतीविशीं नागो त्रिंबक यासी पुसावयास आले, याजवरून मशारनिल्हे रामचंद्र वाघ याचे मातोश्रींकडेस जावून बोलले, कीं तुमचे चिरंजीव व मी एकजीव एकप्राण असतां नारो सखाराम व ते एक होऊन मजविशीं धन्यास अनेक प्रकारें समजावून खाविंदाकडून मजला हिशोब मागतात, तेव्हां मी आमली प्रयोग करून रुपये खर्च जाला हें चौघांत बोलावें ऐसें असल्यास दरोबस्त हिशोब या कर्माचा समजावून देतों व वरकड तो महकमा मजकडेस नाहीं. तेव्हां रामचंद्र वाघाचे मातोश्रीनें चिरंजीवास सांगून समेट घातली. नागो त्रिंबक यांनीं आपासाहेबांचें ध्यान पाहून त्याचे जे माणसानींत[2] मिळाले व नारो सखाराम व रामचंद्र वाघ बाह्यरंगीं नागो त्रिंबक जे माणसानींच ठेवून व सिताबर्डीचें राजकारण वाघाकडून राखून आंतून हा खेळ उभा केला. इतकें कृत्य करण्यास नारो सखाराम नागो त्रिंबक यानीं या उभयतांचें समानांत राहून आंतून अंग्रेज बहादुरांचा स्नेह जो केला होता [ तो ] आपला बहाल असावा यास्तव वर्तमान आपासाहेबांचे चालीचें सांगावें व अंग्रेज बहादूर यांनीं बातण्याद्वारें[3] नागपूर व पुणें आदिकरून येथील ऐकून आपासाहेबांकडेस दोस्तीचें सांगोन पाठविलें कीं, तुम्ही दोस्त आम्ही ऐसें ऐकितों हें कैसें ? तेव्हां परिमार्जन करून उत्तरें आपासाहेबीं करावीं. नागो त्रिंबक यांनीं [ ह्यापुढें चार पांच ओळींची जागा मूळ लेखांत कोरी आहे ] आम्ही पुन्हा खंडो गोविंद पुण्यास पाठविले होते त्यांनीं तेथें आलफिष्टीन साहेब यांचें साधन ठेवून बाजीराव पंत प्रधान यांसिही मिळणीचा विचार खंडो मुकुंद यांचे द्वारें ठेविला. त्याचें पत्र गुप्त यावीं व उत्तरें येथून माधवराव निळकंठ याजकडून लिहावीं. पंत प्रधान यांनां तोहि दोरा[4] ठेविला व नारो सखाराम यांनींहि संचार केला होता तेंही संधान ठेविलें, ऐसा तेथीलही प्रकारचा व चंदी व नागो

---

१. या यज्ञांत सोमलतेच्या रसाचें हवन व प्राशन करतात. २. मंडळींत. ३. बातमी. ४. संबंध.

त्रिंबक याचीही चाल द्वामोस[1] ऐसा सारा प्रकार आपासाहेबांकडून चालीचा अंग्रेज साहेबांस समजों लागला; परंतु त्यांनीं आपलेकडून कांहीं दिसूं दिल्हें नाहीं. राजश्री गुजाबादादा आपले हवेलीचा बंदोबस्त आरबांचा ठेवून होता त्याजवर आपासाहेबांचा लाग न चाले. तेव्हां नागो त्रिंबक व महमद सिदक आलीखान यासी दादासाहेबांकडेस पाठवून प्रेमाचीं बोलणीं बोलून इमानप्रमाण घेऊन टाकून दिल्हें. परंतु हें करणें कृत्रिम दादास दिसलें याजवरून त्यांनीं आपले मनांत सोह ठेवून उत्तरें प्रतिउत्तरें करणें तिकडे व दादांनीं विचार केला कीं, ऐसे दरबारांत या स्थळीं तरी किती दिवस यावें. आपण आश्रय मोठा संपादन केल्याशिवाय नाहीं, आपला धनी बाबासाहेब आहेच; कारभार कोण्हीही करो. या विचारांनीं आपले हवेलींतून निघोन नागो त्रिंबक याचे घरांजवळ रघुनाथ विश्वनाथ याचे घरीं येऊन राहिले. हे तेथून नागो त्रिंबक यासीं बोलणें बोलत गेले व त्याचीही खातरजमा करून ठेविलें. ऐसें असतां आपासाहेबांनीं दादासाहेबांवर हवेलीचे आसपास चवक्यापाहेरे बसवून आंतील माणूस बाहेर जाऊं देऊं नये वं दोन चार वेळेस दंगा फटकाही करून पाहिला, परंतु काबू न चालली व नागो त्रिंबक याची कोठें काबू न चाले. सबब मशारनिलेनीं आपला प्रयत्न करणें तो करून पाहिला. त्यांतून कांहींच घडेना. हें दादांसही समजलें. तेव्हां दादांनीं पंडितजींकडेस गुप्त सांगून पाठविलें व आपले जातीकडून मिस्तर जंकीनसाहेब बहादूर यांजकडेस आपले बचावाचें साधन लाविलें. तिकडूनही खातरजमा करून पाठविली. या भरंवस्यावर आपली मजबुती चौघे प्राणाचे रक्षक आपले जवळ ठेवून हुशार राहिले. आपासाहेबांस दुरोक्ती सांगणाराचे कल्पनेवरून बुर्जांत राहून जें करणें तें करावें. नारायण येशवंत याजला तेलंगखेडींतून अनंतव्रताचे दिवशीं त्याचे घरीं आणोन पाहरा ठेवून बंदोबस्तांनीं ठेविलें व ऐवजाच्या तगाद्यांमधून नागो त्रिंबक वगैरे कारभारी करीत याचें उत्तर तो साराच घरदार हजर, शेवटीं पंडितजीचे विद्यमानें दहा पंधरा हजारपर्यंत ऐवज तसलमात[2] दिल्हा हें आपासाहेबांसि वर्तमान समजलें. मनांत तो विकृति घालणारांनीं घातलीच, परंतु काशीचे प्रसंगास नारायण येशवंत उपयोगीं पडले याजमुळें जीवदानही या योगांनीं ऐवजाचा सक्त तगादा होऊं देवूं नये. नारो सखाराम याचे मनांत कसेंही करून नारायण येशवंत यांसी घालवावें याजवरून आपासाहेब वगैरे लोकांस समजावून चंद्रपुरास नारायण येशवंत याजला नेऊन कैदेंत ठेविलें; त्याजवर सन १२२६चे सालीं खंडो गोविंद यांनीं खंडो मुकुंद याजला पंतप्रधानाकडून घेऊन नागपुरास ठेवून आपासाहेबांची भेट नागो त्रिंबक यांनीं करवून तिकडील प्रकार समजावून खंडो मुकुंद याजवर लोभ केला. तेही चार दिवस नागपुरीं होते. खंडो मुकुंद आपले घरास वराडांत नांदगावास निरोप घेवून गेले. नागो त्रिंबक यांनीं आपले मनांत कांहीं अंदेशा करावा कीं, आमचे हातांनीं अवल गोष्ट कोणती व कारणें काय करितों, यांतून दोस्ताचे मनांत काय

१. दुटप्पी, धरसोडीची. २. कबज्यांत, ताब्यांत.

येईल हा अंदेशा ज्या मनुष्यांत नाहीं त्याची तारीफ काय लिहावी; पंतप्रधान याजला शेगल्याचे प्रकरणावरून पोटांत अंग्रेज बहादुरांचें वैषम्य येऊन आंतील बेतांनीं बिघाडीचा नक्षा मनांत धरून, जमीयेत गोखले याजकडून करवून सिंदे होळकर यांजकडेस लिखावट सुरू करून भोसल्यांचें संधान उभयतां सरदारांचे संधानाचे द्वारें मळन केली. सदर्हू दुःख विचार तैशांत खंडो गोविंद नागपुराहून नागो त्रिंबक यानीं मिस्तर जेंकीन साहेब याची चलाखी मिस्तर अल्फिस्टन साहेब बहादूर यासी सेनासाहेबांचे पदाचीं वस्त्रें पंतप्रधान याजपासून देवविण्याचे उद्योगाची घेऊन रवाना केलें. जेंकीन साहेब बहादूर यांनीं याचे चालीचा प्रकार मनांत ठेवून सक्ती दिली. आपलेकडून दोस्तींत तफावत दिसूं दिला नाहीं. इकडेस आपासाहेब व रामचंद्र वाघ व नारो सखाराम व मनभट यांचा मनसुबा ठहरला कीं, गुजाबादादावर दंगा करावा. यास्तव आपासाहेबांस हिंगणघाटास[1] जाण्याची मसलत दिली. पाठीमागें हें कृत्य करावें सबब आपासाहेब हे हिंगणघाटास गेले तों हें वर्तमान बातमीद्वारें मिस्तर जेंकीन साहेबांस कळलेंच होतें, व गुजाबादादा यांनींही आपलेकडून सावधता ठेविली होती, याजवरून साहेब मवसुफांकडोन गुंडो लक्षुमण, नागो त्रिंबक यांजकडेस येवून बोलले कीं, गुजाबादादा तुमचे जवळ येऊन राहिले आहेत; त्यांजवर दंग्याचा विचार होणार असें ऐकितों; त्यास ऐसें समजल्यास येविशींचा जबाब कंपनीचे सरकारांत द्यावा लागेल, येविशीं तुम्हीं आपासाहेबांस लिहून बंदोबस्त करणें तैसा करावा, तेव्हां मशारनिलेनीं रामचंद्र वाघ यासी कळविलें. त्यांनीं व यांनीं मिळून माधवराव नीळकंठ याची रवानगी आपासाहेबांकडेस येविशींचे इतल्यास केली. आपासाहेबांसमागम नारो सखाराम होते त्यांनीं हें वर्तमान ऐकून माधवराव नीळकंठ याजला पर्यायाचे पोटीं सांगितलें आणि रवाना करून दिल्हें, आणि मनांत विचार आपासाहेबांनीं केला कीं, गुजाबादादावर आतां आपले ताल[2] पटत नाहींत याजविशीं अंग्रेज बोलले तेव्हां दादाचा पक्ष बाबासाहेब राजकारण पुढें बळावेल, कैसे करावें, ऐसें म्हणून आपासाहेब हिंगणघाटावरून कूच करून चंद्रपुरास गेले. नागपूर मुकामीं बाबासाहेब जुने हवेलींत त्याजपाशीं बंदोबस्त चौकी पाहऱ्याचा आपा साहेबांचा व मामलती बंदोबस्ताचे कामीं महमद सिदक अलीखान व कारपरदाज नागो त्रिंबक व रामचंद्र वाघ व मनभट ऐसे होते. आपासाहेब चंद्रपुरांत असतां खान मशारनिलेस पत्रें आलीं कीं महताबखान यांनीं नागपुरास न राहून त्याजला ताकीद करून यांनीं जावें; ते धर्माजी भोसले यांचे मनांतील हें समजोन खान मशारनिल्हे महताबखानास ताकीद करून काढून दिलें. बाळासाहेब नागपूर मुकामीं शरीरानें चांगले असतां, येलाबे[3] सन १२२६ चे सालीं माघशुद्ध पौर्णिमेस देह अवसान पावले. हें वर्तमान हवेलींत मातोश्री बाकाबाई व पार्वतीबाई सौभाग्यवती काशीबाई असतां

---

१. हिंगणघाट हें शहर वर्धा जिल्ह्यांत व्यापारासाठीं प्रस्तुत प्रख्यात आहे. २. आपला पगडा पडत नाहीं. ३. एकाएकीं, अकस्मात्.

तेथून तशाच निघून नवे हवेलींत बाळासाहेबांजवळ येऊन पोहोचले. त्यांचा विचार तैसा पाहिला. त्या शोकास पार राहिलाच नाहीं. सर्वत्र मुत्सद्दीसहित समान जाला. सर्वांनी आश्चर्य केलें कीं, हें एकवेला कैसें जालें. त्या प्रसंगास गुंडो लक्ष्मणही आले होते. काशीबाईनीं सहगमनाचा विचार करून तयार जाली. बाळासाहेबांचें दहन बाबासाहेबांचे देवालयाजवळ केलें. तेथेंच सौभाग्यवती काशीताई सती निघाल्या; हें वर्तमान आपासाहेबांस चंद्रपुरास समजलें. तें त्यांनीं ऐकून बाबासाहेबांचा बहुत शोक केला. तैसेच निघोन अशौचांतच नागपुरास आले. बाबासाहेबांचें क्रियाकर्मांतर भोसल्याकडून करविलें. राजश्री गुजाबादादा यांनीं बाबासाहेबांचा ऐसा विचार पाहून आपले ठिकाणीं योजिलें कीं, आतां येथें राहणें सल्ला नाहीं. हें समजोन आपले जातीचे लोकांत हुशारी करून बंदोबस्तच ठेविला होता, व आपासाहेबांकडील बाहेरून बंदोबस्त असतां दादानें नामर्द व ऐसा प्रसंग जाणून एके दिवशीं दोन प्रहर रात्रीस आपले लोकांसहित कमरबंदी[1] करून, जैसें घडेल तैसें घडो, ऐसे संकल्पांनीं राहिले. जाग्यावरून कजागीचे पोटीं आपले जमावासहित तयारीनें निघोन श्रीधर लक्ष्मुमण याचे देवालयाचे नगारखान्यावरून भंडार दरवाज्यावरून पायउतारेंच अयाचितबावाचें घरास जाऊन तेथें दर्शन करून व्यंकटेशाचे देवालयाजवळून हंसापुरींत उतरून तेथून सिताबर्डीवर मिस्तर जेंकीन साहेबबहादूर यांजकडेस गेले. निंबाजी हलकारा याजबरोबर साहेबांस सलाम सांगोन पाठविला. तेव्हां साहेबांनीं डेरे वगैरे देऊन आपणाजवळ ठेविलें. हें वर्तमान आपासाहेबांनीं ऐकून स्तब्ध जाले; तेव्हां क्षुल्लक माणसांनीं समजाविलें कीं, दादाचा आपला विचार ऐसा असतां साहेब लोकांनीं त्यासी पास[2] केली. हें पोटांतच ठेवून जेंकिन साहेब यासीं बोलणें घातलें कीं, आमची आपली दोस्ती असतां आमचे घरांतील विचार ऐसा आपण बगलेंत ठेविला, त्याजला आमचे स्वाधीन करावें. हें साहेब नौकर लोकांनीं ऐकून आपलेकडून यांत वैगुण्य ठेवूं नये हें समजोन उत्तरें केलीं, गुजाबादादांची व मिस्तर जेंकीन साहेब बहादूर यांची भेट घडून परस्परें बोलण्याचे प्रकार घडून दादांची रवानगी प्रयागास करण्याचा विचार ठरून रवानगी करून दिली. नंतर पलटणचे लोकांचे माहावारीचें बोलणें सुरू जालें व हुसंगाबादेचा किल्ला व पांच हजार फौज पलटणासमागमें देण्याचें पेंढारी वगैरे पारपत्याबद्दल जालेंच होतें, याजवरून नारो सखाराम यांजकडून फौजेचा जमाव नवीन कलम येशवंतरावपंतांनीं यासी त्या कामांत घालून रंगारी तळ्यावर तो जमाव उतरविलाच होता व अंग्रेजास फौज नागपुरचे पश्चिमेस उतरविली होती ती दाखविली. इकडेस नारो सखाराम यांनीं आपासाहेबास नानाप्रकारचे बुद्धिवाद करून शिंदे होळकर यांजकडील मनस्वी वर्तमान सांगावें कीं अंग्रेज बहादुरावर आपआपले ठिकाणास बोलबोलवा करून जेथील तेथें पुरवावें. हा बेत पक्का पंतप्रधानासुद्धां ठरला आहे, आपण त्यास अनुकुळ झाला; त्याचा संतोष त्याजला बहुत जाला. अनुभवच मात्र दिसाव-

1. तयारी. 2. आश्रय दिला. जाण्यायेण्याची परवानगी दिली.

याचा आहे हें समजावून आपले हातचा जमाव जमविला व अंग्रेज साहेबांचे संधानीं पंडितजी व नागो त्रिंबक हे दोघेही अलग केले व गुजाबादादा तरी त्या पक्षांत सिरले तेही गेले, रामचंद्र वाघ व आपली एक मिळण आहेच. महमद सिदक अलीखान केलेला मनुष्य, बापू साहेबांचे हाताखालीं वागलेला व सांप्रत आपासाहेबांचे लोभांत कामकाज करून हें पाहून याजला खालीं करावें हे मंत्र योजिले. आणि रामचंद्र वाघ याजकडून आपासाहेबांस समजाविलें, सिदकअलीखान याजवर आपला लोभ आणि हे अंग्रेजांसीं संधान ठेवून वर्तमान समजावितात आणि आपणास तों मसलत मोठी करणें, तेव्हां या गोष्टीचा बंदोबस्त जरूर करावा. नाहीं म्हटल्यास सुभेदार नाईक निंबाळकर व बाळकृष्णपंत बाळाजी कुंजरांचे पदरचा, याचें जाणें येणें सिताबर्डीस त्यास सिदकआलीखानाचे चालीचें वर्तमान पंताचे मुखें ऐकावें, तैशांत निंबाळकरांनींही व पंत मजकुरांनीं मनस्वी गोष्टी रामचंद्र वाघ व नारायण सखाराम यासी दर्शवून त्याचे लोभांत सिरले. यास्तव या उभयतांनीं त्या उभयतांचें बोलणें व सांगणें प्रमाणयुक्त ऐसें आपासाहेबांस भासवावें, हें समजोन खानमशारनिलवर आपासाहेबांनीं अनास्था करवून याजला अंग्रेजांस फौज दाखवावयाचें निमित्यें फौजेंत नेवून कैद केलें. त्यांचे घरची चीजवस्त वगैरे लुटून आणावी हा बेत, परंतु यांचे भाऊबंद वगैरे जमाव घरीं होता, यास्तव घरावर ताल पटलें नाहीं. तेव्हां देण्याघेण्याचे मार्गावर गोष्ट आली व खानमशारनिल्हेनीं काबू जाणून आपले हुरमतीचा बचाव समजोन घरची चीजवस्त व दागिने वगैरे आणोन देविले ते नारो सखाराम यांचे विद्यमाने गेले. ऐसे रितीनें सिदक अलीखान यास तजवीज करून कामांतून काढून घरीं बसविलें. रामचंद्र वाघ व नारो सखाराम आपासाहेबांजवळ पेश झाले. मसलत सुभेदार नाईक निंबाळकर व बाळकृष्णपंत ऐसे लहान माणसांचे बुद्धीच्या सुरू जाल्या. फौजेचा भरणा भारी जाला. याचे खर्चाची सरभराई अंग्रेजांस महावारीचा[1] ऐवज देणें, यास्तव घरांतील वस्तवानी वगैरे मोडतोड सुरू केली. शेवट कारभारी यांनीं मसलत दिल्ही कीं, आपल्यास मोठा व्यूह करणें यासी रुपया पाहिजे व पुढें मसलत कोठपावेतों लांबती, आजपावेतों सर्वांनीं या दौलतीचें अन्न खाल्लें आहे, तेव्हां या प्रसंगास सर्वत्रांनीं चार रुपये अनुकूळ व्हावे, ऐसी योजना करून, पटी देण्यास मनभट यास नेमून तगादे सुरू केले, मनमाने तैसे उपसर्ग लाविले; येणेंकडून एकच हाहाकार जाला. पुण्यास खंडो गोविंद सेनासाहेबांचे पदाचे वस्त्राकरितां गेले होते. त्यांनीं आल्फिष्टीन-साहेबांस चकती पावती करून त्याजकडून बोलाविलें व आंतून बाजीराव पंतप्रधान याचा व आपासाहेबांचे मिळणीचा एक विचार समजोन पंतप्रधानांनीं, परसोजी भोसले सेनासाहेबांचे पुत्र, त्याचा तो काळ जाला, हें समजोन व त्याचे पोटीं संतान नाहीं; आपासाहेब सेनाधुरंधराचे पुत्र, परंतु सेनासाहेबास अवलाद नसतां अधिकारी जाणोन आपासाहेबास सेनासाहेबांचे पदाचीं वस्त्रें व जरीपटका व जवाहीर समवेत खंडो गोविंद

---

१. महावारी = माहेवारी = महिन्याची ठरलेली रकम.

याचे स्वाधीन केलें; तें मशारनिले घेवून नागपुरास आले. पंतप्रधान यांनीं विचार केला कीं, त्रिंबकजी डेंगळे जमीयेतसहित आहेत; यासीं आंग्रेजासी लढाई होते आहे. तो हस्तगत होत नाहीं. जवामर्द आहे. तैशांत सिंदे होळकर भोंसल्यासुद्धां आपला एक मनसबा जाला; लढाई जागजगां सुरू होण्यास शंका नाहीं, हें समजोन गोखले वगैरे जमाव पुण्यास होताच त्यांची तयारी करून आल्फिष्टोनसाहेब बेटावरी असतां त्याजवर चालून जाऊन लढाई जाली; आंग्रेज लोक हिंमतवान, जवामर्द, कजाक थोडका जमाव जवळ असतां आपल्यास सांभाळून काबूची जागा पाहून मजबुतीनें राहून चहूंकडून पलटणें आपले कुमकेस बोलाविली. या रितीनें तिकडेस बलवा[1] झाला हें वर्तमान जेंकीन्‌-साहेबांस समजलें असतां त्यांनीं आपासाहेबांस सांगून पाठविलें कीं, पंतप्रधानांनीं ही गोष्ट फारच चुकून केली. त्याचा बंदोबस्त साहेब थोडकेच दिवसांत करतील. ऐसें कळलें असतां इकडेस खंडो गोविंद नागपुरास आलियावर आपासाहेबांचे जवळचे मुखत्यार कार-भारी यांनीं अव्वल मसलत योजिलीच होती, पुण्याकडीलही वर्तमान समजलें व आपलेंही वर्तमान पुण्यास समजावें याजकरितां वस्त्रग्रहण करून पुढें जो विचार करणें तो करावा ऐसा सिद्धांत ठरवून, फौजेचा जमाव सक्करदऱ्याचे[2] मैदानांत डेरे देऊन उतरविला व आरब तोफा सिताबरडीचे पोटांत ठेविल्या. नंतर सुमुहूर्त पाहून वस्त्रें यावीं हा विचार करून कार्तिक वद्य तृतीया सन १२२७ सालीं जुने हवेलींत समारंभ करून व जरीपटका उभा करून देवाचें दर्शन घेवून कचेरींत वस्त्रें घेण्यास आले; सर्वत्र मुत्सदी व मानकरी यांसहित दरबार जाला. व नरसिंगराव बल्लाळ व केशवराव व्यंकटेश व आनंदराव बाबू-राव आदिकरून नागो त्रिंबक व रामचंद्र वाघ व नारायण सखाराम यांनीं जमाव करून वस्त्रें घ्यावीं, या संधींत सिताबरडीवर मिस्तर जेंकीनसाहेबांस[3] शुका लिहून पाठविला; त्यांनीं जबाब लिहून पाठविला कीं, या वेळेस पंतप्रधान यांचा व आमचा बिघाड जाला; तुम्ही वस्त्रें घेऊं नयेत; आमचें येणें होत नाहीं. हा जबाव येण्यापूर्वीच आपासाहेबांनीं पंतप्रधानाकडील सेनासाहेबीचे पदाचीं वस्त्रें घेतलीं आणि तैसेच देवघरांत जावून देवाचें दर्शन घेवून तीं वस्त्रें आंगावरून काढून दुसरा पोषाख घेतला आणि जरीपटक्यासुद्धां सक्करदऱ्यावर जाबून फौजेंत उतरले. आठ दहा दिवस तेथें राहून प्रभावतीचा नक्षा करण्याचा विचार ठरविला. जेंकीनसाहेबांनीं आपले जागां याचा विचार पाहिला कीं, यांनीं आपलें सांगणें न ऐकितां फौजेंत जाऊन बाहेर वस्त्रें घेवून राहिले; पंत-प्रधान यांचे चालीवरून यांचे पोटांत कृत्रिम आलें; हे दगा करतील, याजवरून गुंडो लक्ष्मण याजसमागमें आपासाहेबांकडेस सांगून पाठविलें कीं, तुमची आमची दोस्ती, तैशांत तुम्ही फौज जमा करून आमसीं दोस्तींत उणें पाडूं पाहतां हें ठीक नाहीं. बाजीराव पंतप्रधान यांसीं आमसी बिघाड होवून लढाई जाली. भरवंशावर जावूं नये. थोडके रोजांत

---

१. बळकटी. २. हें ठिकाण नागपुरानजीक आहे. ३. चिठ्ठी, पत्र.

तुम्हांस समजेल कीं, त्याचें पारपत्य जालें, आमसीं तुमशीं जैशी दोस्ती जाली आहे,
तैशीच असावी, यांत तुमचें कल्याण आहे. तुमचें चित्तांत दुसरा प्रकार असल्यास आम्हांस
समजों द्यावें, आम्ही वकील आहों, येथून जाऊं; याजवर तुम्ही दग्याचे गोष्ट कराल
तरी येविशींचा जबाब कंपनींत करावा लागेल. हें आपासाहेबीं ऐकून पहानेंगिरी (?)
खातरजमेनी बोलले, आम्हांस दोस्ती तोडावयाची नाहीं, आम्ही जेंकीनसाहेबांस थोरले भाऊ
म्हटलें, तेव्हां ऐसें कैसें घडेल? त्याजवरून गुंडो लक्ष्मण बोलले कीं, ऐसें बोलण्यास आम्हा-
समागमें कोण्ही द्यावें, यावरून नारायण पंडित व नारायण नागरे समागमें दिल्हे. याप्रमाणें
कार्तिक वद्य त्रितीयेचे रोजीं सायंकाळीं जालें. गुंडो लक्ष्मणाबरोबर उभयतां सिताबर्डीवर
गेले; हे जाऊन बोलत असतां येकीकडेस आरब सिताबर्डीखालीं होते. तेथें अंग्रेजांचा बिकट
पाहारा होता; यांशीं त्यांशीं गांठ पडून रामचंद्र वाघ व नारायण सखाराम यांचे इशारा-
वरून लांब हात होवून तोफा सुरू जाल्या. तो जेंकीनसाहेब उभयतांसीं बोलले कीं, तुम्ही
बोलावयास काय आलां, आणखी तोफा सुरू कैशा जाल्या; येविशीं तुमचे खाविंदांनीं
विचार कैसा केला, तेव्हां नागरे बोलले कीं, मी समाचार घेवून येतों; ऐसें बोलून तेथून
निघोन आले. नारायणराव बहादुर मवसुफांजवळच राहिले. चार प्रहर रात्र तोफ सुरू
जाली. प्रातःकाळचे समयास रामचंद्र वाघ व नारो सखाराम या उभयतांनीं सिताबर्डीवर
झाडून अरबांच्या फौजेनिशीं हल्ला केला. सौथबी[1] साहेब ते रोजीं कामास आले. तिसरा
प्रहरपावेतों लढाई सुरू राहिली. हल्ला केली असतां मिस्तर जेंकीनसाहेब हिंमतवान जवा-
मर्द दूरदर्शी यांनीं युक्तीचे पोटीं आपल्यास बचावून याजकडील तुरप[2] यांनीं चालून
वाघ व नारो सखाराम यांचा हल्ला फिरविला. तळयाचे पोटीं तोफ सिताबर्डीनजीक जाऊन
पोहोंचली होती, त्या तोफेपावेतों तुरप चालून तोफेंत खिळा ठोकिला. आंग्रेजाची सरसी
होवून आपासाहेबाची फौज पिच्छेहाठ जाली. त्या संधीत पंडितजी जेंकीनसाहेबाकडून
आपासाहेबांकडे येऊन उभयतां येकांत जाला. आणि पंडितजीचे सांगितल्याप्रमाणें समे-
टीचा मोहरा घालून ज्यांत बहादुर मवसुफाची खातरजमा होय ऐसे रीतीनें दस्तऐवज
लिहून पुन्हा पंडितांस सिताबर्डीवर पाठविलें, आणि जाऊन आज्ञेप्रमाणें खातरजमापूर्वक
बोलले, यास्तव दोहींकडील जमाव समेटले गेले. लढाई मवकुफ जाली. अंग्रेज बहादुर
यांचा पल्ला भारी. त्यांनीं सबर खाऊन आजचें करणें पुढें घालून आंतील बेतांनीं पलटणें
वराडाहून व हुसेंगाबादेहून बोलाविलें. इकडेस आपासाहेब यांजकडेस फौज सक्करदऱ्याचे
मैदानांत राहून आपण जातीनें हवेलींत आले. येवढें होण्यास कारण नारो सखाराम
यांनीं सिंदे, होळकर यासुद्धां एक समयास ऐसा प्रकार होतो. त्यांत पंतप्रधान याजकडील
नमुदी दिसली; याजवरून आपासाहेब आतुर होवून ऐसें केलें. होळकराकडीलही आपा-

---

१. सौथबी हा रेसिडेंटाचा फर्स्ट आसस्टन्ट होता, तो मरण पावला. २. Troop
या शब्दाचा अपभ्रंश.

साहेबांप्रमाणें विचार होवून तीही दौलत तैशीच जाली. एक दौलतराव शिंदे अलीजा-बहादूर यांनीं मात्र अंग्रेजांसी चोहूंकडील आबदाब पाहून आपला स्नेह राखून दोस्ती चालीवली. मिस्तर जेंकीनसाहेब याजकडील पलटणें कर्णेल गिटमन् साहेब व कर्णेल स्कॉटसाहेब सिताबर्डीवर येवून पोहोंचले. नंतर मिस्तर जेंकीनसाहेब याजकडून विनायक आनंदराव आपासाहेबाकडेस येवून बोलले कीं आम्हांकडून तुमसी दुसरा प्रकार न होतां जें तुमचे उचितास आलें तें तुम्ही केलें. आतां तुम्ही जातीनें आम्हांजवळ यावें म्हणजे आमचे मनांतील तुम्हांविशीं अंदेशा राहणार नाहीं. हें आपासाहेबांनीं ऐकून उत्तर केलें कीं, येण्याचा निश्चय सांगून पाठविला, परंतु तुम्ही ब्राह्मण आहां; सत्य बोलावें; मी तेथें आलों असतां कांहीं दगा तो नाहीं. तेव्हां मशारनिलेनी खातरजमापूर्वक विनंती केली. याजवर आपासाहेब इमानाविशीं बोलले, तेव्हां परस्परें इमानपूर्वक संभाषण जालें. याजववरून आपासाहेब घोड्यावर बसून विनायक आनंदराव[1] याजसमागमेंच सिताबर्डीवर गेले. मागोन रामचंद्र वाघही गेले. तेथें पोहोंचलियावरि जेंकीन्साहेबीं आपासाहेबांस आपणाजवळ ठेविलें. तेव्हां दपिटीन[2] साहेब याचें बोलणें पडलें कीं, राजेसाहेब आपले, परंतु त्याची फौज व तोफा तोंडावर आहेत; त्यास तुमची आमची दोस्ती, व राजेसाहेब निखालसपणानीं आले. तेव्हां फौज आमचे तोंडावरून माघारे जावी, व तोफा आमचे स्वाधीन व्हाव्या. याजवरून आपासाहेबांनीं रामचंद्र वाघ यासी तोफा देण्याविशीं व फौजेसमोरून दूर करवण्याकरितां पाठविलें. मशारनिले फौजेंत येऊन पोहोंचतांच तोफा न्यावयास दपटिन साहेबाकडील लैन व तुरप स्वार आले. रामचंद्र वाघ याचे तोफखान्यांत कोणी न मानितां तोफ[3] सुरू केली. ते वेळेस दपटिन साहेब व जेंकीन्साहेब व आपासाहेब व पंडतजी व नागोबा त्रिंबक एक जागां बसले असतां तोफेचे पांच गोळे दपटिन साहेबीं ऐकून बोलले कीं, येथून वाघ गेले असतां हें कैसें जालें? ऐसें म्हणोन दपटिन साहेब तेथून उठून पलटणें व तुर्पस्वारास-हित स्कॉट साहेबाचे जमीयेतसुद्धां आपासाहेबांचे फौजवर चालून येवून तोफखान्याजवळ आले; तेथें गुलामहैदरबक्ष वगैरे फौजेचा जमाव होता. यानीं पलटण येतां पाहून जागा सोडून निघाले; पलटणानीं यागोजी पासऱ्याकडील तोफखाना हस्तगत करून [4]गणपतराव विठ्ठल सुभेदार याजवर चालून घेतलें; तेव्हां सुभेदारांनीं तोफखाना सुरू केला. तोफेचा गोळा टाकून आतां पलटणें उभीं पाहून तुर्पस्वार तोफखान्यावर चालून गेले. तेथें फल केला. याजमुळें सुभेदार उधळून गेले. तोही तोफखाना रामचंद्र वाघ याजकडील जमियेत बजरंगबागाजवळ होती, त्या जमीयेतींत नारो सखाराम व सखाराम रोडाजी

---

१. विनायक आनन्दराव याजविषयीं आपासाहेबांच्या पोंवाड्यांत पुढील उल्लेख आहे—"मला आण पित्याची गाईचें पुच्छ धरून। क्रिया केली ब्राह्मणानें!"
२. Dobdin. ३. ता० १६ डिसेंबर रोजीं ह्या लढाईस आरंभ झाला. ४. याचें उपनांव परांजपे याचे वंशज नागपुरीं 'सुभेदार' या नांवानेंच प्रसिद्ध आहेत.

होता याजवर पलटणानीं जावून तोही जमाव उधळून दिल्हा. तोफा हस्तगत केल्या. ऐसें रितीनें फौज तारपतार रामटेंक भानार आंभोरेपावेतों निघून गेली. दपटिन साहेबीं आपासाहेबांचे फौजेचा तळ घेवून बजरंगबागांत तीन मुक्काम केले. आरब लोक शहरांत शिरून शहरचा बंदोबस्त केला. कोणी नांवधारी असावें हें समजून व मनभट गेला नाहीं, शहरांतच आहे यास्तव त्याचा शोध करून त्याजला आपले दस्तीं आणोन जवळच सरकार हवेलींत आरबानी ठेविलें, व आपाजी आनंदराव याजला आणून त्याजलाही आपणाजवळ ठेवून घेतलें; आणि आरब लोकांनीं नागपूर शहरचा बंदोबस्त जागजागीं नाकेबंदी वकील याचे दरवाज्याचे वगैरे बंदोबस्ती केली. यापूर्वी सरकार हवेलींतील दरोबस्त जनानखाना आपासाहेबीं बाहेर नेवून भानारियास[1] रवाना करून दिल्हा. जेंकीन् साहेबाचे चित्तांत आपासाहेबांचें फौजेचा विचार तैसा जाला, तोफखाना आपले दस्तीं आले. पुढें एखादा पक्केपणा आपासाहेबांजवळून करून घेवून याजला हवेलींत दाखल करावें तो अरबांनीं शहरच बळाविलें, हें आंग्रेजांनीं पाहून अगोदर अरबाकडेस आपासाहेबांस सांगोन पाठविलें. तें आरबानीं न मानिलें याजवरून सुकरवार[2] तळ्याकडून व भुतादरवाज्या[2] व तुलसीबागाची खिडकी या लेखावरून मोर्चेबंदी पलटणाची करून तोफा बाहेरून आंग्रेजांनीं सुरू केल्या. सात रोज मोर्च्याची लगट जाली. आरब लोकही जवामर्द किल्ला सोडून बाहेर निघाले. लढाई व्हावी ऐसे चालले असतां सातवे रोजीं तुलसीबागाकडून आंग्रेजांनीं हल्ला केला, बाग घेऊन आंत आले, तेथें आरब जावून हातभिडनी जाली, याजवरून हल्ला मागें हटला व आरबही आपले मकाणास आले; तेव्हां आरबांनीं आपले जागां विचार केला कीं, आपला खाविंद परदस्तीं[3] गुंतला, आपण कोण्हाचे भरोंशावर लढावें, आंग्रेज जबरदस्त, याचा पिच्छा भारी, तैशांत आपले शिपाईगिरीचा विचार तोही सर्व पाहिला, आतां समेट जाली असतांच चांगलें, हें मनांत आणून महंमद सिदक आलीखान व येशवंत राव रामचंद्र याजकडेस आरबांनीं सूत्र लाविलें. आम्ही चाकर, धनी त्याचे जबेत, आम्ही आपली शिपाईगिरी करणें ती केली, आतां आमची तलब[4] आम्हांस मिळून आम्ही हुरमतीनें[5] जाऊं ऐसे करावें, हें न झाल्यास हुरमती करितां प्राण देऊं, याजवरून खाविंद आपासाहेब सिताबर्डीस समजोन येशवंतराव रामचंद्र व महंमद सिदक आलीखान सिताबर्डीवर जाऊन मिस्तर जेंकीन् साहेबाची भेट घेतली. तेथें आरबाचा जिकर जाल्यावरून यांनींही सविस्तर आरबाचें बोलणें याचे भावें सांगितलें. दुसरे दिवशीं गंगाधर राव माधव चिटनवीसही सिताबर्डीस गेले. नंतर सर्वत्र मुत्सद्दीमंडळ गेले. तेथें मिस्तर जेंकीनसाहेब बहादूर यांची भेट घेऊन आपासाहेबांची भेट जाली आणि तेथें सर्वत्र मुक्काम करून राहिले. आरबाचें बोलणेंचालणें महमद सिदक आलीखान याचे हातून

---

१. भंडारा येथें. २. हीं स्थळें नागपुरांत प्रसिद्ध आहेत. ३. दुसऱ्याच्या ताब्यांत. ४. पगार. ५. अब्रु. ' हुर्मतिर्मान उच्यते " रा. व्य. को. श्लो. २७२.

जेंकीन्‌साहेबाजवळ सुरू जालें; आरबाची तलब देण्याचा व हुरमतीनें त्याचें जाणें व्हावें येविशींचा निश्चय ठरला, याजवरून आरबाची तलबेचे ऐवजाची तजवीजही केली व आपासाहेब यासी साहेब मवसुफानी बोलणें घातलें कीं, आम्हांकडून दोस्तींत तफावत नसतां आणून ऐसें केलें. हिंमतीचे योगानीं जें होणें तें जालें; तुम्हांस पलटणाचे महावारीचा ऐवज देण्यास अवघड पडतें, व पलटणासमागमें पांच हजार फौज मदतीस ध्यावी, त्या फौजेचा आकाराचा रुपया जो होईल तो ऐसा सदर रुपया आकारेल त्याचा प्रांत आम्हांस तोडून देणें. हें बोलणें आपासाहेबीं ऐकून नागो त्रिंबक व रामचंद्र वाघ वगैरे एक विचारें होऊन जेंकीनसाहेबाचे समाधान राखावें व सफाई करावें, यास्तव त्यांचें बोलणें ज्याप्रमाणें प्रांत रेवा उत्तरतीर जबलपूर व [ मूल प्रतींत कांहीं अक्षरें नाहींत ] व गडामंडळा व रेवा दक्षणतीरचे वैंगड सिवनी, हुसेंगाबाद सिवणी छपार व मूलतापी वरघाट व भोवरगड व किल्ले नरनाला व गाविलगड बेचव लक्षाचे महाल आकोट वगैरे सुद्धां दरोबस्त लिहून दिल्हे. राहतांना खालसा नागपूर प्रांत देवगड जिल्हा हरली वगैरे व चंद्रपूर व छत्तीसगड अडपली, लाजी वगैरे महालासुद्धां खालशांत राहिले. हें झाल्यावर आरबांस ऐवज दिल्हा. तेव्हां त्याचें म्हणणें पडलें कीं, हुरमत आमची जाणें या वेळेस घडावें, मार्गांत आंग्रेजी फौजा; याजवरून दोघे आरब नागपुरास वळींत[1] येवून आरबासमागमें एक साहेब लोक गोरा देऊन खांदेश प्रांतीं जाण्यास रवाना केलें; सक्करदऱ्याचे मुक्कामास गेले; आंग्रेजींत बाहोटा मुहूर्तानें पांचवे घंट्यास शहरांत सिदक आलीखान समागमें पलटणें देवून पाठविले. त्या समयांत दपटिन साहेबाचे मनांत शहरावर आपले पलटणेची माणसें बहुत जाया जालीं; त्यास [2]तसनस शहराची करावी, परंतु मिस्तर जेकीन्‌साहेब बहादुर बहुतच दाणा दूरदर्शी; त्यांनीं सेनासाहेबाचे दोस्तीवर नजर देवून पुढें आपले हातून हें संस्थान चालावें हें मनांत धरून शहरास धक्का न लागूं द्यावा, सर्वांस सरफराज केलें; बाहोटा शहरांत नवे वाड्यांत दाखल केला, आणि दौंडी हेच फिरवली कीं, खिलकित खुदाची, राज्य राजेसाहेबाचें, हुकुम सरकार कुंपीनीचा, ऐसें होवून खुषीच्या तोफा सरकारहवेलीपुढें व सिताबर्डीवर येकवीस जाल्या. बाहोटे दाखल झाले. सिताबर्डीवरून जेंकिनसाहेबांनी पाहून बहुतच संतोष पावले, आणि नंतर आपासाहेबांस बहादुर मवसुफानीं जातीनें समागमें येऊन हवेलींत सन १२२७ चे सालीं पौषमासीं शुद्ध पंचेमीस दाखल केलें. आणि कुंपनीचा बंदोबस्त हवेलीचा ठेविला; कारण पुणें प्रांतीं बाजीराव पंतप्रधान यांनीं फौजेचा जमाव करून सातारेकर महाराजास आपले जवळ आणून आंग्रेज बहादुर यासी लढाईचा मोहरा घालून जंग सुरू केला; गोखले मारले पडले, बहादुर मवसुफांनीं पंतप्रधानाचे ताले आपणावर पडूं दिल्हे नाहीं; राजास हस्तगत करून पंतप्रधानामागें पलटणें पुण्याकडील व हैदराबादेकडील चहूंकडून पलटणचा भरणा केला; याजमुळें पंतप्रधान जमाव आपलेसहित पलटणाचा शह सोडून निघाले. मिस्तर जेंकीन्‌साहेब याचे दिलांत पंतप्रधान याचा बंदोबस्त जाला असता;

१. ओलीस. २. नाश.

आपासाहेबास आपले जागां त्याचे दौलतीचा संच पदरचे माणसाचा आळा घालून कायमी करावें, हें समजोन जे जे येथील सरदार लढाईचे प्रसंगांत उधळले होते त्यांजला गणपतराव बिट्ठल सुभेदारासहित पत्रेंहि पाठविलीं व मातोश्री बाकाबाई साहेब आदिकरून माणसें भानरियावरून आणोन जुने हवेलींत ठेविलीं, व आपला बाहोटा नवे हवेलीवर नेऊन मेजर मुकेनजी साहेब त्याचे हाताखालीं मिस्तर पीहूसाहेब यासी ठेवून चावडी आदिकरून शहरचा बंदोबस्त केला. तो गणपतराव सुभेदार व नारो सखाराम यांनीं फौजेचा जमाव घेऊन प्रांतांत उपसर्ग देऊन पंतप्रधान यांजकडेस निघोन गेले. त्यांची भेट घेवून पुन्हा फंदाचा विचार उभा केला. पंतप्रधान यांचें येणें फौजेसुद्धां माहुरपटीस आले. दारव्हें भाम जिल्ह्यांत उतरून चंद्रपूरचा किल्ला घेण्याचा मनसुबा केला. येथें रामचंद्र वाघ आ ासाहेबाजवळ त्याचें सूत्र नारो सखाराम याशीं व नारो सखाराम यांनीं पंतप्रधानास आपासाहेबास काढावयास या जिल्ह्यांत घेऊन आले. आपासाहेबाकडेस रामचंद्र वाघ यांनीं घोडीं फेरावयाचे निमित्यें न्यावीं, यानींही पहात असावें, या कल्पनेवरून व बहादुर मवसुफास बातम्या चौहूंकडून समजतच होत्या व त्याचा बंदोबस्त आपासाहेबाजवळ होताच. यातून कैसे काय वर्तमान बातमी गोरे साहेब लोकांस समजलें असेल, याजवरून त्यांनीं आपासाहेब यासी येण्याविशीं निरोप पाठविला. याचें जाणें जालें नाहीं. तेव्हां साहेब लोक पाठवून हवेलींतून काढून मैदानांत घालून गुलाम महंमद मुनसी याचे हवेलींत सिंताबर्डीवर नेवून ठेविले; आणि चौकी पाहऱ्याचा बंदोबस्त केला. नंतर रामचंद्र वाघ व नागो त्रिंबक याजलाही नेवून फंदाच्या चौकशा केल्या. आपासाहेबाकडेस लेकुरपणा जातीनें आंगवण दौलत करण्याचे व बोलण्याचालण्याचे बहुत योग्यता इतकें असतां नादान माणसाचे बुद्धिवादें करून, बुद्धीस फेर पडावा, याजमुळें दौलतीचा ऐसा विचार जाला. परंतु मिस्तर जेंकीन्‌साहेब याचे दिलांत या दौलतीची पास व कळकळ पुढेंही येथील संच करावा हेंच मनांत ठेवून चौकशांचे पोटीं ज्या ज्या बातम्या समजल्या होत्या त्यांच्या तनक्या करूं लागले. हें समजोन बहादुर मवसुफांनीं विचार केला कीं आपासाहेबाचे बुद्धीस भलताच भ्रंश करितो; त्याच ख्यालीं हे लागतात. न जाणों कोणे वेळेस कोणता ख्याल चित्तांत आणितील; चार रोज डव्हळयाचे[1] दिवस आहेत. या समयांत यांचे राहणें येथें सल्हा नाहीं. त्या संधींत बाजीराव पंतप्रधान वसिष्ठा दक्षिणतीर राळेगांव नाचनगांव या सुमारें फौजेसुद्धां आले. तैशांत आपासाहेबाचे कारकिर्दींत महिपतराव घाटगे चंद्रपूरचे बंदोबस्तास होते, तेथून कांहीं कामकाजामुळें बाहेर निघाले असतां अडपलीवाले वगैरे गोंड यांनीं बलवा करून किल्ला घेतला. त्या प्रसंगास घाटग्यास महंमद सीदक आल्लीखान याजकडून बोलवून त्याजला सांगणें तें सांगितलें कीं, तुम्हीं कैसे करून किल्ला आपले हस्तगत करावा, परंतु घाटग्या कडून तैसें अमलांत न आले. यास्तव कर्णेल स्कॉट साहेब बहादुर यांची रवानगी मै पलटणें तोफासहित गोंडाचें पारपत्य व किलयाचें बंदोबस्तास केली. समागमें, जयराम रामचंद्र याजला साहेब

१. धामधूमीचे.

मवसुफाचे आज्ञेवरून नबाबांनीं दिल्हे. पंतप्रधान यांची चाल पाहून जनरेल आदम साहेब बहादुर हुसेंगाबादेस जमीयेतसहित होते त्याजला जेंकीन्साहेबीं बोलावून पंतप्रधानाचे तोंडावर पाठविलें. यांनीं जमीयेतसुद्धां जावून वसिष्ठा दक्षिणतीरासच छापा घालून बाजीराव पंतप्रधान याचें पारपत्य केलें. त्यांची फौज उधळली, तेव्हां पंतप्रधानांनीं चहूं-कडून पलटणाचा बलवा पाहून बेहिंमत होवून अशरीचे सुमारें जनरेल मालकम साहेब बहादुर यांजकडे गेले. गणपतराव विठ्ठल सुभेदार व नारो सखाराम उधळून पुणें प्रांतीं गेले. या दोघांसही आलफिंष्टीन साहेबीं हस्तगत करून कैद केलें. इकडे जेंकीनसाहेबीं आपासाहेबांची रवानगी प्रयागास नागो त्रिंबक व रामचंद्र वाघ यांसहित केली. नागपुरास महंमद सिदक आल्लीखान याजकडन मामलतीचा व जे जे सरकारचे पदरचे आहळेकर व सिल्लेदार मानकरी वगैरे जे येवून हजर जाले यांचे नेमणुकीच्या यादी व खातरजमा वगैरे करविणें ती केली, आणि दौलतीचा संच व आळा घातला. तैशांत आपासाहेब हरई पावेतों जावून अंग्रेजी लोकांत फंद करून पळून पंचमढीचे पहाडांत रात्रौ गेले. ती जागा बिकट बेकाबू धवळागीर महादेव जिल्हा तेथें जावून गोंडाचा जमाव केला. हें वर्तमान नागपुरास बाहदुर मवसुफास समजलें. नागो त्रिंबक व रामचंद्र वाघ हरईवरून पुढें प्रयागास नेवून कैदेंत ठेविलें. आपासाहेब पाहाडांत गेले हें ऐकून पाहाडांतील गोंड वगैरे जमेदार यांसीं इस्तीहार[1] पाठविले. व अंग्रेजी पलटणें साहेबलोक घेऊन गेले. आपासाहेबीं मूलतापी वगैरे जागां फंद केले होतें. तेथलि बंदोबस्त पलटणांनीं करून पुढें पंचमढीचे रूखें गेले. ती जागा बिकट, रस्ता नीट नाहीं, त्या पहाडांत चोहूंकडून पलटणांनीं रस्त्याचा बंदोबस्त करून हस्तगत करण्याचा उद्योग चालविला. इकडेस चंद्रपुरास स्कॉटसाहेब गेलेच होते. या संधींत आपणास साहेबांनीं पंतप्रधानाचें पारपत्य करून चंद्रपुरास तैसेंच जमीयेतसहित जाऊन किल्याभोंवतीं फिरून मोर्च्याचा लाग पाहून मोर्चे लावून किल्याची सफील[2] पाडून हल्ला करून चंद्रपूरचा किल्ला घेतला. गोंड पराभव पावून पळाले. चंद्रपूरची लूट जे सरकार-हवेलींसुद्धां बहुत जाली; करोड रुपयांचा नुकसान गांवचे व सरकारदौलतीचे त्या जागां जालें. नंतर किल्ला किरापट[3] साहेबांचे स्वाधीन करून जरनेल आदम साहेब व स्कॉट-साहेब दोघेही पलटणांसुद्धां आले. किरापट साहेबांनीं लिंगो दिक्षांत [ ? ] हवाखालीं घेवून चंद्रपूर प्रांतांत जे मुफसद फंदी होते त्यांचें पारपत्य करून बंदोबस्त केला; पहाडांतून आपासाहेबांकडून जागजागां फंद चालला; व नागपुरासही कोठें कोठें सूत्रें संधानें होतीं तीं जैसीं समजल्यावरून अमरसिंग राजे सिरके चरंजीवासहित व व्यंकोजी गुजर व नव-लोजी गुजर व कृष्णाजी मोहते याजला जेंकीन्साहेबीं प्रयागास रवाना केलें. मनभट आरबां समागमें नागपुरांतून निघाला तो साहेब मवसुफांचे हस्तगत जाला. त्याजलाही कैदेंत नागपुरास ठेविलें; व प्रांतांत मामलतीचे कामीं केशो गोविंद शेष पाठविले होते.

---

१. जाहीरनामा. २. तटबंदीवरील गच्ची. ३. Crawford.

नंतर त्या प्रांताचे बंदोबस्ताचा जिम्मा मिस्तर आग्नु साहेब बहादूर यांचा जाला. लांजी कामथ या जिल्ह्यांत आपासाहेबांनीं फंद केल्यावरून गोदी पाटलानीं जमियेत केली होती व आमीन कमाविषदार कैद केले, याजवरून जमीयेतसहित पेटलमसाहेब व वलीयेम गारन साहेब व वलकिंसन साहेब यासमागमें फौज देऊन गोदी पाटील याचे पुतण्याचें पारपत्य करून त्या जिल्ह्याचा बंदोबस्त वलकिंसन साहेबीं केला. जे फंदी होते त्यांचें यांनीं पारपत्य केलें. त्या प्रांताचें काम तुम्ही (?) अंभोरे भानारयापासून वालकिंसन साहेब यांचे जिम्मेस जालें. खालसा प्रांत नागपूर जिल्ह्याचा कारभार महंमद सिदक अल्लीखान यांजकडेस असतां कलक्टर कचेरींत मिस्तर आलकजंदर गारन साहेब यांचे जिम्मेस जाली; राजेसाहेबाकडील फौजेचा संच गाहा करावा हें समजोन या फौजेचें रिसालदार सहा ठरविले. त्यांत मऱ्हाष्ट मंडळाचे दोन. एक जैवंतराव सखाराम, दुसरा नारायण बाजी घाटगे, मुसलमान मंडळाचे चार रिसाले, त्यांत एक कादर अल्लीखान, दुसरा गुलाम हैदरखान बक्षी, तिसरा मियासाहेब, चवथा नपीक साहेब ऐसे सहा रिसाले करून याचे पेव्यांत महाराष्ट्र मंडळ मराठी रिसाल्यांत व मुसलमान मंडळ त्या रिसाल्यांत लावून त्यांत गोरे साहेब लोक नेमून हिंगण्याची छावणी केली. खासपागेचा बंदोबस्त गुणाजी सिरके याजकडून करविला. मिस्तर जेंकिनसाहेब बहादूर यांनीं बंदोबस्त करून पुढें सेनासाहेबाचें नांव चालवावें त्यांची आपली बहुत दोस्ती व त्यांनीं कंपनीचे सरकारांत फारच उमेद ठेविली होती व दोस्ती जाल्या दिवसापासन खश बरोबर दुसरें दिसूं दिल्हें नाहीं, तेव्हां आपलेकडून येहसान मद या दौलतीस करावें हेच पासखातर ठेवून श्रीमंत मातोश्री बाकाबाई साहेब यांचे जागां बहुत विश्वास व त्यांसीं बोलण्यांत आणिलें कीं, आम्हांस सेनासाहेबांचें नांव चालून ही गादी कायम करावी, याजकरितां साहेब बनूबाई साहेब यांचे चिरंजीव बाजीराव गुजर याजला कैलासवासी सेनासाहेबांची नांवें ठेवून बाबासाहेब यांची स्त्री मातोश्री दुर्गाबाईचे ओटींत घालून दत्तविधान करावें. मातोश्री साहेबांकडूनही उत्तर हेंच जालें, जे, तुमचा व कैलासवासीचा ऋणानुबंध तैसाच होता. मध्यंतरीं करणारांनीं दौलतीचा ऐसा प्रकार केला, तुम्हास पासखातर या दौलतीची बहुत आहे हें आम्ही पूर्ण समजोन आहों, तेव्हां जें तुम्हास बेहतर तें करावें. ऐसा सर्वत्र मुत्सद्दी पंडितजी व येशवंतराव भवानी व येशवंतराव रामचंद्र व गंगाधरराव माधव चिटनवीस आदीकरून सर्वांचे संमतें निश्चय ठरून राजेश्री व्यंकटराव गुजर यांसी बोलून नंतर सन १२२७ चे आखेरसालीं ज्येष्टमासीं बाजीबा यांसी मसनदनसीन करून नांव रघोजी भोसले सेनासाहेबसुभा ठेविलें; मसनदनसीन होण्याचे दिवशीं सेनासाहेबांचे पदरचे झाडून आहळेकर मुत्सद्दी व सिल्लेदार मानकरी वगैरे सामान जमा करून जेंकीनसाहेब बहादूर येऊन मोठे समारंभें हा विचार केला; बाई साहेबांनीं साहेब महसुफास गुज्याबा दादाचे प्रयागाहून आणवण्याविशीं बोलण्यांत आणिलें. त्यांनींही कबूल केलें. राजेसाहेब मसनदनसीन जाले. सरकार खाजगी हत्ती, घोडे, उंट गाडीखाना व पागा बाग इत्यादि कारखानेयांचा बंदोबस्त खातरखा असावा, उणें कोठें दिसूं नये, हें

समजोन ह्या कामीं मिस्तर जेंकीन गारन साहेब बहादुर नेमस्त जाले. त्यांनीं आपले हाताखालीं बच्याराव रघुनाथ यांसी घेऊन पंडितजीस सांगितलें कीं, आपण बसून बच्याराव यांसी घेऊन करणें तें करीत जावें; ऐसे रीतीनें खाजगीचाही बंदोबस्त जाला. आपासाहेबांस धवलगिरीचे पहाडांत पंचमढीस असतां त्यांनीं चहूंकडून पलटणाचा संचगाहा व रस्ते बंद ऐसा संकटीं विचार जाणून पंचमढीहून पळून पहाडाच्या रस्त्यांनीं अशरीकडेस गेले ऐसें ऐकिले. तेथून कोण्हीकडेस गेले हें पूर्णतेपणें समजलें नाहीं. लांब पल्यास गेले ऐसें ऐकिण्यांत येत आहे; येविशींची बातमी साहेबलोकांजवळ आहेच. राजेश्री गुजाबा दादा यांजला आणण्याविशीं बाईसाहेबांनीं बोलण्यांत आणिलेंच होतें व साहेबलोकांचें अंतःकरणांत दादाविशीं न्याय होताच, हें समजोन दादालाही प्रयागाहून आणविलें. तेही सन १२२७ चे सालीं आश्वीन मासीं नागपुरास येऊन पोहोचले; दादासाहेबाची व साहेबलोकांची भेट घडून बाईसाहेबांची भेट होऊन पुढें राजेसाहेबांचे दौलतीचा आळा चालविला; आपासाहेब पहाडांतून गेल्यावर देवगड जिल्ह्याची कलेक्टर हवेली मोहगांव पासून मिस्टर मनगमरी[1] साहेबांकडेस सांगितली. याप्रमाणें मिस्तर जेंकीनसाहेब बहादुर यांनीं सेनासाहेबांचे दौलतीचे झाडून बंदोबस्त जेथील तेथें करवून दिवसोंदिवस राजेसाहेबांनीं विद्या अभ्यास व घोडे हत्ती याजवर बसणें व शिपाईगिरीचे इलम शिकणें व कचेरी दरबार सर्वत्र मुत्सद्दी यांस घेऊन करणें इत्यादि तालीम दादांस सांगोन जी लौकिकी गोष्ट चांगली ते दसऱ्याचे समारंभ समवेत करून दाखवीत आहेत.

---

**४२५** श्री श. १७४०

(ना. भो. ५५) स. १८१८

याद सदर बंद आलीशान बडे साहेब बहादूर यानीं दप्तरदार यांचा सिलासिला व नेमणुकी यांच्या व त्यास दरख वगैरे कैसे मिळत होते व त्याची नसल कोण कोण व सांप्रत कोण आहेत येविषयींचा तपशीलः--

दिवाण नऊ सेनासाहेबाचे

१ अव्वल कोनेरराम याजकडेस दिवाणगिरीचा कारभार करून "लक्ष्मीकांता" चें निशाण करावें.

२ बाबूराव कोनेर, चितपावन मशारनिलेचे चिरंजीव.

३ दिवाकर पुरुषोत्तम चोरघोडे, ऋग्वेदी ब्राह्मण.

४ भवानी नागनाथ मुनसी, ऋग्वेदी ब्राह्मण.

५ भवानी शिवराम, ऋग्वेदी ब्राह्मण.

६ महिपतराव दिनकर परभु.

७ दिवाकर पुरुषोत्तम चोरघोडे (पुन्हा)

८ भवानी नागनाथ (पुन्हा)

९ श्रीधर लक्ष्मण, ऋग्वेदी ब्राह्मण व कृष्णराव माधव परभु चिटनवीस.

---

९

---

1. Montgommery.

मुजमदार मुजमदारीचें निशाणः—

१ खानगीवर "बहुत काय लिहिणें हे विनंती."

१ ताकिदीवर "बहुत काय लिहिणें"

१ आज्ञापत्रावर "मोर्तबशुद्ध."

१ तैनातजाबत्यावर [जागा कोरी].

—

याप्रमाणें निशाणी मुजमदारीची व वहिवाट जी ज्यांनीं केली त्यांची नांवनिसी बितपसील—

१ अव्वल कोनेरराम, चितपावन ब्राह्मण.

१ बाबूराव कोनेरराम मशारनिलेचे चिरंजीव.

१ रघुनाथ बाबूराव, मशारनिलेचे चिरंजीव.

१ त्रिंबकराव लक्ष्मण, कोनेरराम यांचे नातू.

० नंतर खास सेनासाहेबांनीं निशाण केलें.

—

चिटणीविसी यांचें लिहिण्याचे शिरस्ते व निशाण.

१ खानगी पत्रें व पत्रांचीं उत्तरें लिहून त्यांजवर तारीख.

१ ताकीदपत्र लिहून त्याजवर तारीख बार.

१ आज्ञापत्र लिहून त्याजवर तारीख बार.

१ अभयपत्र, त्याजवर तारीख बार.

१ दस्तकरहादारी व माफी वगैरे याजवर तारीख बार.

—

५

मुधोजी भोसले सेनाधुरंधर याचे तीन.

१ सदाशिव हरि, कऱ्हाडे.

२ रामाजी केशव, ऋग्वेदी ब्राह्मण.

३ महीपतराव दिनकर, परभु.

—

३

साबाजी भोसले यांचे चार

१ महिपतराव नरसिंह, देशस्थ ब्राह्मण.

२ राजारामपंत वाळके, ऋग्वेदी ब्राह्मण.

३ भवानी काळोंजी, ऋग्वेदी ब्राह्मण.

४ भवानी शिवराम, ऋग्वेदी ब्राह्मण.

—

४

बिंबाजी भोसले यांचे दिवाण दोन.

१ धोंडो महादेव, ब्राह्मण माध्यंदिन.

२ महमदखान तरीन मुसाहेबी करून कारभार करीत.

—

२

याप्रमाणें निशाणी व लिहिणें याची वहिवाट ज्यांनीं केली त्याची नांवनिसी—

१ रखमाजी गणेश परभु.

१ चिमाजी रखमांगद परभु मशारनिलेचे चिरंजीव.

१ कृष्णराव माधव परभु.

१ गंगाधरराव माधव परभु.

—

फडणवीसी यांचें लिहिण्याचे शिरस्तेः—

१ जमाखर्च प्रांतांतील कागद घेऊन सदर जमे झडती वगैरे लिहावी.

१ सनदा नवीन लिहिल्यास लिहून त्याजवर तारीख बार करावी.

१ वराता ऐवजाच्या लिहून तारीख करावी.

—

याप्रमाणें लिहिणें व निशान, येविषया बहिवाट ज्यांनीं केली त्यांची नावनिविसी.

१ जिवाजी महादेव* चितपावन व कृष्णराव बळवंत चितपावन यांचे तर्फेनीं होते परंतु दरोबस्त दफ्तरचे लिहिणें वासुदेव + + + शेणवई हेच करून होते.

१ मोरोपंत ऋग्वेदी यांचे चिरंजीव त्रिंबक मोरेश्वर यांचे हाताखालीं मनाजी शामराज.

१ रामचंद्र त्रिंबक मशारनिलेचे चिरंजीव दस्तक आस्ता काम मनाजी शामराज यांणीं केलें.

१ महादजी बल्लाळ लष्करी, ऋग्वेदी ब्राह्मण.

१ महादजी विश्वनाथ पुरनवार ऋग्वेदी.

१ सोमाजी गंगाधर नवरे माध्यंदीन.

१ आनंदराव माधव ऋग्वेदी.

१ जगन्नाथ भोसले, मशारनिलेचे चिरंजीव.

१ उमाजी महादेव ऋग्वेदी ब्राह्मण.

१ विश्वनाथ उमाजी, मशारनिलेचे चिरंजीव.

१ महादजी उमाजी ऋग्वेदी.

१ बाळाजी केशव ऋग्वेदी, उमाजी महादेव याजपासून.

१ जनार्दन बल्लाळ व नारायण काशी मशारनिलेचे चिरंजीव व पुतणे.

१ सिलेखाना याचे पोटांतील जवाहीर खाना, या कामीं उमाजी महादेव याजपासून आलीकडेस या कामीं रामाजी नलिकंठ.

—

१०

बक्षीगिरी--

१ अव्वल व्यंकाजीपंत ऋग्वेदी ब्राह्मण.

१ राघोपंत मशारनिलेचे भाऊ.

१ महीपतराव, व्यंकाजीपंताचे चिरंजीव.

१ भवानी काळो ऋग्वेदी यांचे पुतणे पांडुरंग गणेश.

१ अमृतराव पांडुरंग.

—

५

शिकेनवीसी--

१ अव्वल रघुनाथ भट पटवर्धन चित्तपावन ब्राह्मण.

१ जानराव यशवंत.

४ यशवंतराव देवराव मशारनिलेचे नात. आलीकडेस ज्यास सरकारानीं आज्ञा करावी त्यांनीं करावा.

—

३

—

७

जामदारखानाः—

१ अव्वल शंकराजी रखमाजी परभु.

१ सुंदर बहिराजी परभु मशारनिलेचे पुतणे.

१ बाबूजी भुरे ब्राह्मण ऋग्वेदी मशारनिलेचे मुतालीक.

१ नारो शंकर कऱ्हाडे.

१ बाळाजी नारायण कऱ्हाडे.

—

५

सिलेखानाः--

१ अव्वल शंकराजी रखमाजी परभु.

१ सुंदर बहिरजी परभु, मशारनिलेचे पुतणे.

१ रामचंद्र भोसले.

---

*रघोजी बरोबर आलेल्या मंडळींत हे होते, उपनांव कोण. पहा राजवाडे खंड १०-२००.

खासगी--
१ अव्वल शंकराजी रखमाजी परभु याजपासून त्याचे पुतणे सुंदर बहिराजी व त्याचे नातू बहिराजी सुंदर पावेतों.
१ हुसेनखान.
१ भवानीपंत फौजदार ऋग्वेदी.
१ शिवराम हरि ऋग्वेदी.
१ रामाजी नीलकंठ ऋग्वेदी.
--
५

मुनशीगिरी--
१ अव्वल चिटको, यांचे हाताखालीं हैदरकुली लिहिणार होता.
१ भवानी नागनाथ ऋग्वेदी.
१ श्रीधर लक्ष्मण ऋग्वेदी, हे भवानी नागनाथ यांचे पुतणे.
--
३

---

श्री

४२६

## भोसल्यांच्या लढाया आणि तहनामे

[ १ ] रघोजी ]

( नाभो ४४ )

१२-६-१८२१
श. १७४३ ज्ये. शु. १२

तारीख चंद्र १२ माहे जून सन १८२१ इसवी. साहेब अल्लीशान बहादूर ( रेसिडन्टसाहेब ) यांनीं हुकूम केला जे, ज्या लढाया जाहल्या त्याच्यानंतर बोलाचाली काय जहाली व गोष्ट मात काय जहाली ते कळवावी.

मोठे रघोजी भोसले यांचे वेळेस पांच लढाया जाहाल्या एक [ १ ] कान्होजी भोसल्याची [ २ ] दुसरी बंगाल्याची [ ३ ] देवगडची [ ४ ] चवथी चांद्याची [ ५ ] पांचवी निजामअल्लीखांची. या पांच लढाया जहाल्या. यांशिवाय भोपाळकडेस पेशवेसाहेबांबरोबर गेले होते व बुंदेलखंडाकडे व त्रिचापल्लीकडे व चंदीचंदावराकडेस गेले होते. जाण्याचें कारण मुल्ख लुटावा आणि खंडण्या घ्याव्या, इतकें कारण; सवालजबाब नाहीं. याचा तपशील या प्रकारें:—

---

* प्रस्तुत लेख बराच मोठा आहे. व त्यांत कोठें युद्धसंग्रामाची हकीकत सविस्तर दिली आहे. ह्या समग्र लेखाची दुसरी प्रत आमच्यापाशीं नाहीं. तथापि इतर ठिकाणीं ह्यांतील कित्येक गोष्टींचा उल्लेख आला आहे व तहनाम्यांच्या संबंध प्रती मिळाल्या आहेत. म्हणून हा लेख जितका सुबोध करवला तितका केला आहे.

१. प्रथम रघोजी भोसले साहेबांस सेनासाहेबीची पदवी मिळून कान्होजी भोसलेचे कामावर स्थापित जाहाले. कान्होजी चुलत चुलता यांसीं व रघोजीशीं लढाई उमरावती व बाळापुर यांचेमध्यें जाहाली. तेव्हां कान्होजीचें बोलणें राजा शाहूशीं काय जाहालें हें न समजलें. परंतु कान्होजी भोसल्याची सलतनत बिघडल्यानंतर त्याचे पुत्राशीं व रघोजीशीं करार मदार जाहाला त्याचा बाजिन्नस तहनाम्याचा आहे. नकल सन ११४९ जेः— स्वामींनीं म्हणजे राजे शाहू यांनीं सत्तावीस महालांचा मोकाशाचा अम्मल करून, या शिवाय दुसेरयांचें महालास उपसर्ग न देऊन, नजर घांसदाणा तुमचे तुम्ही घेणें. आम्ही आपले समागमें राहून व खासगत खर्चास रुपये पन्नास हजार वडिलांनीं द्यावे. परमुलुखांत तुम्हां समागमें फौजेनिशीं येऊं. खंडणी होईल त्याजपैकीं सरदेशमुखी व बाबती वजा होऊन उरल्या ऐवजाची वांटणी फौजेचे गणतीवर दामाशाई प्रमाणें घेऊं; या शिवाय आमचे कारकीर्दीचें कर्ज सावकाराचें सहा लक्ष रुपये आम्हांवर आहेत, यास दरसाल पाऊण लाख रुपये तुम्ही आम्हांस कर्ज वारावयास द्यावें. इत्यादिक मजकूर. या प्रकारें तहनामा जाहला. फसलीचे सन ११४० होतात. नंतर सरकारखेड्यांत जाऊन बाजीतखानास मारलें, व विजापुराकडेस खंडणीस गेले. हे खंडणीबद्दल स्वारी कांहीं लढाईत जमेत नाहीं तेव्हां कोणता जबाब सवाल असावा.

२. दुसरी लढाई बंगाल्याची यामध्यें जुबानी लोकांचे कीं जगन्नाथाचे मैदानांत बाजीराव पेशव्यांची लढाई झाली. त्यास सोभामल यांनीं बंगाल्याची हकीकत लिहिली, त्यांत लिहिलें जेः—जेव्हां रघोजी भोसलेनीं भास्करपंतास साठ हजार फौजेनिशीं बंगाल्याकडे रवाना केलें. सारांश अडीच वर्षे याची लढाई जाहली. अखेरीस अलेवर्दीखानांनीं दगलबाजीवर इरादा ठेवून वालीभाई व राजे जानकीराम व मुस्तफखान यांजला भास्करपंतापाशीं सल्लाह करण्यास्तव पाठविलें. चवथाईचा अंमल देण्याचें कबूल केलें. क्रियाही केली. डेऱ्यास नेऊन भास्करपंतास मारलें. सबब रघोजी भोसले जातीनें फौज घेऊन बंगाल्यास जाऊन मुलुखाची बहुत ताराजी[1] मांडली, तेव्हां मादशहा पादशहाचे आज्ञेवरून बाजीराव पेशवे बंगाल्यांत रघोजीस साहाय्य देण्यास आले. जुबानी, त्या काळीं रघोजी भोसलेनीं बाजीराव पेशवेशी बोलणें केलें जेः—महाराजांची आज्ञा व सनद कीं, बंगाल्यांत चवथाई घांसदाणा घ्यावा, त्यास आपण आडवें यावें, आपसांत कलह करावा हें नीट नाहीं. बलके महाराजांनीं आपले नांवें आज्ञापत्र दिल्हें जे बंगाला वगैरेंत आपली फौजही न्यावी. सारांश आज्ञापत्राची नकल तेरावे नंबरामध्यें सनदेचे किताबींत आहे.

सन ११४७+ रा० बाजीराव पंडित प्रधान यांसि आज्ञा केली ऐशीजे. सुभा प्रांत पटण व प्रांत बांधा व रतनपूर व धमद व बाघेलखंड व प्रांत बंगाल

---

१. धुळधाण. + इ. स. १७३७.

तहत पूर्व समुद्र हे प्रांत रा० रघोजी भोसले सेनासाहेब सुभा यांसि फौजेचे बेगमीबद्दल मोकासे दिले असे, तरी तुम्ही त्या प्रांतीं फौजा न पाठविणें. आपल्या सरदारांत ताकीद करून प्रांतांत उपद्रव लागूं न देणें. मशारनिल्हे त्या प्रांतीं जाऊन अमल बसवितील. सुखी असा. या प्रकारें पेशजीच महाराजांचीं आज्ञापत्रें असतां, दुसरें आमची नुकसानें किती जाहलीं. यावर आपण आलांत अशा प्रकारें भाषण आणि मधस्त सरदार संभाजी शिरके व मानसिंग मोहिते वगैरेनीं करून बाजीरावाची समजूत केली. वरकड बंगालेवाल्याशीं बोलणें कसें जाहलें हें कांहीं खुलासा मिळत नाहीं. मिळावा कशास ? यांनीं लूटपाट करून जबरदस्तीचे पोटीं मुलूख घेण्याचा इरादा आणि सोभामल लिहितो जे, बारा वर्षे बखेडाच बंगाल्यामध्यें लूटपाट लढाई भिडाई राहिली.

रघोजीनें आपला पुत्र जानोजी भोसलेस बंगाल्यास पाठविलें. यांशीं मुस्तफाखां व शेरअंदाजखान व बुलंदखां वगैरे सरदार आलेवरदेखानाचे येऊन जानोजी भोसल्याशी भेटले. अलेवर्देखानाचा वृद्धापकाल समीप आला आणि घरची फूट पाहून हें समजून अले-वर्देखानांनीं मीर हबिबाचे विचारानें तीन सुभेची चौथ मराठेशीं कबूल करून उडसे तमाम भोसले याजला देऊन कौल कराराची मजबुती केली. तेव्हांपासून कांहीं बखेडा जाहला नाहीं. यशवंतरावजीचें बोलणें करून पेशजी जे समयीं रघोजी भोसलेनीं वऱ्हाडचा सुभा नामें सुजायतखां जिवें मारला, त्या समयीं भोसलेसाहेबांस बंगाल्याची मोहीम दरवेश, परंतु निजामअली खानांनीं सुभा मारल्याचा राग न धरतां बोलले जे, तुम्ही बंगाल्याकडेस जावें व वऱ्हाडचा मामला तुमचे मामुलप्रमाणें मिळेल यांत तफावत होणार नाहीं.

तिसरी देवगड घेण्यासमयींचा मजकूर, जुबानीं ऐशी जे, चांदसुलतानाची राणी नामें रतनकुंवर यांनीं रघोजी भोसल्यांस पत्रें पाठविलीं जे, पहिलेपासून तुम्ही आमचे खैरखवा म्हणवितां. सुलतान मजकूर मेल्या उपर वलीशहाचे लयानें आम्हांस बेसालव मान केलें, त्यास तुम्ही बजमियत येऊन अकबरशहा व बुराणशहा याजला गादीवर बस-वून तिघे मिळून हें राज्य खावें. अलीकडे जुबानी ऐकलें जे, अकबरशहा व बुऱ्हाणशहा होते तेव्हां जैगीचे वियामानें बोलणें १७९५ वारख्यात कीं तुम्हीं आमची कुमक करून वलीशहाचें पारिपत्य करून आम्हांस गादीवर स्थापन केल्यास दहा लक्ष रुपये नगद व तीन परगणे जहागीर देऊं व तुमचे सरकारांत जें काम पडेल तें तुमचे वियमानें सवाल जाब करूं. कबुलायतीची नक्कल याप्रकारें आहे तपशील.

कुराण व हजरत
पीर दस्तगीर.

राजेश्री रघोजी भोसले सेनासाहेब
सुभा गोसावी यांस.

॥ श्रीसकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित श्रीमहा-राजाधिराजा राजा अकबरसाहेबजी व बुऱ्हाणसाहेबजी, महिपतिराय देवराजा गोसाई संस्थान देवगड संवत १७९५ वारिखे कारणें तहनामा लिहून दिधला ऐसाजेः वलीशहा

राज्यास अनाधिकारी असून जबरदस्तीनें आमचें राज्य करीत होते, याजकरितां आम्हीं आपले साह्यास फौजेनिशीं आणून तुमचे हातून राज्य सोडवून घेतल्यास आपण तुम्हांस कबूल केलें, कलमा बितपशीलः—

१ फौजेस सबतरीख नालबंदी नगद रुपये घेण्याचे वायदे,–

| ३००००० | ५००००० | २००००० |
|---|---|---|
| माघ शुद्ध ५ | ज्येष्ठ अखेर | माघ शुद्ध १३ |
| | १०,००,००० | |

एकूण दहा लक्ष रुपये सदर्हू वायदे होते.

२ तुमचे राज्यांतील बोलीचाली, तह रह करणें तो तुमचे विचारें करूं. तुम्हाशिवाय दुसऱ्याशीं अनुसंधान करणार नाहीं.

किल्ले पवनी बलाय पाळांदुर

३ परगणे मुलतापी बलाय चिखली व ज्याहागीर फुटकर भाईखान दरोबस्त.

प्रगणें मारुली दरोबस्त.

एकूण तीन परगणे पानसुपारी बद्दल तुम्हांस व तुमचे वंशपरंपरा दिल्हे असते. जोंपर्यंत आपलें राज्य तोंपर्यंत तुम्हांस सदर्हू तीन कलमें लिहून दिलेयामध्यें तफावत करणार नाहीं. सदर्हु लिहिल्याप्रमाणें करारांत तफावत करूं तर आम्हास * * ची शपथ असे. हे कबुलियत लिहून दिधली सही. मिति चंद्र ५ शुद्ध माघ संवत १७९५ ( ता. २०–२–१७३९ ) बारिखे रूजु दफतर दिवाण रघुनाथसिंग.

४. चंद्रपूरची लढाई करून किल्ला घेतला. या लढाईचे पेस्तर चवथ सरदेशमुखीचे दाव्यानें घेऊन देवगडाप्रमाणें भाईवांटणीचा नकाशा ठरवून तहनामा जाहला. त्यांतील गोष्टी ऐशा. तेरा परगणे व पांच पेठा यांमध्यें अंमल समाईक, यांची जमा जी कची होईल ती आकारून त्या पैकीं जो खर्च होईल तो बरोबर हिस्सा समाईक करावा; बाकी राहील त्यांत सरदेशमुखी व च्याहरम जाऊन भाईवांटणी कारभार सेनासाहेबांचे दरबारांत व्हावा. शिक्का नीळकंठशहा राजा, मोर्तब सेनासाहेबांचे. अलाहिदा कमाविस राजेसाहेबाकडे सहा महाल एकअमला नीळकंठशहाला बलालपूर एकअमला दिला; आणि किल्ला व शहर वंशपरंपरा लेकरेंबाळें राहण्यास दिला सन ११४७.

५. सन ११६१ जुबानी यशवंतराव आज रूयेकी तलव प्रगणे दारव्हा व तळेगांव वगैरे साबाजी भोसलेचे नांवें करून घेतलें. परंतु यांपैकीं नजरपणेचा व वऱ्हाडाचे महालांतीचा ऐवज व मुगलाई ऐवज दुसालाचा घेतला. सबब शहाजवानखान वगैरे सरदार पवनार पावेतों आले. रघोजी भोसले सरमस्तखान पन्हीचे विद्यमानें तह करून पांच लक्ष रुपये देऊन माघारे फिरविलें. लढाई जाहाली नाहीं.

६. जानोजी भोसले राज्यावर बसले. मुधोजी भोसले [ यांनीं ] कंबर फिसादची बांधली जे, आम्ही उभयतां मिळून राज्य करूं, या करितां रहाटगांवचे मैदानांत

लढाई झाली. या खरखशांत दिवाकरपंत चोरघोडेनी मुधोजी भोसलेस बोलले जे, कैलास-वासी बाबासाहेबांनीं तुमचे वाटणींत चंद्रपूर दिल्हें, तेंच घेऊन असा वृथा कटकट करावी हें ठीक नाहीं. पाहिलें तर न ऐकतां लढाई केली. शेवटीं याच गोष्टीवर समजूत जाहली.

७. सन ११६३ फसलींत जानोजी भोसलेनीं वऱ्हाड व बालाघाटमध्यें बादशाही खालसे लुटूं लागले, सबब नबाब सलाबतजंगाकडील शवकतजंगाशीं लढाई झाली.

८. सन ११६६ सलाबतजंगाचे पत्रावरून निजामअलीखानाची वऱ्हाडांत जिन्नसी बोरगांवावर बुडविली. एक वर्ष कशमकस होती. नंतर निजामअलीखानाशीं पुरणा-कांठीं लढाई केली. तेव्हां मात्र जानोजी शिकस्त जाहले. नंतर राजे बहादुरांचे विद्यमानें बोलणें जहालें, निजामअलीखानाचे मर्जीप्रमाणें रहावें व कामीं पडावें या करितां देवगड चांदचे जवळ तह जाहला. सन ११७७ फसली पंधरा कलमांचा तहनामा ( कलम ) कीं, इंग्रजींत तरजुमा मिस्तर ऐजिक साहेबांनीं केला यावरून समजेल.

९. सन ११७२ हे तेच संधींत राक्षसभुवनची लढाई [ झाली ]. या लढाईचे बाद जानोजी भोसले निजामअलीखानाचे मशवरती मध्यें धसून आपले नबाबापासून नव महाल सरकार पवनार वगैरे ५६६२३५ रुपयांची तनखामध्यें घेतले. याची बजिन्नस सनद निजामअलीखानाचे मोहरनिशी ११७३ फसलींत सनदेचे किताबींत सातवे नंबरा-मध्यें आहे. याचा तरजुमा आपजिक साहेबांनीं इंग्रजींत केला त्यावरून समजेल. हासल कलम जानोजी भोसलेनीं निजामअलीखानापासून आपला मतलब करून शेवट राक्षस-भुवनचे लढाईचे समयीं पेशवेसाहेबास सामील जाहले.

१०. सन ११७७ माधवराव पेशवेशीं लढाईचें कारण कीं, तुम्हीं मोगलाशीं सामील कां जाहला होतां. हा अर्थ या समयीं बोलणें होऊन जानोजीनीं करार करून दिला. सनदेचे किताबींत बारावे नंबरामध्यें तहनामा कलमबंदीचा आहे. नकल यादी जानोजी भोसले सेनासाहेबसुभा यांजकडील करारमदारचे यादींत मुक्काम मोजे कानका-पूर सन्निध ब्रह्मेश्वर गंगथडी उत्तरतीर सुा तिसा सितेन मया व अलफ चंद्र १४ माहे जिल्काद फाल्गुन मास विद्यमान दिवाकर पुरुषोत्तम.

---

४२६ श्री

( भा. व. १-७२ )

ज्येष्ठ व. ३ श. १७४८
ता. २२-६-१८२६

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके १५३ व्ययनाम संवत्सरे ज्येष्ठ वद्य तृतीया गुरु-वासरे क्षत्रियकुलावंतस श्रीराजा प्रतापसिंह छत्रपति स्वामी यांणीं समस्तराजकार्यलेखन-धुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री बळवंतराव मल्हार चिटणवीस यांसी आज्ञा ऐसी जेः तुमचे वडिलांनीं कैलासवासीं थोरले शिवाजीमहाराज यांजपाशीं राज्याभिवृद्धीचे कामीं

येऊन बहुत सेवा केली. त्याजवरून तुम्हांस अष्टप्रधानांतील दरख देतों म्हटलें असतां चिटणिसी दरख आहे हा व कारखानविशी जमेनिशी तिन्ही धंदे वंशपरंपरेनें वतनी स्वामीपासून व स्वामीचे राज्यांतील करून मागितले. ते तिन्ही धंदे वतनी करून दिल्हे, व कैलासवासी संभाजीमहाराज व राजारामसाहेब यांजपाशीं बहुत राजकारण उपयोगीं कामीं येऊन जीवाभ्य श्रम केले, व कैलासवासी थोरले शाहुमहाराज यांजपाशीं अनुकूल होऊन आज्ञेबरहुकूम सेवा केली; व तुम्ही आमचे तीर्थरूप कैलासवासी शाहुमहाराज यांजपाशीं सेवा केली; व आम्हापाशीं एकनिष्ठेनें बाजीराव यांची अडचण असतां सरकाराकडे लक्ष ठेवून इंग्रजांशीं राजकारण करण्याची आज्ञा जाहली, त्याजवरून राजकारण केलें तें, व बाजीराव व इंग्रज यांची लढाई झाली तेव्हां खासा स्वारी लढाईंत असतां, गर्दीसमयीं बाजीराव सोडोन उधळोन गेले; खासा स्वारी उभे राहिली; इंग्रजांकडील तुर्कांची वगैरे गर्दी फार जाहली; ते समयीं तुम्ही जवळ असोन घोड्यावरून उडी टाकून तुर्कांतील सरदारसाहेब लोक धावून येत होते त्यांजकडे पुढें धावून जाऊन खासा स्वारी आहे हें नांव कळवून, गर्दी करूं नये असें बोललां. गर्दी फेर मना होऊन साहेब वगैरे यांच्या भेटी जाहल्या. ऐसी बहुत सक्तीची चाकरी स्वामिनजरेसमोर केलीत, त्याजवरून स्वामी कृपाळु होऊन पूर्ववत्प्रमाणें वंशपरंपरेनें तिन्ही धंदे व चिटणीस अष्टप्रधानांचे बरोबरीचा रूतबा व चादर सुज्ञ असा हें निशाण करार करून देऊन हें आज्ञापत्र सादर केलें असे. तरी तुम्ही पूर्वीपासून चालत आल्याप्रमाणें तिन्ही धंदे अनुभवून चिटणिशी समंधें इनाम आहे तें खाऊन सेवा करून सुखरूप असणें जाणिजे. प्रमाणें करार असे. बहुत काय लिहिणें तरी सुज्ञ असा. मोर्तब.

बंदास मोर्तब एक.

---

४२७ श्री

( ना. भो. १८ )

माघ व. ८ श. १७५९
ता. १७-२-१८३८

## श्रीलक्ष्मीकांत

आज्ञापत्र सेनाधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा ताा गिरमाजी[1] नाईक गायकवाड सुाा समान सलासीन मयातैन व अलफ. तुम्ही दोन विनंतिपत्रें सरकारांत पाठविलीं तीं पोंचली. लिहिला मजकूर सविस्तर समजला; व विठू[2] पांढऱ्याची रवानगी केलीत, तो मागील प्रहररात्र राहतांना सरकारांत येऊन दाखल जाहला; त्याचे ही जबानीवरून समजलें. त्यास तीर्थस्वरूप आजीबाईसाहेब[3] यांचे येण्याचा

---

१. हा शिलेखान्यावरील मुख्य अधिकारी; शिलेखाना=शास्त्रागार. २. हा सर्व हुजऱ्यांचा नायक. राजा जवळ राहून त्याचे हुकूम दुसऱ्या हुजऱ्याकडून करवावे हें त्याचें काम असे. ३. रघोजी ( तिसरा ) यांची आजी-बाकाबाई.

बेत वार्जिक वारामुळें रविवारचा केला; परंतु मध्यें गुमगांवास[1] मुक्काम करून सोमवारीं टाकळघाटास[2] यावें असा नियम ठहरला असें विठू पांढऱ्या याचे जबानीवरून कळलें. मुक्काम मजकुरीं सरबरा[3] येका दिवसांची, त्यांत तीन मुक्काम खासा स्वारीचे तळ पडले; व पाणी खराब सरंजामाची अडचण पडेल, येविशीं तीर्थस्वरूप मातोश्री आजीबाईसाहेब यांजला पत्र लिहून मुजरद[4] पांढऱ्याची रवानगी माघारें केली आहे. तो तुम्हाजवळ येऊन पोंचल्यावर त्याजला तुम्ही त्रिवर्ग मिळून घेऊन जाऊन पत्र गुजरून देऊन, मातोश्री साहेबांस विनंती करून, रविवारीं कूच वडिलांचे स्वारीचें करून टाकळघाटासच येऊन पोहोंचावें म्हणजे दर मजली जाणें घडेल. पुढें विठू याचे जबानींत समजलें कीं, मातोश्री साहेबांसमागमें तीर्थस्वरूप सौभाग्यवती मातोश्री जिजाबाई[5] व चिरंजीव सौभाग्यवती गजाबाई[6] व सौभाग्यवती मैनाबाई[7] ह्या तिघी परभारें निघोन येणार; तीर्थस्वरूप सौभाग्यवती मातोश्री लक्ष्मीबाई[8] व सौभाग्यवती सावित्रीबाई व चिरंजीव सौभाग्यवती ठमाबाई[9] या तिघींचा कांहीं बेत समजला नाहीं. याकरितां तुम्ही कोणकोण येणार याचा नांवनिशीचा तपशील मातोश्रींसाहेबांस आधीं पुसून, जे येतील ते वडिलांचे स्वारी-समागमें घेऊन येणें; व अगोदर इकडेस त्याचा तपशील लिहिणें. काल दाहा घटका रात्रौ राजश्री कृष्णराव[10] जयराम याजबरोबर एक बिजादरी (?) व लालमहमद जमादार व एक कंपनी सुभेदार व मात्बरदारांचा लवाजमा देऊन तुम्हांकडेस रवाना केले आहेत. × × × × याद पाठविली आहे ती पोहोंचेल. मशारनिले याची रवानगी केली ते वेळेस याजला सांगण्यांत आलें आहे जे तुम्ही राजाबागसवार येथें स्वार वगैरे लवाजमा उतरून देऊन सडे जातीनें जाऊन तुमची भेट घेऊन मातोश्रीसाहेबांची भेट घेणें व लवाजमा घेऊन हाजर आहों अशी विनंती करणें. तेथें शंभर गाडे राजश्री

---

१. हा गांव नागपुराच्या दक्षिणेंस सहा कोसांवर आहे. येथें मुधोजीची बायको चिमाबाई हिनें गणपतीचें सुंदर मंदिर बांधलें आहे. २. हा गांव नागपुराच्या दक्षिणेस १० कोसांवर व बोरी स्टेशनापासून दीड कोसांवर आहे. याची वसाहत सन १७००च्या सुमारास झाली. ३. सरभरा, सामग्री, सामान. ४. लागलीच, ताबडतोब. ५. जिजाबाई कोण? हें रघोजीच्या पहिल्या घरच्या आईचें नांव असावें. ६. ही तिसऱ्या रघोजीची पहिल्या घरची सख्खी बहीण. ही राघोबा शिरके यांस दिली होती. ७. गजाबाईची बहीण. ही त्रिंबकजी अहिरराव उर्फ नानासाहेब यांस दिली होती, हिचाच पहिला मुलगा राजे जानोंजीसाहेब. ८. ही मुधोजी ऊर्फ आपासाहेब सेनाधुरंधर यांची बायको. हिला १५००० रुपये वार्षिक तनखा सरकारांतून मिळत असे. ९. ही आपासाहेबांची दुसरी बायको. १०. हा बक्षी घराण्यांतलि देशस्थ ब्राह्मण सेनाधिकारी होता. यास मेजरची पदवी होती. × या स्थलीं मूळ प्रतींत जागा सोडली आहे. त्याजवरून तेथील कांहीं अक्षरें गळालीं आहेत असें दिसतें.

गोपाळराव आनंद याजकडून तयार ठविले आहेत; ते गाडे राजश्री अमृतराव आनंद यांजला सांगोन बोलावून घेणें; त्यांतील कांहीं ग.डे याजवर कनातीवर राहोव्या व कनाता ऐशा लावून त्याचा जोड गिरमाजी नाईक याजला माहीत आहे, त्याप्रमाणें राहोव्या व कनाता आधीं भरून इकडेस रवाना करून देणें. हत्ती येथून पाठविले आहेत तरी शिलेखान्यांत अंबाऱ्या तयार कांहीं जाहाल्या आहेत व कांहीं राहिल्या त्या तयार करून त्यांचे बुरखे जामदारखान्यांत व पीलखान्यांत तयार असतील ते बोलावून घेणें व त्याच रीतीनें गाड्याहि तयार जाल्या असल्यास व बाकी राहिल्या तयार करून घेऊन मातोश्री साहेबांस सदरीं लिहिल्याअन्वयें घेऊनच येणें. अंबाऱ्याचे घंटा टोपणें जे तयार नसतील तें रातोरात तयार करून घेऊनच येणें. जाणिजे छ. २१ माहे जिल्काद. मोर्तबसुद.

पौ छ. २१ माहे जिल्काद ऊर्फ माघ वद्य ८ शनवार प्रातःकाळचे पंहिल्या प्रहरचे सहा घटिका दिवसास पावलें सन १२४७.

---

श्री

**४२८**
**(ना. भों. ४०)**

श. १७६४ माघ व. ४
ता. १८-२-१८४४

श्रीमंत महाराजेसाहेब मुशफक कदरदान राजे रघोजी भासले सेनासाहेबसुभे बहादूर दाम अष्फाक हूं. आजतर्फ मेजर तामिस बल्‌किसनसाहेब रेसीडंट बाद सलाम. नियाज आंकी साहेब असिस्टंट सिकरटरी मुकाम कलकत्याची चिटी मराा छ १ फरवरी सन १८४३ इ० चे आमचे नांवीं या मजमुनानें आली कीं, कोर्ट आफ दिरक्टरस विलायतची चिटी मराा (मर्कुम) छ ३० माहे नवंबर सन १८४२ इ० नंबर ३१ ची बंगाल गौरमेंटचे नांवीं ऐसी आली कीं, महाराजे आपासाहेब कैलासवासी यांनीं जे जवाहिरात बनारसास पाठविले होते ते मालके इंग्लिशस्थानचे वजीराचे तजविजीनें महाराजे साहेब बहादूर नागपूर कीं जे हाल मसनदनसीन आहेत त्याहाचा हक मुकरर पावला आहे व जवाहिरात फौरन महाराजे माहतषी मारनुल्हेस पावते करावे. ऐसे आल्यावरोन शिकर्टरी मौसफानी आम्हास लिहिलें व त्या चिट्टींत हें लिहिलें आहे कीं, ज्या वेळेस सदरीं लिहिले मसलतबातचा इतिल्ला महाराजेसाहेबांस याल तेव्हां ऐसा इतिल्ला करावा कीं, जवाहिरात हाल जर्नेल ट्रेजरी यानें खजाने कलकत्त्यांत आहे त्यास आपण आपणाकडून कोण्ही सक्स मातबर मुख्त्यार करून पाठवावे म्हणजे त्याचे सुपूर्द केलें जाईल, व येविषयींचा इतिल्ला कालचे दिवशीं आम्ही दरबारास आलों होतों तेव्हां आपणास करून चिट्टीही सुनावून दिल्ही होती. त्या वेळेस आपण चिठ्ठी यांच्या नकला मागितल्या, यास्तव सदरीं लिहिलेल्या दोनही चिठ्यांच्या नकला शिक्क्याबरोबर आपणाकडेस पाठविल्या आहेत. ज्यादा अयाम दौलत वषाद मानी मुदाम बकामबाद बतारीख छ १८ माहे फेब्रुवारी सन १८४३ इसवी मुताबिक छ १८ माहे मोहरम स. ११५९ हिजरी. दसखत रसीदंट बाहादुराची इंग्रेजी असे.

---

४२९ श्री लक्ष्मीकांत

( ना. भो. ४१ ) श. १७६७ आश्विन शु. २

ता. ३-१०-१८४५

हुकूमनामा सरकार श्रीमंत महाराज राजश्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा

वो शिवराम पांडुरंग सुा सीत अर्बेन मयातैन आलफ. छावणी फौज सोनेगांव येथें फौजेंत तुमचेकडील कारकून दाखल्याचे कामीं आहेत त्यांस सांप्रत ज्याप्रमाणें छावणी फौज माहाराजगंज येथें शिरस्ता चालत आला त्याप्रमाणेंच याही फौजेंत राहील, हे समजोन हा हुकूमनामा तुम्हांस सादर केला असे. त्यास तुम्ही छावणी फौज सोनेगांव येथून आपले कारकून दाखल्याचे कामीं आहेत त्यांजला मैदप्तरसुद्धां बोलावून घेणें. जाणिजे. छ १ माहे शवाल सन १२५५ साल फसली मोर्तबसुद.

---

४३० श्रीलक्ष्मीकांत

( ना. भो. २३ ) शके १७६७ मार्ग. व ४

ता. ८-१२-१८४५

हें आज्ञापत्र सरकारांनीं माधवराव गोविंद यांजला भानाऱ्यांस साहेब रेसिडेंट बहादुरांचे स्वारींत पाठविलें, त्याची नक्कल असे. यांची खतावणी चिटणवीसाचे कलमदानावर आहे.

राजश्री माधवराव गोविंद गोसावी यांस

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेो रघोजी भोसले सेनासाहेबसुभा रामराम. सुरू सन सीत अर्बेन मैयातैन व अलफ. छावणी महाराजगंज[1] या फौजेंतील अव्वल व दुय्यम रिसाल्यांत जे कित्येक लोक फंदी फितुरी होते त्यांणीं हल्लीं बखेडा करून दंगा उभा केला होता. तेव्हां त्याचा कचा इतल्ला साहेब रेसिदन्त बहादुरांस देण्यांत येऊन साहेब मवसुफांचे सल्ल्यानें त्या लोकांस नातिज्या देऊन दोनशें सतरा इसम बरतर्फ जाहले. त्यांचे दरमहाचे कमतीचा आंख पांच हजार नऊशें पंचाण्णव रुपये पडला; आणि या मुफसदांची[2] खोड पुरी तुटून सारे फौजेवर दाब रवान राहिला. ही न्यायत[3] मेहरबानगी साहेब रेसिदेन्त बहादुरांनीं या सरकारचे दोस्तीवर व दौलतीचे सरसबाजीवर नजर देऊन केली. यांत सरकारची गोष्ट बरोबर राहिली. ही नामवारी कंपनीसरकारची आहे. या सरकारचा व कंपनीसरकारचा एक कस, तेव्हां कोणतेहीविशीं साहेबबहादुर सरकारास अवघड पडूं देत नाहींत ही खातरजमा, व येकीन[4] सरकारचा पुर्तेपणें आहे. ह्या गोष्टींस साहेब मवसुफ बखुबी[5] जाणत आहेत. सांप्रत सरकारचे मनांत या

---

१. हें छावणीचें ठिकाण नागपूर शहराचे पूर्वेस २ कोसांवर आहे. यास हल्लीं व पूर्वीही पारडा असें नांव असे. २ बंडखोरांची. ३ मोठी. ४ भरंवसा. ५ पूर्णपणें.

सदर्हु इसमाची बरतर्फी लागून कमती पडली याचेऐवजीं पुन्हा स्वार भरती करावे; तों दोन्हीही छावणींत स्वार कामापुरते बलके जास्ती आहेत; आणि हरएक नोकरी चाकरीचे उपयोगीं पैदलाचें काम बहुत पडत आहे. यास्तव सरकारचे विचारास हेंच येत आहे, जे छावणी महाराजगंजाचे फौजेंत तीन पलटणें झाली. वरते रेवानच्या तीन कंपन्या, यांत नवीन पायदळाची भरती केल्यास चार पलटणें होतात. परंतु या आंखावर ज्यास्ती झडती होऊं पाहती, आणि बारमाही तलब[1] देण्याचा या फौजेंत शिरस्ता आहे; तेव्हा पलटण उभें राहण्याची गैरतजवीज लक्षांत येते. दुसरें या छावणीचे पलटणांत तोटा एका कंपनींत चवऱ्याहत्तर जवानाचा, याजवर दर कंपनीस अकरा माणसें जास्ती भरती केली, तर तीनही पलटणांत जवान अधिक होऊन पंचायशी जवानांची कंपनी पुरी होते. हुदेदार वगैरे लवाजमा लागत नाहीं व पलटण नवीन भरती जाहले हा अवसाफ[2] होत नाहीं हा दुसरा प्रकार; तिसरी आणिक एक तजवीज आहे जे रेवानच्या तीन कंपन्या या तीनही पलटणां-वर अधिक आहेत. यांजला पुरवठा नवीन भरती सात कंपन्या केल्या तर चार पलटणें होतात; यांजला बारमाही तनखा लागेल; यांतून किफायत दिसत नाहीं; व छावणी सोनेगांवची फौज जी इंग्रजी दस्तुरांनीं उभी जाहली ती साबक[3] रेसिडन्ट मेजर वलकीनसनसाहेब[4] बहादूर यांचे सल्ल्यानेंच तजवीज केली आहे. तेथें पांचशें स्वार व एक पलटण भरती जाहल्याचें कारण हेंच, जे या फौजेचा दाब रबाब त्या फौजेवर असावा व त्या फौजेचा दाब या फौजेवर असावा. हें समजोनच असे रीतीनें करण्यांत आलें; व तनखाही या फौजेंत दसमाही शरा[5] आहे; येथें आणीक एक पलटण केल्यास सदरीं लिहिले आंखाचे पोटांत भरती होऊन तिल्लेरीच्या[6] दोन तोफा ही उभ्या राहतात; ही गुंजाइष[7] आहे व नोकरी चाकरीचा बंदोबस्त बराबर राहून नवीन पलटण भरती जाहलें हा लौकिक सरकारचा होतो. महाराजगंजाचे फौजेंतील एक पलटण छत्तीसगड जिल्ह्याचे बंदोबस्तास हमेशा कमाणीवर[8] ठेवावेंच लागतें व एक पलटण प्रांतांनीं चंद्रपूर व भानार छिंदेवाड्यास पहिलेपासून कमाणीवर जातें; बाकी एक पलटण छावणीमजकुरीं राहून त्यांत शहर महाल वगैरे चवकी पाहाऱ्याची हुशारी, असा क्रम चालत आला. हल्लीं आणीक सोनेगांवास छावणीवर एक पलटण भरती जाहलें, म्हणजे महाराजगंजांतील एक पलटण सालीम[9] छत्तीसगडाचे बंदोबस्तास राहील व बाकी दोन पलटणें छावणीमजकुरीं

१ पगार. ( round ) २ अफवा–लोकवार्ता; 'अवसाफो भवेत्ख्यातिः रा. व्य. को. लोक २४८. ३ माजी. ४ सन १८३९ पासून १८४४ पर्यंत नागपूरचा रेसिडेंट. यास संस्कृत भाषेची व विशेषतः गणितशास्त्राची गोडी असून याजला ज्योतिःशास्त्र पढविण्यास बापूशास्त्री देव व श्रीकृष्णशास्त्री घोंगे हे नागपूरचे सुप्रसिद्ध ज्योतिर्विद् होते. विल्कन्सनचे शास्त्रीय लेख कलकत्ता रॉ. ए. सो. च्या ग्रंथांत प्रसिद्ध झाले आहेत. ५ शरा=कायदा, नियम, 'शरानामक यथाशाम्' रा० व्य० को० श्लो० २८५. ६ आर्टिलरीच्या. ७ नफा. ८ कामगिरीवर. ९ सर्व.

राहतील व सोनेगांवचे दोन पलटणांपैकीं एक पलटण तीनही जिल्ह्यांवर कमाणीस जाईल व एक पलटण छावणीवर राहील म्हणजे प्रांताचाही बंदोबस्त राहतो व छावण्यांवर ही पलटणें राहतात. असें जाहल्यानें दोन्ही छावण्यांचा बंदोबस्त व प्रांतांचीही बेहबुदि[1] चांगली राहील, यास्तव ही सल्लामसलत सरकारास मुनासब दिसत आहे; हा खुलासा साहेब रेसिदेन्ट बहादुरांचे कानावर जाऊन त्यांची परवानगी सोनेगांवचे फौजेंत या कमती झाल्या आंखांचे जोडांत भरती करण्याविषयीं होऊन मंजुरी आल्यास फार चांगलें आहे. याजकरितां जितके प्रकार दोन्ही छावण्यांवरील फौजेचे मुक्तआसुक्त कमबेशीचे[2] मुनासब लक्षांत आले ते तुम्हांस लिहून सुचविले असे. तुम्हीं या सरकारआज्ञेचे लिहिल्याचें पुर्तेपणें मनन करून जितक्या तजविजी साधकबाधकेतच्या लिहिल्या आहेत याचा खुलासा मुक्तसर[3] साहेब रेसिदन्ट बाहादुरास त्याचे मिजाजीचे संतोषाची वेळ व मर्जी खुशवक्त पाहून कामकारभाराचा जिकर व हरएक प्रकर्णीं चर्चा होत राहतात त्यांत ही गोष्ट काढून ज्यांत पलटणभरतीचा हुकूम लवकर देईत तें घडून येण्याविषयींची परवानगी घेऊन जलद सरकारांत लिहून पाठवणें. सारांश सदरीं लिहिला मजकूर इतकाही तपशीलांनीं जिकर करण्याचें कारण नाहीं. सरासरींत दहापांच गोष्टींच्या बोलण्यांचे लपेटींत ही ही गोष्ट काढून पडल्या फळाची परवानगी घेणें. बरतर्फवाल्या लोकांची कमती पडून जो आंख कमतीचा जाला आहे, याचा जोडच बजिनस लिहून पाठविला आहे. याजवरून तुम्हास कळेल. जाणिजे छ १८ माहे जिल्हेज सन १२५५ फसली. बहुत काय लिहिणें. [ मोर्तब.]

---

श्री

४३१
( ना. भो. २४ )

श. १७६७ मार्ग. व. ४
ता. १८-१२-१८४५

अस्सल जोड[4] भानाऱ्यांस साहेब रेसिडेंट बहादूर यांजला दाखविण्याबद्दल पाठविला होता त्याची नक्कल असे. माधवरावाचे पत्रांतून पाठवून रवाना केला. यादी छावणी फौज महाराजगंज येथील अव्वल व दुय्यम रिसाल्यांत बखेडा होऊन स्वार व दफेदार व जमादार बरतर्फ जाहले. सन १२५५ फसली

४५० जमादार असाम्या तीन दर १५० प्रमाणें.

४८० दफेदार असामी १२ बारा.

४०० कित्ता; असाम्या १० दरमहा रुपये ४० प्रमाणें.

४० कित्ता, असामी एक मयत.

४० कित्ता, असामी एक रुसकत[5] इमामुदीन माजुल जमादार याचा चिरंजीव वडील यलोनुद्दीन.

---

१. बंदोबस्त. २. कमजास्तीचे. ३ श्रेष्ठ. ४. जोडलेला किंवा सोबतचा कागद. ५ बडतर्फ.

४८० चारशें ऐशी एकंदर.
१०० वकील असाम्या चार दरमहा रुपये २५.
४०५० स्वार असामी १९८ दर असामी रुपये २५.
१५ लवस तुरमचो (?) असामी ३ दर ५ रुपये प्रमाणें
५९९५ एकंदर.

---

**४३२** श्री
( ना. भा. १२ )

श. १७६८ का. व. ८
११-११-१८४६

कलंमबंदी श्रीमंत सौभाग्यवती दर्याबाईसाहेब[1] सन १२५६ फसली.

१. अव्वल. प्रातःकाळीं उठून शौच मुखमार्जन स्नान करून सोंवळें नेसावें. देवाची व ब्राह्मणाची व तुळशीची पूजा वगैरे पुराणश्रवण इत्यादिक चार घटका दिवसपर्यंत उरकावें; व सोंवळें सोडून पोषाखी लुगडें नेसावें, व जवाद्दिर व कुंकूं लावावें. नंतर सहावे घटकेंत न्याहारी करून बसून तांबूल भक्षावा. फक्त.

२. दुसरें, बाद[2] न्याहारीचे आंतचे चवकाची खबर बोलाविणें, जे चवकांत भीड आहे अथवा नाहीं. भीड असल्यास जामदारखान्याचे जिन्यानीं मुदबाखखान्यांत जाऊन समाचार घेऊन आजीबाईसाहेबांचे पायां पडावें. बाद आजीबाईसाहेबांस फुरसत असल्यास घटकाभर आजीबाईसाहेबांजवळ बसून मुदबाखखान्याची मागती खबर घेऊन सरकारची बातमी ठेवावी. जलदीनें सरकारचें स्नान जाल्यास नीटच आहे, उशीर असल्यास चवकाचे जिन्यानीं वर्ती येऊन कांहीं क्रमणा करावी. फक्त.

३. बाद सरकारचें स्नान जालें म्हणजे मुदबाखखान्यांत जाऊन सरकारचें ताट वाढण्याची तजवीज चांगली ठेवावी. सरकारभोजन झालें म्हणजे सौभाग्यवती अन्नपूर्णाबाईसाहेबांकडे[3] यावें. भोजनाचा समेट असल्यास खालीं भोजन करून वर्ती यावें, अगर

---

१. दर्याबाई ही नागपुरचे तिसऱ्या रघोजीची सहावी बायको होय. ही शिरक्यांचे घराण्यांतील. हिचें लग्न सन १८४२ चे सुमारानंतर झालें असावें. राजाचे मरणसमयीं ही अल्पवयस्कच होती. हिला कांहीं अपत्य झालें नाहीं. ही सन १८७६ त आश्विन वद्य १४ स प्रातःकाळीं प्रहर दीड प्रहर दिवसास निवर्तली. हिला ४५ हजारांचें वार्षिक वेतन होतें. २. नंतर. ३. ही राजाची तिसरी बायको. ही मोहित्यांच्या घराण्यांतील. हिजपेक्षां वडील बायका मैनाबाई, व गंगाबाई ह्या निवर्तल्या असल्यामुळें हीच घरांतील मुख्य मानकरीण. याच करितां प्रस्तुत लेखांत तिचा नामनिर्देश केला आहे. ही राजाच्या मरणानंतर सुमारें दोन वर्षांनीं म्हणजे १८५५ त वारली.

कांहीं उशीर असल्यास वर्ती येऊन सौभाग्यवती साहेबांचें भोजनाची खबर ठेवून भोजनास जावें. भोजन करून वर्ती येऊन चार घटका आराम करावा. फक्त.

४. आराम केल्यावर चूळ भरून बाहेरचे सोप्यांत पाळण्याजवळ बसून तांबूल भक्षावा. फक्त.

५. नंतर सायंकाळीं मुदबाखखान्यांत जाऊन भोजनाची तजवीज ठेवावी. बाद सरकारचें भोजन जाल्यास वर्ती यावें. नंतर सरकार मुदबाखखान्याचें ताट बोलावून भोजन वर्ती करावें. आपणास भोजनाची जी चीज पसंत असल्यास पांडे[1] वगैरे हजरच आहेत त्यांचे हातून तयार करवून भोजनाचे वेळेस भक्षावें, व आठ चार दिवसावानीं, चांगली चीज झाली असें भासल्यास, मुदबाखखान्यांत पांड्यांस समागमें घेऊन सरकारताटांत वाढवावी. फक्त.

६. आजीबाईसाहेबांचे समोर विडा खाऊं नये; व तस्तांत चूळ भरूं नये व पीकदाणी ठेवणें इत्यादि त्यांचे नजरेसमोर करूं नये व मर्यादेनें बसून बोलणेंचालणें करावें. अगर आजीबाईसाहेब वर्ती असल्यास त्यांचे समोर तकिये लावून बसूं नये, तकिये उचलून नजरेचे पलीकडे ठेवावें, ज्यामध्यें आजीबाईसाहेबांस दिसेना. फक्त.

७. सौभाग्यवती अन्नपूर्णाबाईसाहेब यांचे समक्ष तस्तांत चूळ भरून आचमन न करावें व पिकदाणींत थुंकूं नये. हात वगैरे धुणें असल्यास जोत्यावर बसून धुवावे. विडा मात्र भक्षावा, अगर वर्ती असल्यास, आपले तकिये भोंसले[2] बारीदार[3] वगैरे यांचे हातीं बाईसाहेबांस द्यावे. भरताजीम द्यावी. फक्त.

८. पाकनिष्पत्ति दोन चार दिवसांत फुरसत करून पांडे व रमाबाई[4] उभयतांस घेऊन आपले जातीनें करीत जावी, अगर बिघडेल तर चिंता नाहीं. परंतु पाक दोनचार दिवसांनीं करीत जावा व आळस करूं नये, व जो पदार्थ सरकारास अथवा आपणांस आवडेल तो आपले जातीनें पांडे उभयतांस घेऊन तयार करावा. व पांडे उभयतांनीं शिकवावें. फक्त.

९. बाहेरच्या बायका सोयरे मंडळी वगैरे आपले येथें आल्यास ज्याचा जसा त्या रीतीनें सन्मान करून विडे देऊन रुक्सत करावें. फक्त.

१०. जानीबाई[5] व धुर्मनबाइ[5] वगैरे आदीकरून आपले भेटीस आल्यास, उत्तम प्रकारें दस्तुर माफक बसवून चांगलें भाषण करून विडे देऊन रुक्सत करावें. ते येतील

---

१. मुदबाखखान्यावरील मुख्य कामगार हा जातीचा शूद्र. २. हे कडवे भोसले म्हणजे राजघराण्यांतील पुरुषांचे पोटचे परंतु उपस्त्रियांपासून झालेले हे हुजरे वगैरेंचे कामावर असत. ३. बारी=पाळी, दार=वाला, पाळीपाळीनें राहणोर हुजरे. ४. दर्याबाईचे खिदमतींतील मुख्य कुणबीण. ५. या राजाच्या नाटकशाळांपैकीं दोघी, या एकंदर आठ होत्या.

तेव्हां ‘ बसा ’ म्हणण्याची वाट पाहतील त्यास तुरंत आपण त्यांचे बसण्याचे पूर्वी ‘ बसा ’ असा हुकूम करून सदरहू लिहिल्याप्रमाणें त्यांनीं आज्ञा पुसल्यास विडे बोलावून रुक्सत करावें. फक्त.

११. हलके माणसांशीं कानाशीं लागून गोष्ट हरवख्त सांगूं नये. एखादी बारकीची गोष्ट असल्यासच कोणी चांगला मनुष्य अथवा स्त्री पाहून त्याचे कानीं गोष्ट सांगून कामाची निकाशी[1] करावी. फक्त.

१२. जे सरकार सूक्त अथवा असूक्त बाईसाहेबांस व ताबेदार लोकांस आज्ञा फर्मावितील त्या आज्ञेनुरूप वर्तणूक करावी. या आज्ञेंत खलेल[2] दिसून आल्यास जबाब देही[3] घेण्यांत येईल. फक्त.

१३. मायबापाशीं व तत्संबंधीं सोयरे वगैरे मंडळींशीं सरोकार[4] ठेवूं नये, व ताबेदार लोकांनीं या हुकुमावर ख्याल करूं नये. आपले खास अथवा दौलतप्रकरणीं ताबेदार कोणाचाही असल्यास कामदार अथवा जामदार सरकार इतल्ला करून जी कांहीं विनंती करतील ते मुनासब समजून मान्य करण्यांत येईल. परंतु याचा इतल्ला सरकारास होत असावा. व सणतिवार आहे याजमध्यें तत्संबंधीं मातुल पक्ष सोयरे वगैरे मंडळी येतील अथवा बोलावण्याचें काम पडल्यास बोलावण्यास जातील त्यास दस्तुरामाफक रुकुसत करून द्यावेत. भोजनास अथवा विड्यास चवघांचे समक्ष रुकसत करावी. फक्त.

१४. मातुल पक्षाची बिलकूल फिकीर ठेवूं नये. सणतिवार भोजनास अथवा विडयास या प्रसंगास आल्यास, भोजनास बोलवावें अगर विडे द्यावे. बाकीची विनंती त्यास करणें असेल ती परभारें सरकारास करतील, व त्याची फिकर सरकार ठेवितील. बाईसाहेबाशी बिलकुल संबंध नसावा. फक्त.

१५. कामदार व रांडापोरें वगैरे यांशीं हुकूम करतील कीं, आमचे तत्संबंधी मातुल पक्षाचे सोयरे आहेत त्यास कोणाचीही चीज भाजी विडयाचे पानापासून नेऊन देणें हा हुकूम करूं नये. अगर हुकूम केल्यास ताबेदारांनीं ख्याल न ठेवावा, व त्याचा निरोप बाईसाहेबांजवळ सांगूं नये. फक्त.

१६. मसलतीची गोष्ट असल्यास स्वतः सरकार अथवा मुत्सद्दी हे कामदार असल्यास हळूच सांगावी. ज्यामध्यें दुसऱ्यास ऐकूं न जावें. बाकी खुलाशाची गोष्ट असल्यास चौघांचे समक्ष व मोठ्यानें बोलल्यास चिंता नाहीं. फक्त.

१७. आपणास सूक्त अकवा असूक्त खबर जाहल्यास तुरंत सरकारास जाहीर करावी, पोषीदगी[5] ठेवूं नये व सरकाराशीं बिलकुल लिहाज[6] करूं नये, किंवा सरकारानीं पुसल्यास पाहिली किंवा ऐकिली ते बराबर सांगून द्यावी. फक्त.

---

१. फोड, सफाई. २. अंतर, कंपेशी. ३. खुद्द, स्वतः. ४. दाट संबंध. ५. गुप्त, लपवून. ६ छद्मीपणा, कपटभाव.

१८. हालकीं माणसें बारेकरणी व बारीदार वगैरे यांच्या तोंडीं बिलकूल लागूं नये. आपला बोज हलका पडतो. दाबांतच ठेवणें नीट आहे. चाकरी बराबर घेत जावी. चुकल्यास सजा मुनासब जाणून करावी. फक्त.

१९. कोठें मेजवानी व हळदकुंकास वगैरे जाणें असल्यास आजीबाईसाहेबांस व सरकारांस पुसून जावें; किंवा आजीबाईसाहेबांकडील आज्ञा आल्यास सरकारचे कानावर टाकून जावें. फक्त.

२०. लेंकूरपणाचा स्वभाव टाकून बुरदबारी[1] आंगीं ठेवावी. बेजाहा[2] हांसूं नये व धावूं नये. फक्त.

२१. आजीबाईसाहेबांची खबर फुरसतींत असल्याची रमाबाई व येशवंतराव[3] व सदाशिव[3] या त्रिवर्गांत जो हजर राहील त्यांनीं बोलावून बाईसाहेबांस दररोज एकवेळ शिवाय मामुलाचे समागमें जाऊन आजीबाईसाहेबांजवळ बसून जें भाषण करतील तें श्रवण करून त्या गोष्टी लक्षांत ठेवणें जरूर आहे. फक्त.

२२. सरकार असल्यास रमाबाईनें आपले खोलींत अगर कोठेंही रहावें. बाद सरकार गेल्यावर रमाबाईनें आपला बिछाना बंदोबस्त करून निद्रा करावी व सरकार ज्या दिवशीं नसल्यास दरोबस्त राहणें जरूर असे. फक्त.

२३. बाईसाहेबांनीं सरकार मुदबखखान्यांत जाऊन पांडे व मुदबाखी बापू भोसला वगैरे यांसी पुसावें कीं आज पाकनिष्पत्ति तयार काय झाली, याची तकरार[4] हमेषा करावी. फक्त.

२४. सरकारांशीं बाईसाहेबांनीं दररोज दिवसा उदयापासून अस्तमानपावेतों सरकारचे व आपले दोन घटका फुरसत पाहून खिलबत जरूर करावी. फक्त.

२५. सरकारांनीं सौभाग्यवती बाईसाहेबांस जहर खाणें अथवा अमृत प्राशन करणें किंवा विहिरींत उडी टाकणें असा हुकूम केल्यास निःसंशय अनमान न करितां आज्ञावंदन करणें जरूर. परंतु सरकार हुकूम करतील ते समजूनच करतील. फक्त.

२६. प्रातःकाळीं उठून शौचमुखमार्जन नंतर स्नान, देवपूजा पोषाखी लुगडें व पोषाखी दागिनं कुंकूं वगैरे इत्यादि यांची त्वरा करावी. या कामांत सुस्ती व ढील न करावी. फक्त.

२७. देवपूजेकडे ब्राह्मण व पुराणिक व देवपुजारी आदिकरून मुकरर होऊन हालबंदोबस्त करण्यांत आला. दस्तुरमाफक सहा घटका अगर सात घटका दिवसांचे पोटांत पूजा व पुराण नित्यनैमित्य दान व धर्म वगैरे इत्यादिक होऊन फरागत होणें जरूर आहे. पैकीं इसम बितपशीलः—

---

१ प्रौढता. २. भलत्या वेळीं. ३ हे बहुधा हुजरे असावेत. ४ चौकशी, पूसपास.

२. पुराणिक असामी
 १. आबा पुराणिक. १. रामाचार्य पुराणिक.
 २
४. पुजारी असामी चार.
 १. लक्ष्मण भट. १. जयराम भट.
 १. बापूभट. १. कृष्णाबापू
 ४

२. गुजराती असामी दोन.
 १. तुळाराम. १. जागू पोर.
२. तुळशीफुलांचे कामावर व ब्राह्मणांचे शिधे सरंजाम वगैरेची तसवीज ठेवणें.
 १. चिमणा व मदतीस गणू पोर.
 १०

२८. जामदारखान्याकडे दरोबस्त आमला[1] वगैरे मुकरर होऊन हाल बंदोबस्त करण्यांत आला. इसम बितपशील १. पैकाजीपंत यांनीं जितकें काम आहे याची देखरेख व ज्याहबेज्याहचा बंदोबस्त ठेवावा व कामाचा रपोर्ट त्यांनीं हमेषा दररोज प्रातःकाळीं घेत जावा; जें काम ज्याकडे नेमलें आहे त्या कामाची हरकत झाल्यास त्याचा इतल्ला सरकारास करून मुनासब सजा करणें जरूर आहे. जामदाखान्याकडे दरोबस्त अमला वगैरे मुत्सद्दी मंडळी ३ तीन यांनीं आपले कामीं जें काम नेमून दिलें आहे तें करावें. दुसरे कामाशीं व सल्लामसलतीशीं जरूर नाहीं. दुसरें काम करणें जरूर असल्यास सरकार हुकूम करतील तें करावें इसम बितपशीलः—
१ गजानन अवधूतराव १ वामनाजी शंकर हळदे १ जागेश्वर भवानी
 ३

कुळंच भोसला याणीं जामदारखान्याची चांगली हुशारी ठेवावी. कोणाचीही वस्तूचें नुकसान झाल्यास अथवा चोरी गेल्यास, जबाब देही घेऊन मुनासब सजा करणें ती करण्यांत येईल. बाकी पोषाखी कापड व डागीना वगैरे दस्तुरामाफक हमेषा देणें जरूर आहे.
५ फरास इसम पांच पैकी इसम बितपशीलः—

१ श्रावणफरास यांनीं चवघाही फरासांचा बंदोबस्त ठेवावा. जी चीज पडदे वगैरे हरजिन्नसा मशारनिल्हेचे सुपूर्द आहे त्याचें नुकसान अथवा चोरी गेली असें समजल्यास मुनासब जाणून सजा करण्यांत येईल.

४. इसम चार या लोकांनीं श्रावण फरासाची मदतगारी ठेवावी व सरकार कामाविषयीं जो हुकूम करील त्याची बेआदबी न करितां कामाची निकाशी करीत जावी. जामदारखान्याकडील फरास इसम पांच. फरास इसम चार पैकीं तपशीलः—

---

[1] कामगार.

१ त्रिंबकजी, १ भिकू, १ आली बेग, १ फाजल

४

५

१०

२९. वें, मुदबाखखान्याकडे माणसें बायका वगैरे मुकरर करून फिलहाल बंदोबस्त करण्यांत आला. इसम बितपशीलः—

१. रमाबाईनें ज्या वेळेस सौभाग्यवती बाईसाहेब न्याहारी व भोजन वगैर करतील त्या वेळेस जवळ बसून माशा वाराव्यात व ताट वाढवावें व मुदवाखखान्याची देखरेख स्वयंपाक तयार जहाला किंवा नाहीं ही तजवीज ठेऊन हमेशा दस्तुरामाफक करीत जावें.

३. पाकनिष्पति व दस्तूर हमेषा जे वेळेस तेवेळेस होणें जरूर; इसम बितपशील. १ देवीदीन पांडे १ सटवा, १ रखमा गरत.

२. कामाठी असामी दोन; या लोकांनीं सरंजाम लाकूड भांडी वगैरे दस्तुराप्रमाणें करण्याचें तें करणें.

३०. पाण्यावर गुजराथी वगैरे माणसें नेमून दिलीं तीं हरवख्त हाजर राहून आपले बारीप्रमाणें आपली गैरहाजिरी न होतां काम करीत जाणें.

२ सुरईवर असामी दोन जगन्नाथ व हरिराम. १ विहीरीचे पाण्याकरितां मनसाराम.

३१. झोळण्यावर जे बारीदार नेमले आहेत त्यांनीं हरवख्त आपले बारीवर हाजर राहून काम करीत जावें. पैकीं तपशील इसम—

२. खास झोळण्यावर.

१ मल्हारी जुना यानें विड्याचीं पानें वगैरे जो दस्तुर चालत आला, त्या बमूजिब बंदोबस्त ठेवावा व जे बारीदार लिहिले आहेत त्यांचे हातीं काम घेत जाणें.

१ मल्हारी चव्हाण.

२

२ पानाकडे असामी देवबा व रामा.

२ फालतू असामी दोन झोळणा वगैरे चवरी हरएक काम पडल्यास यांनीं करीत जावें. १ ज्ञानबा कृष्ण.

६

३२. दवाखान्यावर अंतू बारीदार वगैरे दोन असामी मुकरर केले आहेत. त्यांचा बंदोबस्त दुरुस्त ठेवणें जरूर.

१. अंतू बारीदार यानें औषधें वगैरेची तजवीज ठेवावी. रात्रौ घरास जाणें असल्यास इतल्ला करून जावें व बहिणाजी बारीदार रात्रौ ऐवजीं ठेवणें या तजविजींत हरकत झाल्यास अंतूजवळून जबाब घेण्यांत येईल.

१. बहिणाजी बारीदार यांनीं दरोबस्त अंतची मदतगारी ठेवावी. दोघे मिळून काम आज्याम द्यावें.

३३. बाळाजी बारीदार याजकडे शिलाखानाचे दागिने पोषाखावर देणें व चांदीचें भांडें, कुंकूं, दातवण, टिकल्या वगैरे इत्यादि यांची तजवीज ठेऊन हाजरबाशींत रहावें. रात्रीं घरास जाणें असल्यास, कुलंच भोसला याला पुसून जावें. म्हणजे पोषाखांचा बंदोबस्त कुलंच ठेवील व सौभाग्यवती बाईसाहेबांकडील नजराणा येईल तो बाळाजीचे जिम्मेस राहील. त्याचा हिशोब व्यंकटेश रघुनाथ सावंत हा ठेवील व त्याचा दाखला जामदार-खान्याचे इलाख्यांत ठेवणें जरूर मुनासब आहे.

३४. चवरी बारदार याजवर दोघे बारीदार मुकरर केले आहेत. स्वारी कोठें सौभाग्यवती बाईसाहेबांची बाहेर गेल्यास चवरीचें काम करतील. बाकी चाकरी हमेशा झोळणा वगैरे फालतू जो हुकूम अन्वयें येईल तें करावें. फक्त.

१. बापू कबल्या बारीदार }
१. आश्रु बारीदार } २

३५. हमेषा हजरबाशविर यशवंतराव व सदाशिव व रमाबाई. सदर्हू सदाशिव व यशवंतराव यांनीं सुरई आणून न्याहरी व भोजनाचे वेळेस पाणी पाजावें व एका इस-मानें आपले बारीप्रमाणें दरोबस्त रात्रंदिवस हाजरबाशींत असावें. दिवसभर उभयतांही रहातील. रात्रीं एकानीं घरास जावें व एकांनीं चाकरीवर रहावें. रमाबाईनें दरोबस्त रहाणें जरूरच आहे. या हुकुमांत हरकत झाल्यास मुनासब समजून हुकूम देण्यांत येईल. फक्त.

३६. भोसले लोक यांच्या तीन बरच्या [बाऱ्या ?] मुकरर होऊन फिलहाल बंदोबस्त आपआपले बारीप्रमाणें करून काम बराबर आजाम द्यावें. इसम बितपशीलः—

५. अवलबारी रघु भोसला बितपशीलः—

१ मशारनिल्हे १ यशवंता १ रामा नागींचा १ कोल्ह्या १ सखाजी.

५

४. दुय्यमबारी हिरू भोसला.

१ मशारनिल्हे १ रामा शिरकें १ मारुती १ भगाजी.

४

५ बारी तिसरी मालबा भोसले येकटिंग मनाजी भोसले

१ मनाजी १ भणु १ लक्षुमण भुरा १ कृष्णाजी भोसले १ लक्ष्मण पारीचा.

५

१४

सदर्हूप्रमाणें इसमांनीं दिवसा हाजर रहावें. रात्रीं आपापले दस्तुरांनीं जशी बारी येईल त्या बारीप्रमाणें पाहारा चौकी वगैरे करीत जाणें, व कोणास घरीं काम असल्यास

आपले बारीवाल्यास इतल्ला करून घरास जावें; बेइतल्यानें घरास गेल्यास दरमाहा अगरचे शेर एक महिन्याचा जप्त होईल.

३७. बारी करणी फिलहालबारी मुकरर करून बंदोबस्त करण्यांत आला त्याप्रमाणें आपापले बारीवर हजर राहून काम आजाम द्यावें. कांहीं हरकत दिसून आल्यास सजा मुनासब पाहून करण्यांत येईल.

इसमनबिशी बितपशील:—

१० अवलबारी हवशी

१ मशारनिल्हे १ पारू १ सावित्री १ चिमी १ गंगा १ रेणुकी १ जनी किल्लेवाली २ कृष्णा १ विठी १ केतकी.

१०

१० दुयमबारी मंजी.

१ मशारनिल्हे १ मोहनी १ गुजाई १ जिवाई १ गवरी

१ राघू १ सगुणी १ भागी १ गजी १ बजी १ पोरगी.

१०

९ बारी तियम येशीची

१ मशारनिल्हे १ जैनी १ जैनी नवीन १ वेणू बुद्धी १ मनी १ गंगी नवीन

१ रेवाई १ यमुना १ गजी.

९

२९

पैकीं तपशील:—

१८ बारी पैकीं आसाम्या आठरा.

४ फुटकळ आसामी चार.

७ खालच्या आसामी.

२९

३८. बकूसुईण इनें नेहमीं हजर रहावें. आपलें काम अथवा आणिक कोणाचेंही काम जें येईल तें करावें. फक्त.

३९. काकोजी भोसला याकडे कोठीचें काम मुकरर होऊन फीलहाल बंदोबस्त करण्यांत आला. शिधा वगैरे सरंजाम ब्राह्मणाची नित्यनेमित्य दानाची दक्षिणा आदीकरून हें काम बरवख्त आज्याम देऊन ज्यास्ती कमतीचा इतला कामदारास होत असावा. यामध्यें कोणत्याही गोष्टीची तफावत पडल्यास मुनासब हुकूम देण्यांत येईल.

४०. आबदागिरे इसम दोन. दस्तुराप्रमाणें त्यांनीं आपलें काम आज्याम द्यावें. इसमनिशी १ रामा बोराव्या १ राम अवतस्य.

४१. भोई असामी आठ व नाईक दयाराम सदरहू प्रमाणें असामी नऊ. यांनीं आपले बारीप्रमाणें भोईखान्यांत हजर राहून सरकारचाकरी वक्तशीर करीत असावी. चाकरीची हरकत झाल्यास दयाराम नाईक याजपासून जबाब घेण्यांत येईल.

४२. फरासखानयाकडे घुल्या फरास असामी दोन. यांनीं हरवख्त बिछाना सतरंजी वगैरे पडदे साफ करून बिछाना करावा व रावजीस इतल्ला द्यावा.

४३. हरदो इलाख्याचे महालीं येकंदरच आहेत. जे वेळेस ज्या इलाख्यांत जसें काम पडेल तसें तें आज्यांम देतील.

४४. बगीच्या इंदोऱ्याची. परभारें इलाखे गज्याबा नाईक कारकून १ व पैकीं बारीदार येक.

४५. चिमणबाग नवीन तयारी फीलहाल बंदोबस्त करण्यांत आला. याची देखरेख बलासूखखान यांनीं करावी. खानमजकूरचे हाताखालीं दोघे माळी परशराम व झिंगरा माळी या उभयतांचे हातें काम घेऊन दुरस्ती झाड तयार करण्याची चांगली करावी. हरकत झाल्याबद्दल बलासुखापासून जबाब घेण्यांत येईल.

४६. चुकवल्या हरदो चवकांतील असामी आठरा यांनीं आपलेआपले कामीं राहून याची देखरेख रमाबाईनें करावी. हरकत झाल्यास रमाबाईजवळून जबाब घेण्यांत येईल.

४७. चपराशी लोक यांनीं दरोबस्त चाकरी येईल ती अमलांत आणून कामदारांस इतल्ला करीत असावें. आसामी दोन हुजूर १ मुकुंदा चपराशी इलाके कोतवाली.

४८. भिस्ती महंमद यांनीं दरोबस्त हजर राहून काम मामुलाप्रमाणें करीत जावें. फक्त

४८

सदरहु कलमबंदीपैकीं कलमें आठेताळीस दस्तुराप्रमाणें अमलांत आणून वहिवाट करावी. फक्त

तागाईत चंद्र २१ माहे जिल्काद सन १२५६ साल फसली.

---

श्री

**४३३**

**(ना. भो. १)**

श. १७७५ मार्ग. शु. ११
ता. ११-१२-१८५३

## “सेनासाहेबसुभा” पद कोणा पुरुषापासून चाललें याचा तपशील

१. शाहूमहाराजांस सातार्‍यास दिल्लीहून बादशहानीं रवाना केलें. ते बर्‍हाणपूरचे मुक्कामीं दाखल झाले. ताराबाई शाहूमहाराजांची चुलती सातार्‍यास मालकी करून होती. ते वेळेस परसोजी भोसले याजला वर्तमान समजलें कीं, शाहूमहाराज सातार्‍यास येतात. तें समजून बर्‍हाणपूरचे मुक्कामीं भेट घेऊन त्यांजसमागमें सातार्‍यास आले. तेथें तारा-

बाईनीं बंड केलें होतें. त्याचें पारपत्याकरितां महाराजांस साथ देऊन बंड परागंदा करून स्वराज्यावर शाहूमहाराज स्थापित झाले. ते वेळेस महाराज सरफराज होऊन परसोजी भोसले उपयोगी पडले सबब यांजला वऱ्हाड प्रांताचे "सेनासाहेबसुभ्या"चें पद देऊन जरीपटका व साहेबनौबद व शिक्केकटार वस्त्रें देऊन सन १११७ फसली शके १६३०चे सालीं रवाना केलें. त्यांनीं वऱ्हाड प्रांतीं येऊन त्या प्रांताचा बंदोबस्त ठेऊन स्वस्थान कायम करून दोन वर्षे राज्य केलें. त्यांचा काळ सन १११९ सालीं झाला.

२. बाद त्यांचे चिरंजीव कान्होजी भोसले यांजला सन ११२० सालीं "सेनासाहेब सुभ्या"चें पद देऊन रवाना केलें. त्यांनीं १८ वर्षे राज्य केलें. त्यांस संतति नव्हती, सबब त्यांचे धाकटे बंधु बिंबाजी भोसले यांचे चिरंजीव रघोजीबाबा ऊर्फ बाबासाहेब यांजला आपले जवळ भाम[1] येथें ठेऊन पुत्रवत् मानिलें. नंतर कान्होजी भोसले यांस पुत्र रायाजी भोसले झाले. सबब रघोजी भोसले ऊर्फ बाबासाहेब हे साताऱ्यास जाऊन शाहूमहाराजांपाशीं राहिले. महाराजांकडून फत्तेसिंग भोसले कर्नाटकचे मोहिमेवर रवाना झाले. त्यांसमागमें रघोजी भोसले याजला दिलें. त्यांनीं कर्नाटकचे प्रांतीं जाऊन स्वपराक्रम व जवामर्दी करून प्रांत सर केला. नंतर साताऱ्यास आले. नंतर एक दिवस शाहूमहाराज शिकारीस गेले. समागमें रघोजी बाबासाहेबही होते. महाराज जंगलांत पालखींतून उतरून उभे राहून शिकारीचा तमाशा पहात राहिले. तितकियांत एक वाघ मातब्बर बिडांतून निघून महाराजांचे सामने आंगावर चालून आला. नजीक येऊन झेंप टाकावी तितकियांत रघोजी भोसले नजीक उभे होते त्यांनीं जलदी करून तलवारीनें वाघ मारिला व महाराजांस वाचविलें. याजवरून महाराजांनीं बहुतशी खातरतसरीफ करून आपले जवळ ठेविले. इकडे कान्होजी भोसले यांनीं वऱ्हाड प्रांतीं बदफैलीवर जुलूम करून महाराजाशीं बागी* झाले. सबब त्यांचे पारिपत्यास रघोजी भोसले ऊर्फ बाबासाहेब याहास मुकरर करून समागमें फौज देऊन वऱ्हाड प्रांतीं रवाना केलें. त्यांनीं कान्होजी भोसले याजला काबीज करून साताऱ्यास घेऊन आले.[2]

३. त्याजवरून महाराज सरफराज होऊन रघोजी भोसले यांजला सेनासाहेबसुभ्याचीं वस्त्रें व जरीपटका व साहेबनौबद व शिक्केकट्यार व कोन्हेर राम दिवाण व रखमाजी गणेश

---

१. हा गांव वऱ्हाडांत यवतमाळ शहराच्या दक्षिणेस सुमारें ८।९ कोसांवर आहे. राजपदप्राप्ति होईल असा रघोजीस या ठिकाणीं दृष्टांत झाला अशी आख्यायिका आहे. त्या स्थलीं अनेक जंगी इमारती गडप झाल्याच्या खाणाखुणा क्वचित् दृष्टीस पडतात व फक्त बैरागी लोकांचा ५००० उंबरठा होता असें सांगतात. याजवरून रघोजीच्या सैन्याची जमात येथें केवढी होती याची अटकळ करितां येईल. २. इ. स. १७३०त कान्होजीस रघोजीनें वऱ्हाडांतील वणी तालुक्यांतील मंदार नांवाच्या गांवीं पकडिलें. कान्होजी साताऱ्यास बंदीखान्यांत असतांच मरण पावला. *. बंडखोर.

चिटणवीस व पटवर्धन* शिक्केनवीस व बक्षी व फडणवीस वगैरे मुत्सद्दी आणि इतर सरदार मानकरी बरोबर देऊन सन ११३९ सालीं वऱ्हाड प्रांतीं रवाना केलें. त्यांनीं वऱ्हाड प्रांताचा बंदोबस्त करून गोंडवण व बंगाला व उडिसापर्यंत मुलूख काबीज करून अमल बसवून २१ वर्षे राज्य करून ११६१ सालीं फाल्गुन शुद्ध ३स त्यांचा अंतकाळ झाला.

४. नंतर त्यांचे वडील पुत्र जानोजी भोसले सन ११६२ चे सालीं गादीनशीन झाले. त्यांचा काळ सन ११८० चे सालीं वैशाख मासीं १५स झाला. त्यांजला संतति नव्हती. सबब त्यांचे धाकटे बंधु मुधोजीबाबा भोसले ऊर्फ बापूसाहेब यांजला जानोजी-बोवांनीं मृत्यु होण्याचे पूर्वीच दोन वर्षे वटींत घेतलें होतें. नंतर जानोजीबाबाचा काळ ११८० चे सालीं झाला.

५. यावर सन ११८२ चें सालीं रघोजी भोसले याला पुण्याहून वस्त्रें येऊन गादीनशीन झाले. त्यांनीं सन १२२५ सालपावेतों राज्य करून तेच सालीं फाल्गुन मासीं वद्य ९ रोजीं शुक्रवारीं मृत्यु पावले. त्यांनीं ४३ वर्षे राज्य केलें.

६. उपरांत परसोजी भोसले ऊर्फ बाळासाहेब सन १२२५ सालीं वैशाखमासीं पुण्याहून वस्त्रें येऊन गादीनशीन झाले. त्यांनीं ९ महिने राज्य करून त्यांचा काळ सन १२२६ चे सालीं माघमासीं १५स तारीख १ फेब्रुवारी शनवार रोजीं पहाटेस ६ घटका रात्रीस झाला.

७. उपरांत मुधोजी भोसले ऊर्फ आपासाहेब यांनीं कंबेष १ वर्ष राज्य करून कंपनी सरकाराशीं बिघाड करून परांगदा झाले.

८. नंतर सन १२२८ चे सालीं श्रावणमासीं रघोजी भोसले ऊर्फ बापूसाहेब यांची वडील कन्या बनूबाई व्यंकटराव गुजरास दिली होती, त्यांचा पुत्र बाजीबा गुजर याजला श्रीमंत बाकाबाई साहेबांनीं दौलतीचे वारस समजून परसोजी भोसल्याची ३री स्त्री दुर्गाबाई यांचे ओटींत घेऊन रघोजी भोसले नांव देऊन दत्तविधान केलें. कंपनी सरकारांनीं दोस्तीची पासखातर येऊन गादीनशीन केलें. याचा बंदोबस्त पूर्वीप्रमाणें चालला. यांनीं ३५ वर्षे राज्य करून सदन १२६३ सालीं मार्गशीर्ष महिन्यांत शुद्ध ११स काळ झाला.

---

* रघुनाथभट पटवर्धन यांनीं आपल्या बायकोच्या हातांतील पाटल्या मोडून रघोजीसाठीं शिक्का करण्याकरितां पाटल्याचें सोनें दिलें म्हणून पटवर्धन हेच शिक्केनवीस झाले. रघोजीचा शिक्का वर्तुळाकार असून त्यांत पुढील अक्षरें होतीं:—

“ शाहुराज–पदांभोज–भ्रमरायितचेतसः बिम्बात्मजस्य मुद्रेयं राघवस्य विराजते. ”

४३४ श्री

शके १७७६

माहे मे सन १८५४

( ना. भो. २ )

कैफीयत बापूजी जिवाजी कोल्हटकर, मुजुमदार, मुलाईम[1] श्रीमंत महाराज राजश्री सेनासाहेबसुभा बहादूर, सुरु सन १२६४ साल फसली.

१. आमचे मूळपुरुष तीर्थस्वरूप राजश्री रामाजी नारायण कोल्हटकर यांचे वतनदारीचा गांव पांडवगड प्रांत वांई. येथील वतनदारी व राहणें घरदार वगैरे या गांवीं, तेव्हां कोंकणांत नेवरें येथील देशमुखी याजकरितां, वडिलांचें जाणें हरहमेष मौजे नेवरें येथें. मार्गी कोंकण प्रांतीं कोयना नदीचे तीरीं भैरवगडाचे खालीं भोसले राजश्रीचे बापूजी वडील बंधु व मधले परसोजी व कनिष्ठ साबाजी भोसले त्रिवर्ग बंधु व मुलें माणसें खटल्यासमवेत वस्तीस राहत होते. त्या गांवीं मुक्काम होण्यामुळें भोसल्यांनीं आपले घरीं ठेऊन घेऊन शिधासरंजाम वगैरेची सरभराई करावी. याअन्वयें दिवसेंदिवस स्नेह विशेष झाला. असें असतां, हाफसियानें भोसल्यावर दगा करून खटला सर्व लुटून कुटुंबासमवेत आपले कैदींत ठेवलें. हें वर्तमान रामाजीपंतास समजल्यावरून हाफसियाजकडेस जाऊन सवाल जातीनिशीं केला. जबाब दिल्हा जे, भोसले याजबाबत तीन हजार रुपये जो कोणी देईल त्याचे सुपूर्द करण्यांत येईल. हें ऐकोन आपले गांवीं येऊन जिंदगी आपली विकून तीन हजार रुपयांची भरती करून हाफसी यांजला देऊन भोसले यांजला सोडून पांडववाडीस आणून पाहाडाखालीं घर तयार करून देऊन जिंदगी कालानुरूप जमऊन देऊन ठेविलें. आपले वतनाचे विभागांतून खर्चाची मदत करावी. याजमुळें स्नेह अधिकोत्तर जाला. तेव्हां भोसल्यांनीं आपली उपाधिक वगैरे आमचे वडिलांस दिल्ही. नंतर बापूजी भोसले यांचे चिरंजीव राजश्री बिंबाजी भोसले यांचे स्त्रियेचें पोटांत दोन वर्षांचें सल होतें. याजमुळें फार चिंतेंत होते. पंतमजकूर याजला उपासना श्रीरघुवीरस्वामीची व साक्षात्कार; हें बिंबाजी बावांस समजल्यावरून निष्ठा पंताजवळ जडून अनुग्रह आपण स्त्रियेसमवेत घेतला. रामाजीपंतांनीं आपले येथील श्रीरामचंद्रस्वामीची धातुमूर्ति बिंबाजीबाबांस पूजेकरितां दिली. तीच मूर्ति हा काळपर्यंत सरकारांत देवघरांत आहे. बिंबाजीबाबाचे स्त्रियेस नित्य तीर्थ देत असावें. व पंतांनीं श्रीरघुवीरस्वामीस करुणायुक्त प्रार्थना केली जे, बिंबाजी बावांस पुत्र जाल्यास नामाभिधान स्वामीचेंच ठेऊं, ऐसा नवस केला. तों श्रीरामाचे कृपेकरून सन ११०७ सालीं बिंबाजीबावास पुत्रच झाला. नवसाप्रमाणें नांव रघूजी भोसले ठेविलें. कलम अव्वल

१. श्री छत्रपति संभाजीमहाराज यांजला बादशहानीं फौज पाठवून कबजी करून धरून नेऊन समक्ष हजर झाले. ते पातशहानीं यांचें खुबसुरतीस पाहून द्रवित होऊन "आमचा खाना खा" असें बोलण्यांत आणिलें. उत्तर केलें कीं आपली कन्या मजला

---

[1] सुगुणसंपन्न.

प्राप्त जाली असतां आज्ञेनुरूप हजरच आहों. या सख्त जबाबावरून मर्जी फार खप्पा होऊन प्राणांत केला. हें वर्तमान पातशहाजादीस समजल्यावरून लग्न आपलें केलें नाहीं. शोध करून महाराजांचे चिरंजीव शाहू याजला बहुत दिवस आपले अटकेंत ठेविलें. ते प्रसंगीं समागमें राजश्री विठ्ठल कान्हो ठोसर वाकनवीस कुटुंबासुद्धां होते. याजला कन्या जाली. तिजवर प्रीति शाहूमहाराजांची पुत्रवतप्रमाणें. ऐसें असतां कांहीं दिवसांनंतर पादशहाची मर्जी खुष होऊन सरदेशमुखी चवथाई बाबती व खिलात वगैरे देणगी देऊन शाहुमहाराज यांजला आपले नातू असें म्हणोन सातान्यास रवाना केले. तों सातान्यानजीक स्वारी येण्याची आवाई श्रवण होतांच रामाजीपंत यांणीं भोसले याजला समागमें घेऊन व चिरंजीव कोन्हेर यांजला समागमें घेऊन चलकुचांतच महाराजांच्या भेटी झाल्या. कोन्हेर-राम यांचें वय लहान, फार खुबसुरत व चलाखी पाहून त्याच मुक्कामीं विठ्ठल कान्हो ठोसर यांची कन्या देऊन विवाह केला. महाराजांनीं आपले जांवई असें म्हणून नंतर कोन्हेर-राम हरहमेष सातान्यास जात. ते वेळेस [ त्यांनीं ] समागमें रघोजी भोसले याजला नेत असावें. बाबासाहेब अवतारी पुण्यपुरुष, याजमुळें कोन्हेर राम यांचे मनांत ध्यास हाच कीं, बाबासाहेबांस पद मोठें मिळावें; याजकरितां महाराजांचे कारपरदार मोठमोठीं माणसें चिटणवीस वगैरे यांचा स्नेह बाबासाहेबांशीं करून सर्वांचे मनांत वागलें कीं, बाबा-साहेबांस छत्रपति महाराजाकडून मोठे पदाचें काम देववावें. दुसरें महाराजास कोन्हेर राम यांनीं विनंति केली जे, रघूजी भोसले हे आपले मेहुणीचे चिरंजीव होत. हें समजण्यावरून महाराजही कृपावलोकनें करून बाबासाहेबांकडे पाहात होते. परसोजी भोसले यांचे चिरंजीव कान्होजी भोसले यांजला ' सेनासाहेबसुभ्या 'चीं वस्त्रें देऊन वऱ्हाड प्रांतीं रवाना पेशजी कांहीं एक दिवस केलें होतें. तेव्हां ते वऱ्हाडप्रांतीं राहून होते. तों त्यांचे कारभाराची महाराजांचे मनांत विकृति होऊन बोलले जे, कान्होजी भोसले यांजकडून सेनासाहेबी काढावी, त्यास धरून आणावें. या कामीं कोणाची योजना करावी ? तो चिटनवीस याजला अगत्यवाद फार. यांनीं विनंती केली कीं, या कामीं सेनासाहेबीचीं वस्त्रें रघोजी भोसले यांजला देऊन रवाना केल्यास बंदोबस्त नीट राहील. उत्तर झालें जे, कान्होजी भोसल्याचे [पुतणे]; चुलते पुतणे एक झाल्यास कैसे होईल ? तर राजेश्री कोन्हेर राम हे जामीन देऊन विनंती केली जे, याजला राहण्याकरितां याचे खटल्याजोगी जागा एखादी स्वामीनें देववावी. या विनंतीवरून देऊर* हा गांव मोकासा वंशपरंपरा बाबासाहेबांस करून देऊन सेनासाहेबीचीं वस्त्रें देऊन कोन्हेर राम आमचे पणजे समागमें रवाना केले. ते समयीं महाराजांनीं कोन्हेर राम याला लग्नप्रसंगींचें आंदण देणें

---

* हा गांव सातान्यापासून ६ कोसांवर आहे. सन १८६२ चे जून महिन्यांत गव्हरनर जनरलसाहेबानें आपल्या सहीचें विद्यमान श्रीमंत जानोजी महाराज भोसले यांस एक इनामपत्र दिलें, त्यांत ' राजा बहादूर ऑफ देऊर ' हा किताब दिला.

राहिलें तें आंदण मुजमूचे सेनासाहिबसुभे यास आज्ञा केली कीं, तुम्ही आपले सेनासाहेबीचे मुलुकांतील मुजमूचा दरख देत जाणें. मुजमूचे कोन्हेर राम जांवई सबब आम्ही आंदण दिली. बाबासाहेबांनीं विनंति केली कीं, आज्ञेप्रमाणें घडून येईल. कधींही अंतर नाहीं. ऐसें होऊन बाबासाहेब व कोन्हेर राम वऱ्हाडांत येऊन कान्होजी भोसले याजला वणीजवळ धरून कैद करून पुन्हा साताऱ्यास जाऊन महाराजांजवळ कान्होजी भोसले दाखल केले. कलम दुय्यम.

१. कान्होजी भोसले साताऱ्यांत दाखल झाल्याबाद श्रीमंत राजश्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा याजला बंगाला व झाडी वगैरे सर करण्याकरितां आज्ञा झाली व हमराइत सदरचीं भलीं माणसें विश्वासुक दिलीं. बितपशीलः--

कोन्हेर राम आमचे पणजे यांजला दिवाणगिरीचें काम देऊन दरोबस्त कारभार व मुजुमूची निशाणी मैदरख व खर्च वगैरेचा बंदोबस्त नीट ठेवून मुलुख सर करणें अशी आज्ञा होऊन समागमें दिलें.

१ भास्कर राम कोन्हेर रामाचे बंधु, याजला बक्षीगिरीचें काम कुल फौजेचे मुखत्यारी देऊन रवाना केलें.

१ मुख्य चिटणवीस याजकडून चिटणवीसी देऊन रवाना केलें.

१ साहुकार रघुनाथभट पटवर्धन झिपरे याजकडून अनंतभट चितळे व रघुनाथपुरी व दत्तपुरी गोसावी सावकार या त्रिवर्गांची खातरी कोन्हेर राम यानें करून महाराजांची आज्ञा घेऊन समागमें घेतलें.

१ आणि कित्येक सरदार व मुत्सद्दी वगैरे समागमें छत्रपतीनें दिले.

१ फडनवीस यांजकडून फडणाविसीचे कामीं एक मनुष्याची योजना करून कोन्हेर राम याचे अनुसंगानें वागावें म्हणून ही आज्ञा देऊन समागमें घेतलें.

सदर्हू मंडळी बाबासाहेबाचे समागमें देऊन व वस्त्रें देऊन सन ११३२ सालचे अखेर सालीं रवानगी हुजुराहून जाली. मंडळीसह देऊर मुक्कामीं येऊन कोन्हेरपंत याणीं आपली उपाधिक भिकंभट जोशी हे फार लोभांतील इसम पंताचे, सबब कृपायुक्त होऊन उपाधिकीची वृत्ती देऊन बाबासाहेबांचे हे स्वाधीन गेले, व विश्वनाथ भट राहाळकर* याजला श्रीराममूर्तीची पूजा दिली. असे दोघे भट बाबासाहेबांनीं देऊरांत आपले खटल्यांत घरीं ठेविले. नंतर कूच करून मोहिम मकसुदाबादेस जाऊन लढाई फार करून मुलुक कबज्यांत आणून राजश्री भास्कर राम याजला चाळीस हजार फौजेनशीं वीरभुवन नामें जागा तेथें छावणी करून ठेविली. कारण मुलुक जमीदार माणसें मोठे लढाक याकरितां पंतमजकूर राहिले. तेव्हां छत्तीसगड वगैरे येथपर्यंत पंतमजकुरांनीं लढाई करून अंमल करून छावणीवर होते. बाबासाहेब व कोन्हेर राम

* उपनांव आचवल, मनभट उपाध्ये याचा पूर्वज.

समागमें फौज घेऊन गयेंत अंमल केला. व प्रयाग येथेंही अंमल केला. पुढें सवारीचा बेत जाण्याचा होता इतक्यांत नागपूर प्रांतीं झाडींत अंमल बसवून पवणी वगैरे येथें मोठे मोठे सरदार यांजला ठेविलें होतें तों यांचें पत्र आलें जे, गोंडांचा मोठा उपद्रव होऊन आम्हा लोकांस जेर केलें. हा मजकूर श्रवणीं येतांच सवारीचा कूच होऊन पुन्हा नागपूर जिल्ह्यांत येऊन गोंडांचें पारपत्य असें केलें कीं, गोंड मारून पेंवें भरलीं. इतक्यांत भास्कर राम छावणी करून होते तेथें अलीबिरदीखान व मीरजाफरखान या उभयतांनीं फंद करून पंतास मेजवानीचे बाहाण्यानीं बागांत डेरा देऊन तेथें नेऊन डेऱ्याचे तनावे कापून गरदी करून शीर कापलें. सन ११५७ फसली ऊर्फ शके १६६९; व पंताची स्त्री गर्भिणी होती, इजला धरावें तों ईश्वरकृपेनें एका पठाणाचे बायकोनें बाईला डोली देऊन कोणास न समजतां काशीस रवाना केलें. बाई काशीस पोंचल्यानंतर तेथें पुत्र जाला, त्याचें नांव काशीराम भास्कर ठेविलें. भास्करराव मारले पडले हें वर्तमान फौजीचे सरदार मोठे मोठे होते त्यांनीं बाबासाहेबांस पत्र लिहून कळविलें. हें वर्तमान श्रवण होतांच बाबासाहेब कोन्हेरपंत रोज दर्शनास जाऊन मजकूर निवेदन केला. तों पुन्हा आज्ञा जाली जे, तुम्हीं जाऊन पारपत्य करावें व तुमचे समागमें मदतीस बाजीराव बल्लाळ पेशवे फौजेनिशीं येतील. त्यास पेशवे व बाबासाहेब हे मकसुदाबादेस सवार करून निघाले. ते आपण झाडींत नागपुराहून श्रीमंत जानोजी भोसले व मुधोजी भोसले यांजला पेशवे यांचे बरोबर देऊन मकसुदाबादेस जाऊन बंगाला सर करून बंदोबस्त करून पेशवे गेले व जानोजी भोसले यांनीं तेथें राहून उढीया जगन्नाथ पर्यंत अंमल केला; व भास्करराव याचे मुंडकटाईबद्दल चवदा लक्ष रुपयांचा मुलूख शिवाय करून फौज घेऊन बंदोबस्त करून माघारे आले. कोन्हेरपंत बंधूचे दुःखांत शोकार्णवीं मग्न हें मुधोजीबाबांनीं जाणून आपले नांवें दरसाल पंचवीस हजार रुपयांची सनद वंशपरंपरेची याखेरीज सवारीशिकारीस जो खर्च लागेल तो व लग्नकार्यप्रयोजन तुमचे येथील होईल याचे खर्चाची सरकारांतून मदत राहील, असी शपथपूर्वक वंशपरंपरेची सनद करून दिली. सन ११६१ व शके १६७३ सालीं झाली. कलम ३ सीयम

१ भास्कर राम मारले पडले, त्यांची स्त्री ताईबाई नांवाची काशीस गेली होती. इचे नांवें वराडांतील बंदोबस्त साठचाळिशीचा झाला. तेव्हां वऱ्हाडप्रांतीं सुभा ठेविला तो सुभा बाईचे नांवें बाबासाहेबांनीं करून देऊन वहिवाटीस कोन्हेर राम यांचे विद्यमानें कृष्णाजी गोविंद मुकरर करून बंदोबस्त ठेविला, तो सन ११६१ साल फसली पावेतों चालला. भास्कर राम मारले गेले या दुःखानें राजश्री कोन्हेर राम शोकाक्रांत फार होऊन देशीं जाण्याची आज्ञा मागितली. बाबासाहेबही बहुतां प्रकारें समाधान करून पाहिलें. परंतु उदासीनता दूर होईना हें पाहून त्यांचे विनंतीवरून देशीं जाण्याची आज्ञा देऊन रवाना केलें. नंतर बाबासाहेबांनीं कोन्हेरपंत यांचे सहा पुत्र त्यांत चवघांचे नांवें सनद करून दिली. नांवें बितपशीलः—

१ बाबूराव कोन्हेर १ लक्ष्मणराव कोन्हेर
१ गोविंदराव कोन्हेर १ बळवंतराव कोन्हेर[1]

सदरहु चवघांचे नांवें वंशपरंपरेची चाळीस हजार रुपये नेमणूक दरसालीं घेत जाणें, व खर्च स्वारीशिकारी व लग्नकार्य वगैरे तुमचे येथें होईल याची मदत सरकारांतून राहील. ऐसी वंशपरंपरेची सनद सन ११६२ सालची करून देऊन बाबूराव कोन्हेर याजला कारभार, दवलतीचा कुल सोपून सन्निध ठेविलें, व तिघे बंधु यांची रवानगी देशीं पंतांनीं करून देऊन बाबासाहेबांचे आज्ञेप्रमाणें दिवाणगिरी व मुजमूचा दरख वगैरे शिलशिल्याप्रमाणें घेऊन कारभार केला. व लढाई वगैरे जो प्रसंग प्राप्त झाला त्यास आपण जातीनें जाऊन फौज घेऊन लढाईचें काम करून दिवाणगिरीचें काम करावें. बाबासाहेबांची मर्जी बहुत संतोषभरित पंतावर. ऐसें असतां बाबासाहेबांची प्रकृति बिघडली, तेव्हां राज्यकारभाराचे कितीएक प्रकार बाबूराव याजला एकांत घेऊन करावे व आज्ञा झाली तुम्ही आम्हांस पुत्रवत् आहां, तेव्हां आम्हांजवळ रात्रंदिवस राहत जाणें. आज्ञेप्रमाणें रात्रंदिवस संनिधच रहावें. श्रीमंत जानोजी भोसले यांणीं ही जवळ रहावें. या उभयतांस दवलतीचे सर्व कारभार जे बारकीचे ते समजावून देऊन सन ११६३ सालीं देवाज्ञा झाली. तेरा स्त्रियांनीं सहगमन केलें. दिवस क्रमल्यानंतर चवऱ्या सोन्याच्या दांडीच्या दोन त्यांजपैकीं बाबासाहेबांच्या आज्ञेप्रमाणें एक चवरी बाबूराव कोन्हेर याजला दिली व एक श्रीमंत जानोजीबाबांनीं आपणाकरितां ठेविली. नंतर कांहीं दिवस सेनासाहेबांचा अधिकार जानोजीबावांनीं घेतला, व कारभार बाबूरावांनीं करावा तो पंतमजकूरची प्रकृत फारच बिघडली, याकरितां आज्ञा घेऊन देशीं गेले. नंतर पंताचे पाठीमागें श्रीमंत जानोजीबाबा श्रीमंत मुधोजी बाबासाहेब या उभयतांत फिसाद वाढून खिस्सा होत गेला. हें वर्तमान पुण्यास समजल्यावरून पेशवे यांनीं जानोजी बाबासाहेबांचे नांवें सेनासाहेबीचीं वस्त्रें पाठविलीं व आपासाहेबांचे नांवें "सेनाधुरंधरी"चीं वस्त्रें येऊन राजकारण कांहीं सुरळीत चाललें. बाबूराव याजला पत्रें फार येण्याविषयीं गेलीं. परंतु प्रकृतीमुळें पंताच्या येण्याचा योग न झाला. कलम चाहरम् ४

१. राजश्री बाबूराव कोन्हेर यांच्या न येण्यामुळें कारभार अस्ताव्यस्त होणें याकरितां श्रीमंत जानोजीबावांनीं बळवंतराव कोन्हेर आमचे आजे याजला पत्र पाठवून बोलावून घेऊन भेट झाली व फार प्रस्तावा केला जे, सेनासाहेबीचें पद रायांनीं आम्हांकडे दिलें हें तुमच्या वडिलांच्या प्रसादाचें होय. याची आठवण आम्ही विसरल्यास तीर्थरूपजी कैलासवासीं हासतील, हें समजोन तुम्हांस बोलाविलें. त्यास तीर्थरूपजींनीं सनद तुमचे वडील बंधु बाबूराव कोन्हेर व तुमचे नांवासमेत चवघा बंधूंचें नांवें करून दिली ती तुम्हांजवळ आहेच. त्यास सांप्रत तुम्हांस दुसरी सनद

---

१. रामचंद्र व यशवंत असे आणखी दोघे बंधु होते.

तुमचे जातीचे नांवाची दहा हजार रुपयांशिवाय करून सरकारांतून सनद करून देण्यांत येईल. या आज्ञेवरून विनंति केली जे, आम्हीं साक्षात् बंधु सहा, त्यांत दोघे नाहींत; बाकी आम्ही चवघे जणे आहोंत. त्यांस चवघांचें नावे सनद मिळावी. या विनंतविरून संतोष होऊन आमचे चवघांचे नांवें बितपशील १ रामचंद्र कोन्हेर १ यशवंतराव कोन्हेर १ लक्ष्मणराव कोन्हेर १ बळवंतराव कोन्हेर. सदरहू चवघांचे नांवें सनद सन ११६७ साल व शके १६७९ या सालीं पन्नास हजार रुपये सालीना नेमणूक वंशपरंपरागत घेत जाऊन सेवा करणें व याखेरीज सवारीशिकारी व तुमचे येथें कार्यप्रयोजन याजला जो खर्च लागेल, तो सरकारांतून तुमचे शिरस्तेप्रमाणें मिळत जाईल, अशी वंशपरंपराची सनद कृपा करून दिली आणि आज्ञा जाली जे, दिवाणगिरी व तुमचे वृत्ति मुजमींची, याचा दरख शिरस्तेप्रमाणें घेऊन सरकारचाकरी आपले वडिलांप्रमाणें बेअंदेष करावी. या आज्ञेप्रमाणें बळवंतराव कोन्हेर, आमचे आजे यांनीं दिवाणगिरीचा कारभार व मुजुमीचा दरख वगैरे घेऊन कांहीं दिवस सरकारताबेदारी मर्जीनुरूप केली. ऐसे असतां राजेश्री दिवाकर पुरुषोत्तम यांचा प्रारब्धोदय दिवसेंदिवस श्रीमंतांची कृपा होऊन बळवंतराव यांस सोडून राज्यकारणें होऊं लागलीं. तेव्हां आमचे आजे यांनीं विचार केला जे, दोघे कारभारी एकदिल नसल्यास व एकचित्तें न वागल्यास कोणे दिवशीं त्यातीस धक्का बसून वडिलांचे लौकिकास दूषण लागेल हें समजोन, हें न दाखवितां श्रीमंत साहेबांस यात्रेचा बहाणा करून देशीं जावयाविषयीं विनंती करून आज्ञा घेऊन कारभारमंत्राचें सूत्र सोडून देशीं रवाना जाले, तों पुन्हां नागपुरास आलेच नाहींत. नेमणुकीपैकीं ऐवज श्रीमंतसाहेबांनीं देशी पाठवीत असावा व आपासाहेब यांजकडे दवलतीचा अधिकार जाल्यानंतर यांनीं हा ऐवजच दररोज देशी पाठवीत असावा.

कलम ५

१. आमचे आजे देशी गेले ते पुन्हा नागपुरास आलेच नाहींत. व आम्हांकडील काशीराव भास्कर यांचे पुत्र रामचंद्र काशी यांचा बंदोबस्त चारशें सवारींचा रिसाला देऊन जातीचा दरमहा पाचसें रुपये व हत्ती पालखी डंका निशाण वगैरे ऐसे मरातबानें श्रीमंत बापूसाहेब निभवीत होते. त्यांचे जातीपावेतों सरकारांतून निर्वाह जाला. नंतर त्यांचे स्त्रीचे नांवें चालले. हल्लीं त्यांचे वंश आहेत.

कलम ६

आमचे आजे बळवंतराव देशीं गेले तेथें त्यांचा काळ झाल्यानंतर श्रीमंत बापूसाहेबांनीं आमचे तीर्थरूप जिवाजी बळवंत याजला पत्रें एक दोन पाठविलीं. तेव्हां पत्रान्वयें तीर्थरूपजी सन ११९६ सालीं नागपुरास दाखल होऊन श्रीमंत साहेबांची भेट होऊन सरकारांनीं बहुतसा प्रस्तावा केला, व आज्ञा जाली जे हें राज्य तुमचे वडिलांचे कृपेचें होय, हा विसर आम्हांस कधींही पडणार नाहीं अशी आपली खात्री ठेवा; व तुमचे वडील व आमचे वडील हे पुण्यवान, त्यांचें तसेंच निभलें, य: अमृत वचनांनीं आमचे तीर्थरूपजींचा परम संतोष होऊन, विनंती केली जे, आम्हीं सर्वपरी सरकारचे आहों. पुन्हा आज्ञा जाली जे, सांप्रत या दवलतींतून तुमचे जातीस नेमणूक, मै पालखीचे

सरंजामसुद्धां अठराशें रुपये सालीना मिळतील. व घांसलकडीकरितां तीनशें रुपयांचा गांव मौजे मांडव मोकासा तुम्हांकडे चालेल. ऐसें एकवीसशें रुपये सालिना येऊन प्रपंच कालानुरूप करावा. याशिवाय तुमचे येथील लग्नकार्य वगैरे जें निमित्त होईल यासीं जो खर्च लागेल तो सरकारांतून मदत होऊन खर्च होत जाईल, ऐशी कृपाळुपणें आज्ञा जाली. त्या आज्ञेप्रमाणें एकवीसशें रुपये कबूल करून नागपूर मुक्कामीं राहून प्रपंच करीत होते. शिवाय नैमित्तिक खर्चास आज्ञेप्रमाणें हजारों रुपयांची मदत सरकारांतून होऊन सन १२२५ साल पावेतों निर्वाह एकरूप झाला. नंतर सालमजकुरीं फाल्गुन वद्य ९मीस श्रीमंत कैलासवासी झाले. नंतर आपासाहेब यांचकडे दवलतीचा अधिकार आला. यांनीं कांहीं एक कमबेश व शिलशिल्याप्रमाणें सन १२२७ साल पावेतों निर्वाह केला. सनमजकुरीं राज्य बुडालें. नंतर अंग्रेजी जाली. सन १२२८ सालीं सिदक अलीखान नबाब व राजश्री नारायण गोपाळ पंडितजी या उभयतांचे हातांनीं दवलतीचा बंदोबस्त जाला. तेव्हां तीर्थरूपजींचे नांवें नेमणूक मुत्सद्यांत नगदी रुपये पन्नास प्रमाणें महावार, एकून रुपये सालिना सहाशें प्रमाणें व तीनश्या रुपयांचा गांव एकून दरसाल नवशें रुपये सनमजकुरी पासोन १२३० अखेर सालपावेतों शिवाय कार्यप्रयोजनास जिनगी शिलशिल्याप्रमाणें दिवसानुरूप मिळत होती. सनमजकुरी तीर्थरूपजींचा काळ जाला. नंतर आमचे नांवें नेमणूक गुजाबादादांनीं करून दिली. आम्ही देशीं गेलों. पुनः देशांतून आलों ते वेळेस कारभार गुजाबा दादासाहेब यांजकडेसच होता. आमचे पाठीमागें आम्हांकडे तीनशें रुपयांच्या मोकाश्यांचा गांव चालत होता, तो महकूफ करून नगदी नेमणूक सालिना साहाशें रुपये प्रमाणें चालली. ती सन १२५४ सालापावेतों सरकारचे अमलांत आम्हांस मिळत गेली; व कार्यप्रयोजनास आमची मदत सरकारांनीं शिरस्तेप्रमाणेंच ठेविली. सन मजकुरीं अखेरसालीं मुत्सद्यांतून राजश्री भगवंतराव दादा फडनवीस यानें सरकारास समजवून मुत्सदी नेमणूकदार जे होते त्यांची खाजगींतून वजाई करून दरमहाप्रमाणें कामें दिलीं, त्यांत आमची खाजगी वजाई होऊन सरकारांनीं कामाविशीचें काम पन्नास रुपये दरमाहाचे देऊन आम्हांकडून कमाविशीचें काम सन १२६३ सालपावेतों घेतलें. नंतर सनमजकुरीं सरकार कैलासवासी जाले. उपरांत सहा सात महिने अंग्रेज बहादुर यांचे हाताखालीं कमाविशी निभली. अखेर वैशाखमासी इलीयट्साहेब बहादूर यांणीं आम्हांकडील कमाविशीचें काम कांहींएक कामांत अंतर नसतां आम्ही वृद्ध असें आम्हांस समजावून बोलण्यांत आणलें कीं, जे तुम्ही बुजरूग, व वयांनीं वृद्ध सबब तुह्मांकडून कमाविशी महकूफ केली. तुमचा निर्वाहाचा बंदोबस्त सदरांतून करण्यांत येईल.

कलम ७

१ सदर्हूप्रमाणें आमची कदामत सरकार कैलासवासी होत पावेतों निभली. सरकारांस देवाज्ञा जाली ते दिवसापासून नाउमेद. तों श्रीमंत मातुश्री बाईसाहेबांची आज्ञा कदामतीचे कैफीयतीविषयीं सादर जाली त्यावरून मनांत परमसंतोष जाला जे, श्रीकृपेनें या

दवलतीचा रागरोष न होईल, व कैफीयतीविषयीं हुकूम जे पक्षीं जाला, तेव्हां जसी ज्याची कदामत त्याप्रमाणें सरकारानें निर्वाह केला तसाच बंदोबस्त हाल कायम होऊन निर्वाह होईल या उमेदीनें मनांत फार आल्हाद होऊन कैफीयत कदामतीची पेष केली आहे.

---

श्री

४३५
( भा. व. २. १३८ )

शके १७८९ मार्ग. व १०
ता. २०-१२-१८६७

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री आप्पासाहेब भानु[1] मुक्काम मेणवली स्वामीचे सेवेसी पोष्य पांडुरंग बल्लाळ खरे मुक्काम पुणें साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल तागाईत मार्गशीर्ष वद्य १० पावेतों सुखरूप असो विशेष. आपली आमची भेट सातारे मुक्कामीं होऊन आपण दिपवाळीकारितां मेणवलीस गेलां. ते वेळेस मार्गशीर्षमासीं शुद्ध पक्षांत पुण्यास येतों आणि तुमचा ऐवज देणें त्याचा उलगडा करूं म्हणून करार केला. त्यास अजून पावेतों पुण्यास आलां नाहीं. आम्ही आपली वाट पहात राहिलों, त्यास आपण कधीं येणार तें पत्र पावतांच लिहून पाठवावें. ऐवजास फार दिवस झाले. इकडे यावयाचें नसल्यास तसेंच ल्याहावें म्हणजे आम्ही आपलेकडे येऊं. स्नेहाचे जागा फार तपसील ल्याहावासा नाहीं. बहुत काय लिहिणें? लोभाची वृद्धि असावी हे विनंती.

---

४३६*
( काळेसंग्रह )

श्री

वैशाख व. ३ शके १६६०
ता. २५-४-१७३८

पौ छ १९ मोहरम बराबरी रायाजी जगन्नाथ, सन ११४८.

राजश्री मानसिंग जाधवराऊ[1] गोसावी यांस

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो बाजीराऊ बल्लाल प्रधान आसीर्वाद उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित गेलें पाहिजे विशेष. तुम्ही पत्र पाठविलें तें पावलें. आपले जागिरीचे परगणे सिंदखेड व खेडले, पडतूर, सेवली, रोशनगांव नबाब निजामनमुल्क याजकडून करार करून घ्यावे म्हणून माहराज राजश्री स्वामींनीं राजश्री आनंदराऊ पंडित सुमंत यांस आज्ञा केली, कागदपत्र नबाबास करून दिल्हे, तों नवाबाचें

---

१ नानाफडणिसाचा दत्तकपुत्र महादजीपंत यास पत्र. * हा व त्यापुढील १० कागद श्री. यादव माधव काळे यांच्या संग्रहांतील आहेत. त्यांजला अशा ऐतिहासिक कागदांच्या जुन्या नकला मिळाल्या, त्यांतून हे थोडे कागद त्यांनीं नकलून घेतले. मूळच्या नकला पुष्कळ ठिकाणीं दुर्बोध होत्या आणि नकलाकारास मूळ कागद नीट वाचतां आले नाहींत असें स्पष्ट दिसतें. तथापि कागद महत्त्वाचे असून त्यांच्या खरेपणाबद्दल संशय घेण्यास कारण नाहीं.

जाणें दिलीकडे जाहलें. त्यामुळें ते गोष्ट तैसीच राहिली. प्रस्तुत उत्तरेकडील प्रसंग विज्वर जाहला. सर्व प्रसंग आपले स्वाधीन जाहला आहे, तरी हे परगणे आपले स्वाधीन केले पाहिजेत म्हणून कितेक तपसिलें लिहिलें तें सविस्तर कळों आलें. ऐशियास तुमचें सर्वा-विशीं चालवावें हें परम अवश्य आहे. तुम्हापेक्षां दुसरें अधिकोतर आहे असें नाहीं. परंतु तुम्हाकडील प्रसंग करून घेणें तो निक्षून करून घ्यावा लागतो याकरितां नवाब नाशरजंग माघारे फिरोन औरंगाबादेकडे येणार ते लौकरीच येतील, त्यांची आमची भेट होईल ते समई कितेक विचार कार्यभागाचे होणें ते होतील. तदोत्तर तुमचा प्रसंग करून घेणें तो त्यांचे आमचेच विचारें करून घेतला जाईल. जें करणें तें पायासुध करावें लागतें. याकरितां आम्हांस तुमच्या कार्याचें अगत्य आहे. नवाबाचे भेटीनंतर आपलें कार्य करून घेतलें जाईल. दौलताबाद सरकारचा वतनी आमल आपला आहे. तरी कमावीसदारांस ताकीदपत्र पाठवावें कीं रुसूम हक सुरलीत पावे म्हणून लिहिलें, त्यावरून कमावीस-दारांस ताकीद पत्र पाठविलें आहे. त्या प्रांतें आलियावरी भेटही होईल. जाणिजे. छ १६ मोहरम बहुत काय लिहिणें. लेखन सीमा

(बाजीरावाचा शिका.)

---

ले. ४३७ श्री शके १६६१

(काळेसंग्रह) इ. स. १७३९

राजमान्य राजश्री बाजीराव पंडित यांसीं आज्ञा केली ऐसीजे वऱ्हाड प्रांतीं खास-गीच्या महालांत राजश्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा यांच्या सरंजामांत तुम्हांकडील फौज जाऊन धामधूम करितात म्हणोन हुजूर विदित जाले तर वऱ्हाड प्रांतीं तुमचा तालुका नसतां फौज पाठवून खासगी व मारनिलेच्या सरंजामास उपद्रव करावा हे गोष्टी उचित नाहीं. हल्लींही आज्ञापत्र सादर केलें आशे तर राजश्री औउजी कवडे वगैरे आपणा-कडील सरदारांस ताकीद करून वऱ्हाड प्रांतांत फौज न जाय, खासगी व रघोजी भोसले यांच्या सरंजामास कोन्हेविसी उपसर्ग न लागे, मुलकांत धामधूम न हो ते गोष्टी करणे. व सरकार हंडिया येथें तुम्हांकडील अमलदार यांकडील अमलास खलेल करितात, तरी अमलदारास ताकीद करून हुजूरच्यास आंतर न करणें बहुत काय लिहिणें सुज्ञ आसा.

---

४३८
( का. सं. ) श्री

ता. छ २६ माहे सव्वाल
सुाा तिसा सलासैन मया व अलफ

पौष व. १३ शके १६६०
ता. २६-१-१७३९.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ६५ कालयुक्तनाम संवत्सरे पौष बहुल १३ शी भृगु-वासरे क्षत्रिय कुलावतंस श्रीराजा शाहूछत्रपति स्वामी यांनीं सेनाधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री रघोजी भोसले सेनासाहेब सुभा यांसी आज्ञा केली ऐसी जेः—

सुभे बितपसील.

१ सुभे मकसुदाबाद
१ सुभा बितिया
१ सुभे लखनौ
१ सुभे बेदर
१ सुभे ढाका बंगाला
१ सुभे इलाहाबाद ऊर्फ प्रयाग

एकूण सुभे सहा तुम्हांकडे जमावाचे बेगमबिद्दल मुकासे दिल्हे असत. तरी तुम्ही सदरहू सहा सुभेचा मुकासबाबेचा वसूल घेऊन स्वामिकार्य करीत जाणें जाणिजे. बहुत काय लिहिणें सुज्ञ असा.

---

श्री

४३९
( काळेसंग्रह )

ता. २-२-१७३९
माघ शु॥ ५ शके १६६०

राजश्री रघोजी भोसले सेनासाहेब सुभा गोसावी यास

श्रीसकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ श्री महाराजाधिराज राजा अकबरशा व बुऱ्हाणशा नि॥ महेपतीराय देवराय गुसाई संस्थान देवगड संवत १७९५:—तहनामा लिहून दिधला ऐसीजे. वलीशा राज्यास अधिकारी असोन जबर्दस्ती आमचें राज्य करीत होते. याजकरितां आम्ही तुम्हास आपल्या साह्यास फौजेनिशीं आणून तुमचे हातें राज्य सोडवून घेतलें, यासीं आपण तुम्हास कबूल केली कलमा बितपशील.

१ फौज बतरीख नालबंदी नगदी रुपये वायदेबंदी बितपशील.

३००००० माघ शुाा ५ मी
२००००० माघ शुाा १३ शी
५००००० तागाईत ज्येष्ठ अखेर सं १७९५

१०,००००० 

एकूण दहा लाख सदर्हू वायदे वाा

१ तुमच्या राज्यांतील बोलाचाली तहरह करणें तो तुमच्या विचारें करूं. तुम्हांशिवाय दुसऱ्याकडे अनुसंधान करणार नाहीं.

१ पाा बितपशील

१ किल्ले पवनी बमय बालापूर
१ पाा मूलतापी बमय चिखली व जागीर फुटकर भाईखान बिबी दरोबस्त जे गांव

| | |
|---|---|
| १ ... सदर्हू तीन कलम लिहून दिले मध्यें तफावत करणार नाहीं. | प्रा मारचे असतील ते दरोबस्त (१५६)<br>१ प्रा मारूड दरोबस्त<br>—<br>३<br>एकूण तीन परगणे पानसुपारी बाल तुम्हास तुमचे वंशपरंपरा दिले असत. |

सदर्हू लिहिल्याप्रमाणें करारांत तफावत करूं तर आम्हास......आहे. हे कबुलीयत लिहून दिले. मोर्तबसुद. छ ५ शुद्ध माघ संवत १७९५ रुजू दफतर दिवाण रघुनाथसिंगजी.

---

श्री

**४४०**

(काळेसंग्रह)

मार्गशीर्ष व. २ शके १६६०

ता. १५-११-१७४८

तहनामा तीर्थस्वरूप राजश्री राघोजीबावा भोसले सेनासाहेबसुभा वडिलांचे सेवेशी आपत्य रायाजी[1] भोसले दंडवत विनंती. आम्हास स्वामींनी सरंजामवाटणी करून दिल्या त्या करारप्रो माहाल सत्ताविसांचा मुकासबाबेचा अमल करून त्यासिवाये दुसरियाचे महालास उपसर्ग न देऊं. नजर घासदाणा तुमचा तुम्ही घेणें. आम्ही वडिलासमागमें राहून साबरीचे डौलास व खासगत खर्चास रुपये पन्नास हजार ५०,००० वडिलांही आम्हांस द्यावे. परमुलकांत तुम्हासमागमे फौजेनसी येऊं. खंडणी होईल त्याजपैकीं सरदेशमुखी व बाबती वजा होऊन उरले ऐवजाची वाटणी फौजेचे गनतीवर दामाशाइ प्रो. याशिवाये आमचे कारकीर्दीचें कर्ज साहुकाराचे सहा लक्ष रुपये आम्हावर आहे. त्यासी दरसाल पावनालक्ष रुपये प्रो तुम्ही आह्मांस कर्ज वारावयास द्यावे, फौजेचे सरंजामाबद्दल गांवीचे ऐवजीं मुबदला रुपये २५००० पंचवीस हजार तुम्ही आम्हास देउगावांचे वाटणीचे ऐवजीं उगवून द्यावे. येणें प्रो करार आसे. छ १४ जिल्हेज सुास्सन तिसा अर्बैन मया व अलफ.

हा तहनामा लिहिला सही O नजर घासदाणा तुम्ही येणेंप्रमाणें वर्तणूक आसे. आंतर करूं तर महाराजांचे पायाची आन आसे. सन आरबी ११४९.

---

श्री

**४४१**

ता. १७४९-५० इ. स.

तहनामा सरकार राजश्री सेनासाहेबसुभा व निळकंठशा राजे स्वस्थान चंद्रपूर सुासन खमसैन मया अलफ सन ११५९ (फसली)

---

१ कान्होजीचा मुलगा.

कमावीस सामाईक दरोबस्त कमावशि माल सायेर व पांढरी व कलाली व हुकुमत माल व झाडझाडोरा शिवाय बाबद सनदी उतार व भुमिगत व कुलबाब व कुलकानु एकूण तपसीले प्राो

१ प्रांो गडबोरी
१ प्रांो राजूर
१ प्रांो जागड×
१ प्रांो चेप्राल
१ प्रांो अष्ट
१ प्रांो नेरी
१ प्रांो सातोंड
१ प्रांो पवड
१ प आमगांव

---

९

१ प्रांो बारसागड
१ प्रांो घाटकुराल
१ प्रांो हवेली देखील
१ प्रांो गडचिरोली
५ पेठा देखील शहर
१ नारायण पेठ
१ रामशाई पेठ
१ पुना पेठ
१ सेटकपूर
१ शहर व कृष्णापूर

---

९ ५

---

१८

एकूण तेरा प्रांो व पेठा पांच देखील शहर चंद्रपूर यास सदरहु कमाविसी पैकीं ठाणे जातशिबंदी समाईक मुकरा दुतर्फा वजा होऊन बाकी जमा राहील त्यास हिस्सेरसीद दरसद्दे अज रुपये ११० एकसे दहा पैकीं हिस्से बितपसील

हिस्सा तरफ सेनासाहेब सुभा
१० सरदेशमुखी
२५ च्याहारम×
३७॥ भाई वाटणी
ये॥ साडेबहात्तर एकसें
दहापैकीं प्रांो हिस्सेरसीद करणें.

हिस्सा तरफ स्वस्थानिक
निळकंठशाई राजे अज
जमाव एकशे दहापैकीं
बो हिस्सेरसीद भाईवाटा
३७॥
प्रांा साडे सदतीस रुपये.

---

**४४२** श्री

इ. स. १७५७–५८.

( काळेसंग्रह )

तहनामा सुभे व्‍हाड दरजागा बुलदे आलजपूर सन ११६७ फसली सुा समान खमसैन मया व अलफ कलमे बितपसील.

ऐ. २८

जागीर सरकार व जागीर जात निजामउद्दौला बहादूर व मशरुत निजामत व समसामुद्दौला व पाये बाकी या महालातची साधणुक खाम पैकी देहे खर्च व सरदेशमुखी माफक मामूल वजा होऊन बाकी बीसरसद्दे सरकार कुलबाब चाहरम

५५

नजर घासदाणा पटीपटीयात कुलबाब वगैरे.

४५

येकूण पंचावन येकूण पंचेचाळीस

पा। महाल जागीर सरकार अलिबशर्त दीलराई.

कलम

१

महालांत सरकार कलंब व सरकार खेडल व सरकार पवनार वगैरे वर्धापार सिवाये देवगड चांद येथें सेलावर (?) व झेंडे सरकारचे येऊन सिरस्ते खाम आकार होईल त्यांत देहेखर्च व सरदेशमुखी माफक मामूल वजा होऊन बाकी निमे निमे दरसदे.

सरकार कुलबाब चाहरम.

५० नजर घासदाणा पटी पटीयात वगैरे कुलबाब

५०

एकूण ऐवज तुमचे सरकारचा होईल तो वर्धेअलीकडे मोवजा देऊं, आगर रुपये नगदी देऊं.

कलम

१

पा। रालेगांव व कारंज वाढोन दरोबस्त व पा। आंदुरी व विरुर आका व पोहण हीचे महाल मशरुत येथे सेक बार व झेंडे सरकारचे येऊन खाम साधणुक देहे खर्च व सरदेशमुखी माफक मामूल वजा होऊन बाकी हिसेरसद बितपसील.

सरकार कुलबाब चाहरम

५५ नजर घासदाणा वगैरे पटी पटीयात कुलबाब

४५

सदरहु ऐवज वर्धे अलीकडे नगद रुपये देऊं.

कलम

१

हरएक महालात इजारदार आहेत त्याजकडून गांवची साधणुक खाम मनास आणन देहे खर्च व सरदेशमुखी माफक मामूल वजा होऊन बाकी इजारदाराकडून निशा करून घ्यावी. जो कोण्ही करार वार्काइ आदा न करी त्याचा हिसेब पाटील पांडे याच्या प्रो। मनास आणून कलम याची वाट उभयतांनीं करून देऊन गांव सोडवावे.

कलम

१

पा। हवेली आलजपूर जागीर सरकार येथें चाहरम व घासदाणा किस्ता रुपये २५००० पंचवीस हजार मोकरर जाले ते सालबसाल घेऊं.

कलम

१

जहागीर दिगर या महालांत साधणुक खाम पैकीं देहे खर्च व सरदेशमुखी माफक मामुल वजा जाऊन बाकी निमे निमे जागीरदारांन कुलबाब,

५०

एकूण पन्नास

चाहरम नजर घासदाणा पटी पटीयात वगैरे कुलबाब ५० एकूण पन्नास.

कलम

१

आम्हाकडील पागे व पतकी कोण्ही परगणियात पैसे घेतील ते मजूर देऊं. या तुम्हाकडून कोण्ही घेतील ते मजरा घेऊं.

कलम

१

जे गांव अमलास असतील तुम्ही आम्ही मिळोन......करून पैसा ध्यावा.

कलम

१

चिरंजीव रा साबाजी भोसले यासी सरकारांतून आहे, त्याचे चाकरीस स्वार सुमार ५०० पाचसे आळजपुरीं ठेवूं. परवाने तुम्ही हुजुरून आणून द्यावे.

कलम

१

उभयपक्षीं वचनप्रमाण जाहाले त्याप्रमाणें अकृत्रीम वर्तावें. तहात अंतर पडो न द्यावें. उभयेतांस ईश्वर दरम्यान.

कलम

१

एकूण कलमें पंधरा

श्रीा देवगड व चांद याची तुम्हास तालुक नाहीं.

कलम

१

मातबर माणूस तहाच्या बंदोबस्ताबद्दल ठेवूं.

कलम

वाटणी गढ्या व मकाने तुमची तुम्हाकडे आमची आम्हाकडे कोण्ही कोणास मुजाहीम न व्हावें.

कलम

१

मुलकास कौल देऊन उभयेतांनीं आबाद करावी. कोण्ही गरज गो खिलाफ जाहीर करील तर उभयेतानीं मंजूर न ठेवावे.

कलम

१

आमचे भाऊबंद वगैरे लोक कोणी तुम्हाकडे आले तरी त्यास आश्रये न द्यावा व आमचे दोस्तीनें तुमचे दोस्त तुम्हाकडून नाखूष होऊन येईल त्यास जागा न देऊं.

कलम

१

---

**४४३** श्री ता. ५-८-१७६१

श्रावण शु. ६ शके १६८३

( काळेसंग्रह )

( ताराबाई आईसाहेबांचें पत्र जानोजी भोसले यास )

तुम्हास हुजूरचे पत्रीं सेनासाहेबसुभा किताब त्याहावयाची आज्ञा नव्हती, त्यास पुण्याहून रघुनाथ बाजीराव व माधवराव बल्लाळ सातारियास आले. माधवरावास पेशवाईची वस्त्रें दिलीं. त्यांनीं अर्ज केल्यावरून तुम्हांस सेनासाहेबसुभ्याचा किताब दिला आहे. येंदा मोगलानें बिघाडाचा डौल धरला आहे, तरी तुम्ही पंतप्रधानास साह्य करून मोगलांचा मोड करावा. छ ५ मोहरम सुा इसने सितैन मया अलफ.

---

**४४४** श्री ता. १-९-१७६१

भाद्रपद शु. ३ शके १६८३

( काळेसंग्रह )

यादी मतलब जानोजी भोसले याचा करार करून घ्यावा, व त्यांनीं पत्र पावतांच यावें. आमचे फौजेप्रमाणें मन घालावें. मोगलाचें पारिपत्य करावयाचा करार सुा सन इसन्ने सीतैन मया व अफ.

गंगथडीचा घासदाणा घ्यावा. घासदाणा याचा ऐवज घ्यावयाचा करार आहे, त्या प्रमाणें जो होईल तो सरकारचे दहा लाख येणें त्यांत वजा घालोन बाकी ऐवज दाहा लाखांत राहातील ते माफ करून कतबा माघारा देऊं.

पटणें याचा ऐवज मागील व पुढें ...

पटणियाचा ऐवज मुधोजी भोसले याचा मागील राहिला असेल तो व पुढें दरसालचा तुम्हांकडे देऊं.

करार करावे.

कड्याचें वतनाचें ठीक करून ठाणें सुद्धां यावें.

वाजवी तुमचें आसेल तसें करूं.

करार करावे.

सदरहुप्रमाणें मन घालून सरकारचे फौजेप्रमाणें चालल्यास सदरहू कलमें पांच करार होतील, छ १ सफर इसन्ने सितैन.

मुधोजी भोसले यां कडील अकरा लक्षांचा सरंजाम देवावा, त्यास आम्ही समजाऊं. अकरा लक्षांचा सरंजाम तुम्हांस करार करूं. तुम्ही यास समजावावें, आणि सरकारचे इतल्यांतच मुधोजी भोसले याचें कर्ज वाजवी असेल तें तुम्ही वारावें.

करार करावे.

वराडची सरदेशमुखी करून द्यावी. नेहमीं सरदेशमुखी तुम्हांस देणें ती घासदाणियाचा व गंगथडीचा ऐवज दरसाल तुम्हांस लाऊन द्यावा. हा करार पेशजीचा आहे, त्या ऐवजीं सरदेशमुखी नेहमीं लाऊन देऊं.

करार करावे.

सदहू कलमे बशर्त यांनीं मोगलाचे कामास अथवा हरएक मातबर मसलत पडल्यास मन घालोन करावें. सरकारचे फौजेपेक्षां अधिक करावें म्हणजे चालवूं.

करार करावे.

---

४४५ श्री

( काळेसंग्रह ) चैत्र व. १३ शके १६८५
ता. ११-४-१७६३

राजश्री जानोजी भोसले सेनासाहेब सुभा गोसावी यांस

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो श्रीनिवास गंगाधर प्रतिनिधि आसीर्वाद विनंती. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन केलें पाहिजे विशेष. श्रीमंत महाराज स्वामी छत्रपति यांजला राजश्री पंतप्रधान यानीं तेरा वर्षे अमर्याद होऊन सेवेची रीत टाकून नजरबंद ठेविलें. श्रीकृपेनें त्याचा फलादेशही त्यांस आला. त्यावरी राजश्री रघुनाथपंत याणी राजश्री गमाजीबावा दिवान यास क्रियाशफत देऊन स्वामीस किल्याखालीं उतरविलें; आणि फिरोन पहिल्या योग्य ( प्रो ? ) जाजती वर्तणूक करूं लागले. किंबहुना त्यापेक्षां विशेष केलें, व पदांच्याही घालमेली केल्या. याजबद्दल छत्रपति महाराज याणी आम्हास आज्ञा केली कीं, तुम्ही राजश्री गमाजीबावास पाठऊन नवाबास फिरविणें. त्याजवरून मशारनिलेची रवानगी केली व तुम्हासही सामील येऊन व्हावयाची आज्ञा केली, त्यावरून फौजेसुधा कलबर्गियाचे मुकामीं येऊन स्वामीसेवेसी येऊन तत्पर जालां. तुम्ही पंचवीस सहस्र फौजेनसी येतांच नवाबही माघारे फिरले. त्यास पुढें राज्याचा बंदोबस्त जाला पाहिजे व शत्रूचा पराभव व्हावा. सालमजकुरीं तुम्हीं पंचेवीस सहस्र फौज ठेविली आहे, तिचा निर्वाहापुढें मातबर फौजेनसीं सन्निध राहून राज्यास अनिष्ट चिंतणार त्यांचें पारपत्य येथास्थित करून स्वामीचे कृपेस पात्र जालां. पुढें राज्य स्वस्त चालावें या करितां तुम्हांस सरंजाम द्यायाचा करार केला असे. बितपसील

छत्रपति कैलासवासी महाराजांचे कारकिर्दीस तुम्हाकडे सरंजाम

१ प्रांत वराड दरोबस्त
१ देवगड प्रांत
१ चंद्रपूर प्रांत
१ सुभा कटक
१ सुभा मकसुदाबाद
१ सुभा पटणें
१ किता प्रगणे नर्मदातीरीं सोळा (गढा ?)
मंडल्याचे शिवाय नेमाड.

येणेंप्रमाणें तुम्हाकडे सरंजाम पूर्वीपासोन चालत आला आहे. तेणें प्रो करार आहे. सदरहू सरंजाम आनभऊन सरंजामावरी जितकी चाकरी करीत आलां तितकी

जाजती सरंजाम हाली तुम्हांस द्यावा. पंचेवीस हजार फौजेचा दर हजारी तीन लक्ष रुपये प्रो येकूण पंचाहात्तर लक्ष रुपये याचा सरंजाम पैकीं फत्तेसिंग भोसले यांचा सरंजाम स्वराज्यांतील वडीलकी, गंगथडी वगैरे सदरहू फौजेचे भरीस द्यावे. निपुरीस (?) राहिले तो दुसरे जागा नेमून द्यावा. खानदेश वगैरे नर्मदेअलीकडे

कलम १

तुमचे साक्षात तिघे भाऊ व तुमची घरांतील भाऊबंद यांस नेमणुकेप्रो तुम्ही आजवरी देत आलां त्याप्रमाणें पुढें चालवावें. सरकारांतून निराळी जागा देऊन

सुखरूप करावी.

यासिवाये पंचेवीस हजार फौजेचा सरंजाम......करार केला असे. कढेवलीतचे देशमुखीचें वतन तुमचें आहे सुरलित करून देऊं. कड्याचें ठाणें देखील तुम्हाकडे देऊं.

कलम

१

नवीन सरंजाम पंचेवीस हजार फौजेस नेमून द्यावे, त्याऐवजीं पुणें देश लिहून देऊं.

कलम

१

ठेवणार नाहीं. तुम्हाकडून सरदार रुसून आला तर सरकारांत ठेवणार नाहीं. तुमचा तुम्हाकडे समजाऊन लाऊन देऊं.

कलम

१

तुम्हास किल्ले राहावयास ध्यावे हा करार आसे. बितपशील.

१ किले सिंहगड

१ किले पुरंदर

१ किले लोहगड

१ किले परली

१

एकूण आठ कलमे करार राजश्री गमाजीबाबापासून तुम्हासीं करार करून तुम्हास महत्कार्यास राज्याचा बंदोबस्तास आणिलें. तुम्हींही आलां, तरी या करारप्रो महाराज छत्रपति स्वामी यांजकडून करार करून आपण देऊं. तुम्ही आम्हासी काडीमात्र वंचना न करावी. जें आमचें नुकसान तें तुमचें; तुमचें नुकसान तें आमचें. उभयतानीं एक विचारें राहावें. आमचें नुकसान ज्यांत आसेल तें जीवादारभ्य श्रम तुम्हीं करून निवारण करावें. याप्रमाणें यावत् तुमचा जीव व तुमचे वंशीचे कोणी होईल त्याणें वंचना न करावी. वंचना करील तो रघोजीबाबाचे वंशीचा नव्हे. आम्ही यावतजीव तावत्कालपर्यंत व आमचे आवलादींत तुम्हासीं आंतर करील तर तो परशरामपंताचे वंशीचा नव्हे. उभयेताणीं एक विचारें चालावें. इमानपुरस्कर दुसरियाची सोय न धरितां, कोणेविसीं आंतर न देतां कलावें रा छ २६ रमजान सु॥ सलास सीतैन मया व अलफ. बहुत काये लिहिणे? लोभ असो दीजे हे विनंती. ( विराजते लेखनावधिः ).

---

४४६ श्री ता. ९-५-१७६३

( काळेसंग्रह ) वैशाख वद्य १२ शके १६६५

राजश्री जानोजी भोसले सेनासाहेब सुभा गोसावी यांस

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य—श्री श्रीनिवास गंगाधर प्रतिनिधि आसीर्वाद विनंती उपरी. आपली व आमची भेटी कलबर्गेयाचे मुकामीं जाहाली त्यांस तीन महिने जाले. त्यास राजश्री गमाजीपंत यांणी व आपण मिळोन मसलती केल्या, त्यांत आम्हांसी कित्येक प्रकारें मशारनिलेंयानीं सांगितलें, सबब आपली व आमची भाषणाची गांठ पडोन भाषण न जालें, या मसलतही न जाहाली. त्यांनीं आतफितुरी

गोष्टीनें सर्व मसलती राजश्रीनें राहिली.+ तदोत्तर गमाजीपंत देशास गेले. आम्ही आपल्यापासीं राहिलों, तेव्हां कितेक गोष्टी मसलतीच्या बोलतां गमाजीपंत यांनीं दगाबाजी केली, मसलतीस दगा जाहाला, ऐसा अर्थ ध्यानांत आणून आपला व आमचा येणेंप्रो करार. आपल्या घरांतील भाऊबंद व कारभारी वगैरे कारभारांत आम्ही मन घालणार नाहीं. तुम्हीं आपलें वर्तवावें. राज्याचा बंदोबस्त असा प्रधान यांचा आहे. जें करणें तें तुम्हांस सांगोन करावें ऐसें करितां कोणी आडथाला करील त्यास आपण आम्ही मिळोन पारपत्य करावें. जेणेंकरून सुधामत राज्याउपयोगी गोष्टी कराव्या. तुमचे डौल चाळीस हजार फौजेचे चालवावे. देशांत पांच किले द्यावे, तुमचा सरंजाम हल्लीं वसुली आहे तो व सत्यपुरस्कर करून बाकींत फत्तेसिंगाचा मुलूक द्यावा. ऐसें करितां राहिला ऐवज तरी खानदेशांत घ्यावा. जिकडे मोहीम पडेल तिकडे आपण फौजसुद्धां जावें. व तुमचे व आमचे जातीची मसलत एक. आमचा वंश व तुमचा वंश आहे तावत्कालपर्यंत चालावें. यांसी आंतर करूं तर तीर्थरूप परशरामपंताचे वंशीचे नव्हे. आपला मित्र तो आमचा मित्र. आपला शत्रु तो आमचा येणेंप्रो चालावें. आम्हावरी संकट प्राप्त जाहालें तरी आपल्यास लिहूं पा। ते समई आपण यावें. सरंजामाचे कागद राजश्री छत्रपत्रि यासी विनंती करून देऊं. रा छ २५ शेवाल सुा सलास सीतैन मया व अलफ. बहुत काय लिहिणें ? लोभ आसो दीजे हे विनंती.

---

श्री

**४४७** सन १७७२

# अहंमदशहा दुराणीच्या स्वाऱ्या आणि पानिपतचा संग्राम[1]

## १ अब्दालीची तिसरी स्वारी

दुसरा आलमगीर बादशहाच्या कारकीर्दीचें दुसरें वर्ष ( हिजरी ११६९, इसवी १७५५–५६ ) सुरू झालें, त्याच सुमारास अहंमदशहा अब्दाली हिंदुस्थानावर चालून येतो, अशा बातम्या अधिकाधिक जोरानें दिल्लीस येऊं लागल्या. नजीबखानानें अब्दालीशीं निकडीचा पत्रव्यवहार चालविला. इमादुल्मुल्क[2] हा वजिरी करीत होता. त्यानें नजीब-

---

+ असेंच वाक्य मुळांत आहे.

१ या विषयावर ही आणखी एक नवीन तत्कालीन हकीकत प्रथमच प्रसिद्ध होत आहे. ब्रिटिश म्युझियममध्यें लिखितसंग्रह–अनुक्रम नंबर २४४१० हें ‘ नजीब उद्दौला ’चें फारशींत लिहिलेलें एक चरित्र असून त्याची संपूर्ण नक्कल फोटोग्राफनें घेऊन सर जदुनाथ सरकार यांनीं आणविली आणि त्या ग्रंथाचा साद्यंत इंग्रजी तर्जुमा त्यांनीं तयार केला, त्यावरून हा मराठी अनुवाद करण्यांत आला आहे. या ठिकाणीं फक्त सन १७५५ पासून १७६१च्या सात वर्षांचा वृत्तांत देण्यांत येत आहे. पोटांतील कलमवारी संपादकीय समजावी. २ हा निजामुल्मुल्कचा नातू धाकटा गाजीउद्दीन उर्फ मीरशहाबुद्दीन.

खानास कळविलें कीं, ' बलमगडच्या छावणींत असतां तुम्ही माझ्याशीं इतःपर कायम दोस्ती ठेवण्याचें वचन दिलें, त्याप्रमाणें आतां शपथ करा.' परंतु अशी शपथ घेण्याची नजीबानें टाळाटाळ चालविली; आणि शपथ कांहीं घेतली नाहीं. पुढें अहंमदशहा नजीक येऊन ठेपला, तेव्हां नजीबानेंही दिल्लीस येऊन शहास पत्रें लिहिलीं कीं, " मी अफगाण असून, आपणही अफगाणच आहां. आमचा येथें निभाव करणें आपल्या हातांत आहे. मी येथें आपल्या भरंवशाचे पंचवीस हजार अफगाण जमा केले आहेत. यांशिवाय गंगापारचे प्रदेशांत आणखी चाळीस हजार अफगाण माझे लगामीं आहेत, तेही आपली नोकरी करण्यास सिद्ध आहेत. तेव्हां आपण निःशंकपणें दिल्लीस यावें. आपणास विरोध करण्याचें सामर्थ्य इमादुल्मुल्कास नाहीं. तो मला आपला उत्कृष्ट दोस्त समजतो. परंतु मी तर सर्वस्वीं आपला आहेंच. सबब येथें आतां दुसरा कोणी साह्यकर्ता इमाद यास उरलेला नाहीं." अशीं पत्रें नबाबाकडून गेल्यावर अहंमदशहानें दिल्लीसमीप येऊन इमादुल्मुल्कास कैद केलें. त्या वेळीं इमादच्या पदरचे दोनतीन सरदार शहादीलखान वगैरे अहंमदशहास जाऊन मिळाले; आणि मराठ्यांची पांच हजार फौज दिल्लींत होती ती पळून गेली. इमादनें पूर्वी एकवीस हजार फौज तोफखान्यासाठीं बाळगली होती, तिला त्यानेंच दोन महिन्यांपूर्वी रजा दिली होती. शिवाय त्याचा मोगली रिसाला स्वतंत्र होता, त्यांतील लोकांनीं पगाराच्या बाकीसाठीं गिल्ला केला, म्हणून एक वर्षापूर्वीच कित्येकांस इमादनें शृंखलाबद्ध केलें व बाकीच्यांस रजा दिली होती. हे सर्व नाराज झालेले इमादच्या पदरचे लोक अहंमदशहा दाखल होतांच नजीबास जाऊन मिळाले. नजीबानें या सर्वांस यमुनापार दिल्लीचे समोर आपल्या छावणींत ठेविलें आणि स्वतः दिल्लीमध्यें दारा शेखोचे वाड्यांत येऊन राहिला. तेथून तो अहंमदशहाकडे जाऊन त्यास वारंवार भेटूं लागला. अहंमदशहानें प्रथम दिल्लीचा बंदोबस्त करून पुढें जाठांवर चाल केली, त्याबरोबर नजीबखानही यमुनेच्या पलीकडील कांठानें आपली फौज घेऊन चालूं लागला. दिल्लीहून सोळा कोसांवर मुक्काम असतां नजीबच्या लोकांनीं इमादुल्मुल्काचे हत्ती पकडून नेले, त्यांत एक हत्ती कोह्-रवान नांवाचा खुद्द महंमदशहा बादशहाचा होता. नंतर नजीबानें सिकंदराबादचा[1] परगणा आपले कबजांत घेतला. ता. ३-४-१७५७ रोजीं अहंमदशहानें मथुरेंतील लोकांची कत्तल करून त्याच रात्रीं जाठाचे मुलखांत चाल केली, त्याबरोबर नजीबखानही आपली फौज घेऊन मथुरेंत आला, तीन दिवसपावेतों त्यानें तेथील संपत्ति यथेच्छ लुटली, आणि घरांस खणत्या लावून पुरलेले द्रव्यसंचय उकरून काढले; तसेंच शहरांतील पुष्कळ रूपवती स्त्रियांस पकडून नेलें. नंतर थोड्या दिवसांतच अहंमदशहा स्वदेशीं निघून गेला, तेव्हां जातांना त्यानें नजीबखानास मीरबक्षी करून त्याजकडे आलमगीर बादशहाची कुलमुखत्यारी सुपूर्त केली. आलमगीरचीही मर्जी नजीबावर बसली.

---

१. अंतर्वेदींत दिल्लीच्या आग्नेयीस ३२ मैल, जि. बुलंद शहर.

अहंमदशाहा निघून गेल्यावर नजीबानें इकडील बंदोबस्त चालविला. दिल्लीसमोरचा अंतर्वेदीचा प्रदेश आपल्या कबजांत घेऊन तेथील वसूल वगैरे त्यानें घेतला. अशा रीतीनें आठ महिने गेल्यावर दक्षिणेंतून पेशव्याचा बंधु रघुनाथराव मोठ्या फौजेसह दिल्लीवर चालून आला. त्याजबरोबर सुभेदार मल्हारराव होळकर, समशेरबहाद्दर, नारो शंकर (झांशीचा सुभेदार), बाबू पाटीलराव वगैरे सरदार होते. वजीर इमादुल्मुल्क व अहंमदखान बंगश हे येऊन रघुनाथरावास सामील झाले. ते दिल्लीजवळ येऊं लागले, तेव्हां बादशहा आलमगीर इमादची समजूत काढूं लागला. त्यास त्यानें स्वदस्तुरची पत्रें लिहिलीं आणि आपल्या खास माणसांबरोबर त्याजला पोषाख व फळफळावळ पाठविली. इमादचा विश्वास पटण्याकरितां बादशहानें नानाविध शपथक्रियाही केल्या. ‘ तुम्हीं आतां माझे केवळ पुत्र आहां. मी तर या रोहिल्यांच्या हातीं सर्वथा बंदिवानाप्रमाणें आहें. केव्हां एकदां तुमचे जवळ येऊन पोंचेन असें मला झालें आहे. ’ असें लिहून याच आशयाचीं कित्येक कवनें हिंदुस्थानींत बनवून त्यानें इमादकडे पाठविलीं. दिल्लीच्या जुन्या किल्ल्यास शेरशहाचा किल्ला म्हणत, त्या किल्ल्याचा अमलदार बख्तावरखान नांवाचा मिया कुत्बशहाचा चेला होता; त्याची नेमणूक नजीबखानानें केलेली होती. मराठ्यांनीं या किल्यावर हल्ला करून बख्तावर-खानास ठार मारिलें आणि जुनें शहर लुटलें. या कृत्यानें चिडून जाऊन नजीबखानानें कुत्बशहाच्या शिकवणीवरून इमादुल्मुल्काचा वाडा लुटला, आणि त्याच्या कित्येक नोकरां-चाकरांस कापून काढिलें. वाड्यांत इमादचा जनानखाना होता, त्या बायकांची नजीबानें विडंबना केली तेव्हां त्या अंगावर बुरखा घालून पायीं चालत वाड्याच्या बाहेर आल्या; आणि सैफुद्दीनखान यानें त्यांस रथांत बसवून राजा नागरमल्ल याचे हवेलींत पोंचविलें. इकडे कैक दिवसपावेतों नजीबानें दिल्ली शहरांत भयंकर अत्याचार केले, त्यामुळें पुष्कळ लोक भयभीत होऊन शहर सोडून गेले. नजीबापाशीं या वेळीं फौज थोडीच होती. तरी एके दिवशीं किल्याचे महाद्वारानें बाहेर येऊन त्यनें खंदकावर हल्ला केला. तसेंच तुर्की दरवाजानें बाहेर येऊन जनकाराव याजवर चाल करून त्याचें निशाण हिरावून घेतलें. कारण काय तर इमादचा दिवाण दिलीरसिंग म्हणून होता त्याचें साह्य हा जनकाराव करीत असे. असे किती तरी अत्याचार नजीबानें केले. एके दिवशीं लाहोर दरवाजानें बाहेर पडून अब्दुल रहमानखान दिलझाक याचे हाताखालीं जुन्या इदग्यांत तोफखाना होता, त्याचे लोक नजीबानें मारून काढिले.

## २ नजीबापुढें दादासाहेबांची तारांबळ

वजीर व नजीब यांची ही दंगल सुमारें एक महिना चालली. पुढें उभयतांत सल्ूख ठरला तो असा कीं (१) वजिरी इमादुल्मुल्कनें करावी; त्याचे ताब्यांत दिल्लीचा किल्ला राहवा. (२) नजीबानें दिल्ली सोडून आपले जागिरींत जाऊन राहवें. (३) मीरबक्षीगिरी अहं-मदखान बंगश यानें करावी. असा करार होऊन नंतर नजीबखान दिल्ली सोडून खालीं सात

कोसांवर यमुनेच्या कांठीं घाट बरारी येथें तळ देऊन राहिला. तेथून जवळच रघुनाथरावांचा मुक्काम होता, त्यांस भेटण्यास आजूबाजूचे ब्राह्मण येत. त्यांची वाट नजीबाच्या छावणीवरून होती. ते घाट बरारीवर स्नान करून मग रघुनाथरावाकडे जात. नजीबाच्या छावणींत गोवध होत असे तो या ब्राह्मणांनीं पाहिला आणि त्याचा बंदोबस्त करण्याविषयीं रघुनाथरावास विनंती केली. ब्राह्मण म्हणाले, "हा काय अधर्म आपल्या नजरेसमोर चालला आहे! यमुनेस जातां येतां हा प्रकार नजरेस पडतो तो आम्हांस डोळ्यांनीं पाहवतसुद्धां नाहीं." रघुनाथराव बाहेर जाई तेव्हां त्यालासुद्धां गाईंच्या हाडांचे ढीग दिसत. त्यावरून मल्हारराव होळकरास बोलावून रघुनाथरावानें या कृत्याचा बंदोबस्त करण्यास सांगितलें, तो प्रकार असाः—

रघु०—तुमची नजीबाची सलगी आहे. बोलीचाली होत असते. तर तुम्ही त्याशीं दोन शब्द बोलून सामोपचारानें कळवा कीं हा गोवध एवढा बंद करा. हें ऐकून मल्हाररावानें नजीबाकडे सांगून पाठविलें कीं—

मल्हा०—दादासाहेबांची इच्छा आहे कीं तुम्ही हा गोवध बंद करावा.

नजीबानें जबाब पाठविला कीं—

नजीब—गाय मारणें हा आमचा धर्म आहे. धर्माची ही आज्ञा आम्ही कधीं मोडणार नाहीं.

हा नजीबाचा जबाब मल्हाररावानें दादासाहेबांस कळविला, तेव्हां त्यांस अत्यंत संताप आला; आणि ते म्हणाले, "उद्यां जर हा गोवध बंद झाला नाहीं, तर आपण नजीबावर चाल करून जाऊं."

मल्हाररावानें हा प्रकार मध्यस्थांमार्फत नजीबास कळविला आणि असें सांगितलें कीं,—

मल्हार०—दादासाहेब आमचे धनी आहेत. तुमचा माझा दोस्तीचा करार आहे. उद्यां दादासाहेबांनीं तुमचेवर स्वारी केली आणि तींत तुम्हांस अपाय घडला; (देव करो आणि असा परिणाम न होवो) तर मी तुमच्या दोस्तीचा करार मोडला अशी माझी लोकांत अप्रतिष्ठा होईल ती चांगली नाहीं. दादासाहेब फौजबंद आहेत. त्यांस सर्व अखत्यार आहे. माझ्यासारखे अनेक सरदार त्यांच्या हाताखालीं आहेत. तेव्हां माझ्याकडे पाहून तरी तुम्ही चार दिवस हा गोवध बंद ठेवा.

हें सर्व ऐकून घेऊन नजीबानें जबाब पाठविला कीं,—

नजीब०—सुभेदारांस सांगा कीं दादासाहेब बाजीरावांचे चिरंजीव आहेत. दक्षिणचे सर्व मोठमोठे सरदार त्यांचे हुकमतींत आहेत. महंमदखान बंगश बावन हजारी यांचा पुत्र अहंमदखान, हिंदुस्थानांतलि सर्व अफगाणांचा प्रमुख, हा दादासाहेबांचें साह्य करण्यास सिद्ध झाला आहे. वजीर इमादुल्मुल्क समस्त मोंगली फौजेचे अध्यक्ष असून ते तर सर्वस्वी दादासाहेबांचेच आहेत. मी मात्र येथें एकटा केवळ पांच हजार फौज बाळगून

आहें. तर तुम्ही सर्व मंडळी अवश्य मजवर चालून या. तुमच्याशीं दोन हात करून समरांगणीं आम्हांस मृत्यु आला तर आमची कीर्ति अजरामर होईल. लोक म्हणतील, सगळे लोक नजीबावर चालून आले, पण हा डगमगला नाहीं. तुम्ही मात्र आणाशपथा सर्व मोडून आमचा एक जरी इसम मारला तरी तुमचीच लोकांत नाचक्की होईल. पण जर का याचे उलट प्रकार होऊन आमचे हातून तुम्हां सर्वांचा पाडाव झाला, तर आमचा यशोदुंदुभी जगभर गर्जत राहील. मनुष्यास मरण एकदांच येतें. मग होऊं द्या तर तुमचे आमचे दोन हात. आम्हांस विजयश्रीनें माळ घातली तर सर्व राज्य आमचें आहे. पण उलट प्रकार घडला तरी स्वर्ग आमचा कायम आहे. एक इहलोक किंवा दुसरा परलोक हे दोन स्पष्ट आहेत. तिसरा प्रकार शक्य नाहीं. तेव्हां तुमच्या दादासाहेबांचा शब्द झेलण्यास मी बिलकूल तयार नाहीं. जें काय ईशसत्तेनें घडायचें असेल तें उद्यां समभूमीवरच दृष्टीस पडेल.

नजीबखानानें हा जबाब मल्हाररावामार्फत दादासाहेबांकडे पाठविला, आणि लगेच आपले लोक एकत्र जमवून त्यांजपुढें भाषण केलें तें असें:—

नजीबः—दोस्त हो! उद्यां जिहाद करून गाझी हें नांव कमावण्याची उत्कृष्ट संधि आपल्याकडे चालून आली आहे, ती तुम्हीं फुकट घालवूं नका. मनाचा धडा करून लढण्यास सिद्ध व्हा. दुसरा विचार मनांतसुद्धां आणूं नका.

अशा प्रकारें समयोचित भाषण करून त्यानें आपल्या लोकांस चेव आणिला; आणि सर्वांनीं लढून मरण्याचा निश्चय केला. दुसऱ्या दिवशीं सकाळींच दादासाहेब फौज घेऊन नजीबावर चालून आले. नजीबही सामना करण्यास सज्ज झाला. मल्हाररावानेंही आपली सर्व फौज बाहेर आणून सर्वांच्या पुढें उभी केली; आणि नंतर आपण एकटाच दादासाहेबांजवळ जाऊन म्हणाला,—

मल्हाररावः—नजीबाची फौज अगदींच अल्प आहे. तिचा नाश करणें मोठेंसें अवघड काम नाहीं. पण तुमच्याच हुकुमानें मी खानाशीं दोस्ती ठेवण्याचा करार केला; आणि आतां हा करार मीच मोडणें अधर्म होईल.

दादासाहेबः—मी देखील धर्मासाठींच लढत आहें. या धर्माचे बाबतींत मी कोणाचीही मध्यस्ती ऐकणार नाहीं.

मल्हाररावः—आपले वडील बाजीरावसाहेब माझे शब्दाचा मान राखीत आले, त्याप्रमाणें आपणही माझा शब्द या प्रसंगीं मोडूं नये.

तथापि रघुनाथराव मल्हाररावाचें म्हणणें ऐकेना; आणि पुढें चाल करूं लागला; त्याबरोबर मल्हाररावानें घोड्यावरून उतरून पायउतारा पुढें होऊन दादासाहेबांचे घोड्यांची अनीन पकडून धरली आणि बोलला,—

मल्हाररावः—प्रथम मला तुडवून ठार करा आणि मग पुढें पाऊल टाका. नाहींतर मी तुम्हांस पुढें जाऊं देत नाहीं.

यावरून दादासाहेब संतापानें लाल झाले; आणि मल्हाररावास अद्वातद्वा पुष्कळ बोलले, पण त्यापुढें त्यांचा इलाज चालेना. तेव्हां अंतःकरणांत खेद पावले व डोळ्यांत आंसवें आणून ते परत वळले. अशा रीतीनें नजीबानें आपला डाव सिद्धीस नेला. हस्तगत केलेला प्रदेश त्यानें सोडला नाहीं आणि ठिकठिकाणीं ठाणीं बसवून त्यानें उत्तरोत्तर आपली बळकटी कायम केली.

## ३ रोहिल्यांची जूट व अब्दालीस पाचारण

मराठ्यांपुढें आपला एकट्याचा निभाव लागणार नाहीं असें जाणून नजीबानें फिरून अहंमदशहाकडे पत्रें पाठवून कळविलें कीं, या काफीर मराठ्यांनीं आमच्या लोकांवर शुद्ध कहर चालविला आहे. आपण मुसलमानांचे बादशहा आहां; आमच्या बचावाचा कांहीं तरी उपाय आपण काढला पाहिजे.' यावर अहंमदशहाचा जबाब आला कीं,—

अहंमदशहाः—या सालीं आम्हांस येथून बाहेर जाण्याची सोय नाहीं. आमचे राज्यांत एका बाजूस नासीरखानानें बंडावा चालविला आहे, तर हिरातचा दर्वेशअलीखान दुसरीकडून आम्हांस उपद्रव करीत आहे. या दोघांचा बंदोबस्त जेव्हां ईशकृपेनें होऊन सुव्यवस्था नांदेल तेव्हां तुमचें कार्य मी अवश्य हातीं घेईन." हें उत्तर आल्यावर नजीबानें गंगापारच्या रोहिल्यांस उद्देशून निकराचा संदेश पाठविला कीं, "या मराठ्यांनीं सगळ्या हिंदुस्थानचें वाटोळें केलें. आज त्यांस आळा घालणारा कोणी उरला नाहीं. परंतु तुम्ही सर्व एकजुटीनें मला साह्य करीत असाल तर या कामांत मी पुढें होतों. शहाजहानाबाद ही हिंदुस्थानची राजधानी, खुद्द बादशहाचा वजीर मराठ्यांस सामील. फौज बाळगणारे राजेरजवाडे व जमीनदार तर एकूणएक त्यांस दरसाल खंडण्या भरतात. फक्त एक प्रदेश अद्यापि त्यांस वश झालेला नाहीं, तो हा तुमचा गंगापारचा दुआब होय. या प्रदेशांतून माझा उठाव करण्याचे त्यांचे भगीरथ प्रयत्न चालले आहेत. ते सिद्धीस गेले म्हणजे पुढची पाळी तुमची व शुजाउद्दौल्याची. मी नाहींसा झाल्यावर तुमचा एकट्यांचा जोर कितीसा चालणार!"

नजीबाच्या या उठावणीस रोहिले सरदारांचें उत्तर आलें तें धरसोडीचें होतें. त्यांनीं कळविलें:—"मराठ्यांशीं सामना करण्याची ताकद आम्हांस नाहीं. पूर्वी शुजाउद्दौल्याशीं आमचें युद्ध झालें तेव्हां त्यानें मराठ्यांची मदत आणून आमचा पाडाव केला. त्यांतून आज इतक्या दिवसांनंतर मोठ्या कष्टानें आम्ही आपली सुटका करून घेत आहों. अशा स्थितींत अतांच मराठ्यांशीं पुनः वैर जोडण्याचें साहस अंगावर घेणें आम्हांस युक्त वाटत नाहीं. कां कीं, खुद्द बादशहा व वजीर हे मराठ्यांस सामील असून ते लगेच आमच्यावर चालून येतील. मराठ्यांचें सामर्थ्य कसेंही असलें तरी बादशहा व वजीर यांजवर शस्त्र उचलणें आम्हांस अत्यंत अश्लाध्य वाटतें. मराठ्यांचा जमाव भारी आहे. त्यांनीं सर्व हिंदुस्थान पादाक्रांत केलें आहे. हजारों वर्षे नांदत आलेलीं राजघराणीं त्यांस खंडण्या

भरतात. बादशहास तर त्यांनीं सर्वस्वीं कबजांत ठेविलें आहे. अशा स्थितींत आमच्या हातून मराठ्यांचा प्रतिकार कितीसा होणार? तरी पण प्रत्यक्ष गंगा उतरून आमचे मुलखावर चाल करणें त्यांस सुद्धां जडच जाईल; असाच बनाव घडून आला तर मग आम्ही आपले बचावाचा विचार जो करणें असेल तो अवश्य करूं."

हा जबाब आल्यावर नजीबाची खात्री झाली कीं, हे रोहिले व शुजा यांस मराठ्यांशी सामना करण्याची ताकद नाहीं. त्या धोरणानें पुनः त्यानें त्यांस कळविलें कीं,—

नजीबः–ज्यापक्षीं मराठ्यांचा बंदोबस्त करण्याचें तुम्ही मनावर घेत नाहीं, त्यापक्षीं मी अब्दालीस लिहून आपले मदतीस बोलावितों, मात्र तो येथें येऊन दाखल झाल्यावर, 'आम्ही बिनतक्रार त्यास सामील होऊं आणि त्याच्या खास विलायती फौजेचा खर्च असेल तो सर्व वारूं,' अशी आपली लेखी कबुली तुम्हीं सर्वांनीं आतांच मजकडे पाठवा.

नजीबाच्या या मागणीप्रमाणें आपली लेखी क़बुली समस्त रोहिले सरदारांनीं प्रत्येकाच्या शिक्कामोर्तबानिशीं त्याजकडे पाठवून दिली. तींत त्यांनीं लिहून दिलें कीं, 'अब्दाली इकडे आल्यावर आम्ही जिवाची परवा न करितां त्याचें साह्य करूं.' अशीं लेखी वचनें हातीं येतांच नजीबानें तीं लगेच अहंमदशहाकडे रवाना केलीं. तीं अफगाणिस्तानांत दाखल झालीं तेव्हां शहा नासरिखानावर चालून गेला होता. पत्रें वाचून त्यानें ताबडतोब जबाब पाठविला कीं, 'पुढील हिवाळ्यांत आम्ही खास हिंदुस्थानांत येतों; तुम्हां रोहिल्यांचें कार्य तेंच इस्लामाचेंही कार्य समजून, हातून घडेल तें करून दाखविण्यास आम्ही कसूर करणार नाहीं.'

## ४ शुक्रतालची छावणी

अशा प्रकारच्या परस्पर वाटाघाटींत एक वर्ष गेलें. त्या अवधींत मराठ्यांची दुसरी फौज दिल्लीवर चालून आली. तिचा मुख्य नायक आपाजी सिंद्याचा पुत्र जनकोजी होता. परंतु तो वयानें प्रबुद्ध नसल्यामुळें सर्व कारभार चुलता दत्ताजी पाटील पाहत असे. सिंदे दिल्लीस येतांच त्यांचा इमादुल्मुल्काशीं तंटा उपस्थित झाला. अटक नांवाची एक प्रचंड तोफ बादशहाची होती, तिच्या बरोबरीची दुसरी तोफ संबंध हिंदुस्थानांत नव्हती. ती दत्ताजीनें आपले कबजांत घेतली, त्यावरून वजीर फार नाखूष झाला. दत्ताजीनें वजिरास कळविलें—

दत्ताजीः—आम्हांस आतां नजीबाचें पारिपत्य कर्तव्य आहे तर त्या कामीं तुम्ही आपली सर्व फौज व एक भरंवशाचा सेनानायक आमचे बरोबर द्या.

त्यावर इमादनें आपला दिवाण दिलबारसिंग व बहादूरखान बलूच या दोघांस पांच हजार स्वारांनिशीं दत्ताजीचे साह्यास पाठविलें. आदल्या वर्षीं रघुनाथराव लाहोरास गेले तेव्हां तुकोजी होळकरानें पंजाबांत आपलीं ठाणीं बसविलीं होतीं. तसेंच मुलतान येथें

दादो सिद्धेश्वर[1] नांवाचा मराठा सरदार फौजबंद ठेवण्यांत आला होता. या वर्षी पुनः दत्ताजीनें आपला सरदार साबाजी पाटील यास लाहोरावर रवाना केलें; आणि आपण जनकोजीस घेऊन यमुनेपार दुआबांत गेला. तिकडे नजीबखान त्याचे सामन्यास आला. प्रथम कांहीं वेळ सिंदे व नजीब यांजमध्यें सलुखाचें बोलणें चाललें; आणि त्यासाठीं समक्ष भेटून बोलणें व्हावें असें ठरलें. नजीबखान भेटीस आला म्हणजे त्यास एकदम पकडून अटकेंत ठेवावें असा दत्ताजीचा घाट होता. पुढें एक दिवस भेटीचा मुक्रर झाला. दत्ताजीनें बोलावल्यावरून नजीबखान विशेष बंदोबस्त न करितां सडाच दत्ताजीचे मुक्कामावर आला. नजीबखान दिवाणखान्यांत प्रवेश करीत असतां त्याच्या बरोबरच्या माणसांस पहारेकरी आंत सोडीनात; हा प्रकार कित्येक अफगाणांस खपला नाहीं. लोहारीचा जमीनदार अहमदखान आफ्रिडी हा आपले दोन बंधू व दहा संरक्षक बरोबर घेऊन नजीबाचे पाठोपाठ आंत घुसला. हें पाहून नजीबास संशय आला कीं येथें कांहीं कपटप्रयोग असावा, आणि पुढें कांहीं संभाषण होणार त्यापूर्वीच नजीबखान मागचे पायीं निघून बाहेर आला.[2] पाटील बावानेंही त्यास थांबण्यास आग्रह केला नाहीं. मुक्कामीं परत आल्यावर नजीबखान म्हणाला, 'या लोकांवर विश्वास ठेवणें बिलकूल कामाचें नाहीं. त्यांच्या नजरा दुष्टाव्याच्या दिसतात.' हा कपटप्रकार नजरेस आल्यावर दोन दिवसांनीं नजीबखान सलुखाचा नाद सोडून गंगाकांठच्या आपल्या जागिरींत गेला. त्या ठिकाणीं गंगेला एक मोठें वांकण असून त्यास शुक्रतार[3] असें नांव आहे. या वांकणांत पाण्याची सोय पाहून नजीबानें आपली छावणी केली; आणि सभोंवार मातीचे मोठाले उंचवटे रचून त्यांवर गंगापार जाण्याचा पूल बांधला. मातीच्या या ढिगांस 'संगर' म्हणजे मोर्चा म्हणतात. या संगरांवर नजीबानें आपला तोफखाना रोखून ठेविला.

सलूखाचा प्रयत्न फिसकटल्यावर दत्ताजीनें नजीबाचा बाहेरचा प्रदेश हस्तगत केला आणि तेथें ठिकठिकाणीं आपलीं ठाणीं बसविलीं; तेणेंकरून नजीबाचा कोंडमारा झाला. त्यानें आपले दूत वारंवार अहमदशहाकडे पाठविले आणि गंगापारच्या रोहिल्यांस व शुजास निकडीनें आपल्या साहाय्यास बोलाविलें. तो म्हणाला,—

नजीबः—मराठे आज माझ्या छातीवर येऊन बसलेले तुम्ही पाहातां. मी एकटा यांजपुढें कसा टिकाव धरणार? तर तुम्ही सर्व त्वरेनें माझ्या साह्यास धावून या.

---

१ मराठी कागदांत त्र्यंबक बापूजीचें पथक मुलतान येथें असल्याचा उल्लेख आहे.

२ याचे उलट दत्ताजीला भेटीस आणून कपटानें ठार मारण्याचा घाट नजीबानें रचला होता, असें मराठी बखरींत आहे.

३ शुक्र तार (शुक्र-ताल) गंगेच्या पश्चिम कांठीं मुजफ्फरनगरच्या पूर्वेस १६ मैलांवर आहे. हें गांव उंचवट्यावर असून सर्व बाजूंस नदीकडे उतरत जाणारीं मोठमोठीं वळणें आहेत. नकाशावर पाहिल्यास मुजफ्फरनगर पानिपतच्या थेट पूर्वेस येईल.

यावर रोहिले सरदारांनीं पूर्वीचेच धरसोडीचे जबाब नजीबास पाठविले. आपसांत त्यांचा विचार असा ठरला कीं, ‘ हा नजीब शुद्ध वेडा आहे. कंदाहाराहून कुमक येण्याच्या आशेवर हा उगाच आगींत उडी घेतो. ’ असें म्हणून त्यांनीं कांहीं एक हालचाल केली नाहीं. त्यांनीं विचार केला कीं, गंगेला हल्लीं महापूर आहे. नदी ओलांडून मराठ्यांना आपल्यावर चालून येणें एव्हां शक्य नाहीं. सबब मुद्दाम आपण धोक्यांत पडणें श्रेयस्कर नाहीं. असें मनांत आणून रोहिले कांहींच हालचाल करीनात. शिंद्याच्या फौजेनें नजीबाचा मुलूख सहज हाताखालीं घातला आणि ती शुक्रतालच्या छावणीवर चालून आली. अलीकडे अर्ध्या कोसावर दत्ताजीनें एक मातीची गढी उभारली. आणि तींत स्वतः बसून तेथून तो आपल्या टोळ्या नजीबाच्या संगरावर हल्ला करण्यास पाठवूं लागला. इकडे संगरांतून नजीबाचे लोक बाहेर येऊन मराठ्यांशीं सामना करीत. अशा प्रकारें कांहीं दिवस झोंबाझोंबी चालली. नजीबानें आपल्या लोकांस निक्षून ताकीद केली, कीं आपापले संगर सोडून कोणीही दूर जाऊं नये. एके दिवशीं नजीबाची एक टोळी फार पुढें सिंद्याचें अंगावर आलेली पाहतांच दत्ताजीनें लगेच आपले दोन हजार निवडक स्वार त्यांजवर घातले, त्या वेळीं तो आपल्या लोकांस म्हणाला, ‘ हा पहा गनीम आपण होऊन तुमचे तावडींत आला आहे, तर आज एकाही इसमास जिवंत परत जाऊं देऊं नका.’ असें म्हणून खुद्द दत्ताजी कमरग्यांतून[1] आणखी फौज घेऊन शत्रूवर चालून गेला. नजीबास दत्ताजीच्या फौजेची धूळ दुरून दिसतांच तो म्हणाला, ‘ आजपावेतों समोरून धूळ येत असे तशी ही नव्हे. आज या धुळींत कांहीं तरी अनिष्ट प्रकार खचित असावा.’ असें म्हणून त्याचें खास बरकंदाज पायदळ होतें त्यास बाहेर आणून जवळच्या एका कोरड्या नाल्यांत गुपचूप बसवून ठेविलें. ही जागा मराठ्यांच्या वाटेवर होती. पुढें अल्पावकाशांत मराठे चालून आले. त्यांच्यांशीं नजीबाचा थोडा वेळ निकराचा संग्राम झाला. प्रथम मराठ्यांचा हल्ला येतांच रोहिले लढत लढत मागें हटूं लागलेले पाहतांच दत्ताजीचे सात आठ हजार स्वार उत्कृष्ट पोषाख केलेले व उमद्या आरबी घोड्यांवर आरूढ झालेले नागव्या तलवारींनिशीं अनीना सैल सोडून रोहिल्यांचे पाठलागास धावले. मध्यें स्वतः दत्ताजी होता. वर जे धुळीचे लोट उसळले त्यांतून मराठ्यांच्या लखलखणाऱ्या तलवारी व भाले ढगांतलि विजेप्रमाणें नजीबास दिसले. पाठलागाचे भरांत मराठे अगदीं रोहिल्यांच्या संगरास येऊन भिडले, तेव्हां संगरावरून रोहिल्यांनीं त्यांजवर तोफांचा व बंदुकांचा सडकून मारा केला. त्याबरोबर मराठे तोंडें फिरवून नाल्याच्या बाजूस हटले. ते दहावीस पावलांच्या टप्प्यांत येतांच तेथें रोहिल्यांचें दहाबारा हजार पायदळ लपून बसलें होतें, त्यांतील लोकांनीं एकदम मराठ्यांवर दोन हजार बंदुकांचा वर्षाव सुरू केला; त्या योगें मराठे पटापट मरून त्यांच्या प्रेताचे ढीग बनले. त्या वेळीं अशी हातघाईची दंगल उडाली कीं, खुद्द

१ छावणीचा मधला मुख्य भाग.

जनकोजीच्या घोड्याची अनीन एका रोहिल्यानें पकडून दुसऱ्या हातानें त्याजवर तलवारीचा वार केला. त्यामुळें जनकोजीचे हातास थोडीशी जखम झाली. इतक्यांत जवळच्या बारगिरांनीं त्या रोहिल्यास तलवारीनें ठार केलें. असा संग्राम होऊन दत्ताजी हलके हलके परत आपल्या मुक्कामावर आला. या प्रसंगांत सिंद्याचे पांचशें शूर इसम व कित्येक चांगले घोडे कामास आले. रोहिल्यांचे सुमारें ५० इसम मृत्यु पावले व शंभर जखमी झाले.[१] त्या दिवसापासून मराठ्यांचे हल्ले थांबले; पण नजीबाची धास्ती कमी झाली नाहीं. त्यानें आपले दूत वारंवार अब्दालीकडे पाठवून कळविलें कीं,—

नजीबः—आपली कुमक आम्हांस वेळेवर येईल या आशेवर मी मराठ्यांशीं सामना करण्यास सिद्ध झालों. या दुष्टांनीं आमचा केवळ प्राणान्त चालविला आहे. अफगाणांचे त्राते आपण हयात असतां आमची ही अशी दुर्दशा होत आहे. मी आपल्या जिवावर पाणी सोडून शत्रूशीं झगडा चालवीत आहें. आपण त्वरा करून याल तर आमचा तरणो-पाय आहे. इतक्याउपर अल्ला आपणांस बुद्धि देईल ती खरी.

असेच निर्वाणीचे संदेश नजीबानें गंगापारच्या रोहिल्यांस व शुजास पाठविले, आणि कळविलें कीं, ' आमची आतां प्राणांतिक अवस्था आली आहे. आज सहा महिने मी एकटा शत्रूशीं झगडत आहें, परंतु तुमच्यापैकीं एकही इसम माझे मदतीस येत नाहीं. आज जें माझें मरण, तेंच उद्यां तुमचें ठेवलेलें आहे म्हणून समजा. '

इकडे सिंद्यास कळून चुकलें कीं, अशा उघड्या हल्ल्यांनीं आपलें काम भागणार नाहीं. कारण नजीबानें गंगेवर पूल बांधला होता त्यावरून त्यास पलीकडच्या बाजूनें धान्य-सामुग्रीचा पुरवठा भरपूर होत असे, तो बंद करण्यासाठीं गंगापार जाऊन तिकडून त्याची रसद बंद करून त्यास पायबंद दिल्याशिवाय तो वठणीस येणार नाहीं, अशी खात्री होऊन कशाही प्रकारें गंगापार जाण्याचा दत्ताजीनें निश्चय केला. पलीकडच्या अफगाणांस प्रथम नरम केलें कीं, नजीबाचा आधार तुटणार होता. म्हणून सिंद्यानें गंगेवरील उताराचा शोध चालविला. एक जमीनदार गुजर[२] होता त्यास गंगेच्या उतारांची माहिती चांगली होती. तो मोठ्या बक्षिसाच्या लालचीनें सिंद्यास अनुकूल झाला; आणि त्यानें सिंद्याच्या फौजेस उतार दाखविला.

गंगेपलीकडे हिमालयाच्या पायथ्याशीं शानपूर नांवाचें एक प्राचीन हिंदु राजाचें ठिकाण होतें. तेथून दहा कोसांवर तराईचे डोंगर लागतात. त्या जागीं नजीबानें आपला

---

१ वरील वर्णन मराठींतील हकीकतीशीं ताडून पाहतां तें उघड उघड पक्षपाताचें व अतिशयोक्तीचें दिसतें. आंकडे तर अगदींच चुकीचे भासतात. या लेखांत असा प्रकार इतरत्रही आढळतो.

२ मराठीकागदांत जेता गुजर असें नांव असून त्यानें व मिरापूरच्या जमीनदारानें दत्ताजीचें साहाय्य केलें असें आहे.

वाडा बांधून एक वसाहत केली आणि बागबगीचा, मशीद, मद्रेसा वगैरे बांधून त्यास नजीबाबाद असें नांव दिलें होतें. हें ठिकाण चांगलें सुरक्षित जाणून तेथें त्यानें आपलीं बायकामुलें वगैरे ठेवून दिलीं होतीं. दत्ताजी सिंदे नजीबावर चालून आला, तेव्हांपासून नजीबानें शुजाउद्दौला, हाफीज रहमत, दुंदेखान, मुल्ला सरदार बक्षी इत्यादिकांकडे मदतीची याचना चालविली होती, आणि ते सर्व लढाईच्या तयारीनें आपापल्या हद्दींत सावध होते. पण हद्द सोडून बाहेर पडण्याचें साहस कोणास होईना. इकडे गुजराच्या मदतीनें सिंद्याच्या फौजेस उतार मिळाला, त्याच सुमारास शुजाउद्दौला येऊन हाफीझ रहमत वगैरे रोहिल्यांस सामील झाला. उतार सांपडतांच सिंद्यानें आपला एक सरदार भोइटे व दुसरा एक यांस फौज देऊन गंगेपलीकडे रवाना केलें. त्यांनीं जाऊन मुलखांत जाळपोळ करून नजीबास येणारी सामग्री बंद केली. नजीबाबादेपासून तीन कोसांवर मराठे येऊन ठेपले, तेव्हां नजीबाच्या बायकामुलांस धास्ती पडली कीं, आतां आपली कठिण अवस्था होणार. त्यांनीं नजीबाबाद सोडून उत्तरेस जंगलाचा आश्रय करण्याचा बेत ठरविला. इकडे नजीबाजवळ जे अफगाण होते त्यांनाही आपल्या बायकामुलांची चिंता उत्पन्न झाली. ते म्हणत, ‘इतका सगळा व्याप आपण करतों तो केवळ या बायकामुलांसाठीं. तींच जर आतां तिकडे शत्रूंच्या हातीं लागलीं, तर आम्ही इकडे लढत राहण्यापासून काय फायदा होणार?’ अशा चिंतेंत नजीबानें त्यांस आश्वासन दिलें कीं, ‘तुम्ही असे घाबरूं नका. अल्ला आपला पाठीराखा आहे, त्याचें नांव घेऊन निर्धास्त राहा. अहंमदशहा आपणांस सोडविण्यास धावून येत आहे. मी तर जिवाची आशा सोडूनच या साहसांत पडलों आहें. तर आतां भलतेसलते विचार बिलकूल मनांत आणूं नका. व्हायचें असेल तें कधीं चुकत नाहीं. निश्चयानें लढूं या. आतां माघार घेणें शक्य नाहीं.’

इकडे मराठे आपल्या बाजूस चढाई करीत आलेले पाहून शुजानें त्यांजवर अनुपगीर व उमरावगीर या दोन सरदारांस रवाना केलें. हे गोसावी बंधू रात्रीचा दिवस करून मोठमोठ्या मजलांनीं धावून आले. मराठ्यांना असावध गांठून त्यांजवर त्यांनीं शस्त्र चालविलें. मराठी फौजांचा गोंधळ उडून त्या पळूं लागल्या. गोसाव्यांनीं पुष्कळांस कापून काढिलें.[१] कित्येक पळून परत येत असतां नदींत बुडाले. हें वर्तमान शुजास कळतांच तोही त्वरेनें पुढें चालून आला. त्या योगें शुक्रतार येथें प्रथम थोडा वेळ सिंद्याची गाळण उडाली. तरी त्यानें शुक्रतारचा वेढा निकरानें चालविला. इतक्यांत अब्दालीनें पुढें रवाना केलेले वकील नजीबाजवळ येऊन दाखल झाले. त्यांनीं बातमी कळविली कीं, ‘शहा काबुलाहून निघाले हें वर्तमान तुम्हांस कळविण्यासाठीं त्यांनीं आम्हांस पुढें पाठविलें आहे. वकिलांनीं शहाचीं पत्रें सर्व अफगाण सरदारांस आणिलीं कीं, ‘मी मुद्दाम तुराणइराण-

---

१ पुढें तीस वर्षांनीं या गोसावी बंधूंवर महादजीनें सूड उगविला, त्याचें पहिलें बीज या प्रसंगीं रुजलेलें दिसतें.

कडचीं निकडीचीं कामें टाकून तुम्हा अफगाणांचें नांव राखण्यासाठीं हें एक जिहादच अंगावर घेतलें आहे. इतक्या लांबून मी तुमचे कुमकेस धावून येत असतां, तुम्ही मात्र जवळ असून नजीबाचें साहाय्य करीत नाहीं ही मोठी खेदाची गोष्ट होय. आतां तरी मनाचा कायम निश्चय करून पत्र पावतांच नजीबास सामील व्हा; आणि मी येण्यापूर्वीच काफरांचा हा कांटा साफ काढून टाका. खुदाची मर्जी असेल तर मी येऊन अल्पावकाशांत त्यांचें निर्मूलन करितों.'

## ५ अब्दालीचें आगमन

वकील दाखल होण्यापूर्वींच अब्दाली आल्याची बातमी चहूंकडे पसरली. ती ऐकून तुकोजी होळकर वगैरे मराठे सरदार पंजाबांत होते ते परत लाहोराकडे आले. ही बातमी दत्ताजीस दुआबांत समजली, तेव्हां तो अगदीं चिंताक्रान्त झाला. लगेच शुक्रतारचा वेढा उठवून अब्दालीस गांठण्यासाठीं त्यानें यमुनेकडे चाल केली. त्याबरोबर नजीबखान आनंदाचा जयघोष करीत शुक्रतारांतून बाहेर पडला, आणि शुजाउद्दौलाही गंगेवर येऊन दाखल झाला. दिल्लीचे लोक घाबरून बाहेर पळून जाऊं लागले. वजीर इमादुल्मुल्कानें आपला जनानखाना जाटाचे आश्रयास पाठविला, आणि स्वतः आपण दत्ताजीजनकोजींची फौज गांठली. त्या वेळीं दत्ताजीचा मुक्काम मुजफरनगरजवळ बारा येथें होता. तेथून सिंदे व इमाद सहारणपुराकडे चालले. इकडे पंजाबांतून अहंमदशहा बुरिया[1] व मुस्तफाबाद पावेतों दाखल झाला. ही बातमी नजीबास पोंचतांच तो एका दिवसांत १५ कोस मजल मारून त्वरेनें अहंमदशहाकडे चालला. त्यानें शहास कळविलें कीं, "अद्याप मराठे यमुनेपार आहेत तों तुम्ही यमुनेच्या पश्चिम कांठानें पानिपतपावेतों या. तुम्ही यमुनेअलीकडे याल तेव्हां मी हाफीज रहमत वगैरे सर्व अफगाण सरदारांसह तुम्हांस येऊन मिळतों." पुढें शहा कुंजपुऱ्यावर आला, तेव्हां पलीकडील कांठावर सिंद्याची फौज दाखल झाली. उभयतांमध्यें दहा कोसांचें अंतर राहिलें. लगेच सडे होऊन अब्दालीशीं गांठ घालावी असें दत्ताजीनें ठरविलें. भोइटे याचे हाताखालीं पांच हजार घोडेस्वार आणि इमादचा मोगली सरदार महंमद सयदखान किपचाक याचे हाताखालीं एक हजार मोगली स्वार असे पुढें होऊन सभोंवारचा प्रदेश उध्वस्त करूं लागले. सिंदे यमुना उतरून अबदालीचे तोंडावर जातांच शहाच्या आघाडीनें त्यांजवर चाल केली, आणि ती वर्दी त्यांनीं शहाकडे पाठविली. भोइटे यानें शेंपन्नास अफगाण पुढें आले होते त्यांजवर निकरानें हल्ला केला आणि दहापांच असामी जखमी करून त्यांचे घोडे हिरावून घेतले. सर्वच मराठे या थोड्या अफगाणांवर कोसळल्यामुळें अफगाण मागें हटले, आणि मराठ्यांनीं जयघोषाच्या आरोळ्यांनीं त्यांचा

---

१ बुरिया, ता जगधी, यमुनेच्या पश्चिमकांठीं कुरुक्षेत्राच्या उत्तरेस सुमारें २० मैल. मुस्तफाबाद अंबाला जिल्ह्यांत.

पाठलाग चालविला. ही बातमी अहंमदशहास कळतांच त्यानें आपल्या करवालांचा[1] अंमलदार शहा पसंदखान यास चार हजार स्वारांनिशीं त्या अफगाणांचे मदतीस पाठविलें. अहंमदशहाचें निशाण दुरून पाहतांच बादशहाची मोंगल फौज मराठ्यांस सोडून बाजूस सरली. अफगाणांचा मारा कसा असतो याचा अनुभव त्यांस पूर्वी चांगला आलेला होता. मराठे थोडेच आहेत असें पाहून त्यांजवर शहा पसंदखानानें झडप घालून गोळ्यांचा वर्षाव सुरू केला, तों त्यांचे मदतीस शहानें आणखी एक दस्ता पाठविला. त्यांनीं दुसऱ्या बाजूनें येऊन मराठ्यांस हैराण केलें, त्यामुळें भोइटे याचा नाइलाज होऊन त्यानें पळ काढला. या झटापटींत त्याचे चारशें लोक जायां झाले. याप्रमाणें पराभव पावून परत आलेले लोक दृष्टीस पडतांच स्वतः दत्ताजी अफगाणांशीं सामना करण्यास धावून आला. दोन्ही पक्षांची थोडा वेळ लढाई झाली, पण सूर्यास्त झाल्यामुळें दोघेही आपापल्या जागीं थबकून राहिले. या प्रसंगांत भोइट्याचें सबंध पथक लुटलें गेलें. त्याचे जे लोक लढाईंत पडले, त्यांचीं डोचकीं शहापसंदखानानें कापून आणिली आणि अहंमदशहाचे छावणीचे बाजारांत त्यांची रास घातली.

दुसऱ्या दिवशीं आपले निवडक दहा हजार स्वार बरोबर घेऊन दत्ताजीनें अफगाणांवर चालून जाण्याचा विचार केला, तों त्यास बातमी पोंचली कीं, भोइट्याचा पाडाव केल्यावर अहंमदशहा यमुना उतरून नजीबखानास मिळण्यासाठीं पुढें दुआबांत चालला आहे. ही बातमी कळल्यावर दत्ताजीनें अबदालीवर जाण्याचा रोंख सोडून दिला आणि पुढील बेत ठरविण्यासाठीं तो परत आपल्या छावणींत आला. इकडे अहंमदशहा यमुना उतरून पलीकडे गेला तो मीरत येथें नजीबास मिळाला. उपरांत लवकरच हाफीज रहमत, दुंदेखान, सादुल्लाखान, फैजुल्लाखान, मुल्ला सरदार वगैरे रोहिले पुढारी येऊन अहंमदशहास भेटले. अफगाणांचा असा सर्व जमाव एकत्र झालेला पाहून दत्ताजी व जनकोजी कुंजपुऱ्यावरील आपली छावणी उठवून यमुना पश्चिम कांठानें दिल्लीकडे येऊं लागले. त्यांचा पहिला मुक्काम कर्नाळवर, दुसरा पानिपतावर आणि तिसरा सोनपतावर झाला. चवथ्या दिवशीं दिल्लीच्या उत्तरेस सात कोसांवर यमुनेच्या कांठीं बरारी+ येथें दत्ताजीनें आपली छावणी केली. त्याच वेळीं दिल्लीच्या समोर पलीकडच्या कांठीं लोनी[2] येथें अबदाली व समस्त रोहिले सरदार यांनीं आपला तळ दिला. अहंमदशहाशीं आतां सामना करण्याचें ठरवून सिंद्यांनीं आपलें जड सामान व बुणगे दिल्लीचे मागें वीस कोस रेवाडीस पाठवून दिले आणि आपण सडे होऊन लढाईस सिद्ध झाले.

---

१ करोल (Cavalry) = बरकंदाज, बंदुका वापरणारे स्वार. आघाडीस ठेवलेले.
+ बादली स्टेशनच्या पूर्वेस ५ मैल व दिल्लीच्या उत्तरेस ८ मैल. २. परगणे बागपत, जि. मीरत.

## ६ दत्ताजीचा वध

बुधवार[१] ता. ९ जानेवारी सन १७६० रोजीं अहंमदशहा घोड्यावर स्वार होऊन मराठ्यांची टेहळणी करीत पुढें आला. त्यानें आघाडीवर नजीबास नेमून त्यास दत्ताजीचे सामन्यास रवाना केलें. नजीबखान पुढें आला तेव्हां पश्चिम कांठावर साबाजी पाटील ७०० लोक घेऊन उताराचे रखवालीस असलेला त्यास आढळला. लगेच त्यानें आपलें पायदळ फौज व निशाणें हीं हत्तींवर लादून त्या उतारावरून यमुनेच्या पलीकडे नेलीं. तेथून तीन मैलांवर दत्ताजी, जनकोजी व इमादुल्मुल्क यांचा तळ होता. नदी उतरल्याबरोबर नजीबाची व साबाजीची हातघाईची लढाई चालू झाली. हें वर्तमान दत्ताजीस समजतांच तो लगेच साबाजीचे मदतीस धावून आला. रोहिल्यांपुढें आपला निभाव लागत नाहींसें पाहून मध्यें एक नाला होता त्याचे अलीकडे साबाजीनें आपलें पथक आणिलें. लगेच नाला ओलांडून रोहिले साबाजीच्या अंगावर आले आणि त्यांनीं बरेच मराठे कापून काढिले. दत्ताजी व जनकोजी पुढें आले तेव्हां साबाजीचे थोडेच लोक उरले होते, त्यांस सोडविण्यासाठीं दत्ताजीनें भाला रोंखून एकदम आपला घोडा पुढें घातला. मागोमाग त्याचे स्वार रोहिल्यांवर घुसले. त्यांनीं पुष्कळांस कापून काढिलें आणि बाकीच्यांस नाल्यापलीकडे हाकून दिलें. रोहिले पादचारी असून त्यांचें निशाण हस्तगत करण्यासाठीं दत्ताजी त्यांस कापीत पुढें जात असतां रोहिल्यांकडील बंदुकीची गोळी दत्ताजीचे डोळ्यांत व दुसरी जनकोजीचे दंडांत शिरली. त्याबरोबर दत्ताजी घोड्याखालीं आला आणि रोहिल्यांनीं जवळ येऊन त्याचें शीर कापून घेतलें. त्याच क्षणीं मराठे बारगिरांनीं पुढें होऊन जनकोजीच्या घोड्याची लगाम पकडून त्यास मागें आणिलें. या गर्दींत साबाजी पाटील व त्याचे ७०० मराठे मरून पडले. आपल्या पायदळांत मराठे स्वार घुसलेले पाहतांच स्वतः नजीबखान मागून लोकांस धीर देत पुढें आला, तेव्हां त्याजपुढें रोहिल्यांनीं मराठ्यांचे शिरांचा ढीग रचिला. त्यांत दत्ताजीचें शीर होतें तें नजीबानें ओळखिलें, पण त्याचे लोक म्हणाले—

"दत्ताजीचा वर्ण काळा असून, या शिराचा वर्ण पिवळा दिसतो. सिंद्यांचे वीस हजार शेलके स्वार, उत्कृष्ट सामान व निशाणें घेऊन मागें सज्ज असतां, त्यांतले हे थोडेच लोक एकदम पुढें येऊन आमचे अंगावर घुसले. ज्यानें पहिला भाला जोरानें आमचेवर फेंकला, त्याचें हें शीर आहे."

नजीब—हें शीर पिवळें दिसतें याचें कारण त्यांतलें रक्त सर्व नाहींसें झालें आहे. सर्वांपुढें तडफेनें घोडा फेंकणारा स्वार दुसरा तिसरा कोणी नव्हे. तो दत्ताजीच. मी त्यास चांगला ओळखतों. त्याचे संगतींत मी पुष्कळ बसलोंउठलों आहें.

दत्ताजीचें शीर नजीबानें अब्दालीसमोर नेलें, तेव्हां शहानें दत्ताजीच्या शौर्याची तारिफ करीत विचारिलें, "हाच गृहस्थ मराठी फौजांचा सेनानायक होता काय ?"

---

१. गुरुवार पौष वद्य ८ अशी मिति पे. द. २७-२४७ या कागदांत आहे. मुसलमानी चंद्रामुळें हा फरक पडूं शकेल.

नजीब—अलबत्, हाच त्यांचा मुख्य सरदार होय. त्याचा पुतण्या जनकोजी मालक खरा, पण अखत्यार सर्व याचा होता.

या पहिल्याच संग्रामांत नजीबाचा पराक्रम व्यक्त झाल्यामुळें त्याजवर शहाचा पूर्ण विश्वास बसून तो पुढें त्याचेच विचारानें वागूं लागला. इतउत्तर शहानें फौजेच्या आघाडीवर नजीबाचीच नेमणूक केली आणि हिंदु किंवा मुसलमान सत्ताधीशांशीं तहाची वगैरे बोलाचाली करण्याचा संपूर्ण अधिकार त्यास दिला.

इतक्यांत मराठ्यांची दुसरी फौज मल्हारराव होळकराचे हाताखालीं जयनगराहून पुढें आली. मल्हारराव व नजीबखान यांची पूर्वीपासून दोस्ती असून, त्यांचेच मार्फत तह व करार ठरत. मल्हारराव व जनकोजी यांच्या पुढें भेटी होऊन त्यांच्या फौजा एकत्र झाल्या. जनकोजी जखमांनीं आजारीच होता. जयनगरच्या पुढें मेवाट प्रांतांत मराठ्यांच्या फौजा असतां त्यांजवर नजीबाच्या शिकवणीनें अहंमदशहानें चढाई केली, पण त्यास चुकवून मराठे दिल्लीस येऊन यमुनापारचा प्रदेश लुटूं लागले. पाठोपाठ अहंमदशहा व नजीबखान त्यांजवर चालून गेले. मल्हाररावानें त्यांच्याशीं सामना केला नाहीं. त्याचे आघाडीस संभाजी घोरपडे याचें आठ हजार स्वारांचें पथक सिकंदरा परगण्यांत होतें, त्यांजवर अफगाणांनीं हल्ला करून संभाजी व त्याचे पुष्कळ लोक ठार मारिले. संभाजीचा मुलगा फकीरजी अहंमदशहाचे हातीं जिवंत सांपडला. हा जय मिळाल्यावर नजीबानें शहास पुढील सल्ला दिलीः—

नजीब—आपण मोठे नशीबवान् आहांत. हिंदुस्थानांत येतांच शिंदेहोळकरांचा पाडाव करून आपण त्यांस मागें त्यांचे हद्दींत रेटून घातलें. इतक्या उपर दक्षिणेंतून नवीन फौज आल्याशिवाय शिंदेहोळकरांना आपल्यावर चालून येण्याची ताकद उरलेली नाहीं. हल्लीं येथें उन्हाळा सुरू झाला आहे. लवकरच पुढें पावसाळा येईल. तरी आपण या सालीं येथेंच छावणी करून मराठ्यांवर दडपण ठेवून राहवें. त्यांचा संपूर्ण पाडाव झाल्याशिवाय आमच्या सारख्यांचा निभाव येथें लागणार नाहीं. आपणांस खर्च लागेल तो सर्व मी पुरवितों.

अहंमदशहास ही सल्ला पसंत पडली; आणि कोयल परगण्यांत त्यानें छावणीचा विचार कायम केला. पूर्वी इमादुल्मुल्कचे ताब्यांत जो प्रदेश होता तो सर्व शहानें नजीबास दिला; आणि त्यानेंही थोडथोड्या रकमा आणून शहाचे खर्चास पुरविल्या. उन्हाळा असतांच फरीदाबाद, शहादाबाद वगैरे जाठांचे परगणे होते ते व कोयल परगणा असे शहानें स्वतः आपल्या ताब्यांत घेतले. पूर्वी साबीतखानानें बांधलेला साबीतगड[1] नांवाचा मजबूत किल्ला जाठांचा होता. जाठानें त्यास रामगड हें नांव दिलें होतें. किल्ल्याचे तीन भाग असून आंत तोफांच्या माऱ्याचा उत्कृष्ट बंदोबस्त व तीन वर्षें पुरेल इतकी धान्य-

१. यासच हल्लीं अलीगड म्हणतात.

सामग्री होती. तो किल्ला पंधरा दिवस पावेतों लढून अहंमदशहानें हस्तगत केला; आणि त्यानजीकच आपली छावणी दिली.

हिंदुस्थानांतील हीं वर्तमानें दक्षिणेंत मराठ्यांचा मुख्य जो पेशवा नाना त्यास कळतांच त्यानें आपला बंधु सदाशिवराव ऊर्फ भाऊ यास मोठी फौज देऊन अब्दालीचे सामन्यासाठीं उत्तरेंत रवाना केलें. पावसाळ्याचे सुरुवातीस मराठ्यांच्या फौजा जमत चालल्याची बातमी अहंमदशहास मिळाली. तेव्हां नजीबानें लखनौहून शुजाउद्दौल्यास आणून त्याची अब्दालीशीं मुलाजमत करविली. भाऊ मथुरेस दाखल होतांच सुरजमल्ल जाठ व इमादुल्मुल्क भरतपुरास होते ते आपापल्या जमावांनिशीं येऊन भाऊस सामील झाले. अहंमदशहानें आपला वजीर शहावलीखान याचा भाऊ याकूबअलीखान यास दिल्लीचे संरक्षणास ठेविलें होतें. त्याजवळ ३०० स्वार व ३०० पायदळ असून जराब-बाशी म्हणून तेथें तोफखान्याचा अंमलदार होता. त्यांचे ताब्यांतून प्रथम दिल्ली सोडविण्याचें ठरवून भाऊनें त्या कामगिरीवर मल्हारराव, जनकोजी, बळवंतराव, इमादुल्मुल्क व महाराज ब्रजेंन्द्र बहादूर सुरजमल्ल जाठ यांस मथुरेहूनच पुढें रवाना केलें. त्यांनीं येतांच दिल्लीस वेढा घालून किल्ला व शहर हस्तगत करण्याचा उद्योग चालविला.

### ७ कुंजपुऱ्याचा पाडाव

दिल्लीवर फौजा रवाना करून मागाहून तीन दिवसांनीं म्हणजे शहाआलमच्या पहिल्याच वर्षी छ १ जिल्हेज हिजरी सन ११७३ ( = २४-७-१७६० ) रोजीं खुद्द भाऊ दिल्लीस दाखल झाला. दिल्ली हस्तगत करण्यास बिलंब लावल्याबद्दल त्यानें सरदारांस दोष दिला आणि किल्लेदाराशीं ठराव करून तेरा दिवसांत दिल्लीचा ताबा घेतला. नंतर दिवाणीखासचे छतास चांदीचा पत्रा होता तो भाऊनें काढून त्याचे रुपये पाडले. ते चौदा लाख झाले. पुढें भाऊनें कांहीं दिवस दिल्लीसच मुक्काम केला. मराठ्यांनीं दिल्ली हस्तगत केलेली पाहून अहंमदशहास अत्यंत दुःख झालें, आणि त्यानें आपली कोयलची छावणी उठवून ती दिल्लीसमोर दोन कोसांवर शहादरा येथें आणिली. दोन कोसांवरून दिल्लीची अवस्था त्याचे नजरेस पडली. परंतु यमुनेस अपरंपार पूर असल्यामुळें त्याचा इलाज चालेना. भाऊच्याही मनांत फार होतें कीं, अहमदशहावर चालून जावें, परंतु पुरामुळें त्यालाही पलीकडे जातां येईना. यास्तव दिल्लीचे बाजूस आपलीं मजबूद ठाणीं बसवून यमुनापश्चिमतीरानें थेट सरहिंद पावेतोंचा प्रदेश काबीज करण्याचा बेत भाऊनें ठरविला. दिल्लीपासून उत्तरेस साठ कोसांवर कुंजपुरा आहे, तें ठाणें कबजांत घेण्यासाठीं भाऊ दिल्लीहून पुढें चालून गेला; तेव्हां कुंजपुऱ्याचा जमीनदार नजाबतखान म्हणून होता, त्यानें लढण्याची तयारी केली. अहमदशहाचा एक प्रमुख सरदार समंदखान लाखीजंगल येथें होता, तो आपले पांचशें लोक घेऊन नजाबतखानाचे मदतीस कुंजपुऱ्यास आला. आणखी एक नामांकित अफगाण जमादार कुत्बशहा नांवाचा त्या बाजूस होता, तोही आपला जमाव घेऊन कुंजपुऱ्याचे बचावास धावून आला. बाहेर उघडया

मैदानावर मराठ्यांशीं सामना करणें या मुसलमान सरदारांस शक्य नसल्यामुळें त्यांस नजाबतखानानें किल्ल्याचे आंत बोलाविलें; पण आंत जाऊन कोंडून घेणें त्यांस पसंत वाटलें नाहीं. ते म्हणाले, 'तुम्ही आंतून मारा करा आणि आम्ही बाहेर तटाखालीं राहून मराठ्यांवर हल्ले चढवूं. आमचा नाइलाजच झाला तर मग आम्ही आंत येऊं.'

नजाबतखान—तुमचा हा बेत मला शहाणपणाचा दिसत नाहीं. तुम्ही आंत या, म्हणजे दोन महिनेपावेतों आपण कोणासही दाद देणार नाहीं. एवढ्या अवधींत शहा अब्दाली येऊन आपली सुटका करील.

पण समंदखानास आपल्या शौर्याची मोठी घमेंड होती. त्यानें किल्ल्याचा आश्रय केला नाहीं. तटाजवळच बाहेर त्यानें आपला तळ दिला. इतक्यांत भाऊ आपली सर्व फौज एक लाखावर होती ती व प्रचंड तोफखाना घेऊन कुंजपुऱ्यावर चालून आला. त्याच्या तोफखान्यावर मुख्य अंमलदार इब्राहीमखान गारदी हा पाश्चात्यांचे हाताखालीं तोफ चालविण्यांत निष्णात झालेला असून, त्याचे ताब्यांत बारा हजार गार्द्यांचें स्वतंत्र पथक होतें. कुंजपुऱ्यापुढें येतांच इब्राहीमखानानें सर्वांपुढें होऊन किल्ल्यावर तोफांचा मारा चालविला. समंदखान व कुत्बशहा यांजवळ सगळे मिळून दोन हजारांहून जास्त स्वार नव्हते. त्यांनीं इब्राहीमखानाशीं झगडा केला. परंतु तोफांपुढें स्वारांचा इलाज कसा चालणार? इब्राहीमखानानें एकीकडून तोफांची सरबत्ती सुरू केली तर दुसऱ्या बाजूनें भाऊनें हत्तींवरून तटावर हल्ला केला. पहिल्याच तडाख्यांत समंदखान मारला गेला, तेव्हां त्याचे लोक किल्ल्यांत जाण्यासाठीं तटाच्या द्वाराकडे पळत गेले. तेव्हां द्वाराजवळ मोठीच धुमश्चक्री माजली. समंदखानाचे लोक आंत जाऊं लागले, तेव्हां नजाबतखानानें आंतून दरवाजे बंद केले. पळून येणाऱ्या लोकांस आंत जातां येईना, तेव्हां ते लोक व कुत्बशहा नजाबतखानास म्हणाले,

'अब्दालीच्या या लोकांस तुम्ही आंत घेत नाहीं, यावरून मराठ्यांशीं तुमचें सूत जुळलें आहेसें दिसतें. पण लक्षांत ठेवा, अब्दाली अजून जिवंत आहे. त्याजपुढें तुम्हांस आपल्या या कृत्याचा उद्यां जाब द्यावा लागेल.' अशा प्रकारें त्यांजमध्यें पुष्कळ वेळ तक्रार होऊन शेवटीं नजाबतखानानें त्या लोकांस आंत घेण्यासाठीं दरवाजे उघडले. पण या वाटाघाटींत वेळ गेला तेवढ्या अवकाशांत मराठे अगदीं नजीक येऊन ठेपले आणि नजाबतखानानें दरवाजे उघडतांच अफगाणांच्या बरोबरच मराठ्यांच्या टोळ्यासुद्धां गर्दी करून आंत घुसल्या. किल्ल्यांत प्रवेश मिळतांच मराठ्यांनीं आंतील सर्व सामान लुटलें. नजाबतखान व त्याचे दोन मुलगे यांचे हाल करून त्यांस ठार मारिलें; आणि कुत्बशहा जमादार त्यांचे हातीं सांपडला, त्याचा त्यांनीं पुढें दोन दिवसांनीं शिरच्छेद केला. नजाबतखानाचा एक मुलगा दिलीरखान तेवढा जिवंत राहिला. मराठ्यांनीं कुंजपुऱ्याचा सर्व किल्ला खणून काढिला आणि त्यांत त्यांना पुष्कळ संपत्ति, धान्य, तोफा, घोडे, उंट वगैरे

जनावरें व मुबलक सामान मिळालें. आंतील लोकांची मराठ्यांनीं अत्यंत अप्रतिष्ठा केली. ( ता. १७. १०. १७६० ).

## ८ बागपतावर अब्दाली यमुना उतरतो

कुंजपुऱ्याचें वर्तमान अब्दालीस समजलें तेव्हां त्यास परमावधीचे क्लेश झाले. सगळ्या अफगाण सरदारांस एकत्र करून तो म्हणाला, "मी जिवंत असतां आपल्या लोकांची ही दुर्दशा माझ्यानें पाहवत नाहीं. कसेंही करून तुम्ही यमुनेला एखादा उतार शोधून काढा, म्हणजे आपण पलीकडे जाऊन मराठ्यांचा समाचार घेऊं." हें शहाचें भाषण ऐकून त्याच्या लोकांनीं पुष्कळ शोध केला, परंतु उतार म्हणून मिळेना. तेव्हां स्वतः अब्दाली यमुनेच्या पूर्वकांठानें मराठ्यांचा तलास काढीत व उतार शोधीत पुढें चालला. जातां जातां दिल्लीच्या वर चवदा कोसांवर बागपत येथें अब्दालीचा मुक्काम असतां भाऊस बातमी कळली कीं, अहंमदशहा आपल्यावर चालून येत असून त्याचा मुक्काम बागपतावर आहे; पण नदीस अद्यापि पूर असल्यामुळें शहा नदी उतरून अलीकडे येईल अशी धास्ती भाऊस बिलकुल वाटली नाहीं. तथापि कुंजपुऱ्याहून पुढें सरहिंदकडे जाण्याचा पहिला बेत त्यानें सोडून दिला; आणि दिल्लीपासून वीस कोसांवर सोनपतजवळ नदीस घाट होता, त्या ठिकाणीं कदाचित् अब्दाली अलीकडे येईल असें वाटून त्या घाटावर भाऊनें एक हजार स्वार रात्रंदिवस पहारा करण्यासाठीं ठेवून दिले. चारपांच दिवस बागपत येथें राहिल्यावर अहंमदशहा स्वतःच नदीची पाहणी करून त्यानें आपले सर्व सरदार व फौज यांस नदीकांठावर आणिलें. शुजाउद्दौला व रोहिले सरदारही बरोबरच होते. त्यांच्याशीं शहाचा संवाद झाला तो येणेंप्रमाणेंः—

शहाः—तुम्ही सर्व हिंदुस्थानचे रहीश असून तुम्हांस या नदीचा उतार माहीत असूं नये हें आश्चर्य आहे. मी पहा आतां कसा उतार शोधून काढतों तो.

सरदारः—आम्ही येथचे सर्व लोक केवळ मतलबी आहों. आपण मात्र इतके कष्ट सहन करून केवळ आमच्या उद्धारासाठीं दूर देशाहून येथें आलां आहां, हें सर्व आम्ही जाणतों. पण या उताराचे बाबतींत आमचा अगदीं नाइलाज आहे.

शहाः—आपले सर्वांचे मानवी प्रयत्न तर आतां थकले. फक्त अल्लाच्या नांवाचा एक शेवटचा आधार तेवढा उरला आहे. तर घ्या आतां देवाचें नांव आणि घाला घोडे नदींत या ठिकाणीं.

असें बोलून शहानें स्वमुखानें एक फतवा पठण केला, आणि सर्वांआधीं आपलाच घोडा पाण्यांत घातला. जवळ झारची[1] होता, त्यानें लागेच आरोळी ठोकली, "घाला सर्वांनीं घोडे पाण्यांत." हे शब्द ऐकतांच सर्व फौज पाण्यांत शिरली, आणि हलके हलके महाप्रयासानें पलीकडच्या तीरास पोहोंचली. मध्यें कित्येक जागीं घोड्यांचे पाय तळास लागत, तर कित्येक जागीं त्यांना तरंगत जावें लागलें. पलीकडच्या कांठास ते पोहोंचले

---

१ भालदार.

खरे, पण तेथें चिखल इतका होता कीं, त्यांत माणसें व घोडे रुतूं लागले; पुढें पायच चालेना. तेव्हां शहानें पुढें होऊन झाडांच्या डाहाळ्या तोडून आणून त्या चिखलावर आंथरल्या. त्याबरोबर वजीरसुद्धां सर्व सरदार व लोक फांद्या, गवत, पाला वगैरे सांपडेल तें आणून चिखलावर टाकूं लागले. त्या बाजूस 'झाव' नांवाचीं झाडें दाट उगवलेलीं होतीं. त्या झाडांस पानें विशेष नसून फक्त शिडशिडीत डाहाळ्या होत्या. वजिरानें घोड्यावरून उतरून स्वतः हीं झाडें हातानें तोडून आणिलीं, त्याक्षणीं शहाचे खास आठ हजार स्वार बरोबर होते त्या प्रत्येकानें तीं झाडें तोडून भारे आणून त्या चिखलावर आच्छादिले. त्यामुळें नदीच्या त्या कांठावर चार हात उंचवटा निर्माण होऊन हां हां म्हणतां तेथचा सर्व चिखल झांकला गेला, आणि त्यावरून चालत जाण्यास सर्वांना चांगली वाट झाली. याप्रमाणें माणसें सर्व उतरल्यावर मागाहून हत्तींच्या कमरेस तोफा बांधून त्याही सर्व या बाजूस आणण्यांत आल्या. अशा प्रकारें कांहींएक नुकसान न होतां सर्व फौज यमुनेपार झाली. फार तर दहापंधराच माणसें दगावलीं असतील.

या तीरावर अहंमदशहा दाखल झाला, तेव्हां त्यानें नजबिास विचारिलें, "या नंग्या मराठ्यांनीं उताराचे बंदोबस्तास फौज ठेविली होती ती कोठें आहे?"

नजीब—मराठे येथून सहा कोसांवर आहेत.

लगेच शहानें शहा पसंदखानास त्या मराठ्यांचे तपासास पाठविलें; आणि बजावलें कीं, 'एकून एक कापून काढा. एकासही जिवंत जाऊं देऊं नका.' या हुकमाप्रमाणें लगेच शहा पसंदखान चार हजार स्वार बरोबर घेऊन निघाला. समागमें त्यानें नजीबाचे वाटाडे मार्ग दाखविण्यासाठीं घेतले. दोन घटकांतच मराठ्यांची टोळी त्यांचे नजरेस पडली. प्रथम मराठ्यांचे मनांत सामना करण्याचा विचार होता. पण अफगाणच आपल्यावर चढाई करून येत आहेत असें पाहून त्यांचें धैर्य गळालें आणि ते आपल्या मुख्य छावणीकडे पळत सुटले. शहा पसंदखानानें त्वरा करून त्यांजवर बंदुकांच्या गोळ्यांचा वर्षाव केला. थोडा वेळ ही बरकंदाजी चालल्यावर अफगाणांनीं तलवारी उपसून चहूंकडून मराठ्यांस घेरलें; आणि सर्व लोक कापून काढिले. त्यांची शिरें कापून घेऊन शहापसंदखान निघाल्यापासून सहा घटकांचे आंत शहाचे छावणींत परत आला.

## ९ पानिपतच्या तळावरील शहाची शिस्त, मराठ्यांची रसदबंदी

दुसऱ्या दिवशीं अहंमदशहानें पुढें चाल केली; आणि तिसऱ्या दिवशीं तो पानिपतचे नजीक येऊन पोहोंचला. कसब्याच्या अलीकडे तीन कोसांवर त्यानें आपली छावणी केली. त्या दिवसापासून उभय फौजांमध्यें लहानमोठ्या चकमकी झडूं लागल्या. नारो शंकर दिल्लीस होता. तो भाऊचे फौजेस रसद पोहोंचवीत असे. तोफखान्याचें सामान, दारूगोळा, स्वार, पायदळ व दुसरें लष्करी साहित्य बरोबर घेऊन पुण्याहून शहाजहानाबाद[1]

१. आग्रा. २ शिरस्त्राण.

पावेतों लमाणांचे तांडे सारखे सुरू होते. हें साहित्य तेथून पुढें रवाना करण्याचें काम नारो शंकर करी. अहंमदशहानें आपल्या छावणीची व्यवस्था केल्यावर असा प्रघात घातला कीं, दररोज सकाळीं पुत्र तैमूरशहास बरोबर घेऊन सर्व फौजेची तपासणी करावी; आणि लष्करचा एक एक दस्ता बाहेर आणून त्यास लढाईसाठीं सज्ज करावें. सुजा व रोहिले सरदार यांसहि त्यानें असा सक्त हुकूम फर्माविला कीं,'माझ्या खास हुकुमाशिवाय कोणीहि छावणीच्या बाहेर पडूं नये.' याप्रमाणें दररोज टेहळणीचे थोडे लोक बरोबर घेऊन साध्या पोषाखानें शहा छावणीच्या बाहेर कांहीं अंतरपावेतों येऊन बसे. अशा वेळीं त्या पितापुत्रांबरोबर त्यांची स्वतःची अशी बिलकुल फौज नसे. अंगांत एक लाल डगला, डोक्यास एक काळी टोपी व त्यावर एक शाल एवढाच त्याचा पोषाख असे. त्याशिवाय भपकेदार जिरघा[२] वगैरे तो कांहीं एक घालीत नसे. कमरेस बाणांचा भाता व हातांत धनुष्य असे. मुलाचाहि पोषाख हुबेहुब बापाच्यासारखा असे. शत्रूंकडची टेहळणी करून बातमी आणण्याच्या कामावर शहानें कांहीं निवडक लोक नेमिले होते. ते चोहोंकडून येऊन दररोज त्यास वर्दी देत. मराठ्यांचें एखादें पथक छावणी सोडून पुढें आल्याची बातमी येई, तेव्हां शहा आपल्याकडची एखादी टोळी त्यांच्याशीं झगडण्यासाठीं रवाना करी. तेव्हांच काय ती थोडी बहुत चकमक झडे. परंतु खास हुकुमाशिवाय छावणीच्या बाहेर पडण्याची शहानें सक्त मनाई केली होती. दूर उभा राहून तो धुळीच्या लोटाकडे सारखी दृष्टी लावून बसे. धूळ आपल्याकडेच आलेली दिसली, तर 'माझ्या टोळीचा पाडाव झालेला दिसतो' असें म्हणून तो केवळ अंदाजानें दुसरी टोळी मराठ्यांच्या अंगावर उजवीकडे किंवा डावीकडे रवाना करी. परंतु धुळीचा लोट दुसरीकडे निघून गेलेला दिसला तर त्या बाजूस मराठ्यांचा पाठलाग करण्यास तो लगेच आपल्या दोनतीन टोळ्या एकदम रवाना करी. अशा वेळीं 'अमुक अंतरपर्यंतच पाठलाग करा, त्यापुढें बिलकूल जाऊं नका,' असें तो त्यांस निक्षून बजावी. अमुक एका प्रसंगीं शत्रूचा पाठलाग करणें आपल्या लोकांस अशक्य आहे, असें शहास दिसून आल्यास, ते एका बाणाच्या अंतरावर असतांच शहा स्वतः मैदानांत थोडा पुढें जाऊन प्रत्यक्ष लढणें कसें चाललें आहे हें पाहून घेई, आणि मग योग्य दिसेल तसा हुकम फर्मावी. त्याला जे हिंदी सरदार सामील झाले होते त्यांसही तो स्वतःच्या सरदारांप्रमाणेंच सक्तीचे हुकूम देई. बातमी आणण्यास हरकारे पाठविण्याचा प्रघात हिंदुस्थानांत होता, तो शहानें बंद करून त्यांच्या ऐवजीं तो आपले स्वतःचे निवडक टेहळणीचे स्वार चहूंकडे पाठवून ताबडतोब बाहेरची तपशीलवार बातमी बारकाईनें आणवी. 'मराठ्याच्या हातांत बंदुका आहेत कीं, तलवारी आहेत, बंदुका बंद करून त्यांनीं तलवारींचा प्रयोग केव्हां चालू केला, कोणाचे किती लोक मेले व जखमी झाले; निशाण कोणत्या रंगाचें होतें; आपल्यासमोर आलेल्या हत्तीची अंबारी व हौदा कोणत्या रंगाचा होता,' अशा प्रकारची अगदीं बारीकसारीक बातमी तो वरचेवर आणवी. सकाळचे दोन प्रहरपावेतों शहाचा असा नेहमींचा क्रम होता. देहविधीसाठीं तो

एक कापडी टकुच्या व बसण्यासाठीं एक लहानसा बिचवा बरोबर ठेवी. इकडे त्याचा वजीर शहावलीखान यास शहानें अश्रफुल-वजारा असा किताब व संपूर्ण अधिकार दिला; आणि त्यानेंहि हिंदी लोकांशीं चांगलें सख्य संपादिलें. वजिराच्या हाताखालीं मीरबक्षीच्या म्हणजे सेनानायकाच्या कामावर जहानखान, इश्तबेगीच्या कामावर अब्दुल्लाखान, दिवाणबेगीच्या कामावर फत्तुल्लाखान सदृश्च अशा नेमणुका शहानें केलेल्या होत्या. पैकीं फत्तुल्लाखान हा शहाच्या खालेचा[1] मुलगा असन त्याला 'लंगडा नबाब' असें टोपण नांव होतें. बाझ-चंग-खान बंगश, कहीचा दरोगा, बरखुरदारखान अब्वाकशी, महंमदखान खोजा, घुलार-आघाशी, सय्यद रहमदखान टोपची, मीर आताईखान, आणि झारची करीमदादखान हे सर्व वजिराच्या हातखालीं निरनिराळ्या पथकांचे अंमलदार होते. नसाकची बाशी, कुरक आघाशी मारूफखान, झांकीखान, बाझूखान अर्जबेगी, व हिंदुस्थानचे सरदार हे शहा-बरोबर असत. शहा जेव्हां जेव्हां घोड्यावर बसून छावणींत फिरे तेव्हां हे सर्व सरदार त्याजबरोबर पायीं चालत आणि नाना प्रकारची युद्धविषयक चर्चा करीत. जेव्हां शहा तंबूंत जाऊन बसे, तेव्हां हेही आंत जाऊन गप्पागोष्टी करीत. शहाशीं बोल-तांना ते उभे राहात. पण हाफीज रहमतखान सकाळचेच प्रहरीं शहाकडे येऊन बोलूं लागला म्हणजे ती दरबारची वेळ नसल्यामुळें शहा त्यास बसूनच बोलण्यास सांगे. हाफीज-रहमतखानाबद्दल शहास मोठा आदर होता. कारण त्यास सर्व कुराण तोंडपाठ येत होतें.

इकडे भाऊच्या छावणींत दुआबांतून दिल्लीच्या वाटेनें धान्य व सामान पोहोंचत असे त्यासंबंधानें नजीबानें शहास विनंति केली कीं:—

नजीब—दुआबांत माझीं ठाणीं ठिकठिकाणीं आहेत. पण दिल्लीचे आजूबाजूस बारा कोसांचे टप्यांत माझा अंमल चालत नाहीं. म्हणून आपण जर या कामासाठीं थोडी फौज द्याल तर माझे आमील जागजागां आहेत, त्यांजबरोबर ही फौज देऊन मी शहादऱ्या-पावेतों आपला अंमल बसवितों. म्हणजे दुआबांतून येणारी मराठ्यांची रसद बंद होईल.

ही विनंति मान्य करून शहानें झारची करीमदादखान याचे हाताखालील एक हजार स्वारांची तुकडी नजीबाचे हवालीं केली. त्याचे आमील सिकंदरा येथें व इतर परगण्यांत होते, त्यांजकडे नजीबानें हे आपले एक हजार स्वार यांस रवाना केलें. त्यांनीं शहादरापावेतोंचा प्रदेश लुटून आणिला आणि मराठे हस्तगत झाले त्यांस ठार मारिलें. दिल्लीस नारोशंकर होता. त्यास ही बातमी समजतांच त्यानें जिवाजी बक्षी[2] व मीरखान नथू यांजबरोबर कांहीं पायदळ देऊन करीमदादखानावर दुआबांत पाठविलें. परंतु अफगाणांपुढें त्यांचा निभाव लागला नाहीं. त्यांचे कांहीं मराठे कापले गेले व बाकीचे दहशत खाऊन दिल्लीस परत आले. अर्थात् तेव्हांपासून दुआबांतून भाऊस येणारी रसद बंद झाली.

---

१. खाला = मावशी. २. हाच पुढें प्रसिद्धीस आलेला जिवबादादा असावा.

उपरांत एके दिवशीं झारची करीमदादखान व मीर आताईखान यांस शहा म्हणाला:—

'हें पहा, या मोहिमेपायीं आज दोन वर्षें माझे सर्व लोक अत्यंत यातना सोसून कष्ट करीत आहेत. तुम्ही दोघे नुकतेच कंदाहाराहून आलां आहां, आणि तुमच्या लोकांचा दम अजून ताजा आहे. तर हरकसें करून मराठ्यांस पोहोंचणारी रसद एवढी बंद करा.'

त्या दोघांनीं ही कामगिरी स्वीकारून मुसीखान म्हणून एक बलुची सरदार माहीतगार होता त्यास व दिल्ली बाहेरच्या प्रदेशाचे वाकबगार लोकांस बरोबर घेऊन मराठ्यांच्या कहीवर छापे घालण्यास सुरुवात केली, आणि अल्पावकशांत त्यांनीं पुष्कळसे मराठे मारून काढिले. अर्थात दिल्लीहून सरळ मार्गानें भाऊस पोहोंचणारी रसदही यापुढें बंद पडली.

तथापि पानिपतच्या आजुबाजूस वावरणारीं वणजाऱ्यांचीं लमाणें पुष्कळ होतीं; त्यांस भारी मजुरी देऊन आडवाटांनीं व रात्रीच्या वेळीं लपूनछपून रसद आणण्याचें काम भाऊनें दिलें. दिवसाउजेडीं असें सामान भाऊकडे येणें आतां अशक्य झालें. परंतु भाऊला पैशाचा पुरवठा नसल्यामुळें वणजाऱ्यांस रकमा पोहोंचेनाशा होऊन रसदेचा हाही उपाय खुंटला. तेव्हां भाऊनें नारोशंकरास दिल्लीस निगडीचा हुकूम पाठविला कीं, 'कसेंही करून आम्हांस पैसा येईसें करा.' त्यावरून नारोशंकरानें पांचशें निवडक स्वार तयार केले; आणि प्रत्येकाचे कमरेस पांचशें अश्राफी[1] बांधून पानिपताकडे रवाना केले. दिवस मावळल्यावर हे स्वार रात्रीचे दिल्लीहून निघाले. ते पहाटेच्या प्रहरीं दिवस उगवण्यापूर्वी करीमदादखान व आताईखान यांस आढळले. दुरूनच यांनीं त्या स्वारांवर गोळ्या झाडण्यास सुरुवात केली. त्या बरोबर ते जागच्या जागीं थबकून राहिले. तेव्हां मुसलमानांनीं तलवारी उपसून त्यांजवर चाल केली आणि बहुतेकांस कंठस्नान घालून त्यांजवळचा ऐवज काढून घेतला. फक्त दोनतीन असामी जीव घेऊन परत दिल्लीस गेले. अर्थात् त्यांचे सर्व घोडे व जवळचा पैसा आयता अब्दालीस मिळाला. मारलेल्या माणसांच्या शिरांचा ढीग शहाचे छावणींत रचण्यांत आला.[2]

अशा तुरळक झटापटींत एक महिना गेला. एके दिवशीं नजीबखानाचा भाऊ सुलतानखान एक पायदळ पलटण घेऊन मराठ्यांशीं झगडत असतां त्यानें आपल्या लोकांस इशारत केली कीं, 'आज जर तुम्ही सर्व शिकस्तीनें लढाल, तर आपल्या तलवारींनीं आपण या मराठ्यांना साफ हांकून देऊं.' ती गोष्ट त्या लोकांनीं मान्य केली. मराठ्यांचे

---

१. अश्राफी = मोहोर किं. सुमारें रु. १५. २. मराठींत वर्णिलेला पाराशर दादाजीच्या खजिन्याचा हा प्रकार असावा.

छावणींतून दररोज कांहीं टोळ्या तोफा बरोबर घेऊन खंदकाच्यापुढें वाढून येत आणि सायंकाळच्या चार घटिका दिवस राहिला कीं, परत छावणींत जात. अशा क्रमांत एके दिवशीं ते आपल्या तोफा घेऊन परत जात असतां, सुलतानखानानें त्यांजवर एकाएकीं चाल केली. मराठे स्वार पळूं लागले, त्यांचा पाठलाग करीत रोहिले अगदीं खंदकापाशीं येऊन भिडले. त्याबरोबर मराठ्यांच्या स्वारपायदळांचा एक मोठा जमाव आंतून चालून येऊन रोहिल्यांवर घुसला. सूर्यास्ताची वेळ होती, अशा समयीं तुंबळ रणकंदन माजलें. लढाई जुंपतांच सगळे मराठे बाहेर चालून आले. रोहिल्यांचे केवळ दोन हजार स्वार व तीन हजार पायदळ मिळून पांच हजार लोक होते. पैकीं स्वार होते ते जीव बचावून पळून गेले. पायदळ मागें राहिलें तें आपलें निशाण संभाळून बंदुका झाडीत आपल्या संगराजवळ दाखल झालें. ते बंदुका झाडीत असल्यामुळें मराठ्यांना त्यांशीं लगट करवेना. रोहिले अडचणींत सांपडलेले पाहून इब्राहीमखान गारदी व तोफखान्याचा दरोगा बळवंतराव यांनीं त्यांस अकस्मात् गांठलें. त्या प्रसंगीं रोहिले जिवावर उदार होऊन लढले. त्यांच्यांतून दोन गोळ्या बळवंतरावाच्या पोटांत घुसून तो तत्काळ गतप्राण झाला. एवढ्यांत दुसरीकडून इब्राहीमखानानें लगट करितांच पंधराशें रोहिले मरून पडले. बाकीचे बचावून लढत लढत परत येत असतां काळोख पडल्यामुळें वांचले. आपले इतके शूर पायदळशिपाई जायां झालेले पाहून नजीब अत्यंत विव्हळ झाला.

## १० तहाची वाटाघाट

याच संधींत हाफीज रहमतखानाचे मार्फत मराठ्यांकडून तहाचें बोलणें वजीर शहावलीखान याजकडे आलें होतें, तें मान्य करून एकंदर युद्धप्रसंग बंद करावा असें त्या वजिरानें मनांत आणिलें. यास दुसरें कारण असें झालें कीं, हाफीज रहमतखानास नजीबाचा बडेजाव अत्यंत दुःसह वाटूं लागला होता. नजीबखान हा मूळचा परदेशी अफगाण, हलक्या स्थितींत वाढलेला, पण पुढें हिंदुस्थानांत येऊन तो इकडील सर्व अफगाणांत महत्पद पावला. हाफीज रहमत वगैरे सरदारांपेक्षां त्याची मान्यता जास्त वाढली, ( म्हणजे प्याद्याचा फर्जी झाला; ) त्यानेंच शुजाउद्दौल्यास अहमदशहाचे पक्षांत आणून शुजाची योग्यता वाढविली. हे प्रकार हाफीज रहमत वगैरे जुन्या रोहिले सरदारांस रुचले नाहींत. त्यांनीं शहावलीखानास गळ घातली कीं, इमादुल्मुल्कास दिल्लीची वजिरी देऊन त्याचे मार्फत मराठ्यांची समजूत काढा आणि ही युद्धाची आपत्ति मिटवा. ही सूचना शहावलीखानास पसंत पडली. त्यानें ती अहंमदशहाचे कानावर घालतांच शहासही ती योग्य वाटली. हा अंतस्थपणें चाललेला प्रकार नजीबास कळतांच त्यानें लगेच सकाळीं शहाचे दरबारास जाऊन शहावलीखानाचे तोंडावर भाषण केलें तें असेंः—

नजीब—कालच माझे चार हजार लोक कापले गेले हें आपण जाणतां; असें असून आपल्या पदरचे कित्येक नामर्द लोक गनिमाशीं सलूख करून आम्हां अफगाणांस त्यांचे

हवालीं करण्याचा बेत रचितात यास काय म्हणावें! अशी भागूबाईची सल्ला देणारा गृहस्थ जातीचा अफगाण खास नव्हे. मी शहांचे तोंडावर साफ सांगतों कीं, आज इस्लामाचें संरक्षण करणें आपलें कर्तव्य आहे. आपण आम्हां अफगाणांचे जातभाई आहां; आमची अब्रू आपल्या हातांत आहे, तेव्हां आम्हांस मराठयांचे हातीं देण्याचें पाप जोडूं नका.

असें बोलून नजीबानें तहाची सल्ला सुचविणारांची पुष्कळच निर्भर्त्सना केली. ती ऐकून शहावलीखानास इतका संताप आला कीं, 'गुमाखोर' ( = बकवा मत कर ) असे शब्द पुस्तू भाषेत उच्चारून तो दरबारांतून उठून चालता झाला. त्या वेळीं हा प्रकार तितकाच राहिला.

पुढें नजीबानें निरनिराळ्या इसमांशीं बोलून त्यांचीं मनें आपले पक्षास वळविलीं. काजी इद्रीस व जहानखान या दोन सरदारांचें वजन शहावर फार मोठें होतें. त्यांस नजीबानें एकांतीं भेटून या प्रसंगीं आपल्या धर्माचें संरक्षण करणें किती जरूर आहे याबद्दल त्यांची खात्री केली. त्या दोघांनीं जाऊन शहाची गांठ घेतली, त्या वेळीं जहानखान म्हणाला,—

'आपण इस्लामाचे पुरस्कर्ते असून या काफर मराठ्यांशीं सलूख करणें आपणांस बिलकुल उचित नाहीं. अद्यापपावेतों आपली बाजू पूर्णपणें मजबूद आहे. एकवारही आपल्या सैन्याचा पाडाव झालेला नाहीं. मग आपण असा धीर सोडण्याचें प्रयोजन काय ? या मराठ्यांनीं आजपावेतों आम्हां मुसलमानांवर कसा गहजब उडवून दिला तो आपल्या ध्यानांत असेलच. लाहोर येथें त्यांनीं केवढे अनर्थ केले, सरहिंद येथें समंदखानाची काय दशा केली, दिल्लीस नजीबखानाची कशी राळ उडवून दिली, हें सर्व आपण जाणतां. नुकताच कुंजपुऱ्यावर आम्हां अफगाणांचा त्यांनीं कसा फन्ना उडविला तें आपणांस कळलेंच असेल. इतक्या उपर आपणांस या काफरांशीं तहच करणें असेल, तर प्रथम माझा प्राण घ्या आणि मग काय तें करा. खरें म्हटलें तर इमादुल्मुल्कानें पहिली आगळीक केली. बादशहास ठार मारून त्यानेंच हें सर्व संकट उपस्थित केलें.

शहा--तुम्ही सांगतां ते सर्व प्रकार मी जाणतों; आणि इमाद किती हरामखोर आहे तेंही मला अवगत आहे. परंतु आपल्या एवढ्या फौजेचा गुजारा कसा चालवयाचा आणि खर्च कसा भागवायचा याची मोठी पंचाईत येऊन पडली आहे. मराठयांपासून जिंकलेले प्रदेश येथच्या अफगाणांस देण्यांत आले. ते आज सर्व ठीक आहेत आणि माझे बाहेरून आलेले सैनिक मात्र भुकेनें मरत आहेत. या अफगाणांचें वित्त हिरावून घ्यावें तर नाहक बेअब्रू पदरीं येते. आमचा हा पेंच वारण्याइतकें भलेपण या अफगाणांचे अंगीं नाहीं; आणि ते आमच्या फौजेस खर्च पुरवीत नाहींत. आज दोन वर्षे केवळ त्यांच्यासाठीं एवढे कष्ट करून मी येथें सारखा झगडत आहें; नाहीं तर माझें अफगाणिस्तानचें राज्य कांहीं हे मराठे हिरावून घेत नाहींत. केवळ धर्मासाठींच मीं एवढी कंबर बांधली आहे; नाहीं तर मला मराठ्यांची गरज काय ?

काजी इद्रिस—असें आहे तर हेच शब्द खरे करा म्हणजे झालें. केवळ धर्मावर नजर द्या. पैशाची बाबत मनांत देखील आणूं नका. पैशावर दृष्टि ठेवल्यास जिहाद केल्याचें पुण्य नाहींसें होईल. रोहिल्यांच्या पैशावर कांहीं तुमचें राज्य चाललें आहे असें नाहीं. रोहिल्यांवर अनर्थ गुदरले तेव्हां त्यांनीं आपल्याकडेच धाव घेतली. अंगीं सामर्थ्य असून जर आपण त्यांचें संकट निवारण केलें नाहीं तर परमेश्वरापुढें आपणांस त्याचा जाब द्यावा लागेल हें ध्यानांत ठेवा. हें जग तर केवळ क्षणभंगुर आहे. निमिषमात्रांत नादीरशहाची काय गत झाली आपण पाहतां. तर शत्रूची भीति मनांत आणूं नका. भीति एक अल्लाची तेवढी बाळगा म्हणजे झालें.

हा संवाद झाल्यावर सर्व अफगाण सरदार म्हणाले,

'काजीसाहेब बोलतात तेंच सत्य. या युद्धांत कसाही प्रसंग आला तरी आम्ही सर्व आपले हुकूम उठविण्यास सिद्ध आहों. आमचीं पोटें भरलेलीं असोत कीं रिकामीं असोत, आम्ही कष्ट करण्यास कधीं चुकणार नाहीं.'

शहा—मान्य आहे मला ही तुमची सल्ला. घ्या अल्लाचें नांव आणि व्हा पुढें. मीं तहाची वाटाघाट सोडून दिली.

असें म्हणून अहंमदशहानें मराठ्यांचे वकिलांस परत जाण्यास रजा दिली.

शहाचे छावणींत हा प्रकार चालला असतां त्याजकडे बातमी दाखल झाली कीं, काल्पी, शुकोआबाद वगैरे परगण्यांचा आमिल गोविंद पंडित उर्फ गोविंद बुंदेले नजीबाचे परगणे लुटून आणलेला मोठा खजिना बरोबर घेऊन तो दुआबांतून भाऊकडे पोहोंचविण्यास निघाला आहे. ही बातमी ऐकतांच झारची करीमदादखान व मीर आताईखान यांस शहानें हुकूम फर्माविला कीं, तुम्ही जाऊन हा खजिना भाऊस पोहोंचणार नाहीं असें करा. ते दोघे सरदार नजीबाचा जमादार करीमखान म्हणून त्या प्रदेशाचा माहीतगार होता, त्यास बरोबर घेऊन यमुनेपलीकडे गेले. सिकदराहून चोवीस तासांत सारखी पन्नास कोसांची मजल मारून सूर्योदयसमयीं एकदम गोविंदपंताचे मुक्कामावर त्यांनीं हल्ला केला. बुंदेले त्या वेळीं असावध होता. त्याचें डोचकें त्यांनीं कापून घेतलें ( ता. २२ डिसेंबर, स. १७६० ). गोविंदपंताचा मुलगा बाळाजी बरोबर होता, त्यानें थोडया खास बारागिरांनिशीं[1] शिकस्तीनें बचावून पळ काढिला. त्याची फौज दहा हजार होती ती सर्व लुटली गेली. चवथ्या दिवशीं गोविंदपंताचें शीर शहाच्या छावणीचे चौकांत मंजिलीनुम्याचे[2] खालीं प्रदर्शनार्थ ठेवण्यांत आलें.

त्या दिवसापासून मराठ्यांच्या छावणींत हरएक जिनसाची मोठी महर्गता सुरू झाली. त्यांचे पोटांत भीति उत्पन्न होऊन बचावासाठीं त्यांनीं नवीन संगर उभारले, आणि छावणच्या

---

१ मुखसुसान = संरक्षक शिपाई. २ वरून पाहण्याचा सज्जा.

सभोंवार एक भाला खोलीचा खंदक तयार केला. या खंदकांतून ते लहानमोठथा चकमकी-साठीं बाहेर पडत; आणि लढणें आटपल्यावर परत खंदकाचे आंत जात. असा हा प्रकार एकंदर दोन महिने चालला. शेवटीं शहानें मराठ्यांची रसद साफ बंद पाडल्यामुळें त्यांची उपासमार होऊं लागली. तेव्हांपासून त्यांची जयश्री मावळून गेली; आणि त्यांचा अगदीं कोंडमारा झाला.

## ११ शेवटचा संग्राम, १४ जानेवारी १७६१

एके दिवशीं सगळीच मराठी फौज आपल्या संगरांतून बाहेर चालून आली. बरोबर त्यांचा समग्र तोफखाना होता. इब्राहीमखान गारदी, होळकर, शिंदे वगैरे सरदार लढा-इच्या उद्देशानें पुढें चालून आलेले पाहून अहंमदशहानें आपल्या वहिवाटीप्रमाणें आपल्या सर्व फौजेचे दस्ते लगेच सज्ज केले, आणि त्यांना मराठ्यांचे सामन्यास रवाना केलें. एकामागून एक मराठ्यांच्या टोळ्या अफगाणांवर येऊन पडल्या, त्यांची बातमी शहाकडे येत गेली. तेव्हां तो घोड्यावर बसून जरा पुढें आला, तों सर्वच मराठी लष्कर एकंदर तोफांनिशीं चालून आलेलें त्यास दिसलें. शुजाउद्दौला, हाफीज रहमतखान, दुंदेखान, बंगश वगैरे हिंदी सरदारांवर भाऊनें इब्राहीमखानास पाठविलें. मल्हारराव होळकर नजीबाचे फौजेवर चालून आला. भाऊची खास फौज हुजरात म्हणून होती, ती घेऊन व स्वतःचा तोफखाना पुढें घालून भाऊ अहंमदशहाचे अंगावर आला. सूर्योदयापासूनच लढाईस तोंड लागलें. पहिले तीन तास फक्त तोफांचा व बाणांचा मारा चालला. तदुत्तर मराठ्यांचे घोडेस्वार पुढें सरकून बंदुका व भाले यांचा मारा करूं लागले. तेव्हां आघाडीस असलेले आपले लोक मागें हटत आहेतसें पाहून शहानें झारची करीमदादखान व मीर आताईखान यांस त्यांचे मदतीस पाठविलें. या दोघांच्या स्वारांनीं चांगली कामगिरी केली. अहंमदखान बंगश व दुंदेखान यांच्या पथकांवर इब्राहीमखानानें व मराठे स्वारांनीं असा जोराचा मारा केला कीं, दुंदेखानाचे बहुतेक लोक मरून पडले, आणि त्याचें सर्व पथक खलास झालें. कांहीं थोडे लोक राहिले ते पळून गेले. खुद्द त्याचा हत्ती पन्नास पावलें मागें सरकत आला. तीच दशा बंगशाचीही झाली. मात्र शुजाउद्दौला व नजीब यांजवर त्या दिवशीं विशेषसा मारा झाला नाहीं.

दोन प्रहरचे सुमारास भाऊ घोड्यावरून व विश्वासराव हत्तीवरून बंदुका, भाले व तरवारी यांचा मारा करीत जोरानें निकट चालून आले. त्या झुंजांत मीर आताईखान मारला गेला, तेव्हां अहंमदशहास दिसून आलें कीं, आतां आपल्या लोकांचा निभाव लागत नाहीं. अशा वेळीं शहाचें खास गुलामांचें सहा हजारांचें पथक होतें, त्या लोकांस पुढें आणून शहा त्यांस म्हणाला, ' बच्चे हो, आतां ही तुमच्या परीक्षेची वेळ आहे. शत्रूंस साफ घेरून टाका कसे ! ' हा हुकूम ऐकतांच गुलामांच्या या पथकानें तीन टोळ्या करून तीन बाजूंनीं खुद्द भाऊच्या आघाडीवर बंदुकांचा मारा सुरू केला. त्या योगानें धिटाईनें

लढत असलेले मराठे कचरूं लागले. भाऊची आघाडी मागें सरली, त्याबरोबर खुद्द भाऊचें पथक मागें होतें तें पुढें घुसलें, तेव्हां सर्वत्र हमरीतुमरीची हातघाई सुरू झाली. मराठे तोंडें फिरवून पळण्याच्या बेतांत आले, परंतु भाऊचे स्वार बिलकुल माघार घेईनात. ते नेट धरून भिंतीसारखे उभे राहिले. अशा स्थितींत शहाच्या गुलामांचा दोन हजारांचा सबंध एक दस्ता बंदुकांचा मारा करीत उजवीकडून लढत डावीकडे येऊन पोहोंचला आणि तसाच दुसरा दोन हजारांचा दस्ता बंदुका सोडीत डावीकडून उजवीकडे चालून गेला. तिसरा दोन हजारांचा दस्ता होता तो भाऊचे आघाडीवर समोरून बंदुका सोडीत त्यांचे पाठीमागें दाखल झाला. अशा या माऱ्यांतून भाऊचे लोक सांवर धरितात, तोंच गुलामांच्या त्या तीन दस्त्यांनीं फिरून आपल्या बंदुका खचून भरून पाहिल्यासारखाच दुसरा फेरा केला; म्हणजे पुनः एक दस्ता डावीकडून उजवीकडे व दुसरा उजवीकडून डावीकडे मारा करीत गेला. अशा रीतीनें शहाच्या या गुलामपथकानें भराभर बंदुका सोडून वर्तुळाकार फेऱ्या केल्या. त्याचा परिणाम असा झाला कीं जिकडे म्हणून तोंड फिरवावें तिकडे आपला या बंदुकांचा मारा आहेच, असें मराठ्यांस झालें. कांहीं वेळ असा प्रकार चालल्यावर मराठी फौजांचा जो सकाळीं प्रचंड विस्तार रणांगणावर फैलावलेला दिसत होता, तो आकुंचित होऊन मध्यभागीं त्याची एक दाट गठडी बनल्यासारखी झाली, आणि लाख असामींच्या या गठडीला शहाच्या सहा हजार गुलामस्वारांनीं केवळ घेरा घालून कोंडून धरिलें. तेव्हां शहाची खात्री झाली कीं, मराठे आतां जेरीस आले. कांहीं तर शहास पळ काढतांनाच आढळले. अशा या संधीस शहानें आपल्या वजिरास आज्ञा केली कीं, 'आतां तुमचें खास पथक या माझ्या गुलामांच्या साह्यास आणा.' हा हुकूम मिळतांच वजिराची फौज बाहेर आली. इतकें होत आहे तों भाऊचा मुख्य जो विश्वासराव त्यास हत्तीवर गोळी लागून तो तत्काळ गतप्राण झाला. या बनावामुळें तर मराठ्यांचा पाडाव होणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं. विश्वासरावास गोळी लागलेली पाहतांच भाऊ त्याजवळ गेला आणि पाहतो तों प्राण निघून गेला असून त्याचे पाय हत्तीच्या गळ्यावर लोंबत आहेत. या देखाव्यानें भाऊचें अंतःकरण विदीर्ण झालें; आणि आतां जिवंत राहवयाचें नाहीं अशा निश्चयानें जवळ जे कांहीं त्याचे मोठ्या पगाराचे थोडे खास संरक्षक होते त्यांसह आपल्या घोड्याची लगाम सैल सोडून तो पुढें घुसला. त्याबरोबर मराठ्यांच्या इतर फौजाही मोठ्यानें आरोळी ठोकून समोर चालून येणाऱ्या वजिराच्या पथकावर येऊन पडल्या. हा प्रकार अहंमदशहाचे नजरेस येतांच त्यानें आपल्या झांबुर्चीबाशीस हुकूम केला कीं ' दौडत जाऊन झांबुर्कांस[1] पुढें आणा; आणि ते पंधराशें झांबुर्कें शत्रूवर सोडा.' या झांबुर्कांचा मारा होतांच खुद्द भाऊचे उमदे संरक्षक स्वार व त्याचे जिव्हाळ्याचे सरदार नजीक होते ते भडाभड मरून पडले. कांहीं थोडे जगले ते माघारे पळून

---

[1] झांबुर्क=उंटांवरील तोफखाना; सुतरनाल, जंबूरेवाले; जंबूरक, झंबूरक=लहान तोफ.

गेले. यानंतर दुसऱ्यांदां भाऊनें आणखी एक निकराचा हल्ला चढविला. परंतु झांबुर्कांपुढें त्याचा नाइलाज झाला. भाऊचे पुष्कळसे लोक पडले आणि तो स्वतः मागें फिरला. त्या वेळीं खुद्द अहंमदशहा झांबुर्कांजवळ उभा राहून त्यांस लढवीत होता. तीन तास दिवस राहतांच एका मागून एक मराठ्यांच्या टोळ्या संग्रामांतून अंग काढून पळूं लागल्या. अहंमदशहानें ताडलें कीं, आतां यांच्यांत बिलकुल दम राहिला नाहीं; खुद्द भाऊचे कांहीं हत्ती, जरी-पटका, व चार पांच हजार स्वार एवढेच कसे तरी झगडत असून ते सुद्धां जीव जग-विण्यासाठीं इकडे तिकडे पळवाट पाहात आहेत. हें पाहून अहंमदशहानें 'खान' आड-नांवाचे म्हणजे खुद्द त्याच्या जातीचे आठ हजार स्वार होते, त्यांस या थकलेल्या मराठ्यां-वर रवाना केलें. त्यांनीं एकदम येऊन झडप घातली, त्यांतच भाऊ मारला गेला. इतरांच्या बरोबर त्याचेंही डोकें अफगाणांनीं कापून घेतलें. उपरांत मोगल, रोहिले, शुजाची फौज वगैरेंनीं पुढें येऊन शत्रूंची लूट व कत्तल केली. त्यांत अगणित किंमतीचा अजबाब अफ-गाणांचे हातास लागला. दिवस मावळेपर्यंत त्यांनीं पळणाऱ्या मराठ्यांचा पाठलाग केला, तो रात्र झाल्यावर थांबला. संगरांत खानांचे हातास जी लूट लागली तिची तर गणतिच नाहीं. त्या खानांनींच ती स्वतः सर्व दाबली, इराणी तुराणी वगैरे दुसऱ्या मुसलमानांस ती बिलकुल मिळूं दिली नाहीं. हातीं लागलेल्या वस्तु विकून त्यांचा त्यांनीं पैसा केला. सुंदर ब्राह्मण स्त्रिया हातीं लागल्या त्या त्यांनीं हिंदुस्थानांतील मुसलमानांस विकल्या. दर एकीची किंमत त्यांनीं एक तुमान[1] घेतली. चांगले घोडे प्रत्येकीं दोन तुमानांप्रमाणें विकले. रात्र पडेपर्यंत जे कोणी मराठे त्यांस सांपडले, त्यांची त्यांनीं साफ कत्तल केली. दया माया कांहीं ठेविली नाहीं. पानिपतावर मराठ्यांनीं खोदलेला खंदक माणसांच्या व घोड्यांच्या प्रेतांनीं भरून गेला. इतर प्रेतांची मोजदाद तर कोणींच केली नाहीं. कैक वर्षें-पावेतों त्या मैदानावर नुसते हाडांचे सांपळे सांपडत असल्यामुळें शेतकऱ्यांस जमीन नांगरणें अशक्य झालें. पुष्कळसे लोक जीव बचावण्यासाठीं कसब्यांत घुसले होते, त्यांचा मागाहून तपास काढून अफगाणांनीं त्यांची कत्तल केली.

नजीबखानाच्या मेहरबानीनें मल्हारराव होळकर सुरक्षितपणें निसटून गेला. जन-कोजी शिंदेसुद्धां रणांगणांतून निघून बाहेर आला होता; परंतु पानिपतनजीकच्या हर्याना परगण्यांतील लोकांनीं त्यास ठार मारिलें. त्याजबरोबर वीस बारगीर होते. पैकीं कांहींचे कपडे व घोडे चोरट्यांनीं सर्व लुबाडून घेतले आणि त्यांस जिवानिशीं सोडलें. पण कित्येकांना आपले घोडे देऊन पायीं चालणें जिवावर आलें, त्यांस त्या चोरट्यांनीं ठार केलें. हर्याना येथील गांवकऱ्यांनीं दोन हजार स्वारांचा सरदार अंताजी माणकेश्वर यास

---

१. जुनें इराणी नाणें, स. १६८० त याची किंमत रु. २७ (= पौं. ३-६-८) होती. त्या वेळीं १ पौंडाचा भाव रु. ८ होता.

काव्यांनीं झोडपून ठार मारिलें. त्याच्या लोकांपैकीं जगून जे पुढें जाठाच्या मुलखांत गेले, त्यांस जाठानें एकेकास एक शेर आटा दिला. जखमी झालेले शेकडों लोक जागच्या जागींच थंडीनें मेले. कांहीं लोकांनीं भाऊचें धड त्याच्या कपड्यांवरून ओळखून आणिलें तें नजीबानें कैदी केलेल्या पुष्कळ मराठ्यांस दाखवून विचारलें, " हें धड भाऊचें खरें काय ? " भाऊचे नातलग म्हणविणारे पुष्कळ इसम जवळ होते, त्यांनीं अंगावरील खाणाखुणा निरखून पाहून कळविलें, " हें भाऊचेंच धड होय, संशय नाहीं. " हें सर्व बोलणें अहंमदशहाचे समक्षच झालें. नंतर शहानें तें धड आश्रफ-उल-वज़राच्या हवालीं केलें. हा वजीर सर्वांशीं स्नेहभाव ठेवावा अशा वृत्तीचा होता. त्यानें सुजास विनंति केली, कीं " तुमचे पदरीं हिंदु लोक असतील त्यांजकरवीं याच्या अंत्यविधीची व्यवस्था करा. " सुजानें तें शव गोसावी सरदारांच्या हवालीं केले; आणि त्यास हिंदुधर्माच्या संस्कारानुसार अग्नि देण्यांत आला. भाऊची बायको पार्वती संग्रामाचे प्रसंगीं घोड्यावर होती. भाऊ पडल्यावर त्याच्या कित्येक बारगिरांनीं मोठा हिय्या करून तिला गर्दीतून बाहेर काढिलें आणि सात प्रहरांत साठ कोस मजल चालून दिल्लीपासून बारा कोसांवर बल्लमगड येथें आणिलें. तेथून पुढें हलक्या मजलींनें त्यांनीं दक्षिणचा रस्ता धरिला.

### १२ अहंमदशहाचें स्वदेशीं प्रयाण

नाना पेशवा दक्षिणेंतून महेश्वरपावेतों आला होता; बरोबर जानोजी भोंसले होता. पानिपतच्या बातमीनें हतबुद्ध होऊन ते परत फिरले व स्वदेशीं गेले. भेलशानजीक बासोदा येथें मुक्काम असतां नानाचे चित्तास भ्रम झाला. मुलगा विश्वासराव अठरा वर्षांचा मृत्यु पावला, त्याचे नांवानें पेशव्यानें सारखा आक्रोश चालविला. त्याच दुःखानें तो पुढें कांहीं महिन्यांनीं मरण पावला.

इकडे अहंमदशहा दिल्लीस आला. तेथें राजा नागरमल्ल व जाठाचे वकील येऊन त्यास भेटले. नागरमल्ल हा मोगल बादशहांचे दरबारांतील एक जुना मुत्सद्दी महंमदशहा, आलमगीर यांचे पदरीं खालशाचा दिवाण होता. हे वकील पुराणा दिल्लीजवळ शहाचा मुक्काम होता तेथें त्यास भेटले. शहा आतां दक्षिणेवर चालून जाणार अशी अटकळ चालू होती. नजीबानें शहास सुचविलें कीं, 'तुम्ही माळव्यांत चला म्हणजे तेथें खंडणीचा पैसा चापून मिळेल.' अशीच सुचना नजीबानें सुरजमल्ल जाठास दिली, त्यावरून जाठानें शहास पेशकश[1] भरून माळव्यावर स्वारी करण्यास आपली लहानशी फौज बरोबर देण्याचें कबूल केलें. मराठ्यांनाही खरेंच वाटलें कीं शहा दक्षिणेवर चालून जातो. असे बेत सुरू झाले, ते शहाच्या परदेशी अफगाणांस कळतांच त्यांनीं एकच गिल्ला करून साफ सांगितलें " आज तीन वर्षें आम्ही या वनवासांत सारख्या यातना भोगीत आहों; आणि एवढे कष्ट केल्यासारखी प्राप्ति तर आम्हांस कांहींच झाली नाहीं. हिंदुस्थानांत थोडा बहुत प्रदेश

---

१ नजराणा, खंडणी.

तुम्हीं हस्तगत केला, तो सर्व रोहिल्यांचे ताब्यांत गेला. कांहीं थोडी लूट आली, ती सुद्धां केवळ मातीमोलानें या रोहिल्यांनींच आमचेपासून दाबली. रुपयाच्या जिनसास आमचे हातीं दोन आणे सुद्धां पडले नाहींत. पोटास नसल्यामुळें येईल ती किंमत घेणें आम्हांस भाग पडलें. इराणांत किंवा तुराणांत जाऊन जर आम्ही इतके लढलों असतो तर आजपावेतों आम्हांस सोनें, चांदी, घोडे यांची केवढी तरी किफायत झाली असती. पण हिंदुस्थानांतील या मराठ्यांजवळ आहे काय? नुसते कुल्ले झांकण्यास सुद्धां पुरेसा कपडा त्यांजवळ नाहीं. हातांत एक सोटा मात्र असावयाचा. त्यांच्या घोड्या आमचे हस्तगत झालेल्या पहाव्या, तों त्या एकेकीस चार तुमानसुद्धां कोणी देणार नाहीं. अशा स्थितींत आम्ही आतां या देशांत क्षणभर सुद्धां राहणार नाहीं;" असा शहाच्या अफगाणांनीं गिल्ला केला, त्याच वेळीं प्रखर उन्हाळा सुरू होऊन लष्करांतील घोडे व माणसें पटापट मरूं लागलीं. त्यामुळें दुराणी लोक परत जाण्याचा हट्ट धरून बसले. त्यांजपुढें शहाचा कांहीं इलाज चालेना. म्हणून त्यास मुकाट्यानें स्वदेशीं प्रयाण करणें भाग झालें. नजीबास हा प्रकार बिलकूल रुचला नाहीं. त्यानें शहास नानाप्रकारें विनविलें कीं 'तुमचे फौजेचा खर्च होईल तो सर्व मी देतों. आतां पुढें लढण्याचें प्रयोजनच उरलेलें नाहीं. आपण माळव्यांत चला कीं, मी निजामअलीखानास नर्मदेवर आणून आपणांस भेटवितों. हें भले मोठे नवीन समृद्ध राज्य आपले हातीं येण्याची ही संधि आहे.' याचे उलट खानाच्या खास पथकांनीं परत जाण्याचा हट्ट धरल्यामुळें शहानें कंदहाराकडे प्रयाण केलें. त्याबरोबर शुजाउद्दौला व रोहिले सरदार हेही आपापल्या ठिकाणांकडे चालते झाले.

प्रयाण करण्यापूर्वीं अहंमदशहानें वजीर शहावलीखानाचे सल्ल्यानें दिल्लीच्या वजिरीचीं वस्त्रें इमादुल्मुल्क याजकडे पाठवून दिलीं; आणि त्यास लिहून कळविलें कीं, "तुम्ही आमचे प्रतिनिधि म्हणून दिल्लीस येऊन बादशहाचा कारभार करावा." शहावलीखानाचा भाऊ याकूब अलीखान याजबरोबर शहानें वजिरीचा खिलत व कलमदान वगैरे मामुली वस्तु रवाना केल्या, त्या मथुरा येथें आणून त्यानें इमादुल्मुल्काचे हवालीं केल्या. त्यावरून पुढील उद्योगाचे पुष्कळ नवीन मनोरथ इमादनें बांधिले. नजीबुद्दौला पुढें दिल्लीहून बागपतास गेला. दिल्लीच्या किल्ल्यांत आलमगीर बादशहाची आई व पुत्र मीर्झा जवानबख्त होते ते इमादच्या धास्तीनें अगदीं घाबरून गेले, तेव्हां नजीबानें त्यास सांगून पाठविलें, कीं "इमादचे हातीं कारभार आला तर तो खात्रीनें दुसरा बादशहा मसनदीवर बसवील किंवा पूर्वीं शहाजहान सानीस त्यानें बादशहा केलें होतें त्यासही काढून टाकील."

समाप्त

# सूचि

